॥ श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ॥

# अध्याय चौदावा

**जयजय आचार्या। समस्तसुरवर्या। प्रज्ञाप्रभातसूर्या। सुखोदया॥ १॥**

**अर्थ**—परब्रह्माचा उपदेश करणाऱ्या हे सद्‌गुरो! जे आपण ब्रह्मदेवादि सर्व देवांना पूज्य, प्रज्ञारूप प्रभात करणारे सूर्य व चित्तांत ब्रह्मसुखाचा उदय करणारे आहात, त्या तुमचा जयजयकार असो॥ १॥

**गूढार्थदीपिका—आचार्या**—"आचार्यवान् पुरुषो वेद" इत्यादि श्रुतीतून 'आचार्य' हा शब्द ब्रह्मोपदेशक गुरुलाच लावला आहे.

**प्रज्ञाप्रभातसूर्या**—ज्याप्रमाणे रात्रीचा अंध:कार संपल्यानंतर पहाट करणारा सूर्य असतो; त्याप्रमाणे श्रीगुरु हे जीवाचे ठिकाणी असलेला अनादि अविद्या अंध:कार नाहीसा करून ब्रह्मोपदेशाने परब्रह्माला व्यापणाऱ्या विद्यावृत्ति अशा शुद्धबुद्धिरूप प्रज्ञेची पाहाट करणारे सूर्य आहेत.

**सुखोदया**—श्रीगुरुच्या कृपेनेच ब्रह्मसुखाचा उदय होतो.

**जयजय सर्व विसांवया। सोहंभावसुहावया। नाना लोक हेलावया। समुद्रा तूं॥ २॥**

**अर्थ**—हे श्रीगुरो! आपण संसारात शीणलेल्या सर्वाचे विश्रांतिस्थान, सोहंभावाने शोभणारे अनेक लोकरूप लाटांना आधारभूत समुद्र आहात. त्या तुमचा जयजयकार असो॥ २॥

**गूढार्थदीपिका—सर्व विसांवया। सोहंभावसुहावया—**

श्रीगुरुच्या सहवासात सर्व संसारदु:खाचा विसर पडतो-म्हणजे सर्व दु:खे नाहीशी होतात व सोहंभावाची प्रतीति येते.

**नानालोक हेलावया। समुद्रा तू—**

सर्व ब्रह्मांड श्रीगुरुच्या सत्तेवरच भासते. येथे परमेश्वराच्या ऐक्याने श्रीगुरुचे स्तवन केले आहे श्रीगुरु म्हणजे परमेश्वराचेच स्वरूप होय, हे दाखविले आहे.

**आइकें गा आर्तबंधू। निरंतरकारुण्यसिंधू। विशदविद्यावधू—। वल्लभा जी॥ ३॥**

**अर्थ**—हे श्रीगुरो! माझी विनंति ऐका. आपण दीनदु:खितांचे बंधु (कैवारी), अखंड करुणेचे समुद्र व स्पष्ट प्रगट झालेली जी ब्रम्हविद्या, हीच कोणी वधु, तिचे पति आहात॥ ३॥

**गूढार्थदीपिका—निरंतरकारुण्यसिंधू**—श्रीगुरु केवळ करुणेचीच मूर्ती असते.

**आर्तबंधू**—पण ते दीनदु:खितांशी मात्र बंधुप्रमाणे वागतात.

**विशदविद्यावधू—। वल्लभा—**

पत्नी जशी पतीचे स्वाधीन होऊन राहते त्याप्रमाणे ब्रह्मविद्या ही श्रीगुरुचे सर्वस्वी स्वाधीन होऊन राहते, असा अर्थ.

माउलीने "मोक्षाची सोडी बांधी करी" (ज्ञा. अ. १२-२२०) "तेथ जाये पाईक जैसा" (ज्ञा. अ. ११-९९) इत्यादि ओव्यांनी हेच सांगितले आहे.

**तूं जयांप्रति लपसी। तयां विश्व हें दाविसी। प्रकटु तैं करिसी। आघवेंचि तूं॥ ४॥**

**अर्थ**—तू ज्यांना आपल्याला दाखवित नाहीस किंवा तू ज्याच्यापासून लपून राहतोस, त्यांना हे विश्व दाखवितोस व ज्यांना प्रगट होतोस त्यांना, हे संपूर्ण तूच आहेस, असा प्रत्यय आणून देतोस॥ ४॥

**गूढार्थदीपिका—प्रकटु तै करिसी। आघवेचि तू—**

त्रिगुणात्मक प्रतीति अज्ञानजन्य असून आत्मज्ञानाने अज्ञान नष्ट झाले की जीवाने कल्पिलेले जगद्वस्तुत्व नष्ट

होऊन नामरूपे परब्रह्माशी ऐक्य पावतात व नामरूपासह एक सगुण सच्चिदानंद परब्रह्मच अनुभवाला येते, हेच माउलींनी येथे दाखविले आहे.

**कीं पुढिलाची दृष्टि चोरिजे। हा दृष्टिबंध निफजे। परी नवल लाघव तुझें। जें आपणपें चोरे॥ ५॥**

**अर्थ**—पाहाणाऱ्यांची दृष्टि चोरणे-म्हणजे त्या दृष्टीला भ्रम उत्पन्न करणे-असा हा दृष्टिबंदीचा किंवा नजरबंदीचा प्रकार गारुडी दाखवित असतो; पण हे श्रीगुरो भगवंता! तुमचे नाटक असे आश्चर्यकारक आहे, की तुम्ही आपल्यालाहि चोरून ठेवता॥ ५॥

**गूढार्थदीपिका**—गारुडी पाहाणाऱ्यांची नजरबंदी करून आपल्याहून भिन्न अशा वस्तूचे ठिकाणी लोकांना भ्रम उत्पन्न करतो व आपण सर्वांना दिसतो; पण भगवान अद्वैतस्वरूप असल्यामुळे त्याच्या ठिकाणी अज्ञानी जनांना जे भ्रमाने जगत् भासते, त्याच्या योगाने तो (परमात्मा) दिसेनासा होतो.

नामरूपे ही परमेश्वराची शक्ति आहे, म्हणूनच त्या नामरूपामुळे होणाऱ्या जगताला विद्यारण्यांनी सोपाधिकभ्रम म्हटले आहे.

मागे तेराव्या अध्यायात अध्यात्मरामायणातील अहिल्येने केलेल्या स्तुतीतील वचन उदाहृत करून भगवन्विमुखाला भगवंताची माया भगवंताला लोपून ठेवून भ्रम उत्पन्न करते व भगवत्संमुख असलेल्यांना ती सर्व भगवत्स्वरूप आहे, असे दाखविते, असे सांगितले आहे.

मूळात भगवंताची मायाशक्ति व भगवान दोघेहि सच्चिदानंदस्वरूप म्हणून अभिन्न असल्यामुळे येथे माउलीने ही सर्व भगवंताची लीला होय, असे जे म्हटले आहे, ते योग्यच होय.

**जे तूंचि तूं सर्वा यया। मा कोणा बोध कोणा माया। ऐसिया आपेंआप लाघविया। नमो तुज॥ ६॥**

**अर्थ**—पण हे श्रीगुरो! हे सर्व तूच असल्यामुळे कोणाचे ठिकाणी ज्ञान, व कोणाचे ठिकाणी अज्ञान, अशी तू आपणच आपली लीला करून दाखवितोस, त्या तुला नमस्कार असो॥ ६॥

**गूढार्थदीपिका—न निरोधो न चोत्पत्तिर्न बद्धो न च साधकः। न मुमुक्षुर्न वै मुक्त इत्येषा परमार्थता॥ ३२॥**

(मांडुक्यकारिका २-३२)

या मांडुक्यकारिकेत सांगितल्याप्रमाणे जग नाही, जगाची उत्पत्ति नाही, प्रलय नाही, कोणी बद्ध नाही कोणी साधक नाही, कोणी मुमुक्षु नाही, कोणी मुक्त नाही एक अविच्छिन्न आत्मस्वरूपच आहे.

**जाणों जगीं आप वोलें। तें तुझिया वोला सुरस जालें। तुझेनि क्षमत्व आलें। पृथ्वीयेसी॥ ७॥**

**अर्थ**—जगात पाणी जे ओलेपणाने दिसते, ते तुझ्याच आर्द्रतेमुळे गोड झाले आहे. तुझ्या क्षमागुणामुळेच पृथ्वीचे ठिकाणी क्षमागुण आला आहे.॥ ७॥

**रविचंद्रादि शुक्ति। उदय करिती त्रिजगतीं। तें तुझिया दीप्ती। तेज तेजां॥ ८॥**

**अर्थ**—(तुझ्याशी तुलना केली असता) शिंपेसारखे दिसणारे सूर्यचंद्र हे जे सर्व त्रैलोक्याला प्रकाशित करतात, ते त्यांना तुझे देदीप्यमान तेज मिळाले, म्हणूनच होय॥ ८॥

**गूढार्थदीपिका**—सृष्टितील सर्व चराचर पदार्थांचे ठिकाणी दिसून येणाऱ्या सर्वशक्तीचा उद्बोधक एक परमेश्वरच आहे, हे मागे सांगितलेच आहे. (ज्ञा. गू. दी. अ. ११)

**जें चळवळिजे अनिळें। तें दैविकेनि जी निजबळें। नभ तुजमाजीं खेळें। लपीथपी॥ ९॥**

**अर्थ**—वायु इकडे तिकडे वाहतो, ते देवा! तुझेच बळ होय. आकाशहि तुझ्यामध्येच लपाछपीचा खेळ खेळते॥ ९॥

**गूढार्थदीपिका-नभ तुजमाजी खेळे। लपीथपी—**

आधारभूत भगवंताची सत्ताच, अज्ञानी जीवाने कल्पिलेल्या सृष्टीला अवकाश देणारी अशी, आकाशरूपाने अज्ञानी लोकांच्या प्रत्ययाला येते व आत्मज्ञानानंतर ते आकाशच केवळ सत्तारूपाने ज्ञानी लोकांच्या प्रत्ययाला येते, हेच आकाशाचे परब्रह्माच्या ठिकाणी लपीछपीचा खेळ खेळणे होय.

**किंबहुना माया असोस। ज्ञान जी तुझेनि डोळस। असो वानणें सायास। श्रुतीसि हें॥ १०॥**

**अर्थ**—फार काय सांगावे! तुझी मायाशक्ति तुझ्यामुळेच अगाध झाली आहे व ज्ञानहि तुझ्या कृपेनेच डोळस होत असते. असो, तुझे गुणवर्णन करणे वेदालाहि कठीण आहे॥ १०॥

**गूढार्थदीपिका**—**डोळस**-म्हणजे ब्रह्मसाक्षात्कार करण्याजोगे किंवा परब्रह्माला जाणण्याजोगे.

**वेद वानूनि तंवचि चांग। जंव न दिसे तुझें आंग। मग आम्हां तया मूग। एके पांती॥ ११॥**
**जी एकार्णवाचे ठाईं। पाहतां प्रलयमेघाचा पाड नाहीं। मा महानदी काई। निवडू येती॥ १२॥**
**कां उदयलिया भास्वतु। चंद्र जैसा खद्योतु। आम्हां श्रुती तुजआंतु। तो पाडु असे॥१३॥**
**आणि दुजया थांव मोडे। जेथ परेसी वैखरी बुडे। तो तूं मा कोणें तोंडें। वानावासी॥ १४॥**

**अर्थ**—तुझ्या स्वरूपाचा प्रत्यय येत नाही तोपर्यंत वेद, तुझी उत्तम स्तुति करणारा म्हणून गौरवास पात्र होतो आणि तुझा प्रत्यय आला की वेद व आम्ही दोघेहि एका मौनाच्या पंक्तीतच बसतो॥ ११॥ प्रलयकाली सातहि समुद्र एकत्र मिळून एकच समुद्र झाला असता जेथे त्याच्याशी प्रलयकाळच्या मेघाला देखील बरोबरी करता येत नाही, तेथे त्याच्याशी तुलना करण्यास महानदी निवडता येईल काय?॥ १२॥ किंवा सूर्य उगवल्याबरोबर चंद्र जसा त्यापुढे काजव्यासारखा होतो, तशीच आमची व वेदाची तुझ्याशी तुलना होऊ शकते॥ १३॥ तुझ्या स्वरूपाचे ठिकाणी दुसऱ्या वस्तुला अवकाशच राहत नाही व परा, पश्यंति, मध्यमा आणि वैखरी या चारहि वाणी लय पावतात; म्हणून वर्णन करण्यास वाचाच शिल्लक राहत नाही. त्या तुझ्या स्वरूपाचे कोण्या मुखाने वर्णन करता येणार?॥ १४॥

**गूढार्थदीपिका**—परब्रह्माच्या स्वरूपाचा साक्षात्कार परब्रह्माहून अलग राहून होत नसून त्याच्याशी ऐक्य पावून होत असतो; म्हणूनच वाणीला मौन पडते.

**यालागीं आतां। स्तुती सांडूनि निवांता। चरणीं ठेविजे माथा। हेंचि भलें॥ १५॥**
**तरी तु जैसा आहासि तैसिया। नमो जी श्रीगुरुराया। मज ग्रंथोद्यम फळावया। वेव्हारा होईं॥ १६॥**
**आतां कृपाभांडवल सोडीं। भरीं मति माझी पोतडी। करीं ज्ञानपद्यजोडी। थोरा मातें॥ १७॥**
**मग मी संसरेन तेणें। करीन संतांसी कर्णभूषणें। लेववीन सुलक्षणें। विवेकाचीं॥ १८॥**
**जी गीतार्थानिधान। काढू माझें मन। सुयीं स्नेहांजन। आपुलें तूं॥ १९॥**

**अर्थ**—याकरिता स्तुति करणे सोडून देऊन निवांतपणे तुझ्या चरणांवर मस्तक ठेवावे, हेच मला उत्तम वाटते॥ १५॥ हे सद्‌गुरुराया! तरी जसा तू असशील तशाच तुला माझा नमस्कार असो आणि माझा ग्रंथ करण्याचा उद्योग सफल होण्याकरिता तू भांडवल पुरविणारा सावकार हो॥ १६॥ आता माझ्याकरिता आपले कृपारूप भांडवल मोकळे कर. माझी बुद्धिरूप पिशवी त्याने भरून दे व ज्ञान प्रगट करणाऱ्या अशा पदांची मला थोर (पूर्ण) जोड प्राप्त करून दे॥ १७॥ मग त्या भांडवलाने उद्युक्त होऊन मी संतांना उत्तम लक्षणे असलेली विवेकांची कर्णभूषणे करीन व ती संतांच्या कानात घालीन-म्हणजे ज्यात विवेक स्पष्ट दिसेल, अशी विवेकांची उत्तम लक्षणे ऐकवीन॥ १८॥ हे श्रीगुरुराया! गीतापद्यात भगवंतांनी ठेवलेला अर्थरूपी ठेवा, माझे मन काढू शकेल, असे आपले प्रेमरूपी अंजन तू माझ्या मनःचक्षूंना लाव॥ १९॥

**गूढार्थदीपिका**—**"यस्य देवे पराभक्तिर्यथा देवे तथा गुरौ। तस्यैते कथिताह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः॥ (श्वे. उ.)"**

सगुण भगवान व श्रीगुरु यांचे ठिकाणी निःसीम प्रेमरूप पराभक्ति करणाऱ्यांनाच भगवंताच्या वचनांचा खरा अर्थ समजू शकतो, अशी श्वेताश्वतर उपनिषदात श्रुती आहे.

या श्रुतीतील तत्त्वाला धरूनच माउलींनी श्रीगुरुची याचना केली आहे.

ज्ञानेश्वर महाराज गीतेचा अर्थ सांगण्यास पात्र अधिकारी कां? याचा उहापोह आम्ही मागे गीतेच्या दहाव्या अध्यायातील ओवी ४७ वरील गूढार्थदीपिकेत केलेलाच आहे.

**हे वाक्‌सृष्टि एके वेळे। देखतु माझे बुद्धीचे डोळे। तैसा उदैजो जी निर्मळें। कारुण्यबिंबें॥ २०॥**

**माझी प्रज्ञावेली वेल्हाळ। काव्यें होय सुफळ। तो वसंत होयी स्नेहाळ। शिरोमणी॥ २१॥**
**प्रमेयमहापुरें। हे मतिगंगा ये थोरे। तैसा वर्ष उदारे। दिठीवेनी॥ २२॥**
**अगा विश्वैकधामा। तुझा प्रसादचंद्रमा। करू मज पूर्णिमा। स्फुर्तीची जी॥ २३॥**
**जी अवलोकिलिया मातें। उन्मेषसागरीं भरितें। वोसंडेल स्फूर्तीतें। रसवृत्तीचे॥ २४॥**
**तंव संतोषोनि श्रीगुरुराजें। म्हणितलें विनतिव्याजें। मांडिलें देखोनि दुजें। स्तवनमिषें॥ २५॥**

**अर्थ**—माझ्या बुद्धीचे डोळे एकाच वेळेला संपूर्ण वाङ्मयसृष्टि पाहू शकतील अशा रीतीने शुद्ध केवळ करुणेची मूर्ति होऊन तू माझ्या ठिकाणी प्रगट व्हावे॥ २०॥ प्रेम करणाऱ्यांमध्ये श्रेष्ठ अशा श्रीगुरो! माझी बुद्धिरूपी विस्तारलेली वेली ज्या वसंतऋतुमुळे काव्यरूपाने फलद्रूप होईल तो वसंतऋतु तू हो॥ २१॥ माझी बुद्धिरूपी गंगा सिद्धान्तरूपी थोर महापुराने भरून येईल असा तू अत्यंत उदार होऊन आपल्या कृपादृष्टीचा वर्षाव कर॥ २२॥ विश्वाला एकमेव आधार असलेल्या श्रीगुरो! तुझा कृपाप्रसादरूपी चंद्र मला स्फूर्तीची पौर्णिमा करो-म्हणजे पूर्ण स्फूर्ति देवो॥ २३॥ त्वां मजकडे कृपादृष्टीने पाहिल्यास ज्ञानसमुद्रावर उठणाऱ्या स्फूर्तीला रसवृत्तीचे-म्हणजे साहित्य अलंकाराचे-भरते ओसंडू लागले॥ २४॥ स्तुति करण्याच्या निमित्ताने अत्यंत नम्रतेने नाममात्र द्वैत स्वीकारलेले पाहून श्रीगुरु निवृत्तिनाथ महाराज संतुष्ट होऊन म्हणाले॥ २५॥

**हें असो आतां वांजटा। तो ज्ञापनार्थ करूनि गोमटा। ग्रंथा दावीं उत्कंठा। भंगों नेदीं॥ २६॥**
**हो कां जी स्वामी। हेंचि पाहात होतों मी। जे श्रीमुखें म्हणा तुम्हीं। ग्रंथ सांग॥ २७॥**
**सहजें दुर्वेचा डिरु। आंगेंचि तंव अमरु। वरी आला पूरु। पीयूषाचा॥ २८॥**
**तरी आता येणें प्रसादें। विन्यासें विदग्धें। मूळशास्त्रपदें। वाखाणीन॥ २९॥**
**परी जीवा आंतुलीकडे। जैसी संदेहाची डोणी बुडे। ना श्रवणीं तरी चाडे। वाढी दिसे॥ ३०॥**
**तैसी बोली साचारी। अवतरो माझी माधुरी। माले मागूनि घरी। गुरुकृपेच्या॥ ३१॥**
**तरी मागां त्रयोदशीं। अध्यायीं गोष्ठि ऐसी। श्रीकृष्ण अर्जुनेसी। चावळले॥ ३२॥**
**जे क्षेत्रक्षेत्रज्ञयोगें। होइजे येणें जगें। आत्मा गुणसंगें। संसारिया॥ ३३॥**
**आणि हाचि प्रकृतिगतु। सुखदु:खभोगीं हेतु। अथवा गुणातीतू। केवळु हा॥ ३४॥**

**अर्थ**—हे व्यर्थ बोलणे आता पुरे. भगवंतांनी अर्जुनाला सांगितलेला अर्थ आम्हाला सुंदर ग्रंथरूपाने विदित करून दाखव आमच्या ऐकण्याच्या इच्छेचा भंग होऊ देऊ नको॥ २६॥ श्रीगुरुच्या मुखातून अशी अक्षरे निघाल्याबरोबर श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात, "हो जी महाराज!" "ग्रंथ सांगा" असे आपण आपल्या मुखाने मला म्हणावे, याचीच मी वाट पाहत होतो॥ २७॥ हरळी आधीच अमर, त्यातहि अमृताचा पूर आला, तसे झाले आहे॥ २८॥ आता आपण केलेल्या आज्ञारूप प्रसादाने गीतेतील मूळ पदांचे साहित्यअलंकारांनी युक्त असे मी प्रतिपादन करीन॥ २९॥ ज्या रीतीने जीवाच्या अंत:करणातील संशयाची नौका बुडून जाईल, आणखी श्रवणेंद्रियाच्या ठिकाणी ऐकण्याची अत्यंत इच्छा वाढेल॥ ३०॥ तसे खरोखर मधुर झालेले बोलच माझ्या मुखातून निघावे, अशी गुरुकृपेच्या घरी माले-म्हणजे खंडोबाचा नागर गळ्यात घालून मागितलेली भिक्षा-मी मागतो॥ ३१॥ तरी मागील तेराव्या अध्यायात भगवान श्रीकृष्णाचे अर्जुनाशी असे बोलणे झाले की॥ ३२॥ क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या संयोगाने हे सर्व जगत् उत्पन्न होते आणि गुणाच्या संगामुळेच आत्मा संसारी किंवा जीवरूप भासतो॥ ३३॥ आणि अशा रीतीने प्रकृतीत सापडणे हेच त्याच्या सुखदु:खाचे कारणहि आहे. अथवा गुणाचा संबंध सोडून पाहता आत्मा हा मूळचा गुणातीतच आहे व राहतो॥ ३४॥

**गूढार्थदीपिका-अथवा गुणातीतू। केवळु हा—**

जीवाने गुण व गुणाच्या संगाची कल्पना केली असल्यामुळे तो मुळात गुणरहित शुद्धच आहे, असे अर्थातच सिद्ध होते.

**तरी कैसा पां असंगा संगु। कोण तो क्षेत्रक्षेत्रज्ञयोगु। सुखदुःखादि भोगु। केवीं तया॥ ३५॥**
**गुण ते कैसे किती। बांधती कवणे रीती। ना तरी गुणातीतीं। चिन्हें काई॥ ३६॥**
**एवं इया आघवेया। अर्था रूप करावया। विषो एथ चौदाविया। अध्यायासी॥ ३७॥**
**तरि तो आतां ऐसा। प्रस्तुत परियेसा। अभिप्रावो विश्वेशा। वैकुंठाचा॥ ३८॥**

**अर्थ**—तरी असंग अशा आत्मस्वरूपाला त्रिगुणाचा संग कसा झाला. क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचा संबंध तो कोणता आणि त्याला सुखदुःखाचे भोग कसे होतात?॥ ३५॥ गुण कोणते आहेत व ते किती आहेत? ते जीवाला कोणत्या रीतीने बांधतात? किंवा आत्म्याला गुणातीत केव्हा म्हटले जाते?॥ ३६॥ याप्रमाणे या सर्व संशयाचा उलगडा करणे हाच या चवदाव्या अध्यायाचा विषय आहे॥ ३७॥ तरी सर्व ब्रह्मांडाचा ईश्वर जो वैकुंठ (परमात्मा) त्याचा या प्रश्नांविषयी अभिप्राय पुढीलप्रमाणे आहे. तो आता सांगतो, श्रवण करा॥ ३८॥

*श्रीभगवानुवाच*

**परं भूयः प्रवक्ष्यामि ज्ञानानां ज्ञानमुत्तमम्। यज्ज्ञात्वा मुनयः सर्वे परां सिद्धिमितो गताः॥ १॥**

**अर्थ**—श्रीभगवान म्हणतात—जे ज्ञान सर्व ज्ञानात उत्तम आहे व जे प्राप्त करून घेऊन सर्व मुनी या देहापासून सुटून परमसिद्धीला प्राप्त झाले, असे प्रकृतीच्या पलीकडे असलेल्या पुरुषाचे परमज्ञान आता पुनः तुला सांगतो॥ १॥

**तो म्हणे गा अर्जुना। अवधानाची सर्व सेना। मेळऊनि इया ज्ञाना। झोंबावें हो॥ ३९॥**
**आम्हीं मागां तुज बहुतीं। दाविलें हे उपपत्तीं। तरी आझुनी प्रतीती-। कुशी न रिघे॥ ४०॥**
**म्हणौनि गा पुढती। सांगिजेल तुजप्रती। पर म्हणोनि श्रुतीं। डाहारिलें जें॥ ४१॥**
**एऱ्हवीं ज्ञान हें आपुलें। परि पर ऐसेनि जालें। जे आवडोनि घेतलें। भवस्वर्गादिक॥ ४२॥**
**अगा याचि कारणें। हें उत्तम सर्वांपरी मी म्हणें। जे वन्हि हें तृणें। येरें ज्ञानें॥ ४३॥**

**अर्थ**—भगवान श्रीकृष्ण म्हणतात, अर्जुना! एकाग्रतेची सर्व सेना एकत्र करून म्हणजे इंद्रिये, मन वगैरे एकत्र करून-या ज्ञानाला ग्रहण केले पाहिजे॥ ३९॥ मागे आम्ही तुला नाना उपपत्तीने जे ज्ञान सांगितले आहे; पण अजुनहि तुझ्या अंतःकरणात त्याचा अनुभव आलेला दिसत नाही॥ ४०॥ म्हणून अर्जुना! ज्या ज्ञानाला श्रुतीने पर-म्हणजे श्रेष्ठ-असे वारंवार म्हटले आहे, ते ज्ञान तुला पुनः सांगतो॥ ४१॥ खरोखर ज्ञान हे आपले आत्मस्वरूप होय. ते विसरून जीवाने आपल्या अंतःकरणात संसारस्वर्गादिकांचे ज्ञानच आवडीने धरून ठेवल्यामुळे आपल्या आत्मस्वरूपाच्या ज्ञानाला "पर" असे म्हणण्यात आले आहे॥ ४२॥ अर्जुना! या कारणामुळे आत्मस्वरूपाचे ज्ञान सर्वांपेक्षा उत्तम आहे, असे मी म्हणतो; कारण आत्म्याचे ज्ञान हे अग्निरूप असून तद्व्यतिरिक्त स्वर्ग-संसार याची ज्ञाने वाळलेल्या गवताप्रमाणे आहेत॥ ४३॥

**गूढार्थदीपिका**—ज्याप्रमाणे वाळलेले सर्व गवत अग्नीने भस्म होते व मग ते गवत दिसत नाही, त्याप्रमाणे अज्ञानकाळी भवस्वर्गादिक वस्तुरूप आहेत असे वाटत असल्यामुळे त्याचे ज्ञान होत असते; पण आत्मज्ञान झाल्यावर ते अज्ञान भ्रमजन्य आहे. वस्तुतः त्यांचे अस्तित्वच नाही, असे समजून येत असल्यामुळे ज्ञानानंतर पूर्वीप्रमाणे त्यांचे वस्तुरूपाने ज्ञानच होत नाही. असे माऊलीनी "जे वन्हि हे तृणे। येरे ज्ञाने" या चरणांनी सुचविले आहे.

**जियें भवस्वर्गातें जाणती। यागचि चांग म्हणती। पारखी फुडी आथी। भेदीं जेयां॥ ४४॥**
**तियें आघवींचि ज्ञानें। केलीं येणें स्वप्नें। जैशा वातोर्मी गगनें। गिळिजती अंतीं॥ ४५॥**
**कां उदितें रश्मिराजें। लोपिलीं चंद्रादि तेजें। नाना प्रळयांबुमाजें। नदी नद॥ ४६॥**
**तैसें हे येणें पाहलेया। ज्ञानजात जाय लया। म्हणोनियां धनंजया। उत्तम हें॥ ४७॥**
**अनादि जे मुक्तता। आपुली असे पांडुसुता। तो मोक्षु हाता येता। होय जेणें॥ ४८॥**

**अर्थ**—ज्या ज्ञानाच्या योगाने संसार-स्वर्ग हेच जाणले जातात व त्यांच्या प्राप्तीचे साधन म्हणून यज्ञयागादि-कर्माची चांगली म्हणून प्रशंसा केली जाते. ज्या ज्ञानाच्या योगाने भेद किंवा द्वैतच सत्य म्हणून स्पष्ट ओळखले

जाते ॥ ४४ ॥ ज्याप्रमाणे कल्पांतसमयी आकाश संपूर्ण वायूच्या लाटांना गिळून टाकते, त्याप्रमाणे या आत्मविषयक ज्ञानाने संपूर्ण इतर ज्ञाने स्वप्नवत् मिथ्या ठरतात ॥ ४५ ॥ किंवा हजारो किरणांनी युक्त अशा सूर्याचा उदय झाल्याबरोबर चंद्रादिकांचे तेज लोपले जाते. किंवा प्रलयात एकार्णवाची स्थिती झालीं असता सर्व नदीनदांचा अलगपणा नाहीसा होतो ॥ ४६ ॥ त्याप्रमाणे ही आत्मज्ञानदृष्टि प्रगट झाली असता संपूर्ण ज्ञाने लयाला जातात; म्हणून आम्ही, अर्जुना! आत्मज्ञानाला उत्तम म्हणतो ॥ ४७ ॥ अर्जुना! जीवाची जी अनादिमुक्तस्थिति आहे ती ज्या आत्मज्ञानाच्या योगाने प्राप्त होते ॥ ४८ ॥

**गूढार्थदीपिका—अनादि जे मुक्तता-**

अविद्याभ्रम काल्पनिकच असल्यामुळे तो होता तेव्हाहि खरोखर नव्हता; म्हणून मी केव्हाच अविद्येने बद्ध झालो नाही, सदासर्वदा मुक्त म्हणजे अविद्यारहितच आहे. असा जो आत्मज्ञानाने अनुभव येतो, त्याला अनादिमुक्ततेचा अनुभव म्हणतात. असा अनुभव असलेल्या ज्ञान्यालाच खरा ज्ञानीपुरुष म्हटले जाते. 'मी पूर्वी बद्ध होतो, आता मुक्त झालो' असे ज्या ज्ञान्याला वाटते तो ज्ञानी अजून भ्रांतीतच आहे, असे म्हणावे लागते. ''म्हणोनि बंधचि तंव वावो। मा मोक्षा के प्रस्तावो'' (अमृ० प्र० ३-१५) 'मी बद्ध आहे' असे म्हणणे जेथे भ्रांतिजन्य म्हणून व्यर्थ आहे, येथे ''मी मुक्त झालो'' हे म्हणणेहि भ्रांतिजन्यच होते. नित्यमुक्त आत्म्याचे ठिकाणी बंधमोक्षाला वाव नसल्यामुळे बंध व मोक्ष मानणे हे दोन्ही प्रकार भ्रांतिजन्य ठरतात, असे माऊलींनी अमृतानुभवांतहि म्हटले आहे.

**जयाचिया प्रतीती। विचारवीरीं समस्तीं। नेदिजेचि संसृती। माथां उधऊं ॥ ४९ ॥**
**मनें मन घालूंनि मागें। विश्रांति जालिया आंगें। ते देहीं देहाजोगे। होतीचि ना ॥ ५० ॥**

**अर्थ**—ज्या ज्ञानाचा अनुभव आला असता विचारशक्ति प्राप्त होऊन विचारवंत झालेले सर्व वीर संसाराला डोके वर काढू देत नाहीत. म्हणजे ज्या ज्ञानविचाराने संसाराचे अस्तित्व आहे, असे कधीच वाटत नाही ॥ ४९ ॥ मनानेच मन मागे सारून व शरीराने विश्रांतिस्वरूप झाल्यावर ते देहात असूनही देहाजोगे होत नाहीत. म्हणजे देहाशी ऐक्य पावत नाहीत ॥ ५० ॥

**गूढार्थदीपिका**—मने मन लूनिया भागे। विश्रांति जालिया आंगे

**मनोहि व्दिविधं प्रोक्तं शुद्धं चाशुध्दमेवच। अशुद्धं काम संकल्पं शुद्धं कामविवर्जितम् ॥**

अशुद्ध किंवा विकारी व शुद्ध किंवा विचारी असे दोन प्रकारचे मन आहे. हे मागे सांगितलेच आहे. (ज्ञा. गु. दी. अ. ९-१७७) अशुद्ध मनाची धांव विषयाकडे असते व ती झाली असता शरीर, इंद्रिये ही सारखी विषय प्राप्तीच्या उद्योगात लागतात.

शुद्ध मनाची धाव अंतर्मुख होऊन आत्म्याकडे वळलेली असते. या विवेकयुक्त शुद्ध मनाला मागे सारले असता विषयसुख प्रवृत्ति क्षीण होत असल्यामुळे शरीर व इंद्रिये यांचा उद्योगहि शांत होतो.

**ते देही देहाजोगे। होतीचि ना—**

विषय सुखापासून, निवृत्त झालेले मन स्थिर होत असल्यामुळे त्याच्या ठिकाणी विवेकज्ञान अखंड जागृत असते; म्हणून ज्ञानी पुरुष देहात असूनही देहाशी ऐक्य पावत नाहीत. ते आत्मस्वरूप होऊनच राहतात.

**मग तें देहाचें बेळें। वोलांडूनि एकेचि वेळे। संवतुकी कांटाळें। माझें जाले ॥ ५१ ॥**

**अर्थ**—मग ते स्थूळ, सूक्ष्म, कारण, महाकारण या चार देहरूप अडवणुकीला एकदमच ओलांडून तुलनेत माझ्या बरोबरीचे होतात ॥ ५१ ॥

**गूढार्थदीपिका**—ज्ञानाने, मी सर्व देहाहून निराळा असा ब्रह्मस्वरूप आहे असे एकदम कळून येते, असा अर्थ.

**इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागताः। सर्गेऽपि नोपजायन्ते प्रलये न व्यथन्ति च ॥ २ ॥**

**अर्थ**—या ज्ञानाचा आश्रय करून जे माझ्या स्वरूपभूत धर्माला प्राप्त झाले, ते सृष्टिकाली उत्पन्न होत नाहीत व प्रलयकाली प्रलयातील दु:खाने व्यथित होत नाहीत ॥ २ ॥

**जे माझिया नित्यता। तेणें नित्य तें पांडुसुता। परिपूर्ण पूर्णता। माझियाचि॥ ५२॥**
**मी जैसा अनंतानंद। जैसाचि सत्यसंध। तैसेचि ते भेद। उरेचि ना॥ ५३॥**
**जें मी जेवढें जैसें। ते तेंचि जाले तैसें। घटभंगीं घटाकाशें। आकाश जेवीं॥ ५४॥**

**अर्थ**—हे अर्जुना! जे माझ्या नित्यपणामुळे नित्य झाले व माझ्या अखंड पूर्णतेमुळे परिपूर्ण झाले॥ ५२॥ ज्याप्रमाणे मी अमर्याद ब्रह्मानंदस्वरूप व सत्यप्रतिज्ञ आहे, तसेच तेहि असतात. माझ्यात व त्यांच्यात यत्किंचितहि भेद नसतो॥ ५३॥ ज्याप्रमाणे घट फुटला असता त्यातील आकाश महदाकाश होऊन जाते, त्याप्रमाणे मी जसा जेवढा आहे तेहि तसे तेवढे होतात॥ ५४॥

**गूढार्थदीपिका**—जीव हा मूळांत परब्रह्मस्वरूपच असल्यामुळे परब्रह्माचे नित्य, शुद्ध, सच्चिदानंदादि धर्म त्याचे ठिकाणी कायमच असतात; पण ते धर्म विसरून जीवाने त्याहून विपरित धर्म आपल्या ठिकाणी घेतले आहेत; म्हणून जीवाला आत्मज्ञान-म्हणजे माझ्या ठिकाणी आत्मधर्मच आहेत, हीच फक्त जाणीव करून घ्यावी लागते.

ज्याप्रमाणे गोडी व साखर यांचे अत्यंत तादात्म्य असते, त्याप्रमाणे सच्चिदानंदधर्म व परब्रह्म यांचे अत्यंत तादात्म्य आहे; म्हणून परब्रह्माच्या सच्चिदानंदादि धर्माची प्राप्ति म्हणजे परब्रह्माचीच प्राप्ति व सच्चिदानंदधर्माची विस्मृति म्हणजे परब्रह्माची विस्मृति होय, असे सहजच सिद्ध होते.

**नातरी दीप मूळकीं। दीपशिखा अनेकी। मीनलिया अवलोकीं। होय जैसें॥ ५५॥**
**अर्जुना तयापरी। सरली द्वैताची वारी। नांदे नामार्थ एकाहारीं। मीतूंविणे॥ ५६॥**

**अर्थ**—किंवा एका मूळ दिव्यापासून लावलेल्या अनेक दीपज्योती ज्या मूळ दिव्याशी एकत्र केल्या असता ज्याप्रमाणे त्या सर्वांची एकच ज्योत होते॥ ५५॥ अर्जुना! त्याप्रमाणे ज्ञानाने जे माझ्या स्वरूपाला प्राप्त झाले त्यांची द्वैताची पाळी संपते-म्हणजे ते माझ्याहून कधीहि निराळे होत नाहीत. 'मी-तू'-पणावाचून त्यांचे नाम व अर्थ माझ्याशी ऐक्यानेच राहतात॥ ५६॥

**गूढार्थदीपिका—नांदे नामार्थ एकाहारी। मीतूंविण—**

'मी' हा शब्द बोलणारा आपल्याला व 'तू' हा शब्द तो आपल्याहून निराळा असलेल्या पुरुषाला लावतो. याप्रमाणे 'मी' व 'तू' हे दोन शब्द परस्पराहून भिन्नार्थाला दाखविणारे आहेत, असे अज्ञानी समजतो. पण विचार केला असता असे दिसून येते की ज्या पुरुषाला बोलणारा ''तू'' म्हणून संबोधतो तो पुरुष आपल्या ठिकाणी ''तू'' या शब्दाचा ''मी'' असाच अर्थ घेतो-म्हणजे ''मी'' व ''तू'' हे शब्द भिन्न दिसत असले तरी विचारांती त्या दोघांचाहि, ''मी'' हाच एक अर्थ असतो व म्हणून शेवटी ''मी'' हाच एक शब्द उरतो.

तसेच भगवंताशी ज्ञानाने ऐक्य पावल्यानंतर ज्ञानीपुरुष 'मी'-'तू' हे शब्द वापरत असला तरी 'मी-तू'-पणावाचून म्हणजे भिन्न अर्थावाचून वापरत असतो. त्याचे परमेश्वराशी झालेले ऐक्य, मुखातून निघणाऱ्या 'मी-तू' शब्दाने बिघडत नाही. त्याच्या अंत:करणात सर्व शब्दाचा अर्थ एक परमात्माच होऊन राहतो व सर्व शब्दहि एका परमेश्वर शब्दात मिळून जातात—म्हणजे त्याच्या अंत:करणात शब्दाचे भिन्नत्वहि राहत नाही, असा भाव.

**येणेंचि पैं कारणे। जैं पहिलें सृष्टीचें जुंपणें। तैं ही तया होणें। पडेचिना॥ ५७॥**
**सृष्टीचिये सर्वादी। जयां देहाची नाहीं बांधी। तें कैचें प्रळयावधि। निमतील पां॥ ५८॥**
**म्हणौनि जन्मक्षयां। अतीत ते धनंजया। मी जाले ज्ञाना इया। अनुसरोनी॥ ५९॥**
**ऐसी ज्ञानाची वाढी। वानिली देवें आवडी। तेवींचि पार्थाही गोडी। लावावया॥ ६०॥**
**तंव तया जालें आन। सर्वांगी निघाले कान। सपाई अवधान। आतला पां॥ ६१॥**
**आतां देवाचिया ऐसें। जाकळीजत असे वोरसें। म्हणौनि निरूपण आकाशें। वेंटाळेना॥ ६२॥**
**मग म्हणे गा प्रज्ञाकांता। उजवली आजि वक्तृत्वता। जे बोला येवढा श्रोता। जोडलासि॥ ६३॥**
**तरि एकु मी अनेकीं। गोंविजे देहपाशकीं। त्रिगुणीं लुब्धकीं। कवणे परी॥ ६४॥**

**कैसा क्षेत्रयोगें। वियें इयें जगें। तें परिस सांगें। कवणे परी॥ ६५॥**
**पैं क्षेत्र येणें व्याजें। यालागीं हें बोलिजे। जे मत्संगबीजें। भूतीं पिके॥ ६६॥**

**अर्थ**—या कारणामुळेच जेव्हा पुनः कल्पारंभी सृष्टि उत्पन्न होते त्या सृष्टीत देखील त्याला उत्पन्न व्हावे लागत नाही॥ ५७॥ कल्पाच्या आरंभी उत्पन्न होणाऱ्या सृष्टीत शरीर धारण करून ज्यांना उत्पन्न व्हावे लागत नाही, ते शेवटी प्रलयात कसे मरणार?॥ ५८॥ म्हणून, अर्जुना! या ज्ञानाचा आश्रय करून जे मद्रूप झाले ते जन्ममरणरहित होतात॥ ५९॥ याप्रमाणे भगवंतांनी आवडीने व तशीच अर्जुनाला गोडी लागावी म्हणून, आत्मज्ञानाच्या थोरवीचे वर्णन केले॥ ६०॥ तेव्हा भगवंताचे बोलणे ऐकल्यावर अर्जुनाची निराळी स्थिती झाली. त्याच्या सर्वांगाचे ठिकाणी कान निघून तो नखशिखान्त अवधानाने व्यापिला गेला॥ ६१॥ फुटणाऱ्या प्रेमपान्ह्याप्रमाणे असलेले ते भगवंताचे निरूपण, भगवंताप्रमाणे अमर्याद असल्यामुळे जे आकाशाने वेटाळीता येऊ शकत नाही ते तो अर्जुन ग्रहण करू लागला॥ ६२॥ मग भगवान म्हणाले, हे बुद्धीच्या स्वामी अर्जुना! मी जेवढे बोलतो तेवढे संपूर्ण ग्रहण करण्याजोगा तू श्रोता मिळाल्यामुळे आज माझे वक्तृत्व विवाहित झाले-म्हणजे सार्थक झाले॥ ६३॥ तर मग आता मी एकच अद्वैतरूप असताना त्रिगुणरूपी व्याधाने मला अनेक देहरूपी पाशांत कसे गोविले?॥ ६४॥ तसेच माझा क्षेत्राशी कसा संबंध होतो? हे जग कशा रीतीने उत्पन्न होते? ते सर्व सांगतो, ऐक॥ ६५॥ माझ्या संगरूपी बीजाची पेरणी झाली असता भूतरूपाने पीक येते-म्हणजे अनेक प्राणी उत्पन्न होतात. एवढ्या कारणानेच त्याला क्षेत्र म्हटले जाते॥ ६६॥

**मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन्गर्भं दधाम्यहम्। सम्भवः सर्वभूतानां ततो भवति भारत॥ ३॥**

**अर्थ**—माझी महद्ब्रह्मरूप प्रकृति सर्व जगताचे जननस्थान होय. तिचे ठिकाणी मी सृष्टीचा जेव्हा गर्भ ठेवतो तेव्हा तिच्यापासून, अर्जुना! सर्व भूतांची उत्पत्ति होते॥ ३॥

**गूढार्थदीपिका—महद्ब्रह्म**-कारणाचा मोठेपणा त्याच्या होणाऱ्या कार्यविस्तारावरून कळून येतो प्रकृतिरूप कारणापासून एवढ्या मोठ्या संपूर्ण ब्रह्मांडरूप कार्याचा विस्तार झाला असल्यामुळे व तिच्यांतच तो पुन्हा लय पावत असल्यामुळे त्या ब्रह्मांडाच्या अपेक्षेने प्रकृति ही त्यापेक्षा मोठी आहे. हे 'महत्' या शब्दाने दाखविले आहे. आणि संपूर्ण कार्याचा विस्तार करणारी व त्या कार्यविस्ताराचे पोषण करणारी तीच आहे, 'हे ब्रह्म' या शब्दाने दाखविले आहे.

**मम**—जगताचे कारण जी जड प्रकृति ती परब्रह्मसत्तेवरच अभिन्न भासते, हे श्लोकांतील 'मम' या शब्दाने सूचित केले आहे.

एऱ्हवी अखंड सच्चिदानंद परमेश्वराची शक्ती त्रिगुणात्मक जड, विनाशी अशी राहणे शक्य नाही. ती सच्चिदानंदस्वरूपच आहे पण परब्रह्माची ही सच्चिदानंदशक्ति जीवाला, अज्ञान आहे तोपर्यंत केवळ त्रिगुणात्मक मायाशक्तिरूप भासते हे मागे सांगितलेच आहे. (ज्ञा० गू० दी० खंड-२ अ० ९-१०६)

**गर्भ**—जीवाच्या कल्पनारूप. प्रकृतीला परमेश्वराच्या सत्तेचा आधार प्राप्त होणे, हीच जगाची गर्भधारणा होय.

**एऱ्हवीं तरी महद्ब्रह्म। यालागीं हें ऐसें नाम। जे महदादिविश्राम-। शाळिका हें॥ ६७॥**

**अर्थ**—या प्रकृतीतून ब्रह्मांडांतील सर्व स्थूल-सूक्ष्म तत्त्वे उत्पन्न होतात व तेथेच लय पावतात. अर्थात् ती ब्रह्मांडापेक्षा मोठी आहे; म्हणून तिला महद्ब्रह्म असे साधारणता नांव दिले गेले आहे॥ ६७॥

**गूढार्थदीपिका—महदादि विश्राम। शाळिका हे-**

जगदुत्पत्ति, स्थिति, लय हे सर्व प्रकृतीच्या भूमीतच होतात-म्हणजे प्रकृति त्या त्या कार्यरूपाने परिणाम पावते व त्या सर्वांना परमेश्वरसत्तेचा आधार आहे; म्हणून परब्रह्म त्यांना विवर्त-उपादान कारण आहे.

सारांश जडविनाशी जगत्पसारा प्रकृतीचा परिणाम असून परब्रह्माचा अध्यस्त किंवा भ्रमजन्य विवर्त होय. असे वेदान्तशास्त्र म्हणते.

**विकारां बहुवस थोरी। अर्जुना हेंचि करी। म्हणोनि अवधारीं। महद्ब्रह्म॥ ६८॥**

**अर्थ**—अर्जुना! सर्व कार्यरूप पदार्थाचा विस्तार हीच (प्रकृतिच) करीत असल्यामुळे हिला महद्‌ब्रह्म म्हणतात॥ ६८ ॥

**गूढार्थदीपिका—विकारां बहुवस थोरी**-या मायेमुळेच संपूर्ण भेद उत्पन्न झाला आहे, असा अर्थ.

**अव्यक्तवादमतीं। अव्यक्त ऐसी वदंती। सांख्याचिया प्रतीती। प्रकृति हेचि॥ ६९ ॥**
**वेदांतीं इये ते माया। ऐसें म्हणिजे प्राज्ञराया। असो किती बोलों वायां। अज्ञान हें॥ ७० ॥**
**आपला आपणपेयां। विसरु जो धनंजया। तेंचि रूप यया। अज्ञानासी॥ ७१ ॥**

**अर्थ**—सृष्टीचे कारण अव्यक्त असा वाद मानणाऱ्यांच्या मतांत या महद्‌ब्रह्मालाच अव्यक्त म्हटले जाते. सांख्यशास्त्राचे अनुसरणारे या महद्‌ब्रह्मालाच प्रकृति म्हणतात॥ ६९ ॥ हे सर्व बुद्धिमानांमध्ये श्रेष्ठ असलेल्या अर्जुना! वेदांतशास्त्रात हिलाच माया म्हटले आहे. असो व्यर्थच किती सांगायचे! हेच अज्ञान होय॥ ७० ॥ अर्जुना! आपण आपले जे स्वरूप विसरलो आहो तेच अज्ञानाचे स्वरूप होय॥ ७१ ॥

**गूढार्थदीपिका**—प्रत्येक जीव, जड-विनाशी देह म्हणजे 'मी' असे समजतो. या विपरीत ज्ञानावरून जीवाला आपल्या मूळ सच्चिदानंद आत्मस्वरूपाची विस्मृति किंवा अज्ञान आहे, हे समजून येते.

**आणिकही एक असे। जें विचारावेळे न दिसे। वातीं पाहतां जैसें। अंधारें कां॥ ७२ ॥**
**हालविलिया जाय। निश्चळीं तरी होय। दुधीं जैसी साय। दुधाची ते॥ ७३ ॥**
**पैं जागारु ना स्वप्न। ना स्वरूप अवस्थान। ते सुषुप्ति कां घन। जैसी होय॥ ७४ ॥**
**कां न वियतां वायूतें। वांझें आकाश रितें। तया ऐसें निरुतें। अज्ञान गा॥ ७५ ॥**
**पैल खांब कां पुरुखु। ऐसा निश्चयो नाहीं एकु। परी काय नेणो आलोकु। दिसत असे॥ ७६ ॥**
**तेवीं वस्तु जैसी असे। तैसी कीर न दिसे। परी कांही अनारिसें। देखिजेना॥ ७७ ॥**
**ना राती ना तेज। ते संधि जेवीं सांज। तेवीं विरुद्ध ना निज। ज्ञान आथी॥ ७८ ॥**
**ऐसी कोण्ही एकी दशा। तिये वाद अज्ञान ऐसा। तया गुंडलिया प्रकाशा। क्षेत्रज्ञ नांव॥ ७९ ॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे वात उजळून त्याच्या प्रकाशाने अंधार पाहू गेल्यास तो दिसत नाही, त्याप्रमाणे विचाराने पाहू गेल्यास जे दिसत नाही ते अज्ञान होय, असेहि अज्ञानाचे स्वरूप सांगता येईल॥ ७२ ॥ (अमृ. प्र. ७-ओवी २७३-७७) ज्याप्रमाणे दुधाची साय, दूध तापवून निश्चिळ राहू दिले असता त्यावर जमते; पण दूध हालविल्याबरोबर ती दुधात मिळून जाते॥ ७३ ॥ जागृत अवस्था नाही, स्वप्नावस्था नाही किंवा समाधि नव्हे. या तिन्ही अवस्थेवेगळी जी घनदाट सुषुप्ति असते, त्याप्रमाणे जे आहे॥ ७४ ॥ किंवा वायुला उत्पन्न न करता जसे आकाश रिकामे एकटे असते व काहीच ज्ञान होत नाही, त्याच्यासारखे खरोखर हे अज्ञान आहे॥ ७५ ॥ पलीकडे खांब आहे की पुरुष आहे, असा काही एक निश्चय होत नाही, समोर काय आहे हे समजत नाही, पण नुसता भास दिसतो॥ ७६ ॥ त्याप्रमाणे आत्मवस्तु जशी आहे तशी दिसत नाही, पण भलतेहि काही दिसत नाही॥ ७७ ॥ रात्र नाही, उजेड नाही, त्या संधीला जसे सांजवेळ म्हणतात, त्याप्रमाणे आपले ज्ञान नसते व विरुद्धहि ज्ञान नसते॥ ७८ ॥ अशी जी कोणी एक दशा, तिला अज्ञान असे म्हणतात आणि त्या अज्ञानाने गुंडाळलेल्या चेतन प्रकाशाला क्षेत्रज्ञ (जीव) हे नाव आहे॥ ७९ ॥

**गूढार्थदीपिका**—येथे माऊलींनी अज्ञानाचे भावरूपत्व सिद्ध केले असून अज्ञान अनिर्वाच्य भावरूप म्हणजे जीवाने कल्पिले आहे, असे सांगितले आहे.

मी ब्रह्म जाणत नाही, अशी जी जीवाचे ठिकाणी वृत्ति स्फुरते ते अज्ञानाचेच कार्य असून तिच्यावरून जीव अज्ञानाने गुंडाळला आहे, हे प्रत्यक्ष दिसून येते.

"तेविं अविद्याकाळी सतुके। अविद्या नाही" "अविद्या येणे नांवे। मी विद्यमानचि नव्हे। हे अविद्याची

स्वभावे। सांगतसे'' (अमृ० प्र० ६-३१ व ३८) इत्यादि ओव्यातून अज्ञान वस्तुत: नाही असे जे माऊलींनी अमृतानुभवात सांगितले आहे, त्याचेच येथेहि प्रतिपादन केले आहे.

**अज्ञान थोरिये आणिजे। आपणपें तरी नेणिजे। तें रूप जाणिजे। क्षेत्रज्ञाचें॥ ८०॥**
**हाचि उभय योगु। बुझें बापा चांगु। सत्तेचा नैसर्गु। स्वभावो हा॥ ८१॥**

**अर्थ**—अज्ञान व अज्ञानाचे कार्य यांना महत्व देणारा—म्हणजे सत्य समजणारा व आपल्या स्वरूपाला न जाणणारा हाच क्षेत्रज्ञ म्हणजे जीव होय असे, जाण॥ ८०॥ अर्जुना हाच क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचा संबंध होय, हे चांगले लक्षात ठेव. सत्तेचा असा हा निसर्गत: स्वभाव आहे॥ ८१॥

**गूढार्थदीपिका—सत्तेचा नैसर्गु। स्वभाव हा-**

दोरीवर भ्रांतीने जेव्हा सर्प भासतो व तो खरा वाटतो, तेव्हा तो कार्यकारी होतो-म्हणजे भीति उत्पन्न करतो. या नेहमीच्या अनुभवावरून, खरोखर अस्तित्वात नसलेली वस्तु ही भ्रांतीने, आहे असे वाटून, तिला सत्ता मिळाली असता ती कार्यकारी होते, असा सत्तेचा नैसर्गिक स्वभाव दिसून येतो.

अज्ञान हे वस्तुत: अस्तित्वात नाही, पण जीवाने अमर्याद व अद्वैत अशा आपल्या सत्तेवरच ते मानले असल्यामुळे आत्मसत्तेने ते सत्तावान होऊन कार्यकारी झाले आहे-म्हणजे जीवाला सृष्टि, सृष्टीतील सुखदु:खे इत्यादि भासविण्याला समर्थ झाले आहे.

**किंवा**

जेव्हा एखाद्या वस्तूचे, ही अमुकवस्तु आहे असे निश्चित् ज्ञान होत नाही, कांही आहे, असे सामान्यपणे नुसते सत्तामात्र ज्ञान होते, तेव्हा त्या ज्ञानाबरोबरच त्या वस्तूच्या विशेषधर्माचे अज्ञान असते. असा हा सत्तामात्र ज्ञानाचा स्वभाव आहे.

**हाचि उभय योग-**

जीवात्म्याचे परब्रह्मत्व ज्या चिदानंदादि विशेषधर्माने जाणले जाते, ते धर्म जीवात्मा विसरून केवळ सामान्यपणे सत्तामात्र होऊन राहिला असल्यामुळे त्या जीवक्षेत्राचे ठिकाणी अनायासेच त्याच्या एका परब्रह्मस्वरूपाच्या चिदानंदादि विशेषधर्माचे अज्ञान सिद्ध होते. हाच क्षेत्रज्ञ व अज्ञान यांचा संबंध होय.

**किंवा**

क्षेत्रज्ञ जीवाने आपले सच्चिदानंदादि स्वरूप न जाणणे व अज्ञानाचे किंवा प्रकृतीचे अस्तित्व मानणे हाच क्षेत्राचा क्षेत्रज्ञाशी संबंध होय.

जीवाला सच्चिदानंदरूप विशेषधर्माचे अज्ञान आहे; म्हणूनच तो सत्तामात्र सामान्यज्ञानरूप झाला आहे. आणि त्याची ती सत्ता अज्ञानाला मिळून त्या अज्ञानाने जीवाला सृष्टिरूप भासविला आहे.

मूळांत एक अद्वैत परब्रह्मच असल्यामुळे अज्ञान किंवा प्रकृति हिचे मुळीच अस्तित्व नाही-म्हणजे मी ब्रह्म जाणत नाही अशी जीवच कल्पना करतो-म्हणून क्षेत्राचा क्षेत्रज्ञाशी संबंध काल्पनिक आहे, असा भाव.

**आतां अज्ञानासारिखें। वस्तु आपणपांचि देखे। परी रूपें अनेकें। नेणों कोणें॥ ८२॥**

**अर्थ**—आतां आत्मवस्तुच आपल्याला अज्ञानरूपाने पाहते-म्हणजे मी ब्रह्म जाणत नाही, असे म्हणते-पण कोण-कोणत्या अनेक रूपाने पाहते, हे सांगता येत नाही॥ ८२॥

**गूढार्थदीपिका—परी रूपे अनेके। नेणो कोणे-**

परब्रह्माप्रमाणेच परब्रह्मावर भासणारे अज्ञानकार्यहि अपरिमित असल्यामुळे त्याची संख्या करवत नाही. अज्ञान अज्ञानकार्य व ते पाहणारा ही सर्व त्रिपुटी अज्ञानातीलच असून परब्रह्म नित्य, असंग व प्रकाशरूप असल्यामुळे ते त्या त्रिपुटीला नुसते प्रकाशक होते, असा भाव.

**जैसा रंकु भ्रमला। म्हणे जारे मी रावो आला। कां मूर्छित गेला। स्वर्गलोका॥ ८३॥**

**तेवीं लचकलिया दिठी। मग देखणें जें जें उठी। तया नांव सृष्टी। मीचि वियें पैं गा॥ ८४॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे दरिद्रियाने भ्रमिष्ट होऊन "येथून चालते व्हा, मी राजा आलो आहे" किंवा मूर्च्छित झालेल्याने "स्वर्गलोकात गेलो" असे म्हणावे॥ ८३॥ त्याप्रमाणे आत्मस्वरूपापासून दृष्टि चळली असता जे जे दृष्टिसमोर आले त्याला सृष्टि हे नांव प्राप्त झाले असून ती सर्व सृष्टि माझ्यापासूनच होते-म्हणजे माझ्या सत्तेवर ती भासत असल्यामुळे मीच त्या रूपाने दिसतो॥ ८४॥

**गूढार्थदीपिका**—सर्व सृष्टि आत्मविस्मृतिरूप अज्ञानाजन्य भ्रांतीचे कार्य आहे, असा भाव.

**जैंसे कां स्वप्नमोहा। तो एकाकी देखे बहुवा। तोचि पाडु आत्मया। स्मरणेंवीण असे॥ ८५॥**
**हेंचि आन भ्रांती। प्रमेय उपलवूं पुढती। परी तूं प्रतीती। याचि घे पां॥ ८६॥**
**तरी माझी हे गृहिणी। अनादि तरुणी। अनिर्वाच्यगुणी। अविद्या हे॥ ८७॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणेच स्वप्नभ्रम झाला असता एकच पुरुष अनेक वस्तुरूप होतो, त्याप्रमाणेच आत्मविस्मृति झाल्यामुळे जीवात्मा आपल्यालाच बहुरूप पाहतो. ॥ ८५॥ हाच सिद्धान्त, अर्जुना! पुन: तुला निराळ्या रीतीने सांगतो, पण याचा तू अनुभव घे॥ ८६॥ तरी अविद्या ही माझी पत्नी होय. ती अनिर्वाच्य म्हणजे कल्पनामात्र व गुणी म्हणजे त्रिगुणात्मक आहे व ती अनादि असून अखंड तरुणच राहते॥ ८७॥

**गूढार्थदीपिका**—गृहिणी-"गृहिणी गृहमुच्यते" पत्नीमुळेच सर्व संसार थाटत असल्यामुळे ज्याप्रमाणे पत्नीलाच घर म्हणतात व पत्नीच संतति प्रसवते, त्याप्रमाणे अविद्याच सृष्टीला प्रसवणारी अशी सर्व सृष्टि झाली आहे, हे 'गृहिणी' या शब्दाने सुचविले आहे.

गृहिणी जशी पतीच्या स्वाधीन असते, त्याप्रमाणे परमात्मा त्रिगुणात्मक मायेला आपल्या स्वाधीन ठेवतो, तो तिच्या कधी स्वाधीन होत नाही. जीवात्मा मात्र प्रकृतीच्या स्वाधीन झाल्यासारखा असतो.

**अनादि**-जीवाच्या ठिकाणी असलेल्या अविद्याभ्रमाचा कोणाच्याहि बुद्धीला निश्चय करता येत नाही; म्हणून ती प्रारंभरहित मानावी लागते, असे 'अनादि' या शब्दाने सांगितले आहे.

**तरुणी**—अविद्या ही कल्पनामात्र आहे व कल्पनेला कधी म्हातारपण म्हणजे क्षीणता येत नाही, हे 'तरुणी' या शब्दाने सांगितले आहे.

**अनिर्वाच्य**—अविद्येला सत् म्हणता येत नाही किंवा असत् म्हणता येत नाही. किंवा तिला अत्यंत खरी किंवा अत्यंत खोटी असे म्हणता येत नाही, अशी ही दोहोहून विलक्षण आहे. असे "अनिर्वाच्य" या शब्दाने दाखविले आहे.

**अविद्या**—ती मुळी वस्तुरूपाने अस्तित्वांतच नाही, हे 'अविद्या' शब्दाने सांगितले आहे.

"माया अविद्यमानस्य आख्या" माया हे अस्तित्वात नसलेल्याचे नांव आहे, असे आचार्यांनीहि म्हटले आहे, पुढील ओवीतील "इये नाही हेचि रूप" या चरणाने हाच अर्थ माऊलीनी स्पष्ट केला आहे.

**इये नाहीं हेंचि रूप। ठाणें हें अति उमप। हें निद्रितां समीप। चेतां दुरी॥ ८८॥**

**अर्थ**—नसणे हेच तिचे स्वरूप आहे. तिचे राहण्याचे ठिकाण जे ब्रह्म अति विस्तीर्ण आहे. आत्मस्वरूपाचा विचार न करणाऱ्याचे जवळ ती असते आत्मस्वरूपाचा विचार करणाऱ्यांच्या ती दूर असते॥ ८८॥

**गूढार्थदीपिका—इये नाही हेंचि रूप**-अविद्या वस्तुत: नसून ती जीवकल्पित आहे, असा अर्थ.

**निद्रितां समीप**-आत्मस्वरूपाचा विचार होत नाही तोपर्यंत ती असते.

**चेतां दुरी**—आत्मस्वरूपाचा विचार केला असता अविद्या किंवा अज्ञान अथवा त्रिगुणात्मक माया हिचे वर्तमान, भूत, भविष्य अशा तिन्ही काळी भावरूप वस्तुत्वच सिद्ध होत नाही असा जो सर्व ज्ञान्यांचा अनुभव आहे, तोच येथे माउलींनी सांगितला आहे.

अमृतानुभवातील 'अज्ञानखंडन या सातव्या प्रकरणात त्याचेच प्रतिपादन केले आहे; म्हणून अमृतानुभव व

ज्ञानेश्वरी या दोन ग्रंथातील वेदान्तप्रतिपादनात काहीहि फरक नाही.

ज्ञानेश्वरीत कोठे कोठे माउलीनी मायेचा किंवा अविद्येचा जो उल्लेख केला आहे तो अविद्या किंवा माया अथवा अज्ञान ही भावरूप वस्तु आहे असे सांगण्याकरिता केला नसून जीवाने मानलेल्या अविद्येचा किंवा अज्ञानाचा अथवा मायेचा तो नुसता अनुवाद केला आहे.

सारांश, विचाराने अविद्येचे अस्तित्व सिद्ध होत नाही व अविचारानेच ती मानली जाते, असा भाव.

**पैं माझेनिचि आंगें। पहुडल्या हे जागे। आणि सत्तासंभोगें। गुर्विणी होय॥ ८९ ॥**

**अर्थ**—माझ्या अंगाशी निजली असता ती जागी होते व माझ्या सत्तेचा भोग घेऊन ती गरोदर होते॥ ८९ ॥

**गूढार्थदीपिका—माझेनिचि आंगे। पहुडल्या हे जागे—**

''चित्पद ते माया'' असे श्रीएकनाथ महाराजांनी म्हटले असल्यामुळे चैतन्यरूप प्रकाशाच्या संगतीने ती व्यक्त व जागी म्हणजे कल्पनारूप होते, असा ''माझेनिचि आंगे। पहुडल्या हे जागे'' या चरणांचा अर्थ आहे.

**सत्तासंभोगे। गुर्विणी होय**

चैतन्याचे ठिकाणी सत्ता अनुगत असल्यामुळे चैतन्यप्रकाशाने मुक्त झालेल्या वृत्तीच्या ठिकाणी तीच सत्ता अनुगत होते; म्हणून त्या सत्तेच्या बळावर वृत्तिरूपाने व्यक्त झालेली अविद्या कार्य प्रसवण्यास समर्थ होते, असे ''सत्तासंभोगे। गुर्विणी होय'' या चरणांनी माऊलींनी सुचविले आहे.

**महद्ब्रह्माउदरीं। प्रकृतिं आठै विकारीं। गर्भाची करी। पेलोवेली॥ ९० ॥**
**उभयसंगु पहिलें। बुद्धितत्त्व प्रसवलें। बुद्धितत्त्वें भारैलें। होय मन॥ ९१ ॥**
**तरुणी ममता मनाची। अहंकार तत्त्व रची। तेणें महाभूतांची। अभिव्यक्ति होय॥ ९२ ॥**
**आणि विषयेंद्रियां गौसी। स्वभावें तंव भूतांसी। म्हणोनि येती सरिसीं। तियेंही रूपा॥ ९३ ॥**
**जालेनि विकारक्षोभें। पाठीं त्रिगुणाचें उभें। तेव्हां ये वासना गर्भें। ठायेंठावो॥ ९४ ॥**
**रुखाचा आवांका। जैसी बीजकणिका। जीवीं बांधे उदका। भेटतखेंवो॥ ९५ ॥**
**तैसी माझेनि संगें। अविद्या नाना जगें। आर घेवों लागे। अणियाची॥ ९६ ॥**
**मग गर्भगोळा तया। कैसें रूप तैं ये आया। तें परियेसें राया। सुजनांचिया॥ ९७ ॥**
**पैं मणिज स्वेदज। उद्भिज जारज। उमटती सहज। अवयव हे॥ ९८ ॥**
**व्योमवायुवशें। वाढलेनि गर्भरसें। मणिजु उससे। अवयव तो॥ ९९ ॥**
**पोटीं सूनि तमरजें। आगळिकां तोय तेजें। उठितां निफजे। स्वेदजु गा॥ १०० ॥**
**आपपृथ्वीउत्कटें। आणि तमोमात्रें निकृष्टें। स्थावरु उमटे। उद्भिजु गा॥ १०१ ॥**
**पांचां पांचंही विरजीं। होती मनबुद्ध्यादि साजीं। हीं हेतु जारजीं। ऐसें जाण॥ १०२ ॥**
**ऐसे चारी हे सरळ। करचरणतळ। महाप्रकृति स्थूळ। तेंचि शिर॥ १०३ ॥**
**प्रवृत्ति पेललें पोट। निवृत्ति ते पाठी नीट। सुरयोनी आंगें आठ। ऊर्ध्वाचीं॥ १०४ ॥**

**अर्थ**—अविद्येच्या पोटात असलेल्या गर्भाची, प्रकृति आठ विकारांची वृद्धि करते॥ ९० ॥ क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचा संबंध झाला (कल्पिला) असता प्रथम बुद्धि हे तत्त्व उत्पन्न होते, नंतर बुद्धितत्त्वापासून मन निर्माण होते॥ ९१ ॥ ममता ही मनाची तरुण स्त्री होय, ती अहंकार तत्त्व उत्पन्न करते आणि अहंकारतत्त्वापासून पुढे भूतांची अभिव्यक्ति होते॥ ९२ ॥ आणि तो अहंकार स्वभावत:च महाभूतांना कवटाळतो व त्यामुळे विषय बरोबरच व्यक्त होतात॥ ९३ ॥ चित्तांत विकाराचा क्षोभ झाला असता त्यांच्या पाठीशी सत्व, रज, तम हे तीन गुण उभे असतात व तेथे लगेच वासना उत्पन्न होते॥ ९४॥ ज्याप्रमाणे बी छोटेसे असले तरी पाण्याचा संबंध झाल्याने ते वृक्षाच्या आकाराला येते॥ ९५ ॥ त्याप्रमाणे माझ्या संगाने अविद्या ही नाना जगाच्या रूपाच्या अंकुराचे कोंब घेऊ लागते॥ ९६ ॥ मग त्या गर्भगोळ्याला कोणत्या रूपाचा आकार येतो हे, सज्जनामध्ये श्रेष्ठ असलेल्या अर्जुना! सांगतो, ऐक॥ ९७॥ तेव्हा

अंडज, स्वेदज, उद्भिज व जारज असे हे चार प्रकारचे अवयव सहजच उत्पन्न होतात॥ ९८ ॥ आकाश व वायु यांच्या योगांने गर्भगोळ वोतला असता अंडज अवयव उत्पन्न होतो॥ ९९ ॥ आणि तमोगुण व रजोगुण पोटांत (अंतरात) ठेवून पाणी आणि तेज यांच्या विशेषाने वाढलेला स्वेदज अवयव उत्पन्न होतो॥ १०० ॥ पाणी आणि पृथ्वी ही दोन भूते उत्कट होऊन आणि निकृष्ट अशा तमोगुणाची वृद्धि झाली असता उद्भिज असा स्थावर अवयव उत्पन्न होतो॥ १०१ ॥ पंचमहाभूते ही परस्परांच्या साहाय्याने मन, बुद्धि, अहंकार इत्यादिकांचे पोषण करून वृद्धि करतात आणि हेच जारज अवयव उत्पन्न होण्याचे निमित्त आहे, असे जाण॥ १०२ ॥ याप्रमाणे चार योनी ह्या सरळ करचरणादिक असून मूळ प्रकृतीचे स्थूळ रूपाला येणे, हा मस्तकाचा भाग होय॥ १०३ ॥ प्रवृत्ति हे सुटलेले पोट असून निवृत्ति ही सुंदर पाठ आहे आणि आठ सुरयोनी ही वरची अवयवे आहेत॥ १०४ ॥

**गूढार्थदीपिका—प्रवृत्ति पेलले पोट-**

नाना प्रकारच्या काम्य कर्माकडे प्रवृत्त करणारा हा प्रवृत्तिमार्ग आहे, ह्याच्या योगाने वासना वाढत जाते; म्हणून या प्रवृत्तीला ''पेलले पोट'' म्हटले आहे.

**निवृत्ति ते पाठी नीट—**

निवृत्ति मार्ग हा प्रवृत्ति मार्गाकडे पाठ करणारा आहे—म्हणजे सर्व कामनिक कर्मे सोडून देऊन निष्काम चित्ताने परमेश्वराकडे लागणारा आहे.

**कंठु उल्हासता स्वर्गु। मृत्युलोकु मध्यअर्धभागु। अधोदेशु चांगु। नितंबु तो॥ १०५ ॥**
**ऐसें लेंकरु एक। प्रसवली हे देख। जयाचें तिन्ही लोक। बाळसें गा॥ १०६ ॥**
**चौऱ्यांयशी लक्ष योनी। तिये कांडा पेरां सांदणी। वाढे प्रतिदिनीं। बाळक हें॥ १०७ ॥**
**नाना देहअवयवीं। नामाचीं लेणीं लेववी। मोहस्तन्यें वाढवी। नित्य नवे॥ १०८ ॥**
**सृष्टी वेगवेगळीया। तिया करांघ्रीं आंगोळियां। भिन्नाभिमान सूदलिया। मूदिया तेथें॥ १०९ ॥**
**हें एकलौतें चराचर। अविचारित सुंदर। प्रसवोनि थोर। थोरावली॥ ११० ॥**

**अर्थ**—आनंददायक स्वर्ग हा कंठप्रदेश असून मृत्युलोक हा मध्यभाग आहे आणि पाताळलोक हा सुंदर कटीचा भाग आहे॥ १०५ ॥ अशा एका लेकराला प्रकृतीने जन्म दिला असून स्वर्ग, मृत्यु, पाताळ हे तिन्ही लोक ज्या प्रकृतीचे बाळसलेले आंग आहे॥ १०६ ॥ चौऱ्यांशी लक्ष योनी ह्या त्या बाळसलेल्या लेकराची कांडे, पेरे व सांधे आहेत. अशा प्रकारे ते बालक प्रत्येक दिवशी वाढत जाते॥ १०७ ॥ नाना देह हेच कोणी अवयव असून त्याच्या ठिकाणी नाना नामांचे अलंकार घातलेले आहेत आणि प्रकृति ही, नित्य नवे आसक्तिरूप दूध पाजून ते बालक वाढवित असते॥ १०८ ॥ निरनिराळी सृष्टि ही हातापायांची बोटे असून त्यांचा भिन्न भिन्न अभिमान हातापायाच्या बोटात घातलेल्या आंगठ्या होत॥ १०९ ॥ ह्या प्रकृतीने, विचार करीत नाही तोपर्यंत सुंदर वाटणाऱ्या अशा एकुलत्या एक बालकाला जन्म देऊन ती थोर झाली आहे॥ ११० ॥

**गूढार्थदीपिका—अविचारित सुंदर—**

जीव आत्मज्ञानाचा विचार करीत नाही तोपर्यंतच त्याला जगत् सुंदर वाटते, असा भाव.

**पैं ब्रह्मा प्रात:काळु। विष्णु तो माध्यान्ह वेळु। सदाशिव सायंकाळु। बाळा यया॥ १११ ॥**

**अर्थ**—या बालकाला ब्रह्मदेव हा प्रात:काळ विष्णु हा माध्यान्हकाळ व सदाशिव हा सायंकाळ होय॥ १११ ॥

**गूढार्थदीपिका**—येथे विष्णुच्या, सृष्टीची स्थिति करण्याच्या व शिवाचा, सृष्टीचा संहार करण्याच्या नुसत्या मर्यादित अधिकाराला धरुनच त्याना ''विष्णू तो मध्यान्ह वेळु। सदाशिव सायंकाळु'' असे म्हटले आहे. त्यांच्या पूर्णब्रह्मत्वाला धरून म्हटले नाही.

**महाप्रळयसेजे। खेळौनि निवांत निजे। विषमज्ञानें उमजे। कल्पोदयीं॥ ११२ ॥**

**अर्थ—**हे बालक सृष्टीचा खेळ खेळून महाप्रलयरूपी आंथरूणावर स्वस्थ निजते व कल्पारंभी पुन: विषमज्ञानाने जागे होते॥ ११२ ॥

**गूढार्थदीपिका—विषमज्ञानें उमजे। कल्पोदयी-**
अनादि संस्कारामुळे कल्पारंभी पुनः अशीच सृष्टि निर्माण होते, असा भाव.

**अर्जुना इयापरी। मिथ्यादृष्टीच्या घरीं। युगानुवृत्तीचीं करी। चोज पाउलें॥ ११३॥**

**अर्थ**—अर्जुना! याप्रमाणे मिथ्या दृष्टीच्या घरात युगांपाठी युगे करीत हे बालक कौतुकाने पाय टाकते॥ ११३॥

**गूढार्थदीपिका—मिथ्यादृष्टीच्या घरी। युगानुवृत्तीचीं करी-**
जगताची उत्पत्ति, स्थिति, लय मिथ्यादृष्टीने म्हणजे भ्रांतीनेच आहेत, असा भाव.

**संकल्पु ययाचा इष्टु। अहंकारु विनटु। ऐसिया होय तै शेवटु। ज्ञानें यया॥ ११४॥**

**अर्थ**—या बालकाला संकल्प करणे हीच एक गोष्ट आवडत असते. अहंकार त्याचा खेळगडी होय. अशा या जगत्बालकाचा शेवट एका आत्मज्ञानानेच होतो॥ ११४॥

**गूढार्थदीपिका—संकल्प ययाचा इष्टु**—केवल संकल्पानेच सृष्टि उत्पन्न होते, असा अर्थ.

**अहंकारू विनटु**—अहंकार हा सृष्टीला धरून ठेवणारा आहे, म्हणून तो संकल्पाचा मित्र आहे.

**ऐसिया होय शेवटु। ज्ञाने यया**-एक ब्रह्मज्ञानच या जगाची निःशेष निवृत्ति करणारे आहे.

**आतां असो हे बहु बोली। ऐसें विश्व माया व्याली। तेथ साह्य जाली। माझी सत्ता॥ ११५॥**

**अर्थ**—अर्जुना! आता हे बहु बोलणे असो. अशा प्रकारे हे संपूर्ण विश्व मायेपासून—म्हणजे भ्रांतिपासून-निर्माण झाले आहे व त्या मायाभ्रांतीला माझ्या सत्तेचा आधार असल्यामुळे माझी सत्ता तिला साहाय्यभूत झाली आहे॥ ११५॥

**सर्वयोनिषु कौन्तेय मूर्तयः सम्भवन्ति याः। तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रदः पिता॥ ४॥**

**अर्थ**—हे अर्जुना! सर्व योनीमध्ये जेवढे देहाकार आहेत त्यांचे परिणामी-उपादान-कारण प्रकृति असून तिचे ठिकाणी बीज स्थापन करणारा पिता मी आहे॥ ४॥

**याकारणें मी पिता। महद्ब्रह्म माता। अपत्य पांडुसुता। जगडंबर॥ ११६॥**
**आतां शरीरें बहुतें। देखौनि न भेद हो चित्तें। जें मनबुद्ध्यादि भूतें। एकेंचि येथें॥ ११७॥**

**अर्थ**—म्हणूनच मी पिता असून महद्ब्रह्म म्हणजे प्रकृति ही माता आहे व अर्जुना! ब्रह्मांड हे दोघांपासून झालेले अपत्य आहे॥ ११६॥ आता निरनिराळी पुष्कळशी शरीरे पाहून तू चित्तात त्यांचा भेद मानू नकोस; कारण खऱ्या अन्वयदृष्टीने पाहता मन, बुद्धि, महाभूते इत्यादि सर्व एक परब्रह्मवस्तूच झाली आहे॥ ११७॥

**गूढार्थदीपिका**—ज्याप्रमाणे दोरीच भ्रांतीने सर्परूप भासते, त्याप्रमाणे परब्रह्मच अज्ञानभ्रांतीने मनबुद्ध्यादि सर्व कारणकार्यप्रपंचरूप भासते.

**हां गा एकचि देहीं। काय अनारिसे अवयव नाहीं। तेवीं विचित्र विश्व पाहीं। एकचि हें॥ ११८॥**
**पैं उंचा नीचा डाहाळिया। विषमा वेगळालिया। येकाचि जेवीं जालिया। बीजाचिया॥ ११९॥**
**आणि संबंधु तोही ऐसा। मृत्तिके घटु लेंक जैसा। कां पटत्व कापुसा। नातू होय॥ १२०॥**

**अर्थ**—अर्जुना! एकाच देहाचे ठिकाणी निरनिराळी अवयवे नसतात काय? त्याप्रमाणे विश्व जरी विचित्र दिसत असले तरी त्या सर्वरूपाने एक परब्रह्मवस्तुच प्रगट झाली आहे, असे समज॥ ११८॥ ज्याप्रमाणे एकाच बीजाच्या वर खाली व भिन्न भिन्न आकाराच्या निरनिराळ्या डाहाळ्या वाढतात॥ ११९॥ आणि ज्याप्रमाणे घट हा मातीचा लेक समजला जातो किंवा वस्त्र कापसाचे नातवंड समजले जाते, तसाच हा संबंध आहे॥ १२०॥

**गूढार्थदीपिका—संबंधु तोही ऐसा—**
परब्रह्मच नामरूपात्मक भासत असल्यामुळे त्याच्या ठिकाणी कल्पिलेल्या चराचर जगाचा संबंध काल्पनिक आहे. वस्तुतः भासत असलेले चराचर पूर्ण परब्रह्मच असल्यामुळे एका वस्तूत संबंध मानणे व्यर्थ आहे असा अर्थ.

**नाना कल्लोळपरंपरा। संतती जैसी सागरा। आम्हां आणि चराचरा। संबंधु तैसा॥ १२१॥**

**अर्थ**—किंवा ज्याप्रमाणे एका मागून एक उठणारे तरंग समुद्राचीच संतति समजली जाते, तसा आमचा आणि चराचराचा संबंध आहे॥ १२१ ॥

**गूढार्थदीपिका—आम्हा आणि चराचर। संबंधु तैसा-**

खऱ्या दृष्टीने पाहता परब्रह्मच अनध्यस्त विवर्तत्वाने-म्हणजे त्रिगुणात्मक मायेवाचून-नामरूपात्मक झाले आहे; पण अज्ञानी जीवाला हे ज्ञान नसल्यामुळे तो भ्रमाने त्याला (नामरूपात्मक परब्रह्माला) जगत् म्हणतो.

**म्हणोनि वन्हि आणि ज्वाळ। दोन्ही वन्हीचि केवळ। तेवीं मी गा सकळ। संबंध वावो॥ १२२ ॥**
**जालेनि जगें मी झांकें। तरी जगत्वें कोण फांके। किळेवरी माणिकें। लोपिजे काई॥ १२३ ॥**
**अळंकारातें आलें। तरी सोनेंपण काइ गेलें। कीं कमळ फांकलें। कमळत्वा मुके॥ १२४ ॥**
**सांग पां धनंजया। अवयवीं अवयविया। आच्छादिजे की तया। तेंचि रूप॥ १२५ ॥**
**कीं विरूढलिया जोंधळा। कणिसाचा निर्वाळा। वेंचला कीं आगळा। दिसतसे॥ १२६ ॥**
**म्हणोनि जग परौतें। सारूनि पाहिजे मातें। तैसा नोहे उखितें। आघवें मीचि॥ १२७ ॥**

**अर्थ**—म्हणून ज्याप्रमाणे विस्तव आणि ज्वाला दोन्ही विस्तवच होत, त्याप्रमाणे मीच सर्व चराचर असल्यामुळे माझा व चराचराचा संबंध लावणे खोटे आहे॥ १२२ ॥ झालेल्या जगाने मी झाकला जातो असे म्हणावे तर जगरूपाने कोण फांकतो? माणिक आपल्या तेजाने झाकले जाते काय?॥ १२३ ॥ किंवा सोने अलंकारदशेला आले तरी सोनेपण नाहीसे झाले काय? किंवा कमळ फाकलेले असते तेव्हा ते कमळत्वाला मुकते काय?॥ १२४ ॥ अर्जुना! सांग बरे! देह हा आपल्या अवयवाने झाकला जातो की ते त्याचे रूपच आहे?॥ १२५ ॥ किंवा जोंधळा विशेष वाढला असता त्याचे कणसात दिसणे नाहीसे होते किंवा विशेष स्पष्ट होते?॥ १२६ ॥ म्हणून जग बाजूला सारून मला पाहण्याची आवश्यकता नाही. संपूर्ण विश्व निपटून मीच आहे॥ १२७ ॥

**गूढार्थदीपिका**—आत्मज्ञान झाले असता नामरूपाचे ठिकाणी परब्रह्माहून भिन्नत्वाची व जड-विनाशी जगद्वस्तुत्वाची जीवाने अज्ञानभ्रांतीने केलेली फक्त कल्पनाच नाहीशी करायची असते. नामरूपे नाहीशी करायची नसतात. ज्याप्रमाणे घट संबंध मातीचाच दिसतो, त्याप्रमाणे नामरूपासह सच्चिदानंद परब्रह्मच अनुभवाला येते, असे माऊलीचे म्हणणे आहे, हाच अन्यरूप अनुभव होय.

**हा तूं साचोकारा। निश्चयाचा खरा। गांठी बांध वीरा। जीवाचिये॥ १२८ ।**
**आतां मियां मज दाविला। शरीरीं वेगळाला। गुणीं मीचि बांधला। ऐसा आवडें॥ १२९ ॥**
**जैसें स्वप्नीं आपण। उठवूनियां आत्ममरण। भोगिजे गा जाण। कपिध्वजा॥ १३० ॥**
**कां कावळातें डोळे। प्रकाशूनि पिंवळें। देखती तेंही कळे। तयांसीचि॥ १३१ ॥**
**नाना सूर्य प्रकाशें। प्रकटी तैं अभ्र भासे। तो लोपला हेंही दिसे। सूर्येचि कीं॥ १३२ ॥**
**पैं आपणपेनि जालिया। छाया गा आपुलिया। बिहोनि बिहालिया। आन आहे॥ १३३ ॥**
**तैसी इयें नाना देहें। दाऊनि मी नाना होयें। तेथ ऐसा जो बंध आहे। तेंही देखें॥ १३४ ॥**
**बंधचि कां न बंधिजे। हें जाणणें मज माझें। नेणणेनि उपजे। आपलेनि॥ १३५ ॥**
**तरी कोणें गुणें कैसा। मजचि मी बंध ऐसा। आवडे तें परियेसा। अर्जुनदेवा॥ १३६ ॥**
**गुण ते किती किंधर्म। कायि ययां रूपनाम। कें जालें हें वर्म। अवधारिजे॥ १३७ ॥**

**अर्थ**—हे वीरा अर्जुना! असा हाच खरोखर तत्त्वविचार आहे; म्हणून या खऱ्या निश्चयाची चित्तांत गाठ बांध॥ १२८ ॥ निरनिराळ्या शरीरात एक मीच वेगवेगळा झालो आहे, हे मी आतापर्यंत दाखविले; परंतु तोच मी गुणांनी बांधल्यासारखा अज्ञानी जीवांना वाटतो॥ १२९ ॥ ज्याच्या ध्वजाचे ठिकाणी वानर आहे अशा अर्जुना! स्वप्नात उठून जसे आपणच आपल्या मरणाचे दु:ख भोगावे॥ १३० ॥ किंवा कावीळाने पिवळे झालेल्या डोळ्यांनाच कावीळ दिसते व कावीळ झाली हेहि ते डोळेच जाणतात॥ १३१ ॥ किंवा सूर्यप्रकाशानेच अभ्र दिसू लागते व सूर्य लोपला

हेहि त्याच्या प्रकाशानेच दिसते॥ १३२॥ आपल्यामुळेच पडलेल्या आपल्या छायेला जर आपण पाहून भ्यालो तर तेथे दुसरा कोणी भिवविणारा आहे काय?॥ १३३॥ त्याप्रमाणे मी नाना प्रकारची शरीरें भासवून मीच नाना प्रकारचा होतो. त्या ठिकाणी गुणाचा जो बंध होतो, तोहि मीच जाणतो॥ १३४॥ बंध भासतो, पण त्या बंधाने मी बांधला गेलो नाही, असे माझ्या स्वरूपाचे ज्ञान मला आहे; पण असे आपल्या स्वरूपाला न जाणल्याने जीव बद्ध होतो॥ १३५॥ तरी अर्जुना! कोणत्या गुणाने बांधला जातो व मला मीच कसा बंधनकारक वाटतो, ते सांगतो ऐक॥ १३६॥ गुण किती आहेत? त्यांचे धर्म काय? त्यांचे रूप काय? त्यांची नावे काय? व ते कोठे उत्पन्न झालेत? हे रहस्य सांगतो, ऐक॥ १३७॥

**सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसम्भवाः। निबध्नन्ति महाबाहो देहे देहिनमव्ययम्॥ ५॥**

**अर्थ**—हे अर्जुना! सत्व, रज, तम हे तीन गुण असून ते प्रकृतीपासून निर्माण झाले आहेत. ते अविनाशी अशा देहाभिमानी जीवाला या देहाचे ठिकाणी बांधतात॥ ५॥

**तरी सत्त्व रज तम। तिघासि हें नाम। आणि प्रकृति जन्म-। भूमिका ययां॥ १३८॥**
**येथ सत्त्व तें उत्तम। रज तें मध्यम। तिहींमाजीं तम। सावियाधारें॥ १३९॥**
**हें एकेचि वृत्तीच्या ठायीं। त्रिगुणत्व आवडे पाहीं। वयसात्रय देहीं। येकीं जेवीं॥ १४०॥**
**कां मीनलेनि कीडें। जंवजंव तूक वाढे। तंवतंव सोनें हीन पडे। पांचिकां कसीं॥ १४१॥**
**पैं सावधपण जैसें। वाहविलें आळसें। सुषुप्ति बैसे। घणावोनी॥ १४२॥**
**तैसी अज्ञानांगीकारें। निगाली वृत्ति विखुरे। ते सत्त्वरजद्वारें। तमही होय॥ १४३॥**

**अर्थ**—तरी सत्त्व, रज, तम अशी त्यांची नावे असून प्रकृति ही त्यांची जन्मभूमि आहे॥ १३८॥ त्या तिघांमध्ये सत्त्वगुण उत्तम असून रजोगुण मध्यम आहे व तमोगुणसहजच त्यांच्यापेक्षा खालचा म्हणजे कनिष्ट आहे॥ १३९॥ ज्याप्रमाणे एका देहाचे ठिकाणी बाल्य, तारुण्य व म्हातारपण ह्या तिन्ही अवस्था असतात, त्याप्रमाणे हे तिन्ही गुण एकाच अंत:करणवृत्तीच्या ठिकाणी असतात॥ १४०॥ किंवा हीणकसाच्या मिश्रणाने जसजसे सोन्याचे वजन वाढते तसतसे ते (सोने) कसात कमी होऊन पांच रुपये किंमतीचे होते॥ १४१॥ ज्याप्रमाणे आळसाने सावधपणा नाहीसा होऊन गाढ सुषुप्ति येते॥ १४२॥ त्याप्रमाणे, मी अज्ञानी आहे, असा अज्ञानाचा अंगीकार केल्याने उठलेली वृत्ति भेद पावते व ती सत्त्वरजतमात्मक होते॥ १४३॥

**गूढार्थदीपिका**—ही अहंवृत्ति आपल्या मूळ ब्रह्मस्थितीला विसरल्यामुळे ती सात्विक-राजस-तामस होते. सत्त्वगुणाने ती जाणते, रजोगुणाने कर्माचे कर्तृत्व घेते व तमोगुणाने आळस, निद्रा वगैरे घेते. हेच तिचे अनुक्रमे सत्व-रज-तमात्मक होणे होय.

**अर्जुना गा जाण। ययां नाम गुण। आतां दाखऊं खुण। बांधिती ते॥ १४४॥**
**तरी क्षेत्रज्ञदशे। आत्मा मोटका पैसे। हें देह मी ऐसें। मुहूर्त करी॥ १४५॥**

**अर्थ**—अर्जुना! याला गुण म्हणतात, असे जाण. आता त्यांनी बांधले असे केव्हा समजले जाते, ते सांगतो, ऐक॥ १४४॥ क्षेत्रज्ञदशेत शिरल्यासारखा भासलेला आत्मा, मी देह आहे, असे समजायला लागतो॥ १४५॥

**गूढार्थदीपिका**—वेदान्तात जीवदशेचा प्रारंभ मानता येत नसल्यामुळे माउलींनी येथे जीवदशेचा प्रारंभ दाखविला नाही. आत्म्याचे ठिकाणी जीव अवस्था मी देह आहे, या कल्पनेमुळे भासते, एवढेच सांगितले आहे.

**आजन्ममरणांतीं। देहधर्मीं समस्तीं। ममत्वाची सूती। घे ना जंव॥ १४६॥**
**जैसी मीनाच्या तोंडीं। पडेना जंव उंडी। तंव गळ आसुडी। जळपारधी॥ १४७॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे गळाला लावलेला मासांचा तुकडा मासोळीच्या तोंडात जातो तोच धीवर गळाला हिसडा मारतो, त्याप्रमाणे जीव जन्मापासून मरेपर्यंत देहाच्या संपूर्ण धर्माची ममता धरतो किंवा हे माझे धर्म आहेत असे म्हणतो, तोच मी देह आहे अशी आपल्या ठिकाणी कल्पना करून घेतो व त्रिगुणांनी बांधला जातो॥ १४६-१४७॥

**गूढार्थदीपिका**—गुण व गुणाची देहादि कार्ये यांचा जाणता 'मी', त्यांच्याहून निराळा आहे, हे विसरून ते सर्व सत्य असून माझ्या ठिकाणी आहेत किंवा माझे आहेत, असे मानणे, हेच गुणांनी बांधले जाणे आहे. जीव असेच मानतो; म्हणून तो गुणबद्ध होतो.

**तत्र सत्त्वं निर्मलत्वात्प्रकाशकमनामयम्। सुखसङ्गेन बध्नाति ज्ञानसङ्गेन चानघ॥ ६॥**

**अर्थ**—त्यात सत्त्वगुण हा निर्मल असल्यामुळे प्रकाशक व निरुपद्रवी आहे. हे निष्पाप अर्जुना! तो, सुखाच्या संगाने व ज्ञानाच्या संगाने-म्हणजे मी सुखी आहे, मी जाणता आहे अशा अभिमानाने-बंधन करतो॥ ६॥

**तेवीं सत्त्वें लुब्धकें। सुखज्ञानाचीं पासिकें। वोढिजती मग खुडके। मृगु जैसा॥ १४८॥**
**मग ज्ञानें चडफडी। जाणिवेचे खुरखोडी। स्वयंसुख हें धाडी। हातींचें गा॥ १४९॥**
**तेव्हां विद्यामानें तोखे। लाभमात्रें हरिखे। मी संतुष्ट हेंही देखे। श्लाघों लागे॥ १५०॥**
**म्हणे भाग्य ना माझें। आजि सुखियें नाहीं दुजें। विकाराष्टकें फुंजे। सात्त्विकाचेनि॥ १५१॥**
**आणि येणेंही न सरे। लांकण लागे दुसरें। जें विद्वत्तेचें भरे। भूत आंगीं॥ १५२॥**
**आपणचि ज्ञानस्वरूप आहे। तें गेलें हें दुःख न वाहे। कीं विषयज्ञानें होये। गगनायेवढा॥ १५३॥**
**रावो जैसा स्वप्नीं। रंकपणें रिघे धानीं। तो दों दाणां मानी। इंद्रु ना मी॥ १५४॥**
**तैसें गा देहातीता। जालेया देहवंता। हों लागे पांडुसुता। बाह्यज्ञानें॥ १५५॥**
**प्रवृत्तिशास्त्र बुझे। यज्ञविद्या उमजे। किंबहुना सुझे। स्वर्गवरी॥ १५६॥**
**आणि म्हणे आजि आन। मी वांचूनि नाहीं सज्ञान। चातुर्यचंद्रा गगन। चित्त माझें॥ १५७॥**
**ऐसें सत्त्व सुखज्ञानीं। जीवासि लावूनि कानी। बैलाची करी वानी। पांगुळाचिया॥ १५८॥**
**आतां हाचि शरीरीं। रजें जियापरी। बांधिजे तें अवधारीं। सांगिजेल॥ १५९॥**

**अर्थ**—पारध्याने पाशात मृग धरला असता जसा तो तडफडतो त्याप्रमाणे सुख व ज्ञान यांच्या संगाने सत्त्वगुणरूपी पारधी जीवाला बांधतो॥ १४८॥ मग आपली स्वयंसुखरूप व ज्ञानरूप स्थिति विसरून, प्राप्त केलेल्या विषयसुखाच्या व विषयज्ञानाच्या अभिमानाने तो तळमळतो॥ १४९॥ तेव्हा त्याच्या विद्वत्तेचा कोणी मान केल्यास त्याला आनंद वाटतो, काही त्याला लाभ झाल्यास तो संतोष मानतो, मी सुखात राहावे, हेहि तो पाहत राहतो व आपल्या सुखस्थितीची प्रशंसा करीत जातो॥ १५०॥ आणि म्हणतो की, माझे हे महद्भाग्यच ना! आज माझ्यासारखा दुसरा कोणी सुखी नाही, असे म्हणता म्हणता तो सत्त्वगुणामुळे आठ प्रकारच्या विकाराने फुगू लागतो॥ १५१॥ आणि एवढ्यानेच संपत नाही, तर दुसरे एक बंधन त्याच्या पाठीमागे लागते. त्याच्या आंगात विद्वत्तेच्या अभिमानाचा भूतसंचार होतो॥ १५२॥ आपण केवळ ज्ञानस्वरूप असतांना आपल्याला त्याचा विसर पडला, याचे त्याला दुःख वाटत नाही; उलट विषयाचे ज्ञान प्राप्त करून घेऊन अभिमानाने आकाशांएवढा फुगतो॥ १५३॥ ज्याप्रमाणे राजा स्वप्नामध्ये दरिद्री होऊन नगरात शिरतो व दोन दाणे मिळाल्याने आपल्याला इंद्र मानू लागतो॥ १५४॥ हे पांडुसुता अर्जुना! देहाहून अलग असलेल्या या क्षेत्रज्ञ जीवाला "मी देह आहे" असा देहाचा अभिमान धरून देहवान झाल्याबरोबर बाह्य विषयाच्या ज्ञानाने असे होऊ लागते॥ १५५॥ संसारदायक कर्मकांड तो जाणतो, संपूर्ण यज्ञक्रिया जाणतो, एवढेच नाही, तर स्वर्गप्राप्तिपर्यंत सर्व जाणतो॥ १५६॥ आणि म्हणतो की, आज माझ्या बरोबरीचा विद्वान दुसरा कोणी नाही. माझे चित्त चातुर्यरूपी चंद्राला राहण्याचे आकाश आहे-म्हणजे मीच एक चतुर आहे॥ १५७॥ याप्रमाणे सत्वगुण हा जीवाला सुख व ज्ञान यांच्या अभिमानाच्या दोरीने बांधून नंदीबैलाप्रमाणे करून ठेवतो॥ १५८॥ आता हा जीव रजोगुणाने ज्या प्रकाराने बांधला जातो तो प्रकार सांगतो, ऐक॥ १५९॥

**रजो रागात्मकं विद्धि तृष्णासङ्गसमुद्भवम्। तन्निबध्नाति कौन्तेय कर्मसङ्गेन देहिनम्॥ ७॥**

**अर्थ**—रजोगुण हा मनाचे रंजन करणारा असून तो वासना व आसक्ति यांना उत्पन्न करणारा आहे. तो जीवाला फलाच्या इच्छेने कर्मात आसक्त करून बंधन करतो, असे जाण॥ ७॥

**हें रज याचि कारणें। जीवातें रंजऊं जाणे। हें अभिलाखाचें तरुणें। सदाचि गा॥ १६०॥**
**हें जीवीं मोटकें रिगे। आणि कामाच्या मदीं लागे। मग वारया वळघे। तृष्णेचिया॥ १६१॥**
**घृतें आंबुखूनि आगियाळें। वज्राग्नीचें सादुकलें। आतां बहु थेंकुलें। आहे तेथ॥ १६२॥**
**तैसी खवळे चाड। होय दुःखासकट गोड। इंद्रश्रीहि सांकड। गमों लागे॥ १६३॥**
**तैसी तृष्णा वाढिनलिया। मेरुही हाता आलिया। तऱ्ही म्हणे एखादिया। दारुणा वळघो॥ १६४॥**
**जीविताची कुरोंडी। वोंवाळूं लागे कवडी। मानी तृणाचिये जोडी। कृतकृत्यता॥ १६५॥**
**आजि असतें वेंचिजेल। परी पाहे पां काय कीजेल। ऐसा पांगीं वडील। व्यवसाय मांडी॥ १६६॥**
**म्हणे स्वर्गा हन जावें। तरी काय तेथें खावें। इयालागीं धांवे। याग करूं॥ १६७॥**
**व्रतापाठीं व्रतें। आचरे इष्टापूर्तें। काम्यावांचूनि हातें। शिवणें नाहीं॥ १६८॥**
**पैं ग्रीष्मांतींचां वारा। विसावों नेणें वीरा। तैसा न म्हणे व्यापारा। रात्र दिवस॥ १६९॥**
**काय चंचळ मासा। कामिनीकटाक्ष कायसा। लवलाहो तैसा। विजूही नाहीं॥ १७०॥**
**तेतुलेनि गा वेगें। स्वर्गसंसारपांगें। आगीमाजीं रिगे। क्रियांचिये॥ १७१॥**
**ऐसी देहीं देहावेगळा। ले तृष्णेचिया सांखळा। खटाटोपु वाहे गळां। व्यापाराचा॥ १७२॥**
**हें रजोगुणाचें दारुण। देहीं देहियासि बंधन। परिस आतां विंदाण। तमाचें तें॥ १७३॥**

**अर्थ**—जीवाच्या चित्ताला रंजविणारा असल्यामुळे याला रजोगुण म्हणतात. हा रजोगुण वासनेला अखंड तरुण ठेवतो-म्हणजे तिला क्षीण होऊ देत नाही॥ १६०॥ हा थोडाहि अंत:करणात शिरला की काम-मद उत्पन्न करतो व मग जीव, वासनारूपी वाऱ्याला मिठी मारतो॥ १६१॥ अग्निकुंडाल तूप टाकून पेटलेल्या अग्नीला विद्युत अग्नीने साहाय्य मिळून तो भडकला असता त्याला थोडे-बहुत म्हणता येईल काय?॥ १६२॥ त्याप्रमाणे विषयवासना अशी खवळते की तिला दु:खासह सर्व गोड वाटू लागते व इंद्राच्या संपत्तीनेहि त्याला पुरेशी तृप्ति वाटत नाही॥ १६३॥ तशीच वासना वाढत जाऊन मेरुसारखा सुवर्णाचा पर्वत हाती आला तरी याहिपेक्षा अधिक संपत्ति प्राप्त होईल, असा दुसरा एखादा साहसी प्रयत्न करून पाहावा, असे त्याला वाटते॥ १६४॥ एक कवडी प्राप्त झाली तर तिच्यावरून आपला जीव ओवाळून टाकतो व एक गवताची काडी प्राप्त झाली तर आपल्याला धन्य समजतो॥ १६५॥ आज माझ्यापाशी असलेली संपत्ति संपल्यावर उद्या आपले कसे चालणार? असे मनात येऊन वासनेच्या स्वाधीन असलेला तो मोठ्या प्रयत्नाला लागतो॥ १६६॥ तो म्हणतो, स्वर्गात गेलो तर तेथे खायला काय मिळणार? याकरिता यज्ञ करण्याला प्रवृत्त होतो॥ १६७॥ शरीराचे शोषण करणारी अशी एकामागून एक व्रते करतो. इष्ट-म्हणजे यज्ञयागादि कर्मे व पूर्त-म्हणजे कूप तडागादि बांधणे, अशी कर्मे करतो. याप्रमाणे काम्यकर्मावाचून दुसऱ्या कर्मांना शिवत नाही॥ १६८॥ ज्याप्रमाणे ग्रीष्मऋतूचे शेवटी सुटणारा वारा सारखा वाहत असतो-क्षणभर थांबत नाही-त्याप्रमाणे जो रात्रंदिवस व्यापार करीत राहतो॥ १६९॥ रजोगुणी पुरुषाच्या चांचल्यापुढे माशाचे चंचलपण काहीच नाही अथवा स्त्रियेच्या कटाक्षाची काय मातब्बरी आहे? तसा वेग विद्युल्लतेचाहि नाही॥ १७०॥ तेवढ्या त्या वेगाने स्वर्ग व संसार याचा आश्रय करून तो कर्मरूपी अग्नीत शिरतो॥ १७१॥ अशा प्रकारे देहावेगळा असलेला जीव वासनेच्या बेडया स्वत:च घालून घेतो व नाना प्रकारच्या कर्मांचा व्याप आपल्या गळ्यात लावून घेतो॥ १७२॥ असे हे रजोगुणाचे दुर्धर बंधन देहधारी जीवाला देहाच्या ठिकाणी लागलेले आहे. आता तमोगुणाचा खेळ ऐक॥ १७३॥

**तमस्त्वज्ञानजं विद्धि मोहनं सर्वदेहिनाम्। प्रमादालस्यनिद्राभिस्तन्निबध्नाति भारत॥ ८॥**

**अर्थ**—अज्ञानापासून झालेला तमोगुण सर्व जीवाच्या बुद्धीला मोह पाडणारा-म्हणजे अविवेकी करणारा आहे. तो प्रमाद-म्हणजे विचार न करता कशाचेहि धाडस करणे, आलस्य व झोप इत्यादि कर्मांनी हे अर्जुना! जीवाला बद्ध करतो॥ ८॥

व्यवहाराचेहि डोळे। मंद जेणे पडळें। मोहरात्रीचें काळें। मेहुडें जें॥ १७४॥
अज्ञानाचें जियालें। तया एका लागलें। जेणें विश्व भुललें। नाचत असे॥ १७५॥
अविवेकमहामंत्र। जें मौढ्यमद्याचें पात्र। हें असो मोहनास्त्र। जीवांसि जें॥ १७६॥
पार्था तें गा तम। रचूनि ऐसें वर्म। चौखुरी देहात्म-। मानियातें॥ १७७॥
हें एकचि कीर शरीरीं। माजों लागे चराचरीं। आणि तेथ दुसरी। गोठी नाहीं॥ १७८॥
सर्वेंद्रिया जाड्य। मनामाजीं मौढ्य। माल्हाती दार्ढ्य। आलस्याचें॥ १७९॥
आंगें आंग मोडामोडी। कार्य जातीं अनावडी। नुसती परवडी। जांभयांची॥ १८०॥
उघडियाचि दिठी। देखणें नाहीं किरीटी। नाळवितांचि उठी। वो म्हणौनि॥ १८१॥
पडलिये धोंडी। नेणे कानी मुरडी। तयाचि परी मुरकुंडी। उकलूं नेणे॥ १८२॥
पृथ्वी पाताळीं जावो। कां आकाशही वरी येवो। परी उठणें हा भावो। उपजों नेणे॥ १८३॥
उचितानुचित आघवें। झांसुरतां नाठवे जीवें। जेथींचा तेथ लोळावें। ऐसी मेधा॥ १८४॥
उभऊनि करतळें। पडिघाये कपोळें। पायाचें शिरियाळें। मांडूं लागे॥ १८५॥
आणि निद्रेविषयीं चांगु। जीवीं आथि लागु। झोंपीं जातां स्वर्गु। वावो म्हणे॥ १८६॥
ब्रह्मायु होइजे। मा निजेलियाचि असिजे। हें वांचूनि दुजें। व्यसन नाहीं॥ १८७॥
कां वाटा जातां वोघें। कल्हातांही डोळा लागे। अमृतही परी नेघे। जरी नीद आली॥ १८८॥
तेवींचि आक्रोशबळें। व्यापारे कोणे एके वेळे। निगालें तरी आंधळें। रोषें जैसें॥ १८९॥
केधवां कैसें राहाटावें। कोणेसीं काय बोलावें। हें ठाकतें कीं नागवे। हेंही नेणे॥ १९०॥
वणवा मियां आघवा। पांखेंचि पुसोनि घेयावा। पतंगु या हांवा। घाली जेवीं॥ १९१॥
तैसा वळघे साहसा। अकरणींचि धिंवसा। किंबहुना ऐसा। प्रमाद रचे॥ १९२॥
एवं निद्रालस्यप्रमादीं। तम इया त्रिविधीं। बांधे निरुपाधी। चोखटातें॥ १९३॥
जैसा वन्ही काष्ठीं भरे। तैं दिसे काष्ठाकारें। व्योम घटें आवरे। तें घटाकाश॥ १९४॥
नाना सरोवर भरलें। तैं चंद्रत्व तेथें बिंबलें। तैसें गुणाभासीं बांधलें। आत्मत्व गमे॥ १९५॥

**अर्थ**—तमोगुण हा व्यवहाराच्या ज्ञानालाहि पडळरोगाप्रमाणे झाकणारा आहे व जो मोहरूपी (अविवेकरूपी) अंधाऱ्या रात्रीचे काळे ढग आहे॥ १७४॥ अज्ञानापासून झालेला हा तमोगुण ज्या एका जीवाला लागला आहे, त्याच्या योगाने जीव आपल्या स्वरूपाला विसरून विषयाला मोहित झाला आहे॥ १७५॥ अविवेक हा त्याचा मुख्य मंत्र असून तमोगुण हे मूर्खपणारूपी सुरापानाचे भांडेच होय. हे असो हा तमोगुण म्हणजे जीवाला पूर्णपणे मोहून टाकणारे अस्त्रच आहे॥ १७६॥ अर्जुना! असा हा तमोगुण, या लक्षणाने प्रगट होऊन देह म्हणजेच आत्मा असे मानणाऱ्याला चहूबाजूंनी आवळतो॥ १७७॥ हा एकच तमोगुण सर्व स्थावर-जंगम शरीरामध्ये वाढला असता मग तेथे त्याच्या लक्षणाशिवाय दुसरी गोष्टच राहत नाही॥ १७८॥ सर्व इंद्रिये जड होतात, मन अत्यंत अविवेकी होते व तो सर्वस्वी आळसाच्या स्वाधीन होतो॥ १७९॥ अंगाला आळेपिळे देतो, काहीच करावेसे वाटत नाही. नुसत्या जांभया देत राहतो॥ १८०॥ अर्जुना! डोळे उघडेच असून पाहात नाही, हाक न मारताही होकार देऊन उठतो॥ १८१॥ पडलेला दगड जसा कानवडा होत नाही, त्याप्रमाणे घातलेली मुरकुंडी तो मोडत नाही॥ १८२॥ जमीन पाताळात जावो किंवा वरील आकाश तुटून पडतो तरी झोपेतून उठावे असे त्याच्या मनातच येत नाही॥ १८३॥ आळसाने स्वस्थ पडला असता योग्यायोग्य काही पाहात नाही. जेथे असतो तेथेच त्याला पडावेसे वाटते॥ १८४॥ दोन्ही हाताचे तळवे वर करून गालाला धरतो व डोक्याला पायाचे आळे करतो-म्हणजे डोके दोन्ही गुडध्यात घालतो॥ १८५॥ आणि झोपेच्या ठिकाणी अत्यंत आसक्ति असते झोपेपुढे त्याला स्वर्गहि तुच्छ वाटतो॥ १८६॥ ब्रह्मदेवाचे आयुष्य मिळावे व निजूनच राहावे याशिवाय दुसरा नादच नाही॥ १८७॥ रस्त्याने जात असता तमोगुणाच्या ओघात आंग कलंडून

पडले तरी डोळा लागलाच राहतो निद्रा आली असता अमृत प्राप्त आले तरी ते घ्यावेसे वाटत नाही॥ १८८॥ आंधळा मनुष्य रागाच्या त्वेषात जायला निघाला असता ज्याप्रमाणे तो कोठेहि जातो, नियम नाही; त्याप्रमाणे दुसऱ्याच्या आरडाओरडीने झोपेतून उठविलेला तमोगुणी पुरुषहि एखादे वेळी कामाला प्रवृत्त झाला तरी तो काय करील याचा नियमच नसतो॥ १८९॥ केव्हा कसे वागावे, कोणाशी कसे बोलावे, तसेच हे प्राप्त होणार आहे किंवा नागविणार आहे, हे त्याला कळेनासे होते॥ १९०॥ संपूर्ण वणवा पंखाने पुसून घ्यावा ह्या अविचाराने जसा पतंग त्यात शिरतो व प्राणाला मुकतो॥ १९१॥ त्याप्रमाणे साहसी कर्मांचे तो धाडस करतो, करू नये असे कर्म करण्यातच धैर्य दाखवितो. फार काय सांगावे! असे तो प्रमादच करीत असतो॥ १९२॥ याप्रमाणे निद्रा, आळस, प्रमाद या तीन प्रकारांनी मुळात निरुपाधिक असलेल्या जीवात्म्याला तमोगुण बांधत असतो॥ १९३॥ ज्याप्रमाणे लाकडात अग्नि प्रगट झाला असता तो लाकडाएवढा दिसतो, घटात भरलेले आकाश घटाएवढे दिसते॥ १९४॥ किंवा भरलेल्या सरोवरात चंद्र प्रतिबिंबित होतो, त्याप्रमाणे आत्मा गुणांनी बांधल्यासारखा दिसतो॥ १९५॥

**सत्त्वं सुखे सञ्जयति रजः कर्मणि भारत। ज्ञानमावृत्य तु तमः प्रमादे सञ्जयत्युत॥ ९ ॥**
**रजस्तमश्चाभिभूय सत्त्वं भवति भारत। रजः सत्त्वं तमश्चैव तमः सत्त्वं रजस्तथा॥ १०॥**

**अर्थ**—सत्त्वगुण सुखात आसक्त करतो, रजोगुण कर्मात आसक्त करतो व तमोगुण ज्ञानाला झाकून प्रमादात आसक्त करतो॥ ९॥ केव्हा रजोगुण व तमोगुण यांना दाबून सत्त्वगुण असतो तर केव्हा सत्त्वगुण व तमोगुण यांना दाबून रजोगुण असतो. आणि केव्हा सत्त्वगुण व रजोगुण यांना दाबून तमोगुण असतो॥ १०॥

**पै परिहरूनि कफवात। जैं देहीं आटोपे पित्त। तैं करी संतप्त। देह जेवीं॥ १९६॥**
**कां वर्ष आतप जैसें। जिणोनि शीतचि दिसे। तेव्हां होय हिंव ऐसें। आकाश हें॥ १९७॥**
**नाना स्वप्न जागृती। लोपूनि ये सुषुप्ति। तैं क्षणु एक चित्तवृत्ती। तेचि होय॥ १९८॥**
**तैसीं रजतमें हारवी। जैं सत्त्व माजु मिरवी। तैं जीवाकरवीं म्हणवी। सुखिया ना मी॥ १९९॥**
**तैसेंचि सत्त्व रज। लोपूनि तमाचें भोज। वळघें तैं सहज। प्रमादी होय॥ २००॥**
**तयाचि गा परिपाठीं। सत्त्व तमातें पोटीं। घालूनि जेव्हां उठी। रजोगुण॥ २०१॥**
**तेव्हा कर्मावांचूनि कांहीं। आन गोमटे नाहीं। ऐसें मानी देहीं। देहराज॥ २०२॥**
**त्रिगुण निरूपण। तीं श्लोकीं सांगितलें जाण। आतां सत्त्वादिवृद्धीलक्षण। सादर परिसा॥ २०३॥**

**अर्थ**—कफवाताला दाबून पित्त वाढले असता ज्याप्रमाणे ते सर्वांगाचा दाह करते॥ १९६॥ किंवा जेव्हा ग्रीष्मकाळ व वर्षाकाळ यांना जिंकून शीतकाळ येतो, तेव्हा सर्व आकाश शीतमयच होते॥ १९७॥ किंवा जागृति, स्वप्न जाऊन सुषुप्ति अवस्था आली असता चित्त जसे तितका वेळ त्याच अवस्थेच्या रूपाचे होते॥ १९८॥ त्याप्रमाणे रजतमगुण क्षीण होऊन जेव्हा सत्त्वगुण वाढतो, तेव्हा तो जीवाकडून ''मी एक सुखी'' असा अभिमान घेववितो॥ १९९॥ त्याचप्रमाणे सत्व व रज हे दोन गुण क्षीण होऊन तमोगुण फोफावला असता सहजच मनुष्यप्राणी प्रमाद करू लागतो॥ २००॥ या रीतीने सत्व, तम हे दोन गुण पोटात घालून जेव्हा रजोगुण वाढतो॥ २०१॥ तेव्हा या देहामध्ये असलेल्या जीवाला कर्म करण्यावाचून दूसरे काही बरे वाटत नाही॥ २०२॥ याप्रमाणे मागे तीन श्लोकांनी सत्व, रज, तम या तीन गुणांची लक्षणे सांगितली. आता सत्त्वादि गुण वृद्धि पावले असता कोणती लक्षणे होतात, ते सांगतो, लक्ष देऊन ऐका॥ २०३॥

**सर्वद्वारेषु देहेऽस्मिन्प्रकाश उपजायते। ज्ञानं यदा तदा विद्याद्विवृद्धं सत्त्वमित्युत॥ ११॥**
**लोभः प्रवृत्तिरारम्भः कर्मणामशमः स्पृहा। रजस्येतानि जायन्ते विवृद्धे भरतर्षभ॥ १२॥**
**अप्रकाशोऽप्रवृत्तिश्च प्रमादो मोह एव च। तमस्येतानि जायन्ते विवृद्धे कुरुनन्दन॥ १३॥**
**यदा सत्त्वे प्रवृद्धे तु प्रलयं याति देहभृत्। तदोत्तमविदां लोकानमलान्प्रतिपद्यते॥ १४॥**
**रजसि प्रलयं गत्वा कर्मसङ्गिषु जायते। तथा प्रलीनस्तमसि मूढयोनिषु जायते॥ १५॥**

**अर्थ**—या देहामध्ये असलेल्या सर्व इंद्रियाच्या द्वारातून विवेकज्ञान प्रगट होऊ लागले असता-म्हणजे सर्व इंद्रिये विवेकज्ञानपूर्वक व्यापार करू लागली असता सत्त्वगुणाची वृद्धि झाली, असे जाणावे ॥ ११ ॥ रजोगुण वाढला असता परद्रव्याचा अभिलाष, शरीर व इंद्रिये यांची कर्म करण्याकडे प्रवृत्ति, कर्माची सुरुवात, चित्तांत अशांति असणे (म्हणजे राग, द्वेष इत्यादि विकारापैकी काहीतरी विकार चित्तात राहणे) व वस्तूच्या प्राप्तीची प्रबल इच्छा ही लक्षणे होतात ॥ १२ ॥ तमोगुण वाढला असता अविचार, कर्म करण्यास आळस, प्रमाद, अविवेक अशी लक्षणे होतात ॥ १३ ॥ सत्वगुण वाढला असतांना जेव्हा जीव मरतो तेव्हा तो स्वर्गादि पुण्यलोकात जातो ॥ १४ ॥ तसेच रजोगुण वाढला असतांना जीव मरण पावला तर तो कर्मासक्त अशा मनुष्यलोकात जन्म घेतो. त्याचप्रमाणे तमोगुण वाढला असता असता मरणाऱ्यास पशु, पक्षी, कृमी इत्यादि मूढयोनीत जन्म येतो. ॥ १५ ॥

**पैं रजतमविजयें। सत्त्व गा देहीं इये। वाढतां चिन्हें तियें। ऐसीं होती ॥ २०४ ॥**
**जे प्रज्ञा आंतुलीकडे। न समाती बाहेरी वोसंडे। वसंतीं पद्मखंडें। दूती जैसी ॥ २०५ ॥**
**सर्वेद्रियांचां आंगणीं। विवेक करी राबणी। साचचि करचरणीं। होती डोळे ॥ २०६ ॥**
**राजहंसापुढें। चांचूचें आगरडें। तोडी जेवीं झगडे। क्षीरनीराचे ॥ २०७ ॥**
**तेवीं दोषादोषविवेकीं। इंद्रियेंचि होती पारखीं। नियम बारे पायिकी। वोळगे तैं ॥ २०८ ॥**
**नाइकणें तें कानचि वाळी। न पाहाणें तें दिठीचि गाळी। अवाच्य तें टाळी। जीभचि गा ॥ २०९ ॥**
**वातीपुढे जैसें। पळों लागे काळवसें। निषिद्ध इंद्रियां तैसें। समोर नोहे ॥ २१० ॥**
**धाराधरकाळे। महानदी उचंबळें। तैसी बुद्धि पघळे। शास्त्रजातीं ॥ २११ ॥**
**अगा पुनवेचां दिवशीं। चंद्रप्रभा धांवे आकाशीं। ज्ञानीं वृत्ति तैसी। फांके सैंघ ॥ २१२ ॥**
**वासना एकवटे। प्रवृत्ति वोहटे। मानस विटे। विषयांवरी ॥ २१३ ॥**

**अर्थ**—अर्जुना! रज, तम या गुणांना जिंकून सत्त्वगुण वाढला असता देहाच्या ठिकाणी अशी चिन्हे दिसतात ॥ २०४ ॥ ज्याप्रमाणे वसंत ऋतुत कमलफुलातील सुगंध आत न सामावल्यामुळे बाहेर फाकतो, त्याप्रमाणे जीवाच्या बुद्धीतील सात्त्विकज्ञान आत न सामावल्यामुळे इंद्रियांचे द्वारा बाहेरहि फाकते ॥ २०५ ॥ सर्व ज्ञानेंद्रियांच्या ठिकाणी विवेक राहाटी करतो-म्हणजे सर्व ज्ञानेद्रियांचे व्यापार विवेकपूर्वक होतात. खरोखर हात-पाय यांच्या ठिकाणी देखील डोळे येतात-म्हणजे कर्मेंद्रियाचे व्यापारही विवेकाने होतात ॥ २०६ ॥ ज्याप्रमाणे राजहंसापुढे दूध व पाणी यांचे मिश्रण आले असता जसे त्याच्या चोचीच्या योगाने दूध व पाणी अलग होते ॥ २०७ ॥ त्याप्रमाणे हे दोषावह की निर्दोष हे इंद्रियांना आपोआप कळू लागते. यम-नियम हे सात्त्विक पुरुषाची सेवकाप्रमाणे सेवा करू लागतात ॥ २०८ ॥ जे ऐकू नये ते कानच आपण ऐकायचे टाळतात. पाहू नये ते दृष्टिच आपण पाहत नाही. जे बोलू नये ते जीभच बोलण्याचे टाकून देते ॥ २०९ ॥ उजळलेल्या दिव्यापुढे ज्याप्रमाणे आंधार राहात नाही, त्याप्रमाणे इंद्रियाकडून निषिद्धाचरण होतच नाही ॥ २१० ॥ ज्याप्रमाणे पावसाळ्यात महानदी पुरामुळे उचंबळून येते. त्याप्रमाणे सत्त्वगुण वाढला असता बुद्धीला सर्व शास्त्राचे ज्ञान होते ॥ २११ ॥ अर्जुना! पौर्णिमेच्या दिवशी पूर्ण चंद्र झाला असता त्याचा प्रकाश सर्व आकाशभर पसरतो त्याप्रमाणे सत्त्वगुण वाढला असता बुद्धीचे ज्ञान सर्वत्र पसरते ॥ २१२ ॥ नाना विषयाच्या ठिकाणी फाकलेली वासना एका परब्रह्मप्राप्तीचे ठिकाणी एकवटते-म्हणजे विषयप्राप्तीची वासना नाहीशी होऊन एक परमेश्वरप्राप्तीचीच वासना राहते-विषयसुख प्राप्तीचा प्रयत्न क्षीण होतो व मनालाच विषयभोगाचा कंटाळा वाटतो ॥ २१३ ॥

**गूढार्थदीपिका**—ज्या पुरुषाच्या ठिकाणी सत्त्वगुणाची वृद्धि झाली आहे, त्या पुरुषाला "ऊह: शब्दोऽध्ययनं दु:खविघातास्त्रय: सुहृत्प्राप्ति:" (सां० का० श्लो० ५१) ऊह म्हणजे विशेष अशी सूक्ष्म विचारशक्ति, शब्द म्हणजे शब्दव्युत्पत्ति, अध्ययन म्हणजे शास्त्रप्रवेश, आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक अशा तिन्ही दु:खाचा नाश व आत्मकल्याण साधून देणाऱ्या सत्पुरुषाची प्राप्ति, अशा सिद्धी प्राप्त होतात असे सांख्यकारिकेतील ५१ व्या श्लोकात

म्हटले असून ''अध्यवसायो बुद्धिर्धर्मो ज्ञान विराग ऐश्वर्यम्। सात्विकमेतद्रूपम्'' यथार्थ निश्चय होणे, धर्म समजणे, आत्मज्ञान होणे, वैराग्य होणे, ऐश्वर्य प्राप्त होणे इत्यादि अशी सात्त्विकबुद्धीची रूपे आहेत असेहि तेथेच २३ व्या श्लोकाने सांगितले आहे.

**एवं सत्त्व वाढे। तैं हें चिन्ह फुडें। आणि निधनही घडे। तेव्हांचि जरी॥ २१४॥**
**कां पाहालेनि सुयाणें। जालिया परगुणें। पढियंतें ये पाहुणें। स्वर्गोनि ये॥ २१५॥**
**तरी जैसीच घरींची संपत्ती। आणि तैंसीच औदार्यधैर्यवृत्ती। मा परत्रा आणि कीर्ती। कां नोहावें॥ २१६॥**
**मग गोमटेया तया। जावळी असे धनंजया। तेवीं सत्त्वीं जाणे देहा। कें आथि गा॥ २१७॥**
**जे स्वगुणीं उद्भट। घेऊनि सत्त्व चोखट। निगे सांडूनि कोपट। भोगक्षम हें॥ २१८॥**
**अवचटें ऐसा जो जाये। तो सत्त्वाचाचि नवा होये। किंबहुना जन्म लाहे। ज्ञानियांमाजीं॥ २१९॥**
**सांग पां धनुर्धरा। रावो रायपणें डोंगरा। गेलिया अपुरा। होय काई॥ २२०॥**
**नातरी येथिंचा दिवा। नेलिया सेजिया गांवा। तो तेथें तरी पांडवा। दीपचि कीं॥ २२१॥**
**तैसी ते सत्त्वशुद्धी। आगळी ज्ञानेंसी वृद्धी। तरंगावों लागे बुद्धी। विवेकावरी॥ २२२॥**
**पैं महदादि परिपाटी। विचारूनि शेवटीं। विचारासकट पोटीं। जिरोनि जाय॥ २२३॥**
**छत्तिसां सदतिसावें। चोविसां पंचविसावें। तिन्ही नुरोनि स्वभावें। चतुर्थ जें॥ २२४॥**
**ऐसें सर्व जें सर्वोत्तम। जालें असे जया सुगम। तयासवें निरुपम। लाहे देह॥ २२५॥**

**अर्थ**—याप्रमाणे सत्त्वगुणाची वृद्धि झाली असता ही लक्षणे होतात. अशा सत्त्वगुणाच्या वृद्धीतच जर मरण आले॥ २१४॥ तर ज्याप्रमाणे सर्व धान्यादिकांची विपुल समृद्धि असून मेजवानीचा प्रसंग असावा व तेव्हाच स्वर्गातून प्रिय पाहुणा यावा॥ २१५॥ किंवा आपल्या घरी विपुल संपत्ति असून त्याबरोबर सढळ हाताने दान देण्याची प्रवृत्ति व धैर्य असावे, तर इहलोकात त्याची कीर्ति व परलोकात त्याला सुख का प्राप्त होणार नाही?॥ २१६॥ अर्जुना! मग त्याच्या त्या उत्तम गतीला उपमा देण्याला दुसरे काही आहे काय? त्याप्रमाणे सत्त्वगुणाची वृद्धि होऊन मरण आले असता सत्त्वाला सोडून त्याचा देह कोठे जाणार?॥ २१७॥ आपल्या स्वभावगुणकर्मानुसार विहित केलेल्या धर्माचे अत्यंत एकनिष्ठपणे आचरण करून संपादन केलेला सत्त्वगुणाचा उत्कर्ष घेऊन जो विषयाचा भोग घेण्यास समर्थ असलेल्या या देहरूपी खोपडीतून बाहेर पडतो.॥ २१८॥ अशा रीतीने जो अकस्मात देह सोडून जातो तो सत्त्वगुणी राहून नवा देह प्राप्त करून घेतो. फार काय सांगावे! तो ज्ञानी पुरुषाच्या कुळातच जन्म घेतो॥ २१९॥ हे अर्जुना! राजा, राजाप्रमाणे डोंगरावर गेला म्हणून त्याला कमीपणा येतो काय? सांग बरे!॥ २२०॥ किंवा अर्जुना! येथील दिवा जवळच्या गावात नेला असता तेथेहि तो दिवाच असतो की नाही?॥ २२१॥ त्याप्रमाणे सत्त्वगुणाच्या वृद्धीने ज्ञानाची विशेषच वृद्धि होत असते व बुद्धि आत्मानात्मविवेकावर तरंगू लागते-म्हणजे आत्मानात्मविवेकच करीत राहते॥ २२२॥ ही बुद्धि महदादि तत्त्वाचा क्रमाने विचार करून शेवटी विचारासकट तेथल्या तेथे नाहीशी होते॥ २२३॥ छत्तीस किंवा सदतीस अथवा चोवीस किंवा पंचवीस अशी निरनिराळ्या शास्त्रकारांनी मानलेली तत्त्वे व तीन देह हे सर्व नाहीसे होऊन चवथा जो महाकारण देह किंवा तुर्यावस्था तीच एक उरते॥ २२४॥ महाकारणरूप किंवा तुर्यावस्थारूप असे जे सर्वोत्तम ब्रह्म ते त्याला सुलभ प्राप्त होऊन त्याबरोबरच अनुपम अशा देहाचीहि प्राप्ति होते॥ २२५॥

**गूढार्थदीपिका**—''**सत्त्वयुक्तं यथा चित्तं शब्दब्रह्मार्थ दर्शनम्**'' (भाग १०-२०-४३) सत्त्वगुण हा परब्रह्माचे दर्शन करून देणारा आहे, असे भागवतातहि म्हटले आहे.

**इयाचि परी देख। तमसत्त्व अधोमुख। बैसोनि जैं आगळीक। धरी रज॥ २२६॥**
**आपलिया कार्याचा। धुमाड गांवीं देहाचा। माजवी तैं चिन्हांचा। उदयो ऐसा॥ २२७॥**
**पांजरली वाहटुळी। करी वेगळ वेंटाळी। तैसी विषयीं सरळी। इंद्रियां होय॥ २२८॥**

**परदारादि पडे। परी विरुद्ध ऐसें नावडे। मग शेळियेचेनि तोंडें। सैंघ चारी॥ २२९॥**
**हा ठायवरी लोभु। करी स्वैरत्वाचा राबु। वेंटाळितां अलाभु। तें तें उरे॥ २३०॥**
**आणि आड पडलिया। उद्यमजातां भलतेया। प्रवृत्ति धनंजया। हातु न काढी॥ २३१॥**
**तेवींचि एकादा प्रासादु। कां करावा अश्वमेधु। ऐसा अचाट छंदु। घेऊनि उठी॥ २३२॥**
**नगरेंचि रचावीं। जळाशयें निर्मावीं। महावनें लावावीं। नानाविधें॥ २३३॥**
**ऐसैसां अफाटीं कर्मीं। समारंभु उपक्रमी। आणि दृष्टादृष्ट कामीं। पुरे न म्हणे॥ २३४॥**
**सागरही सांडीं पडे। आगी न लाहे तीन कवडे। ऐसें अभिलाषीं जोडे। दुर्भरत्व॥ २३५॥**
**स्पृहा मना पुढां पुढां। आशेचा घे दवडा। विश्व घापे चाडा। पायांतळीं॥ २३६॥**
**इत्यादि वाढतां रजीं। इयें चिन्हें होती साजीं। आणि ऐशा समाजीं। वेंचे जरी देह॥ २३७॥**
**तरी आघवाचि इहीं। परिवारला आनीं देहीं। रिगे परि योनीही। मानुषीचि॥ २३८॥**
**सुरवाडेंसिं भिकारी। वसो पां राजमंदिरीं। तरी काय अवधारीं। रावो होईल॥ २३९॥**
**बैल तेथें करबाडें। हें न चुके गा फुडें। नेइजो कां व्हाडें। समर्थाचेनी॥ २४०॥**
**म्हणौनि व्यापाराच्याहातीं। उसंतु देहा ना राती। तैसयांचिये पांती। जुंपिजे तो॥ २४१॥**
**कर्मजडाचां ठायीं। किंबहुना होय देहीं। जो रजोवृद्धीच्या डोहीं। बुडोनि निमे॥ २४२॥**

**अर्थ**—त्याचप्रमाणे जेव्हा सत्त्वगुण व तमोगुण हे क्षीण होऊन रजोगुण विशेष वाढतो आणि देहरूपी गावात आपल्या कर्माचा धुमाकूळ माजवितो, तेव्हा ही पुढील चिन्हे प्रगट होतात॥ २२६-२२७॥ ज्याप्रमाणे सुटलेली वाहटूळ पसरली असता ती वेगवेगळ्या पदार्थांना वेटाळून एकत्र करते, त्याप्रमाणे रजोगुणाची वृद्धि झाली असता इंद्रिये विषयांच्या ठिकाणी स्वैर वागतात॥ २२८॥ परस्त्री दृष्टीस पडली असता तिच्याकडे पाहणे किंवा तिचा भोग घेणे हे पाप आहे असे वाटत नाही व मग शेळीच्या तोंडाप्रमाणे इंद्रियांना स्वैर चरू देतो॥ २२९॥ त्या रजोगुणी पुरुषाचा लोभ एथपर्यंत वाढतो की तो स्वैरपणे वागत असताना जो पदार्थ त्याला लाभणार नाही, तेवढाच त्याच्या हातून सुटतो॥ २३०॥ अर्जुना! कोणताहि बरा-वाईट उद्योग करण्याचा प्रसंग समोर आला असता तो प्रवृत्तिपासून माघार घेत नाही-म्हणजे कर्म केल्यावाचून राहत नाही॥ २३१॥ त्याचप्रमाणे एखाद्या मोठा राजवाडा बांधावा किंवा अश्वमेघ यज्ञ करावा अशा अवाढव्य उद्योगाच्या पाठीमागे लागतो॥ २३२॥ शहरे वसवावी, विहिरी-तळी बांधावी व नाना प्रकारच्या अरण्याची लावणी करावी॥ २३३॥ अशा अशा अचाट कामाला तो प्रारंभ करतो व दृष्ट-म्हणजे इहलोकात कीर्ति वगैरे मिळणारी व अदृष्ट-म्हणजे मेल्यावर स्वर्गादिकांची प्राप्ति करून देणारी-कर्मे करतांना त्याला पुरेसे वाटत नाही॥ २३४॥ समुद्रात कितीहि पाण्याची भर होत राहीली तरी तो पूर्ण भरला जात नाही असा दुर्भर आहे, तोहि एकदाचा पूर्ण भरून वाहू लागेल, अग्नीत कितीहि इंधन टाकले तरी तो तृप्त होत नाही, तो अधिकच पेट घेतो असा तो दुर्धर आहे. तोहि एकदाचा तृप्त होईल, पण रजोगुणी पुरुषाचा अभिलाष कधी शांत होत नाही॥ २३५॥ त्या रजोगुणी पुरुषाची इच्छा मनाच्या पुढेच आशेची धाव घेते व त्या आशेने तो संपूर्ण जगत् पालथे घालतो॥ २३६॥ याप्रमाणे रजोगुणाची वृद्धि झाली असता ही लक्षणे व्यक्त होतात आणि अशा रजोगुणाच्या वृद्धीतच तो जर मरण पावला॥ २३७॥ तर या रजोगुण व रजोगुणाच्या लक्षणासह मनुष्ययोनीतच त्याला दुसरा देह प्राप्त होतो॥ २३८॥ पहा! भिकारीमनुष्य राजवाड्यात चांगले भोग भोगीत सुखाने राहिला तरी तो राजा होईल काय?॥ २३९॥ बैल, श्रीमंताच्या लग्नास वऱ्हाडाबरोबर गेले तरी त्यांच्या कपाळाचा कडबा चुकत नाही॥ २४०॥ ज्या रजोगुणी पुरुषाच्या देहाच्या व्यापाररूप हाताला दिवस-रात्र विश्रांति नसते अशांच्या पंक्तीत ते जाऊन बसतात॥ २४१॥ रजोगुणाच्या, वाढलेल्या स्थितीत ज्यांना मृत्यु येतो ते जड अशा कर्ममार्गाच्या ठिकाणी विश्वास ठेवणाऱ्या मूढबुद्धि लोकांच्या कुळात देह धारण करतात॥ २४२॥

**मग तैसाचि पुढती। रजसत्त्ववृत्ती। गिळूनि ये उन्नती। तमोगुण॥ २४३॥**

**तैंचि जियें लिंगें। देहींचीं सबाह्य सांगें। तियें परिस चांगे। श्रोत्रबळें॥ २४४॥**
**तरी होय ऐसें मन। जैसें रविचंद्रहीन। रात्रींचें का गगन। अंवसेचिये॥ २४५॥**
**तैसें अंतर असोस। होय स्फूर्तिहीन उद्वस। विचाराची भाष। हारपे तैं॥ २४६॥**
**बुद्धि मेचवेना धोंडी। हा ठायवरी मवाळें सांडी। आठवो देशधडी। जाला दिसे॥ २४७॥**
**अविवेकाचेनि माजें। सबाह्य शरीर गाजे। एकलेनि घेपे दीजे। मौढ्यें तेथ॥ २४८॥**
**आचारभंगाची हाडें। रूपती इंद्रियापुढें। मरे जरी तेणेंकडे। क्रिया जाय॥ २४९॥**
**पाहीं आणिकही एक दिसे। जे दुष्कृतीं चित्त उल्हासे। आंधारी देखणें जैसें। डुडुळाचें॥ २५०॥**
**तैसें निषिद्धाचेनि नांवें। भलतेही भरे हांवे। तियेविषयीं धांवें। घेती करणें॥ २५१॥**
**मदिरा न घेतां डुले। सन्निपातेंवीण बरळे। निष्प्रेमेंचि भुले। पिसें जैसें॥ २५२॥**
**चित्त तरी गेलें आहे। परी उन्मनी ते नोहे। ऐसें माल्हातिजे मोहें। माजिरेनि॥ २५३॥**
**किंबहुना ऐसैसीं। इयें चिन्हें तम पोषी। जैं वाढे आयितीसी। आपुलिया॥ २५४॥**

**अर्थ**—मग पुढे त्याचप्रमाणे रजोगुण व सत्त्वगुण क्षीण करून जेव्हा तमोगुणाचा उत्कर्ष होतो॥ २४३॥ तेव्हा देहाच्या ठिकाणी आत व बाहेर जी चिन्हे उमटतात, ती सांगतो, लक्ष देऊन ऐक॥ २४४॥ ज्याप्रमाणे अमावस्येच्या रात्री आकाश सूर्यचंद्रावाचून गडद अंध:कारमय असते असे हे मन ज्ञानहीन होते॥ २४५॥ त्याप्रमाणे अंत:करण अत्यंत जाणीवरहित शून्यमय होते व तेथे विचाराची भाषाच राहत नाही॥ २४६॥ दगड पासंगासहि पुरणार नाही इतका त्या बुद्धीचा कोमलपणा नाहीसा झालेला असतो-म्हणजे बुद्धि अत्यंत कठोर होते. स्मृति नि:शेष नाहीशी होते॥ २४७॥ संपूर्ण शरीराच्या आत-बाहेर अविवेकच माजला असतो आणि तेथे नुसत्या केवळ मूर्खपणानेच देण्याघेण्याचा व्यवहार होतो॥ २४८॥ शास्त्रविहित आचारांचा भंग, हीच कोणी हाडे, कर्मेंद्रियापुढे रोविली असतात-म्हणजे कर्मेंद्रियाकडून निषिद्धाचरणच होते आणि तो मेला तरी त्याची क्रिया तमोगुणाकडेच जाते-म्हणजे निषिद्धच होते॥ २४९॥ ज्याप्रमाणे घुबडाला अंधारातच दिसते, त्याप्रमाणे तमोगुणी पुरुषाची आणखी एक गोष्ट अशी असते की, त्याला वाईट किंवा निषिद्ध कर्म करण्यातच उल्हास वाटतो॥ २५०॥ निषिद्धाचरणाच्या नावाने व काहीहि करण्याच्या इच्छेने तो भारून जातो व त्याची इंद्रिये तसेच करण्याला धावतात॥ २५१॥ ज्याप्रमाणे वेडा झालेला मनुष्य मद्य न पिता देखील झिंगतो, सन्निपात न होतांनाहि बरळतो व भगवत्प्रेमावाचून देहाला विसरतो॥ २५२॥ त्याप्रमाणे तमोगुणी पुरुषाचे चित्त अज्ञानांत लीन झाले असते; पण ती उन्मनी अवस्था नव्हे. असा माजलेल्या मोहाने तो ग्रासला जातो॥ २५३॥ फार काय सांगावे! याप्रमाणे जेव्हा तमोगुण आपल्या सर्व सामुग्रीसह वाढतो, तेव्हा ही लक्षणे होतात॥ २५४॥

**आणि हेंचि होय प्रसंगें। मरणाचें जरी पडे खागें। तरी तेतुलेनि रिगे। तमेंसीं तो॥ २५५॥**
**राई राईपण बीजीं। सांठवूनियां अंग त्यजी। मग विरूढे तैं दुजी। गोठी आहे गा॥ २५६॥**
**पैं होऊनि दीपकलिका। येरु आगी विझो कां। जेथ लागे तेथ असका। तोचि आहे॥ २५७॥**
**म्हणोनि तमाचिये लोथे। बांधोनियां संकल्पातें। देह जाय तैं मागुतें। तमाचेंचि होय॥ २५८॥**
**आतां काय येणें बव्हें। जो तमोवृद्धि मृत्यु लाहे। तो पशु कां पक्षी होये। झाड कां कृमी॥ २५९॥**

**अर्थ**—आणि वाढलेल्या तमोगुणाच्या प्रसंगानेच मरण प्राप्त झाले तर तो मनुष्य त्या वाढलेल्या तमोगुणासह देह सोडून जातो॥ २५५॥ मोहरी मोहरीपणानेच बीजरूपात साठविली जाते व ती पेरली असता पुन: बीजरूपात साठविलेल्या मोहरीहून निराळ्या रीतीने उगवते काय?॥ २५६॥ दिव्याच्या रूपाने प्रगट झाल्यावर अग्नि विझला तरी जेथे जेथे ती दिव्याची ज्योति लागेल तेथे तेथे अग्निच असतो॥ २५७॥ त्याचप्रमाणे सर्व सामग्रीसह वाढलेल्या तमोगुणाच्या गाठोडीत संकल्पाला बांधून जो देह सोडून जातो, तो पुन: पुढे तमोगुणी योनीतच जन्म घेतो॥ २५८॥ आता बहु बोलून काय करायचे! ज्याला वाढलेल्या तमोगुणाच्या स्थितीतच मृत्यु येतो, त्याला पशु, पक्षी, झाड किंवा कृमि अशा योनीतच जन्म येतो.॥ २५९॥

गूढार्थदीपिका—''य इह कपूयचरणा अभ्याशो ह यत्ते कपूयां योनिमापद्येरञ्श्वयोनि वा सूकरयोनि वा चण्डालयोनि वा'' (छां० उ०-५-१०-७) जो पाप कर्म करतो त्याला कुत्रा, डुक्कर किंवा चांडाल अशा योनि प्राप्त होतात असे श्रुतीनेहि सांगितले आहे.

जीव हा उत्क्रांतच आहे; म्हणून मनुष्य खालच्या योनीत जातच नाही असा हा पाश्चात्यांचा उत्क्रांतिवाद, पापाचरणाने प्राप्त होणाऱ्या दु:खाची भीति नाहीशी करून स्वैर वर्तनाला पोषक असल्यामुळे बुद्धीला न पटणारा असा वेडगळपणाचा आहे. मनुष्य सदाचरणादिकांनी आपल्या परम अशा अनादि व पूर्ण परब्रह्मस्थितिला प्राप्त होतो व अधर्माचरणाने खालच्या पशुपक्ष्यादि योनीत जातो, हा श्री ज्ञानेश्वर माउलीनी सांगितलेला वैदिक सिद्धान्तच बौद्धिक असून समाजकल्याणकारक आहे.

**कर्मणः सुकृतस्याहुः सात्त्विकं निर्मलं फलम्। रजसस्तु फलं दुःखमज्ञानं तमसः फलम्॥ १६॥**

**अर्थ**—शास्त्रविहित सात्विक अशा पुण्यकर्माचरणाचे निर्मल सात्विक फल मिळते. दु:खप्राप्ति हे राजकर्माचे फल आहे. तमोगुणी कर्माचे अज्ञान किंवा अविवेक हे फळ होय॥ १६॥

**येणेंचि पैं कारणें। जें निपजे सत्त्वगुणें। तें सुकृत ऐसें म्हणे। श्रौतसमो॥ २६०॥**
**म्हणौनि तया निर्मळा। सुखज्ञानी सरळा। अपूर्व ये फळा। सात्त्विक तें॥ २६१॥**
**मग राजसा जिया क्रिया। तया इंद्रावणी पिकलिया। जे सुखें चितारूनियां। फळतीं दुःखें॥ २६२॥**
**कां निंबोळियेचें पिक। वरि गोड आंत विख। तैसें तें राजस देख। क्रियाफळ॥ २६३॥**
**तामस कर्म जितुकें। अज्ञान फळेंचि पिके। विषांकुर विखें। जियापरी॥ २६४॥**

**अर्थ**—या कारणास्तवच जे सत्वगुणाने कर्म केले जाते, ते पुण्यकर्म होय, असे वेदांनी सांगितले आहे॥ २६०॥ म्हणूनच अशा त्या सात्विक कर्म करणाऱ्या निर्मळ चित्ताच्या पुरुषाला ते सात्विक कर्म श्रेष्ठ दर्जाचे सुख व ज्ञान असे फळ देते॥ २६१॥ ज्याप्रमाणे इंद्रावणीची फळे वरून दिसायला अति सुंदर असतात, पण आत कडु असतात, त्याप्रमाणे मग ज्या रजोगुणी क्रिया आहेत त्या बाहेरून सुखाने रंगविलेल्या असून त्याचे दु:खरूपच फळ मिळते-प्राप्त होते॥ २६२॥ किंवा ज्याप्रमाणे कडूनिंबाच्या निंबोळ्या दिसायला सुंदर असल्या तरी आंत विषाप्रमाणे कडु असतात, त्याप्रमाणेच रजोगुणी कर्माचे दु:खरूपच फळ मिळते॥ २६३॥ ज्याप्रमाणे विष पेरले असता त्याला विषाचाच अंकुर येतो, त्याप्रमाणे सर्व तमोगुणी कर्माचे अज्ञान हेच फळ मिळते॥ २६४॥

**सत्त्वात्सञ्जायते ज्ञानं रजसो लोभ एव च। प्रमादमोहौ तमसो भवतोऽज्ञानमेव च॥ १७॥**

**अर्थ**—सत्त्वगुणापासून ज्ञान उत्पन्न होते, रजोगुणापासून लोभ उत्पन्न होतो व तमोगुणापासून प्रमाद, मोह-म्हणजे अविवेक, उत्पन्न होतात व अज्ञानही उत्पन्न होते.॥ १७॥

**म्हणौनि बा रे अर्जुना। येथ सत्त्वचि हेतु ज्ञाना। जैसा कां दिनमाना। सूर्य हा पैं॥ २६५॥**
**आणि तैसेंचि हें जाण। लोभासि रज कारण। आपलें विस्मरण। द्वैता जेवीं॥ २६६॥**
**मोह अज्ञान प्रमादा। ययां मैळेंया दोषवृंदा। पुढती पुढती प्रबुद्धा। तमचि मूळ॥ २६७॥**
**ऐसें विचाराच्या डोळां। तिन्ही गुण हे वेगवेगळां। दाविले जैसा आंवळा। तळहातींचा॥ २६८॥**
**तंव रजतमें दोन्हीं। देखिलीं प्रौढ पतनीं। सत्त्वावांचूनि नाणी। ज्ञानाकडे॥ २६९॥**
**म्हणौनि सात्त्विका वृत्ती। एक जाले गा जन्मव्रती। सर्वत्यागें चतुर्थी। भक्ति जैसी॥ २७०॥**

**अर्थ**—म्हणून बाबा अर्जुना! ज्याप्रमाणे दिवसाला सूर्य हा कारण आहे, त्याप्रमाणे ज्ञान उत्पन्न होण्याला सत्वगुणच कारण आहे॥ २६५॥ ज्याप्रमाणे आपल्या अद्वैतस्वरूपाची विस्मृति ही द्वैतभाव उत्पन्न होण्याला कारण आहे, त्याप्रमाणे लोभ उत्पन्न होण्याला रजोगुण कारण आहे॥ २६६॥ मोह, अज्ञान, प्रमाद या काळ्याकुट्ट दोष समुदायाला, अर्जुना! तमोगुण हाच वारंवार कारण होतो॥ २६७॥ तळहातावर ठेवलेला आवळा जसा स्पष्ट दिसतो, त्याप्रमाणे सत्त्व, रज, तम हे तिन्ही गुण विचारदृष्टीने स्पष्ट वेगवेगळे करून तुला सांगितले आहेत.॥ २६८॥ त्यात

रज व तम हे दोन गुण मनुष्याच्या पतनाला मुख्यत: कारण असून सत्वगुणावाचून आत्मज्ञानाकडे प्रवृत्ति होत नाही॥ २६९॥ म्हणून ज्याप्रमाणे सर्व मार्ग सोडून देऊन एका चौथ्या भक्तीचाच आश्रय करावा, त्याप्रमाणे ज्यांनी जन्मभर सत्त्वगुणी राहण्याचेच व्रत स्वीकारले॥ २७०॥

**ऊर्ध्वं गच्छन्ति सत्त्वस्था मध्ये तिष्ठन्ति राजसाः। जघन्यगुणवृत्तिस्था अधो गच्छन्ति तामसाः॥ १८॥**

**अर्थ**—सत्वगुणी पुरुष वर स्वर्गलोकात जातात, रजोगुणी पुरुष मृत्युलोकात वारंवार जन्म घेतात व निषिद्ध आचरण करणारे तमोगुणी पुरुष खालच्या पश्वादि अधम योनीत जातात॥ १८॥

**तैसें सत्त्वाचेनि नटनाचें। असणें जाणें जयांचें। ते तनुत्यागीं स्वर्गींचे। राय होती॥ २७१॥**
**इयाचि परी रजें। जिहीं कां जीजे मरिजे। तिहीं मनुष्य होइजे। मृत्युलोकीं॥ २७२॥**
**तेथ सुखदुःखाचें खिचटें। जेविजे एकेचि ताटें। जेथ इये मरणवाटे। पडिलें नुठी॥ २७३॥**
**आणि तयाचि स्थिति तमीं। जे वाढोनि निमती भोगक्षमीं। ते घेती नरकभूमी। मूळपत्र॥ २७४॥**
**एवं वस्तूचिया सत्ता। त्रिगुणासी पांडुसुता। दाविली सकारणता। आघवीचि॥ २७५॥**
**पैं वस्तु वस्तुत्वें असिकें। तें आपणपें गुणासारिखें। देखोनि कार्यविशेखें। अनुकरे गा॥ २७६॥**
**जैसें कां स्वप्नींचेनि राजें। जै परचक्र देखिजे। तैं हारी जैत होइजे। आपणचि॥ २७७॥**
**तैसे मध्योर्ध्वअध। हे जे गुणवृत्तिभेद। ते दृष्टीवांचूनि शुद्ध। वस्तुचि असे॥ २७८॥**

**अर्थ**—त्याचप्रमाणे शास्त्रविहित सात्त्विककर्माचे आचरण जन्मभर करीत राहून शेवटी त्यातच ज्याचा मृत्यु झाला ते सद्गुणी पुरुष देह सोडल्यावर स्वर्गाच्या राज्यपदी बसतात॥ २७१॥ याचप्रमाणे जे रजोगुणी कर्माचे जन्मभर आचरण करतात व त्यातच मरतात, ते मृत्युलोकात मनुष्य जन्माला येतात॥ २७२॥ जेथे मरणाचीच वाट आहे, अशा मनुष्यलोकात ते एकदा पडले की तेथून ते उठत नाहीत-म्हणजे रजोगुणी मनुष्य वारंवार जन्म घेतो व मरतो-तेथे मग एकाच ताटात सुखदु:खाची खिचडी खातात-म्हणजे एकाच देहाने सुख व दु:खहि भोगीत असतात॥ २७३॥ या स्थितिप्रमाणे जे तमोगुण वाढवून तमोगुणी भोग भोगतात व त्याचेच संरक्षण करतात, ते नरकभूमि असा जो यम लोक तेथे जाण्याची सनद मिळवितात.॥ २७४॥ याप्रमाणे परब्रह्माच्या सत्तेमुळे सत्त्व, रज, तम या तिन्ही गुणांनाच सर्व सृष्टीचे कारणत्व आहे, हे तुला दाखविले.॥ २७५॥ परंतु परब्रह्मवस्तु आपल्या मूळस्वरूपाने अखंड जशीच्या तशीच आहे; पण ती आपल्याला गुणासारखी झालेली पाहून कार्यविशेषानुसार होते.॥ २७६॥ ज्याप्रमाणे स्वप्नामध्ये झालेला राजा परचक्र आलेले पाहतो व आपणच हारतो किंवा जिंकतो॥ २७७॥ त्याप्रमाणे मनुष्ययोनि, देवयोनि व अधमयोनि इत्यादि सर्व गुणाचेच प्रकार आहेत, वास्तविक पाहता भ्रांत अशा भेददृष्टिवाचून एक सर्व परब्रह्मच आहे॥ २७८॥

**नान्यं गुणेभ्यः कर्तारं यदा द्रष्टानुपश्यति। गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोऽधिगच्छति॥ १९॥**

**अर्थ**—जेव्हा गुणावाचून सृष्टीचा उत्पन्नकर्ता दुसरा कोणी नाही असे जीव पाहतो व गुणाच्या पलीकडे असलेल्या आपल्या स्वरूपाला जाणतो तेव्हा तो ज्ञानी माझ्याशी ऐक्यस्वरूप पावतो॥ १९॥

**परी हे वाहणी असो। तरी तुज आन न दिसो। परिसें तें सांगतसों। मागील गोष्टी॥ २७९॥**
**तरी ऐंसें निजनिजे। सामर्थ्यें तिन्ही सहजें। होती देहव्याजें। गुणचि हे॥ २८०॥**
**इंधनाचेनि आकारें। अग्नि जैसा अवतरे। कां आघवेनि तरुवरें। भूमिरस॥ २८१॥**
**नाना दहियाचेनि मिसें। परिणमे दूधचि जैसें। कां मूर्त होय ऊंसें। गोडी जेवीं॥ २८२॥**
**तैसें हें सांतःकरण। देहचि होती त्रिगुण। म्हणोनि बंधासि कारण। घडे कीर॥ २८३॥**
**परी चोज हें धनुर्धरा। जे एवढा हा गुंफिरा। मोक्षाचा संसारा। उणा नोहे॥ २८४॥**

**अर्थ**—परंतु आता अशा निरूपणाचा प्रवाह पुरे. तुला परब्रह्मवस्तूहून दुसरे काही दिसू नये; म्हणून मागे सांगितलेले निरूपणच सांगत आहे, असे समज॥ २७९॥ हे तीन गुणच आपआपल्या साहजिक सामर्थ्याने देहरूप

झाले आहेत॥ २८०॥ ज्याप्रमाणे लाकूड ज्या आकाराचे असेल, त्याच आकाराचा अग्नि होतो किंवा सर्व प्रकारच्या वृक्षात भूमीचा एकच रस त्या त्या प्रमाणे होतो॥ २८१॥ अथवा जसे दूधच दह्याच्या रूपाने परिणाम पावते किंवा गोडीच उसाच्या रूपाने साकार स्वरूपात येते॥ २८२॥ त्याप्रमाणे हे तीन गुणच अंत:करणासह देहरूप होतात; म्हणून ते बंधन करण्याला कारणीभूतहि होतात॥ २८३॥ तरीपण, अर्जुना! हे आश्चर्य आहे की जीव इतका गुणबद्ध होऊनहि त्याच्या मोक्षस्थितीत यत्किंचित् कमीपणा येत नाही॥ २८४॥

**गूढार्थदीपिका**—गुण व गुणाची बद्धता हे सर्व भ्रमजन्य असल्यामुळेच जीवाची मूळची शुद्ध ब्रह्मस्थिति सहजच अखंड कायम राहते, असा अर्थ.

**त्रिगुण आपुलालेनि धर्में। देहींचे मागुते साउमें। चाळितांही न खोमे। गुणातीतता॥ २८५॥**
**ऐसी मुक्ति असे सहज। ते आतां परिसऊं तुज। जे तूं ज्ञानांबुज-। द्विरेफु कीं॥ २८६॥**
**आणि गुणीं गुणाजोगें। चैतन्य नोहे मागें। बोलिलों तें खागें। तेवींचि हें॥ २८७॥**
**तरी पार्था जैं ऐसे। बोधलेनि जीवें दिसे। स्वप्न कां जैसें। चेइलेनी॥ २८८॥**
**नातरी आपण जळीं। बिंबलों तीरोनी न्याहाळी। चळण होतां कल्लोळीं। अनेकधा॥ २८९॥**
**कां नटलेनि लाघवें। नटु जैसा न झकवे। तैसें गुणजात देखावें। न होनियां॥ २९०॥**
**पैं ऋतुत्रय आकाशें। धरूनियांही जैसें। नेदिजेचि येवों वोसें। वेगळेपणा॥ २९१॥**
**तैसें गुणीं गुणापरौतें। जें आपणपें असे आयितें। तिये अहं बैसे अहंते। मूळकेचिये॥ २९२॥**
**तै तेथूनि मग पाहातां। म्हणे साक्षी मी अकर्ता। हे गुणचि क्रियाजातां। नियोजित॥ २९३॥**

**अर्थ**—तीन गुण हे आपआपल्या स्वभावधर्माप्रमाणे देहाचे ठिकाणी मागे झालेल्या व पुढे होणाऱ्या कर्मरूपाने राहाटत असता जीवाची मूळची गुणातीत स्थिति यत्किंचितहि उणी होत नाही॥ २८५॥ अशी जीवाची गुणातीत मुक्तावस्था जी स्वाभाविकच आहे ती, तूं आत्मज्ञानरूपी कमळावरील भ्रमर असल्यामुळे तुला सांगतो, ऐक॥ २८६॥ आणि चैतन्य हे गुणांमध्ये असले तरी गुणाजोगे होत नाही व तसेच ती अंतिम स्वरूपस्थिति आहे, हे मागे सांगितलेच आहे॥ २८७॥ तरी अर्जुना! ज्याप्रमाणे जागा झालेला मनुष्य स्वप्नाला भास असे समजतो, त्याप्रमाणे जीव जगाला सत्य न समजता मिथ्याभासरूप समजेल.॥ २८८॥ किंवा आपण पाण्यात बिंबलो आहो व पाण्यातील लाटांच्या अनेक प्रकारच्या चळणवळणाने अनेक प्रकारचे होत आहो; पण माझा त्याच्याशी काही एक संबंध नाही, असे जसे तीरावर उभे राहून मनुष्य पाहतो.॥ २८९॥ ज्याप्रमाणे नट, घेतलेल्या नानाप्रकारच्या सोंगाने मी खरोखर तसा झालो, असे समजत नाही; त्याप्रमाणे मी संपूर्ण सत्त्वादिगुणाचा साक्षी, त्याच्याहून निराळा आहे, असे पाहावे.॥ २९०॥ आकाश हे तिन्ही ऋतूंना आपल्या ठिकाणी धारण करते; पण त्यांच्याहून आपला असलेला वेगळेपणा नाहीसा होऊ देत नाही.॥ २९१॥ जी आत्मवस्तु गुणांमध्ये असूनहि आपल्या मूळ स्वरूपानेच आहे-म्हणजे गुणातीत आहे. त्या गुणातीत मूळ स्थितीची अहंता धरून अहंवृत्ति स्थिर होऊन राहते.॥ २९२॥ गुणातीत अशा आत्मस्थितीचे ठिकाणी अहंवृत्ति स्थिर होवून सर्व कर्माचे ठिकाणी सत्त्वादि गुणच कारण आहे, मी त्या सर्वाचा साक्षी असून अकर्ता आहे असे ही चैतन्ययुक्त अहंवृत्ति पाहते.॥ २९३॥

**गूढार्थदीपिका**—अंत:करणावच्छिन्न-म्हणजे अंत:करणाने मर्यादित केलेल्या चैतन्याला, अंत:करणाच्या ऐक्याच्या भ्रांतिसहित जीव म्हटले जाते व तेच जेव्हा वृत्तीच्या साहाय्याने आपल्याला अंत:करणाहून निराळे ओळखते व अंत:करणाला उपहित म्हणजे आधार होते तेव्हा ते साक्षी म्हटले जाते, असा माउलींच्या ओव्यांतील व ''अहंरूपाने स्फुरणारे वृत्यवच्छिन्न चैतन्यच साक्षी होते'' या आमच्या मागील म्हणण्याचाहि आशय आहे.

**सत्त्वरजतमांच्या। भेदीं प्रसर कर्माचां। होत असे तो गुणांचा। विकारु हा॥ २९४॥**
**ययामाजीं मी ऐसा। वनीं कां वसंतु जैसा। वनलक्ष्मीविलासा। हेतुभूत॥ २९५॥**
**कां तारागणीं लोपावें। सूर्यकांतीं उद्दीपावें। कमळीं विकासावें। जावें तमें॥ २९६॥**

**यया कोणाचे काजीं काहीं। सविता जैसा देखत नाहीं। तैसा अकर्ता मी देहीं। सत्तारूप॥ २९७॥**
**मी दाऊनि गुण देखे। गुणता हे मियां पोखे।ययाचोनि निःशेषे। उरे तें मी॥ २९८॥**
**ऐसेनि विवेकें जया। उदो होय धनंजया। ये गुणातीतत्व तया। अर्धपंथें॥ २९९॥**

**अर्थ**—हे सत्त्व, रज, तम गुण परस्पराहून भिन्न असल्यामुळे कर्मेहि वेगवेगळी पसरली आहेत व संपूर्ण कर्माचा विस्तार ही गुणांचीच कार्ये आहेत॥ २९४॥ या सर्व गुण व त्यांच्या कार्यामध्ये मी वनांत वनशोभेला कारणीभूत असणाऱ्या वसंतऋतूप्रमाणे कल्पित असून निमित्तमात्र आहे.॥ २९५॥ किंवा नक्षत्रे नाहीशी व्हावी, सूर्यकान्त मण्याने प्रकाशित व्हावे, कमळाच्या फुलाने प्रफुल्लित व्हावे व अंधःकार नाहीसा व्हावा (ही कार्ये सूर्यामुळे होत असली तरी)॥ २९६॥ यापैकी कोणाचीही कार्ये ज्याप्रमाणे सूर्याला दिसत नाहीत, त्याप्रमाणे या सर्व देहांमध्ये मी अकर्ता असा केवळ सत्तारूप आहे॥ २९७॥ माझ्या सत्तेने गुण प्रगट होऊन मी त्यांचा साक्षी होतो. गुणांची गुणस्थिति माझ्या सत्तेनेच पुष्ट होते. (विस्तार पावते) हे गुण व गुणाचे कार्य नाहीसे होऊन जे उरते, ते सत्तामात्र स्वरूप मी आहे.॥ २९८॥ हे अर्जुना! असा हा आत्मानात्मविवेक ज्यांच्या ठिकाणी प्रगट होतो, त्याला सहजच त्याची मूळची गुणातीत ब्रह्मस्थिति प्राप्त होते॥ २९९॥

**गूढार्थदीपिका—ऊर्ध्वपंथे**-म्हणजे आकाशातून हातात फळ पडावे, त्याप्रमाणे सहज-आपोआप.

"आत्मा सुटावया मायेपासून। केवळ विषयनिवृत्तिचि नाही साधन। सर्व जगाचे जे प्रवृत्ति कारण। तिचेही गुण निवर्तावे॥ ५२०॥" (श्रीगुलाबराव महाराजाकृत-प्रियलीलामहोत्सव-आगमनविलास पदन्यास-१) जीवात्मा मायाबंधनापासून नुसत्या विषयवैराग्याने-म्हणजे अपरवैराग्याने मुक्त होत नसून सर्व जगाला कारण जे सत्वादि तीन गुण त्यापासून मुक्त झाला पाहिजे तो परवैराग्यसंपन्न झाला पाहिजे किंवा योगशास्त्रात सांगितल्याप्रमाणे त्याला गुणवैतृष्ण्य प्राप्त झाले पाहिजे, हे मत येथे श्री ज्ञानेश्वर माउलींनी प्रगट केले आहे.

**गुणानेतानतीत्य त्रीन्देही देहसमुद्भवान् । जन्ममृत्युजरादुःखैर्विमुक्तोऽमृतमश्नुते ॥ २०॥**

**अर्थ**—हा देहाभिमानी जीव देहाच्या उत्पत्तीला कारणभूत असणाऱ्या या तीन गुणाहून निराळा झाला असता जन्म-मरण-म्हातारपण व सर्व दुःखे यांपासून मुक्त होऊन माझ्या अविनाशी स्वरूपाला प्राप्त होतो॥ २०॥

**आतां निर्गुण असे आणिक। तें तो जाणे अचुक। जे ज्ञानें केलें टीक। तयाचिवरी॥ ३००॥**
**किंबहुना पांडुसुता। ऐसा तो माझी सत्ता। पावे जैसी सरिता। सिंधुत्व गा॥ ३०१॥**
**नळिकेवरूनि उठिला। जैसा शुक शाखे बैसला। तैसा मूळअहंता ठाकिलां। तो मी म्हणौनि॥ ३०२॥**

**अर्थ**—या त्रिगुणाविरहित म्हणून निर्गुण अशी जी आत्मवस्तु आणखी आहे ती, तो, ज्ञानाने त्याच्याच ठिकाणी वस्ती केली असल्यामुळे अचुक जाणतो॥ ३००॥ एवढेच नाही तर, अर्जुना! ज्याप्रमाणे नदी समुद्राला मिळून समुद्रच होऊन जाते, त्याप्रमाणे तो माझ्या अविनाशी सत्तेशी ऐक्य पावतो॥ ३०१॥ ज्याप्रमाणे पिंजऱ्यातील नळीवरून उडलेला पोपट झाडाच्या फांदीवर जाऊन बसतो, त्याप्रमाणे तो गुणातीत झालेला ज्ञानी मी ब्रह्मस्वरूप आहे, अशी आपल्या मूळच्या ब्रह्मस्वरूपतेची अहंता घेऊन राहतो.॥ ३०२॥

**गूढार्थदीपिका**—ज्ञानी पुरुषाच्या ठिकाणी ब्रह्मस्वरूपाशी केलेल्या ऐक्याचा सात्त्विक अहंकार असतो हे येथे माउलींनी स्पष्ट केले आहे.

**अगा अज्ञानाचिया निदा। जो घोरत होता बदबदा। तो स्वस्वरूपीं प्रबुद्धा। चेइला कीं॥ ३०३॥**
**पैं बुद्धिभेदाचा आरिसा। तया हातोनि पडिला वीरेशा। म्हणौनि प्रतिमुखाभासा। मुकला तो॥ ३०४॥**
**देहाभिमानाचा वारा। आतां वाजों ठेला वीरा। तैं ऐक्य वीचिसागरां। जीवेशां हें॥ ३०५॥**
**म्हणौनि मद्भावेंसी। प्राप्ति पाविजे तेणेंसरिसी। वर्षांतीं आकाशीं। घनजात जेवीं॥ ३०६॥**
**तेवी मी होऊनि निरुता। मग देहींचि ये असतां। नागवे देहसंभूतां। गुणांसि तो॥ ३०७॥**

**जैसा भिंगाचेनि घरें। दीपप्रकाश नावरे। कां न विझेचि सागरें। वडवानळ॥ ३०८॥**
**तैसा आला गेला गुणांचा। बोधु न मैळे तयाचा। तो देहीं जैसा व्योमींचा। चंद्र जळीं॥ ३०९॥**

**अर्थ**—असे झाले असता जो जीव अज्ञानाच्या झोपेत सारखा घोरत पडला होता तो, अर्जुना! ती निद्रा टाकून देऊन आपल्या ब्रह्मस्वरूपाच्या ठिकाणी जागा होतो॥ ३०३॥ हे अर्जुना! रजोगुणी, तमोगुणी अशी अविवेकी भ्रांत बुद्धि हाच भेद दाखविणारा आरसा होय. तो हातातून पडून फुटल्यामुळे मुखाभास नाहीसा झाला-म्हणजे द्वैत नि:शेष नाहीसे झाले॥ ३०४॥ हे वीरा अर्जुना! ज्याप्रमाणे वारा बंद झाला असता सागर व तरंग यांचे ऐक्य होते, त्याप्रमाणे देहाभिमानाचा वारा बंद झाल्यामुळे जीवशिवाचे ऐक्य आहे-म्हणजे देहाभिमानामुळे परमात्म्याहून भिन्न झालेला जीव, देहाभिमान नि:शेष सुटल्यामुळे परमेश्वराशी ऐक्य पावला॥ ३०५॥ ज्याप्रमाणे वर्षाऋतूचे शेवटी मेघ आकाशरूप होऊन जातात, त्याप्रमाणेच अज्ञानभ्रांति पूर्ण नाहीशी झाल्याबरोबर देहाभिमान नाहीसा होऊन जीव माझ्याशी ऐक्य पावतो॥ ३०६॥ तसा तो माझ्यासारखा शुद्ध निरूपाधिक स्वरूप होऊन या देहातच राहत असला तरी देहापासून उत्पन्न होणाऱ्या गुणाच्या स्वाधीन होत नाही॥ ३०७॥ ज्याप्रमाणे अभ्रकाच्या घराने दिव्याचा प्रकाश कोंडला जात नाही अथवा समुद्राच्या पाण्याने वडवानळरूपी अग्नि विझविला जात नाही॥ ३०८॥ जसा आकाशातील चंद्र, पाण्यात प्रतिबिंबित झाला तरी पाण्याच्या हेलकाव्यापासून निर्दोष असतो, त्याप्रमाणे देहाच्या ठिकाणी असतांना देखील उठणाऱ्या गुणामुळे त्याचा (ज्ञान्याचा) आत्मबोध मलीन होत नाही॥ ३०९॥

**गूढार्थदीपिका**—ज्ञानीपुरुष अखंड साक्षीस्वरूप होऊन राहतात. ते आपले साक्षीत्व कधी विसरत नाहीत, असा अर्थ.

**तिन्ही गुण आपुलालिये प्रौढी। देहीं नाचविती बागडीं। तो पाहोंही न धाडी। अहंतेतें॥ ३१०॥**
**हा ठायवरी। नेहटोनि ठेला अंतरीं। आतां काय वर्ते शरीरीं। काही नेणे॥ ३११॥**
**सांडूनि आंगींची खोळी। सर्प रिगालिया पाताळीं। ते त्वचा कोण सांभाळी। तैसें जालें॥ ३१२॥**
**कां सौरभ्यजीर्ण जैसा। आमोदु मिळोनि जाय आकाशा। माघारा कमळकोशा। न येचि तो॥ ३१३॥**
**पैं स्वरूपसमरसें। तयाही गा जालें तैसें। तेथ किंधर्म हें कैसें। नेणे देह॥ ३१४॥**
**म्हणौनि जन्मजरामरण। इत्यादि जे साही गुण। ते देहींचि ठेले कारण। नाहीं तया॥ ३१५॥**
**घटाचिया खापरिया। घटभंगीं फेडिलिया। महदाकाशा आपैसया। जालेंचि असे॥ ३१६॥**
**तैसी देहबुद्धि जाये। जैं आपणपां आठौ होये। तैं आन कांहीं आहे। तेंवांचुनी॥ ३१७॥**
**येणें थोर बोधलेपणें। तयासि गा देहीं असणें। म्हणूनि तो मी म्हणें। गुणातीत॥ ३१८॥**
**यया देवाचिया बोला। पार्थु अति सुखावला। मेघें संबोखिला। मोरु जैसा॥ ३१९॥**

**अर्थ**—सत्त्व, रज, तम या तीन गुणापैकी प्रत्येक गुण वृद्धि पावून आपआपल्या लक्षणरूपी चेष्टा करतात; पण परमात्म्याशी ऐक्य पावलेला ज्ञानीपुरुष त्यांची यत्किंचितहि अहंता धरत नाही॥ ३१०॥ एथपर्यंत ज्ञानीपुरुष अंतर्मुखवृत्ति करून राहतो, म्हणून देहाच्या ठिकाणी काय चालले आहे, हे तो जाणत नाही॥ ३११॥ ज्याप्रमाणे सर्प, माझी ही कात कोण सांभाळील याची काळजी न करता ती टाकून देऊन बिळात शिरतो, त्याप्रमाणे ज्ञानीपुरुषहि, देह आता कोण सांभाळील याची चिंता न करता देहाचा अभिमान नि:शेष सोडून देऊन आपल्या आत्मस्वरूपाशी अहंवृत्तीचे ऐक्य करून साक्षी होऊन राहतो॥ ३१२॥ किंवा जीर्ण झालेल्या कमळाच्या फुलाचा सुवास ज्याप्रमाणे आकाशाशी एकरूप होऊन राहतो व पुन: कमळाचे ठिकाणी येत नाही॥ ३१३॥ त्याप्रमाणे जीव हा शिवाशी समरसतेने ऐक्य पावला असता देहाचे काय धर्म आहेत व त्याचे ठिकाणी काय चालले आहे, हे तो काही जाणत नाही.॥ ३१४॥ म्हणून जन्म, जरा, मृत्यु इत्यादि जे षड्विकार आहेत ते देहाचे ठिकाणीच राहतात. ज्ञानीपुरुषाचा त्यांच्याशी काही एक संबंध नसतो.॥ ३१५॥ घट फुटून घटाची दोन खापरे अलग झाली असता घटाकाश आपोआपच महदाकाश होते, त्याला महदाकाशात मिळावे लागत नाही॥ ३१६॥ याप्रमाणे, जेव्हा आपल्या मूळच्या

शुद्ध स्वरूपाचे जीवाला ज्ञान होते, तेव्हा देहबुद्धि आपोआप नाहीशी होते. मग आत्मस्वरूपाव्यतिरिक्त दुसऱ्याचे अस्तित्व भासेनासे होत असल्यामुळे एका आत्मस्वरूपावाचून दुसरे काहीच अनुभवाला येत नाही. ॥ ३१७ ॥ असा दृढ आत्मबोध ठेवून तो ज्ञानीपुरुष प्रारब्ध संपेपर्यंत देहाचे ठिकाणी राहतो, म्हणून मी त्याला गुणातीत म्हणतो. ॥ ३१८ ॥ मेघाने जसे मोराला आनंदित करावे, त्याप्रमाणे भगवंताचे बोलणे ऐकून अर्जुन अत्यंत आनंदित झाला ॥ ३१९ ॥

*अर्जुन उवाच*

**कैर्लिङ्गैस्त्रीन्गुणानेतानतीतो भवति प्रभो। किमाचारः कथं चैतांस्त्रीन्गुणानतिवर्तते॥ २१॥**

**अर्थ**—अर्जुन म्हणाला, हे प्रभो! कोणत्या गुणावरून पुरुष या तीन गुणाच्या पलीकडे गेला हे ओळखता येते? त्याचा आकार कसा असतो? कशा प्रकारे तो तीन गुणाच्या पलीकडे जातो?॥ २१ ॥

**तेणें तोषें वीर पुसे। जी कोण्हीं चिन्हीं तो दिसे। जयामाजीं वसे। ऐसा बोधु॥ ३२०॥**
**तो निर्गुण काय आचरे। कैसेनि गुण निस्तरे। हें सांगिजो माहेरें। कृपेचेनि॥ ३२१॥**
**यया अर्जुनाचिया प्रश्ना। तो षड्गुणांचा राणा। परिहार आकर्णा। बोलतु असे॥ ३२२॥**
**म्हणे पार्था तुझी नवाई। हें येतुलेंचि पुससी काई। तें नामचि तया पाहीं। साच लटिकें॥ ३२३॥**

**अर्थ**—असे भगवंताचे बोलणे ऐकून संतुष्ट झालेला तो वीर अर्जुन विचारू लागला की ज्याच्या ठिकाणी आपण सांगितल्याप्रमाणे दृढ आत्मबोध झाला आहे, असा पुरुष कशा लक्षणाचा असतो?॥ ३२० ॥ हे कृपाळु मायबापा श्रीकृष्णा! गुणरहित कोणते आचरण करतो? व कोणत्या साधनाने तो गुणरहित होतो? हे मला सांगा॥ ३२१ ॥ या अर्जुनाच्या प्रश्नावर उत्तर देऊन त्याच्या शंकेचा परिहार करण्याकरिता तो षड्गुणादि अपरिमित ऐश्वर्यवान श्रीकृष्ण सांगतो, ऐका॥ ३२२ ॥ अर्जुना! तुझे आश्चर्य वाटते. एवढेच काय विचारतोस? त्याला गुणातीत हे जे नाव दिले गेले, तेच खरे आहे व खोटेहि आहे॥ ३२३ ॥

**गूढार्थदीपिका—ते नामचि तया पाही। साच लटिके—**

ज्ञान्याच्या ठिकाणी प्रारब्धामुळे गुणाची लक्षणे दिसून येतात; म्हणून त्याला गुणातीत म्हणणे खोटे ठरते व गुणानुसार वर्तन करीत असतानाहि तो गुणाचा साक्षी होऊनच राहतो, गुणाशी ऐक्य करीत नाही म्हणून गुणातीत हे नांव त्याचे ठिकाणी खरेहि आहे.

**गुणातीत जया नांवें। तो गुणाधीन तरी नव्हे। ना होय तरी नागवे। गुणां यया॥ ३२४॥**
**परी अधीन कां नागवें। हेंचि कैसेनि जाणावें। गुणांचिये उखरवे-। माजीं असतां॥ ३२५॥**
**हा संदेह जरी वाहसी। तरी सुखें पुसों लाहसी। परिस आतां तयासी। रूप करूं॥ ३२६॥**

**अर्थ**—गुणातीत या नावाने जो संबोधला जातो तो गुणाच्या स्वाधीन होत नाही व गुणानुसार वागत आहे असे दिसला, तरी तो गुणांनी नागवला जात नाही-म्हणजे तो आपल्या स्वरूपाला विसरत नाही. ॥ ३२४॥ गुणाच्या गलबल्यात वावरत दिसतानाहि तो त्यांच्या स्वाधीन झाला किंवा झाला नाही, हे कसे जाणता येते?॥ ३२५ ॥ असा संशय तुझ्या मनात असल्यास मात्र तू खुशाल विचार. गुणातीततेचे आता स्वरूप सांगतो, ऐक॥ ३२६ ॥

*श्रीभगवानुवाच—*

**प्रकाशं च प्रवृत्तिं च मोहमेव च पाण्डव। न द्वेष्टि सम्प्रवृत्तानि न निवृत्तानि काङ्क्षति॥ २२॥**

**अर्थ**—भगवान म्हणाले, प्रकाश म्हणजे सत्त्वगुणाचे कार्य सुख व जाणीव, प्रवृत्ति-म्हणजे रजोगुणाचे कार्य कर्म करण्याची प्रवृत्ति व मोह—म्हणजे तमोगुणाचे कार्य अविवेक, ही उत्पन्न झाली असता (गुणातीत झालेला पुरुष) त्यांचा द्वेष करीत नाही व नाहीशी झाली असतां त्याची इच्छा करीत नाही॥ २२॥

**तरी रजाचेनि माजें। देहीं कर्माचें आणोजें। प्रवृत्ति जैं घेइजे। वेंटाळूनि॥ ३२७॥**
**तैं मीचि कां कर्मठ। ऐसा न ये श्रीमाठ। कां दरिद्रलिये बुद्धी वीट। तोही नाही॥ ३२८॥**

**अथवा सत्त्वेंचि अधिकें। जैं सर्वेंद्रियीं ज्ञान फांके। तैं सुविद्यता तोखे। उभजेही ना॥ ३२९॥**
**कां वाढिनलेनि तमें। गिळेजेचि मोहभ्रमें। तैं अज्ञानत्वें न श्रमे। घेणेंही नाहीं॥ ३३०॥**
**पैं मोहाच्या अवसरीं। ज्ञानाची चाड न धरी। ज्ञानें कर्मे नादरी। होतां न दुःखी॥ ३३१॥**
**सायंप्रातर्मध्यान्हा। या तिही काळांची गणना। नाहीं जेवीं तपना। तैसा असे॥ ३३२॥**
**तया वेगळाचि काय प्रकाशें। ज्ञानित्व यावें असे। कायि जळार्णव पाउसें। साजा होय॥ ३३३॥**
**ना प्रवर्तलेनि कर्मे। कर्मठत्व तया कां गमे। सांगें हिमवंत हिमें। कांपे कायि॥ ३३४॥**
**नातरी मोह आलिया। काइ पां ज्ञाना मुकिजेल तया। महा आगीतें उन्हाळेया। जाळवत असे॥ ३३५॥**

**अर्थ**—रजोगुणाच्या वृद्धीने चित्तांत कर्माचा अंकुर उत्पन्न होऊन कर्म करण्याची प्रवृत्ति झाली असतांहि ॥ ३२७॥ मी कर्म करणारा असा त्याला अहंकार उत्पन्न होत नाही किंवा कर्म न करण्याची बुद्धि झाली असता तिचा तो द्वेष करीत नाही-म्हणजे कर्म करण्याची इच्छा करीत नाही॥ ३२८॥ किंवा सत्त्वगुणाच्या वृद्धीने सर्व इंद्रियाच्या ठिकाणी ज्ञानाचा विकास झाला असता मी सुविद्य आहे, असा त्याला संतोष वाटत नाही किंवा खेदहि होत नाही॥ ३२९॥ किंवा तमोगुण वाढला असता तो अविवेकभ्रमाने ग्रासला जात नाही म्हणूनच तो अज्ञान घेत नाही व त्यामुळे तो कष्टी होत नाही.॥ ३३०॥ चित्तात अविवेक वृत्ति उठली असता तो ज्ञानाची इच्छा करीत नाही. ज्ञानामुळे कर्माचा आदर करून कर्म करण्याची इच्छा करीत नाही व कर्म घडले असता दुःखी होत नाही.॥ ३३१॥ ज्याप्रमाणे सूर्याचा प्रकाश सायंकाळ, प्रातःकाळ, माध्यान्हकाळ अशी कालगणना करीत नाही. तो सूर्याच्या ठिकाणी सदा सारखा असतो, त्याप्रमाणे गुणातीत पुरुष निर्विकार असतो॥ ३३२॥ स्वप्रकाश सोडून दुसऱ्या प्रकाशाने त्याला ज्ञानीपणा येतो काय? समुद्र क्षीण होऊन तो पावसाने भरला असे होते काय?॥ ३३३॥ किंवा कर्मप्रवृत्तीच्या योगाने त्याला कर्मठत्व येते काय? अत्यंत थंडीने हिमालय पर्वत थरथर कापतो काय?॥ ३३४॥ किंवा प्रारब्धानुसार मोह किंवा अविवेक उत्पन्न झाला असता आत्मज्ञान त्याला सोडील काय? होमाग्नीला उन्हाळा जाळता येईल काय? किंवा उन्हाळ्याला अग्नी जाळता येईल काय?॥ ३३५॥

**गूढार्थदीपिका**—विरोधी वस्तुच परस्परांचा नाश करतात; पण ज्याप्रमाणे अग्नि व उन्हाळा याचा विरोध नसल्यामुळे ते परस्परांना जाळीत नाहीत, त्याप्रमाणे ज्ञान सर्वांना जाणणारे व सर्व त्याच्याच सत्तेवर भासत असल्यामुळे त्याचा कशाशी विरोध नसतो; म्हणून मोहादिकांनी आत्मज्ञान नाहीसे होऊ शकत नाही. ज्ञान्याचे ठिकाणी प्रारब्धामुळे सत्व, रज, तम या गुणांची लक्षणे दिसत असली, तरी तो त्याची प्रवृत्ति किंवा निवृत्ति करीत नाही. तो साक्षी होऊन त्याची प्रवृत्ति-निवृत्ति नुसता पाहत राहतो.

**उदासीनवदासीनो गुणैर्यो न विचाल्यते। गुणा वर्तन्त इत्येव योऽवतिष्ठति नेङ्गते॥ २३॥**

**अर्थ**—ज्ञानीपुरुष साक्षी होऊन उदासीनासारखा स्वस्थ राहतो, तो गुणाच्या योगाने चलित होत नाही. गुणच परस्परांशी वागत आहे, असे जाणून तो स्वरूपाचे ठिकाणी स्थिर राहतो. तो तेथून कधी ढळत नाही॥ २३॥

**तैसें गुणागुणकार्य हें। आघवेंचि आपण आहें। म्हणौनि एकेका नोहे। तडातोडी॥ ३३६॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे गुण व गुणांची मोहादि लक्षणकार्ये सर्व मीच आहे, अशा ज्ञानाने एक एकाला-म्हणजे ज्ञान व मोहादि कार्ये यांना-दूर करण्याचा प्रयत्न तो करीत नाही॥ ३३६॥

**गूढार्थदीपिका**—मनुष्याला जेथे मृगजल भासते तेथे ज्याप्रमाणे सूर्यप्रकाशच कंपनामुळे जळाप्रमाणे भासत आहे, असे तो जाणतो, त्याप्रमाणे ज्ञानानंतरहि उरलेल्या प्रारब्धभासामुळे पूर्व अज्ञानजन्य संस्कारानुसार मोहादि रूपाने मीच भासत आहे असे ज्ञानीपुरुष ज्ञानाने समजत असतो; म्हणून तो रजोगुणी तमोगुणी वृत्ती उठल्या तरी त्यांचा द्वेष करीत नाही.

**येवढेया गा प्रतीती। तो देहा आलासे वस्ती। वाटे जातां गुंती-। मार्जी जैसा॥ ३३७॥**
**तो जिणता ना हारवी। तैसा गुण नव्हे ना करवी। जैसी कां श्रोणवी। संग्रामींची॥ ३३८॥**

**कां शरीरातील प्राणू। घरीं आतिथ्याचा ब्राह्मणू। नाना चोहटाचा स्थाणू। उदासु जैसा॥ ३३९॥**
**आणि गुणांचा यावाजावां। ढळें चळे ना पांडवा। मृगजळाचा हेलावा। मेरु जैसा॥ ३४०॥**
**हें बहुत कायि बोलिजे। व्योम वारेनि न वचिजे। कां सूर्य ना गिळिजे। अंधकारें॥ ३४१॥**
**स्वप्न कां गा जियापरी। जागतयातें न सिंतरी। गुणीं तैसा अवधारीं। न बंधिजे तो॥ ३४२॥**
**गुणांसि कीर नातुडे। परी दुरूनि जैं पाहे कोडें। तैं गुणदोष सायिखडें। सभ्य जैसा॥ ३४३॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे वाटेने जाणारा वाटसरू रात्रीपुरता एखाद्या गावाचा आश्रय करतो, त्याप्रमाणे एवढ्या अशा अनुभवासहित तो ज्ञानीपुरुष प्रारब्धापुरता देहरूपी गावात केवळ वस्तीला राहतो. ॥ ३३७॥ ज्याप्रमाणे लढाईच्या भूमीला जय पराजय प्राप्त होत नाहीत, त्याप्रमाणे गुण जिंकले किंवा गुणाला हारविले असा काहीं तो अभिमान बाळगत नाही॥ ३३८॥ किंवा ज्याप्रमाणे शरीरातील प्राण, घरी आलेला अतिथी ब्राह्मण, किंवा चौरस्त्यावरील खांब हे जसे काही न करणारे व काही न करविणारे असे उदास असतात॥ ३३९॥ आणि अर्जुना! मृगजळाच्या हेलकाव्याने जसा मेरु पर्वत ढळत नाही तसा ज्ञानीपुरुषहि आल्या गेल्या ऊर्मींने ढळत नाही किंवा चळत नाही. ॥ ३४०॥ अर्जुना! फार काय सांगू! ज्याप्रमाणे आकाश वाऱ्याने हालविले जात नाही किंवा आंधाराने सूर्य गिळिला जात नाही॥ ३४१॥ अथवा जागे असलेल्या पुरुषाला स्वप्नभ्रम होत नाही, त्याप्रमाणे ज्ञानीपुरुष आपल्याला गुणांनी बद्ध समजत नाही असे समज. ॥ ३४२॥ गुणांना तो सापडत नाही आणि गुणांचा साक्षी राहून त्यांच्याकडे कौतुकाने पाहू लागला तर, नाचणाऱ्या बाहुल्याकडे पाहणाऱ्या सभ्य गृहस्थाप्रमाणे तो गुणदोषाकडे मिथ्यात्वाने पाहतो॥ ३४३॥

**गूढार्थदीपिका**—एका भासक परब्रह्मवस्तुशिवाय दुसऱ्या कोणत्याहि भासमान दृश्याला तो ज्ञानीपुरुष सत्य वस्तु समजत नाही, असा अर्थ.

**सत्कर्मे सात्त्विकीं। रज तें रजोविषयकीं। तम मोहादिकीं। वर्तत असे॥ ३४४॥**
**परिस तयाचिया गा सत्ता। होती गुणक्रिया समस्ता। हें फुडें जाणे सविता। लौकिका जेवीं॥ ३४५॥**
**समुद्रचि भरती। सोमकांतचि द्रवति। कुमुदें विकासती। चंद्रु तो उगा॥ ३४६॥**
**कां वाराचि वाजे विझे। गगनें निश्चळ असिजे। तैसा गुणाचिये गजबजे। डोलेना जो॥ ३४७॥**
**अर्जुना येणें लक्षणें। तो गुणातीत जाणणें। परिस आतां आचरणें। तयाचींये॥ ३४८॥**

**अर्थ**—शास्त्रीय सदाचरणाने सत्त्वगुणात्मक, राजसकर्माने रजोगुणात्मक व मोहादि लक्षणाने तमोगुणात्मक असा तो वागत असतो. ॥ ३४४॥ पण ज्याप्रमाणे सूर्यप्रकाशामुळे लोकांचे व्यवहार चालतात, त्याप्रमाणे ''माझ्या सत्तेवरच गुणाच्या क्रिया होत आहेत'', हे तो ज्ञानीपुरुष स्पष्ट जाणत असतो. ॥ ३४५॥ ज्याप्रमाणे चंद्रामुळेच, समुद्राला भरती येते, सोमकांत मणी पाझरतो व कमले विकसित होतात, तरीपण चंद्र उगाच असतो, तो काही करीत नाही व करवित नाही॥ ३४६॥ किंवा वाराच वाहतो व बंद पडतो, पण आकाश निश्चल असते, त्याप्रमाणे गुणांच्या गलबल्याने जो यत्किंचितहि हालत नाही॥ ३४७॥ हे अर्जुना! तुला सांगितलेल्या या सर्व लक्षणावरून ज्ञानीपुरुषाचे गुणातीतत्व ओळखता येते. आता त्याचे आचरण सांगतो, ऐक॥ ३४८॥

**समदुःखसुखः स्वस्थः समलोष्टाश्मकाञ्चनः। तुल्यप्रियाप्रियो धीरस्तुल्यनिन्दात्मसंस्तुतिः॥ २४॥**

**अर्थ**—सुखदुःख सम लेखून स्वस्थ राहणारा, सोने व मातीचे ढेकुळ समान लेखणारा, प्रिय वस्तूचा वियोग व अप्रिय वस्तूचा संयोग हे दोन्ही समान पाहणारा व निंदा व स्तुति या दोघांची तुलना सारखीच करणारा, असा तो बुद्धिमान ज्ञानीपुरुष सर्वत्र सम म्हणजे ब्रह्मदृष्टीने पाहत असतो॥ २४॥

**तरी वस्त्रासि पाठीं पोटीं। नाहीं सुतावांचूनि किरीटी। ऐसें सुये दिठी। चराचर मद्रूपें॥ ३४९॥**
**म्हणोनि सुखदुःखासरिसें। कांटाळें आचरे ऐसें। रिपुभक्तां जैसें। हरीचें देणें॥ ३५०॥**
**येऱ्हवीं तरी सहजें। सुखदुःख तैंचि सेविजे। देहजळीं होइजे। मासोळीं जै॥ ३५१॥**

**आतां ते तंव तेणें सांडिलें। आहे स्वस्वरूपेंसीचि मांडिलें। सस्यांतीं निवडिलें। बीज जैसें॥ ३५२॥**
**कां वोघ सांडूनि गंगा। रिघोनि समुद्राचें आंगा। निस्तरली लगबगा। खळाळाची॥ ३५३॥**
**तेवीं आपणपांचि जया। वस्ती जाली गा धनंजया। तया देहीं आपैसया। सुख तैसें दु:ख॥ ३५४॥**
**रात्रि तैसें पाहलें। हें धारणा जेवीं एक जालें। आत्मारामा देहीआतलें। द्वंद्व तैसें॥ ३५५॥**
**पैं निद्रिताचेनि आंगेंसी। साप तैशी उर्वशी। तेवीं स्वरूपस्था सरिसीं। देहीं द्वंद्वे॥ ३५६॥**
**म्हणौनि तयाच्या ठायीं। शेणा सोनेया विशेष नाहीं। रत्ना गुंडेया कांहीं। नेणिजे भेद॥ ३५७॥**
**घरा येवो पां स्वर्ग। कां वरिपडो वाघ। परी आत्मबुद्धीसि भंग। कदा नोहे॥ ३५८॥**
**निवटलें ना उपवढे। जळीनलें न विरूढे। साम्यबुद्धी न मोडे। तयापरी॥ ३५९॥**
**हा ब्रह्मा ऐसेनि स्तविजो। कां नीच म्हणोनि निंदिजो। परी नेणें जळों विझों। राखोंडी जैसी॥ ३६०॥**
**तैसी निंदा आणि स्तुती। नये कोण्हेचि व्यक्ती। नाहीं अंधारें कां वाती। सूर्या घरीं॥ ३६१॥**

**अर्थ—**ज्याप्रमाणे अर्जुना! वस्त्रामध्ये आतबाहेर सुतावाचून दुसरे काही नसते, त्याप्रमाणे चराचर विश्वांत आतबाहेर माझ्यावाचून काही नाही; असा तो ज्ञानीपुरुष ज्ञानदृष्टीने पाहत असतो. ॥ ३४९ ॥ म्हणून ज्याप्रमाणे परमात्मा आपल्या विरोधी असलेल्या शत्रूला व भक्ताला सारखेच फळ देतो, त्याप्रमाणे सुख व दु:ख यांना तो सारखेच मानित असतो॥ ३५०॥ जेव्हा जीव देहरूपी जलामध्ये मासोळी होऊन राहतो—म्हणजे देहाचा अभिमान धरतो-तेव्हाच तो अनायासे सुखदु:खे भोगतो. ॥ ३५१ ॥ परंतु ज्याप्रमाणे कोंडा टाकून धान्य घेतले जाते, त्याप्रमाणे त्याने आता देहाभिमान टाकून देऊन आपल्या स्वरूपभूत परब्रह्माशी ऐक्य केले आहे॥ ३५२॥ किंवा गंगा प्रवाहरूपाने वाहणे सोडून देऊन समुद्राशी ऐक्य पावली, आता मिळण्यास जाण्याच्या त्वरेमुळे होणारी खळबळ राहिली नाही॥ ३५३॥ त्याप्रमाणे ज्याने आपल्या आत्मस्वरूपाचे ठिकाणी वस्ती केली-म्हणजे चित्त स्थिर केले-तो देहाचे ठिकाणी येणारी सुखदु:खे सारखीच लेखतो. ॥ ३५४॥ रात्र किंवा सकाळ हे जसे खांबाला सारखेच असतात, त्याप्रमाणे आत्मरूप झालेल्या ज्ञानीपुरुषालाहि देहाचे ठिकाणी येणारी सुखदु:खादि द्वंद्वे सारखीच भासतात. ॥ ३५५॥ ज्याप्रमाणे गाढ निजलेल्या पुरुषाच्या आंगाशेजारी सर्प राहिला किंवा उर्वशी अप्सरा राहिली तरी दोन्ही त्याला सारखीच असतात, त्याप्रमाणे आत्मस्वरूपाचे ठिकाणी चित्त स्थिर झालेल्या पुरुषालाहि सुखदु:खादि द्वंद्वे सारखीच वाटतात. ॥ ३५६॥ म्हणून अशा ज्ञानीपुरुषाला शेण किंवा सोने किंवा रत्न व गार या दोहोत भेद वाटत नाही॥ ३५७॥ अनायासे स्वर्ग प्राप्त झाला असून त्या आनंदाने किंवा वाघ येवून पडला हे पाहून भयाने आत्मस्वरूपाचे ठिकाणी स्थिर झालेली त्याची बुद्धि ढळत नाही॥ ३५८॥ ज्याप्रमाणे प्राणास मुकले ते पुन: जिवंत होत नाही, जळलेले उगवत नाही, त्याप्रमाणे ज्ञान्याची ब्रह्मरूप झालेली समबुद्धि कधी विषम होत नाही. ॥ ३५९ ॥ ज्याप्रमाणे राखोंडी जळत नाही किंवा विझत नाही, त्याप्रमाणे हा केवळ ब्रह्मदेव आहे, अशी कोणी स्तुति केली किंवा हा केवळ नीच आहे, अशी निंदा केली तरी, ज्ञानीपुरुषाच्या चित्ताला त्याची जाणीवच होत नाही॥ ३६०॥ तसेच ज्याप्रमाणे सूर्याच्या घरी अंधार नसतो व वातीहि लावल्या जात नाहीत, त्याप्रमाणे केलेली निंदा किंवा स्तुति ज्ञानीपुरुषाचे ठिकाणी कोणत्याहि परिणामरूप व्यक्तित्वाने दिसत नाही॥ ३६१॥

**मानापमानयोस्तुल्यस्तुल्यो मित्रारिपक्षयो: । सर्वारम्भपरित्यागी गुणातीत: स उच्यते॥ २५॥**

**अर्थ—**मान, अपमान, शत्रु, मित्र यांना जो समान पाहतो, इहपरलोकातील विषयसुखाच्या इच्छेने होणाऱ्या सर्व कर्मप्रवृत्तीचा जो त्याग करतो, त्याला गुणातीत म्हणतात. ॥ २५॥

**ईश्वर म्हणोनि पूजिला। कां चोर म्हणोनि गांजिला। वृषगजीं वेढिला। केला रावो॥ ३६२॥**
**कां सुहृद पासीं आलें। अथवा वैरी वरपडे जाले। परी नेणे राती पाहालें। तेज जेवीं॥ ३६३॥**
**साही ऋतु येतां आकाशें। लिंपिजेचि ना जैसें। तेवीं वैषम्य मानसें। जाणिजेना॥ ३६४॥**
**आणीकही एक पाहीं। आचार तयाच्या ठायीं। तरी व्यापारासि नाहीं। जालें दिसे॥ ३६५॥**

**सर्वारंभा उटकलें। प्रवृत्तीचें तेथ मावळले। जळती गा कर्मफळें। ते तो आगी॥ ३६६॥**
**दृष्टादृष्टाचेनि नांवें। भावचि जीवीं नुगवे। सेवी जें कां स्वभावे। पैठें होय॥ ३६७॥**
**सुखे ना शिणे। पाषाण कां जेणें मानें। तैसी सांडीमांडी मनें। वर्जिली असे॥ ३६८॥**
**आतां किती हा विस्तारु। जाणें ऐसा आचारु। जया तोचि साचारु। गुणातीत॥ ३६९॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे सूर्य रात्र किंवा पहाट जाणत नाही किंवा साही ऋतु आले तरी आकाश त्याहून अलिप्त राहते त्याप्रमाणे कोणी ईश्वर म्हणून पूजन केले किंवा चोर समजून छळ केला किंवा बैल, हत्ती इत्यादि समुदायाने वेढलेला राजा बनविले किंवा आपले हितकर्ते मित्र जवळ आले अथवा आपल्या शत्रुंनी हल्ला केला तरी त्याच्या चित्तात विषमता उत्पन्न होत नाही.॥ ३६२-३६३-३६४॥ ज्ञानीपुरुषाच्या ठिकाणी आणखी एक आचरण असते की, त्याच्या ठिकाणी व्यापार झालाच नाही असे दिसते.॥ ३६५॥ संपूर्ण विषयसुखाच्या कर्माचा आरंभ नाहीसा झालेला असतो. तशीच ती विषयसुखाची प्रवृत्तिहि त्याची नाहीशी होते आणि ज्या ज्ञानाग्नीमध्ये संपूर्ण कर्मफळे जळतात, तो ज्ञानाग्नीच तो होय.॥ ३६६॥ इहलोकातील दृष्ट विषयसुख व परलोकातील अदृष्ट-म्हणजे मेल्यानंतर मिळणारे विषयसुख-अशा नावांची जेवढी विषयसुखे आहेत, त्यापैकी एकाहि विषयसुखाची ज्ञानीपुरुषाचे अंत:करणात इच्छा उत्पन्न होत नाही. त्याचे केवळ प्रारब्धानुसार सेवन केले जाते.॥ ३६७॥ ज्याप्रमाणे दगड सुखी होत नाही किंवा दु:खी होत नाही, त्याप्रमाणे ज्ञानीपुरुषाच्या मनाने करणे किंवा न करणे या दोहोंचा त्याग केलेला असतो.॥ ३६८॥ अर्जुना! आता फार काय सांगायचे! अशा प्रकारचा ज्याचा आचार असतो, तोच पुरुष खरोखर गुणातीत आहे, असे समजावे॥ ३६९॥

**गूढार्थदीपिका**—या सर्व ओव्यांवरून ज्ञानीपुरुष व्यवहार करीत नाही किंवा सर्वांशी व सर्व वस्तूशी एकसारखाच वागतो, असे माउलीचे म्हणणे आहे, असे कोणी समजू नये. ज्ञानाच्या सातव्या तुर्यगा भूमीवर असलेला ज्ञानीपुरुषही व्यवहार करतो, असे योगवसिष्ठांत भगवान वसिष्ठानी सांगितले आहे. म्हणून या सर्व ओव्यांचा अर्थ एवढाच आहे की ज्ञानीपुरुषहि अज्ञानीपुरुषाप्रमाणेच, पूर्वी साधकादशेत बाणलेल्या शास्त्रीय आचरणानुसार विषमतेने व्यवहार करीत असतांना दिसत असला तरी, त्याची अंत:करणवृत्ति सम अशा परब्रह्मस्वरूपाचे ठिकाणी स्थिर झाली असल्यामुळे त्याच्या अंत:करणात विषमता उत्पन्न होत नाही. त्याच्या शरीर व इंद्रियांचा आचार केवळ प्रारब्धानुसार असतो व तो सदासर्वदा साक्षी होऊन राहतो.

**गुणांतें अतिक्रमणें। घडे उपायें जेणें। तो आतां आईक म्हणे। श्रीकृष्णनाथु॥ ३७०॥**

**अर्थ**—पुरुष ज्या योगाने सत्त्व, रज, तम या तिन्ही गुणांचे अतिक्रमण करतो, तो उपाय आता सांगतो, ऐक, असे भगवान श्रीकृष्ण म्हणाले.॥ ३७०॥

**गूढार्थदीपिका**—आतापर्यंत गुणातीततेची लक्षणे सांगितली असूनहि आता पुढे ज्या भक्तिउपायाने तीन गुणांचे अतिक्रमण करून पुरुष गुणातीत होतो, तो भक्ति उपाय सांगतो असे माउली म्हणत आहे व पुढे भक्तीचा उपाय सांगितलाहि आहे.

अहंवृत्त्यंतर्गत चैतन्याला चिदाभास म्हटले असले व बुद्धिपलीकडील चैतन्याला परब्रह्म म्हटले असले तरी, त्यांचा संबंध सुटत नाही, हा चिदाभास किंवा ही अहंवृत्ति बुद्धिपलीकडील परब्रह्माशी ज्ञानाने ऐक्य पावते. ही अहंवृत्ति बुद्धीची असली तरी या अहंवृत्तिमुळे वृत्तिगत चैतन्य साक्षी होऊन साक्षीरूपाने मी बुद्ध्यादि कार्याहून निराळा आहे असे ते जाणत असते. ही अहंवृत्ति प्रत्येक पुरुषाचे ठिकाणी स्फुरत असून तिचे आत्मस्वरूपाशी ऐक्य झाले की पुरुष ज्ञानी होतो व तो साक्षी राहून मी सत्वादि गुणाच्या अतीत आहे, असे जाणतो.

अशाप्रमाणे ज्ञानीपुरुष गुणातीत होतो असे माउलीनी आतापर्यंत सांगितले; पण साक्षित्व म्हणजे मी असंग आहे, मी गुणांच्या अतीत आहे, असे जाणणेहि सात्त्विक वृत्तिमुळे होत असते; म्हणून केवळ साक्षी होऊन राहिल्याने

ज्ञानीपुरुष अत्यंत गुणातीत होतो असा अर्थ नाही. त्याची गुणातीतता अपुरीच असते. ती ज्या उपायाने नाहीशी होईल तो उपचारच खरोखर गुणातीत करणारा होतो.

अर्थात् गुणातीत होण्याकरिता सात्त्विकवृत्तीच्या उपाधीने उत्पन्न होणारी जाणीवहि नाहीशी व्हायला पाहिजे. सगुण भगवंताच्या प्रेमभक्तीने जाणीवेचा विसर पडतो, सत्त्वगुणाची उपाधि नि:शेष नाहीशी होते व मनुष्य खरा गुणातीत म्हणजे निर्विकल्प होतो; म्हणूनच खरोखर माउलीनी गुणातीत होण्याचा उपाय म्हणजे भक्ति होय, असे पुढे प्रतिपादन केले आहे.

**मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते। स गुणान्समतीत्यैतान्ब्रह्मभूयाय कल्पते॥ २६॥**

**अर्थ**—जो माझ्या सगुणस्वरूपाची अनन्यभावाने भक्ति करतो, तो या गुणांचे उल्लंघन करून गुणातीत व निर्विकल्प ब्रह्मस्वरूप होण्यास पात्र होतो. ॥ २६ ॥

**तरी व्यभिचाररहित चित्तें। भक्तियोगें मातें। सेवी तो गुणातें। जाकळूं शके॥ ३७१॥**
**तरी कोण मी कैसी भक्ती। अव्यभिचारा काय व्यक्ती। हे आघवीचि निरुती। होआवी लागे॥ ३७२॥**
**तरी पार्था परियेसा। मी तंव येथ ऐसा। रत्नीं किळावो जैसा। रत्नचि तो॥ ३७३॥**

**अर्थ**—माझ्याहून भिन्न न राहता माझ्याशी ऐक्याने जो माझ्या सगुणस्वरूपाचे ठिकाणी प्रेम करतो, तो तिन्ही गुणांना ताब्यात ठेऊ शकतो. ॥ ३७१ ॥ म्हणून मी कोण आहे. माझी भक्ति कशी आहे-म्हणजे भक्तीचे स्वरूप कसे आहे, तिच्या अव्यभिचारीपणाचे लक्षण कोणते, या सर्वाचा स्पष्टार्थ होणे आवश्यक आहे. ॥ ३७२ ॥ तरी अर्जुना! ऐक, रत्नावरील तेज जसे रत्नच होय, त्याप्रमाणे माझे हे सगुणस्वरूप म्हणजे पूर्णब्रह्मच होय॥ ३७३ ॥

**गूढार्थदीपिका**—श्रीसद्‌गुरु गुलाबराव महाराज यांनी आपल्या ग्रंथातून सगुण साकार रामकृष्णादि स्वरूपाचे जे अनध्यस्तविवर्तत्व प्रतिपादिले आहे, त्या अनध्यस्तविवर्ताची कल्पना माऊलींनी "रत्नी किळावो जैसा। रत्नचि तो" या चरणानी व तसेच पुढील ओव्यातून दिली आहे.

या सर्वाचे तात्पर्य असे आहे की सगुण व निर्गुणस्वरूप यात जो निराळेपणा आहे तो नामरूपासह षड्‌गुणैश्वर्याचा आहे (निर्गुणस्वरूपाचे ठिकाणी त्याची प्रतीति येत नाही व सगुणस्वरूपाचे ठिकाणी ती येते). हे षड्‌गुणैश्वर्य अमर्याद असल्यामुळे मायिक नसून स्वरूपभूत आहे; म्हणून त्यांच्या ठिकाणी कोणत्याही रीतीने भेद नाही. दोन्ही रूपे अभिन्न आहेत. त्यातहि रत्नाच्या तेजावरूनच, असे रत्नाचे मोल ठरते, त्याप्रमाणे सगुणाच्या ठिकाणी प्रगट असणाऱ्या षड्‌गुणैश्वर्यावरूनच परब्रह्माचे निरुपमत्व अनुभवाला येते व तेजा व्यतिरिक्त जसे रत्न राहत नाही, त्याप्रमाणे ज्ञानाने परब्रह्माचा नामरूपरहित असा निर्गुण अनुभव झाला, तरी भक्तीने त्याच परब्रह्माचा सगुणसाकारस्वरूपाने अनुभव येत असल्यामुळे निर्गुणस्वरूपाला सोडून राहत नाही, असे येथे माऊलीनी सुचविले आहे.

**कां द्रवपणचि नीर। अवकाशचि अंबर। गोडी तेचि साखर। आन नाहीं ॥ ३७४॥**
**वन्हि तेचि ज्वाळ। दळाचि नांव कमळ। रूख तेंचि डाळ। फळादिक॥ ३७५॥**
**अगा हिम जें आकर्षलें। तेंचि हिमवंत जेवीं जालें। नाना दूध मुरालें। तेंचि दहीं॥ ३७६॥**
**तैसें विश्व येणें नांवें। हें मीचि पै आघवें। घेईं चंद्रबिंब सोलावें। न लगे जेवीं॥ ३७७॥**

**अर्थ**—किंवा पाण्याहून पातळपणा निराळा नाही, पातळपण तेच पाणी, अवकाशाहून आकाश निराळे नाही, अवकाश म्हणजे आकाश होय आणि गोडीहून साखर निराळी नसते, गोडी हीच साखर होय. ॥ ३७४॥ ज्वाला अग्निच होय, पाकळ्यालाच कमल हे नाव आहे. वृक्ष म्हणजेच त्याच्या डाहाळ्या-फळे हे होत. ॥ ३७५ ॥ थंडी जी गोठली तिचाच हिमालय होतो किंवा दूध विरजले तेच दही होय॥ ३७६॥ ज्याप्रमाणे चंद्र-बिंबावर साल नसल्यामुळे ते सोलावे लागत नाही, त्याप्रमाणे संपूर्ण विश्व मीच परमात्मा नटलो आहे, असे ग्रहण कर. ॥ ३७७॥

**गूढार्थदीपिका**—परमेश्वराहून जगताच्या भिन्न वस्तुत्त्वाची उत्पत्ति व जड विनाशित्त्वादिकांची अज्ञानजन्य भ्रांत कल्पना सोडून देऊन जगत् सच्चिदानंदस्वरूपच आहे, असे ग्रहण करावे, असा अर्थ.

**घृताचें थिजलेंपण। न मोडितां घृतचि जाण। कां नाटितां कांकण। सोनेचि तें॥ ३७८॥**
**नुकलितां पटु। तंतुचि असे स्पष्टु। न विरवितां घटु। मृत्तिका जेवीं॥ ३७९॥**
**म्हणोनि विश्वपण जावें। मग तै मातें घेयावें। तैसा नव्हे आघवें। सकटचि मी॥ ३८०॥**
**ऐसेनि मातें जाणिजे। ते अव्यभिचार भक्ति म्हणिजे। येथ भेदु कांहीं देखिजे। तरी व्यभिचार तो॥ ३८१॥**

**अर्थ**—तूप थिजले तरी ते तूपच राहते. बांगडीचे सोने न आटता देखील सोनेच असते. ॥ ३७८॥ वस्त्राचे दोरे अलग करून पाहिले नाही तरी ते सर्व सूतच असते. मातीचा घट पाण्यात बुडवून विरघळू दिला नाही तरी ती सर्व मातीच असते॥ ३७९॥ त्याप्रमाणे सर्व विश्वाचा लय करून माझे स्वरूप ग्रहण करावे अशी आवश्यकता नसून विश्व असतानाच (वर सांगितल्याप्रमाणे विश्वाच्या वस्तुत्वाची कल्पना सोडून देऊन) नामरूपासह संपूर्ण विश्वच मी आहे॥ ३८०॥ अशा प्रकारे अभेदाने मला जाणणे याला अव्यभिचारी भक्ति म्हणतात (यालाच अन्वयहि म्हणतात). माझ्याहून दुसऱ्या पदार्थाचे अस्तित्व मानून भेद मानणे हाच व्यभिचार होय॥ ३८१॥

**याकारणें भेदातें। सांडूनि अभेदें चित्तें। आपणयासकट मातें। जाणावें गा॥ ३८२॥**
**पार्था सोनयाची टिक। सोनयासी लागली देख। तैसें आपणपें आणिक। मानावें ना॥ ३८३॥**
**तेजाचा तेजौनि निघाला। परी तेजींचि असे लागला। तया रश्मी ऐसा भला। बोधु होआवा॥ ३८४॥**
**पैं परमाणु भूतळीं। हिमकणु हिमाचळीं। मजमाजीं न्याहाळीं। अहं तैसें॥ ३८५॥**
**हो कां तरंगु लहानु। परी सिंधूसी नाहीं भिन्नु। तैसा ईश्वरीं मी आनु। नोहेचि मा॥ ३८६॥**
**ऐसेनि बा समरसें। दृष्टि जैं उल्हासे। ते भक्ति पैं ऐसें। आम्ही म्हणों॥ ३८७॥**

**अर्थ**—म्हणूनच आपल्याहून मला भिन्न न पाहता, माझ्यासह सर्व एक परमात्माच आहे, अशा अभिन्नत्वाने मला जाणावे. ॥ ३८२॥ हे अर्जुना! सोन्याला लावलेली सोन्याची टिकली सोन्याहून भिन्न नसते, त्याप्रमाणे आपल्याला माझ्याहून भिन्न समजू नये. ॥ ३८३॥ तेजापासून निघालेले तेजाचे किरण ज्याप्रमाणे तेजाचे ठिकाणीच असतात, त्याप्रमाणे मी परमेश्वराचे ठिकाणीच आहे, त्याहून भिन्न नाही, असे ज्ञान असायला पाहिजे. ॥ ३८४॥ जसे परमाणु पृथ्वीवरच असतात, बर्फाचे कण हिमालय पर्वतावर असतात, त्याप्रमाणे 'अहं' हा, मज परमात्मस्वरूपाचे ठिकाणीच आहे, असे अखंड पाहात जा. ॥ ३८५॥ समुद्रावर उठलेला तरंग लहान असला तरी तो समुद्राहून निराळा होत नाही त्याप्रमाणे मी परमेश्वराहून निराळा नाही, असे पाहा॥ ३८६॥ अशा प्रकारची अभेद प्रेमदृष्टि झाली असता आम्ही त्या अभेद प्रेमदृष्टीला भक्ति म्हणतो. ॥ ३८७॥

**गूढार्थदीपिका**—येथे नुसत्या ऐक्याच्या जाणीवेला भक्ति म्हटले नसून परमेश्वर मी एक आहे अशी अभेदबुद्धि झाल्यावर सहजच जे सगुण परमेश्वराचे ठिकाणी आत्मप्रेम होते ते प्रेमच भक्ति होय; असे या ओवीने सुचविले आहे.

**आणि ज्ञानाचें चांगावें। इयेचि दृष्टि नांवें। योगाचेंही आघवें। सर्वस्व हें ॥ ३८८॥**
**सिंधू आणि जळधरा-। माजीं लागली अखंड धारा। तैसी वृत्ति वीरा। प्रवर्ते ते॥ ३८९॥**

**अर्थ**—आणि या दृष्टीने ज्ञानमार्गाचे उत्तमत्व मानले जाते. योगाचेहि सारसर्वस्व हेच आहे॥ ३८८॥ ज्याप्रमाणे समुद्रावर पाऊस पडत असता समुद्र व मेघ यांच्या मध्ये अखंड पाण्याची धार लागलेली असते, त्याप्रमाणे अर्जुना! मज परमात्म्याच्या ठिकाणी अखंड प्रेमवृत्ति लागणे ही भक्ति होय. ॥ ३८९॥

**गूढार्थदीपिका**—नुसत्या ज्ञानदशेतून प्रारब्धाने जसे व्युत्थान होते, तसे प्रेमातून होत नाही. परमेश्वराचे ठिकाणी अखंड वृत्ति प्रेमानेच लागू शकते म्हणून "अखंड धारा" या शब्दांनी आत्मप्रेमच सुचविले आहे.

**कां कुहेसीं आकाशा। तोडीं सांदा नाहीं जैसा। तो परमपुरुषीं तैसा। एकवटे गा॥ ३९०॥**

**अर्थ**—किंवा ज्याप्रमाणे विहिरीच्या तोंडाशी बाहेरील आकाशाचा सांधा जोडला जात नाही, त्याप्रमाणे जेव्हा जीव हा मज परमपुरुषाचे ठिकाणी समरस एकवटून जातो, तेव्हा ती भक्ति होय.॥ ३९०॥

**गूढार्थदीपिका—तो परमपुरुषी तैसा। एकवटे—**

"एकवटे" या शब्दाने येथे ऐक्याच्या जाणीवेवाचून जे ऐक्य होते ते सांगितले आहे.

केवळ ज्ञानाने ऐक्य झाले असता सांधा जोडल्याच्या जाणिवेप्रमाणे ऐक्याची जाणीव राहते, पण प्रेमाने ऐक्य झाले असता ऐक्य होऊनहि ऐक्याची जाणीव राहत नाही; म्हणून येथे परमप्रेमाने होणाऱ्या ऐक्याचाच माउलीने "एकवटे" या शब्दाने उल्लेख केला आहे, हे उघड आहे.

**प्रतिबिंबौनि बिंबवरी। प्रभेची जैसी उजरी। ते सोहंवृत्ती अवधारीं। तैसी होय॥ ३९१॥**
**ऐसेनि मग परस्परें। ते सोहंवृत्ति जैं अवतरे। तैं तियेंही सकट सरे। आपैसया॥ ३९२॥**
**जैसा सैंधवाचा रवा। सिंधूमाजीं पांडवा। विरालेया विरवावा। हेंही ठाके॥ ३९३॥**
**नातरी जाळूनि तृण। वन्हिही विझे आपण। तैसें भेदु नाशूनि जाण। ज्ञानही नुरे॥ ३९४॥**

**अर्थ**—प्रतिबिंबापासून बिंबापर्यंत ज्याप्रमाणे एक प्रकाशच प्रगट असतो, त्याप्रमाणे सोहंवृत्तिपासून परमेश्वरापर्यंत एक चैतन्यप्रकाशच प्रगट असतो॥ ३९१ ॥ अशा परस्पर ऐक्याने जी सोहंवृत्ति प्रगट होते, तीहि या प्रेमरूप भक्तिमुळे पुढे आपोआप नाहीशी होते.॥ ३९२॥ अर्जुना! ज्याप्रमाणे समुद्रात मिठाचा खडा टाकल्याने तो आपोआप विरतो, त्याला विरवावे लागत नाही॥ ३९३॥ किंवा ज्याप्रमाणे गवत संपूर्ण जळून गेले असता गवताला जाळणारा अग्नीही विझतो, त्याप्रमाणे ज्ञान हे संपूर्ण भेदाचा नाश करून शेवटी आपणहि नाहीसे होते॥ ३९४॥

**गूढार्थदीपिका**—ज्ञान हे जसे आपले स्वरूप आहे, तसेच प्रेम हेहि आपले स्वरूप असल्यामुळे ज्ञानाने, परमेश्वराशी आपला अभेद आहे, असे कळून आल्यावर भेद नाहीसा होऊन सहजच परमेश्वरावर प्रेम बसते व ते वाढत जाऊन आत्मवत् होते; म्हणूनच त्या प्रेमाधिक्याने ऐक्याची जाणीवरून सोहंवृत्ति नाहीशी होते.

सारांश, आत्मज्ञान झाल्यावर त्या ज्ञानाने भेद नाहीसा होऊन पुढे प्रेमाने जाणीवहि मुरते व शेवटी एक प्रेमच उरते.

**माझें पैलपण जाये। भक्त हें ऐलपण ठाये। अनादि ऐक्य जें आहे। तेंचि निवडे॥ ३९५॥**
**आतां गुणातें तो किरीटी। जिणे या नव्हती गोष्टी। जे एकपणाही मिठी। पडों सरली॥ ३९६॥**
**किंबहुना ऐसी दशा। तें ब्रह्मत्व गा सुदंशा। हें तो पावे जो ऐसा। मातें भजे॥ ३९७॥**
**पुढती इहीं लिंगीं। भक्तु जो माझा जगीं। हे ब्रह्मता तयालागीं। पतिव्रता॥ ३९८॥**

**अर्थ**—मी जो संसाराच्या पलीकडे म्हटला जातो, ते माझे पैलपण नाहीसे होते. संसारनदी तरून जाण्याकरिता संसाराच्या ऐलतीरावरून भक्त जी माझी भक्ती करतो, ते त्याचे ऐलपणहि नाहीसे होऊन मूळचे जाणीवरहित जे ऐक्य आहे तेच तो होऊन राहतो॥ ३९५ ॥ अर्जुना! अशा स्थितीत जेथे ऐक्यही जाणविले जात नाही येथे गुणाला जिंकण्याची गोष्ट उरत नाही॥ ३९६ ॥ अर्जुना! फार काय सांगू! अशा दशेलाच ब्रह्म हे नाव आहे आणि ही दशा माझ्या भक्तीनेच प्राप्त होते॥ ३९७॥ आणखी अशा लक्षणाने जो माझा भक्त झाला आहे, त्याची ब्रह्मता ही पतिव्रता स्त्री होऊन राहते॥ ३९८॥

**गूढार्थदीपिका**—पतिव्रता स्त्री जशी सर्वस्वी पतीच्या स्वाधीन असते त्याप्रमाणे ब्रह्मस्थिति भक्ताच्या सहजच स्वाधीन होऊन राहते.

**जैसें गंगेचेनि वोघें। डळमळीत जळ जें निघे। सिंधुपद तयाजोगें। आन नाहीं॥ ३९९॥**
**तैसा ज्ञानाचिया दिठी। जो मातें सेवी किरीटी। तो होय ब्रह्मतेचां मुकुटीं। चूडारत्न॥ ४००॥**
**यया ब्रह्मत्वासीचि पार्था। सायुज्य ऐसी व्यवस्था। याचि नांवें चौथा। पुरुषार्थ गा॥ ४०१॥**
**परी माझें आराधन। ब्रह्मत्वीं होय सोपान। येथ मी हन साधन। गमेन हो॥ ४०२॥**

**तरी झणी ऐसें। तुझां चित्तीं पैसें। पैं ब्रह्म आन नसे। मीवांचूनि॥ ४०३॥**

**अर्थ**—जे पाणी खळखळ करीत गंगेच्या प्रवाहाच्या रूपाने वाहते, त्याची खळवळ बंद होण्यास जशी समुद्रावाचून दुसरी गति नाही॥ ३९९॥ त्याप्रमाणे ज्ञानाच्या अभेददृष्टीने जो माझ्या सगुणस्वरूपाचे प्रेमाने भजन करतो, तो ब्रह्मतारूप मुकुटावरील मुख्य मणि होय॥ ४००॥ अर्जुना! या ब्रह्मत्वाला सायुज्यता म्हणतात व हिलाच चौथा पुरुषार्थ असेहि नांव आहे॥ ४०१॥ एवढ्यावरून माझी भक्तीही ब्रह्मत्व प्राप्तीचे साधन आहे किंवा ब्रह्मप्राप्तीची पहिली पायरी आहे, म्हणून माझे सगुणस्वरूप साधनरूप आहे, असे तुला वाटेल, पण तसे वाटू देऊ नकोस; कारण माझ्याहून ब्रह्म दुसरे नाही॥ ४०२-४०३॥

**गूढार्थदीपिका**—पुष्कळ वेदान्ती रामकृष्णादि सगुणसाकार स्वरूपाची भक्ती ही निर्गुण परब्रह्माच्या प्राप्तीला साधनभूत आहे, असे जे समजतात, त्या मताचे माउलींनी येथे स्पष्टच खंडन केले आहे भगवंताच्या निर्गुण व रामकृष्णादि सगुणस्वरूपात श्रेष्ठ कनिष्ठ भाव मुळींच नाहीत व नाथांनीहि "माझे स्वरूप निज निर्गुण। अथवा वैकुंठीचे सगुण। दोन्ही एकचि निश्चये जाण। सगुण निर्गुण समसाम्य॥ ३०६॥" (ए० भा० अ० २५) इत्यादि ओव्यातून असेच सांगितले आहे. पण रामकृष्णादि स्वरूपाची (ज्ञानापूर्वी केलेली) कर्ममिश्रित अपरा किंवा गौणी भक्ती ही "गौण्या तु समाधिसिद्धि:" या शांडिल्यसूत्राप्रमाणे निर्गुण ब्रह्मप्राप्तीला साधनभूत असून ज्ञानोत्तर पराभक्ती ही ज्ञानाने उत्पन्न होणाऱ्या अहंब्रह्मपणाला व सोहंपणाला जिरविणारी होते. ब्रह्मता हीच सायुज्यता आहे व ब्रह्म माझ्याहून निराळे नाही असे सांगून सगुण श्रीकृष्णस्वरूप पूर्णब्रह्मच म्हणजे कारणब्रह्मच आहे, हे तत्त्व माउलींनी येथे प्रतिपादिले आहे.

शांकर ब्रह्मसूत्रात सगुण ब्रह्माला जे कार्य ब्रह्मत्व सांगितले आहे, ते अक्षिपुरुष आदित्यपुरुष इत्यादि सगुण ब्रह्माविषयी सांगितले आहे. रामकृष्णादि सगुणस्वरूपाविषयी नाही, हे आम्ही मागे सांगितलेच आहे.

**ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहममृतस्याव्ययस्य च । शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकान्तिकस्य च॥ २७॥**

**ॐतत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे**
**गुणत्रयविभागयोगो नाम चतुर्दशोऽध्याय:॥ १४॥**

**अर्थ**—अविनाशी, अविकारी, नित्य अशा ज्ञानयोगरूप निवृत्तिधर्माने प्राप्त होणाऱ्या अखंड आनंदरूप परब्रह्माची प्रतिष्ठा-म्हणजे शेवटचे निर्विकल्प स्वरूप मीच आहे॥ २७॥

**अगा ब्रह्म या नांवा। अभिप्रावो मी पांडवां। मीचि बोलिजे आघवां। शब्दीं इहीं॥ ४०४॥**
**पैं मंडळ आणि चंद्रमा। दोनी नव्हती सुवर्मा। तैसा मज आणि ब्रह्मा। भेदु नाहीं॥ ४०५॥**
**अगा नित्य जें निष्कंप। अनावृत धर्मरूप। सुख जें उमप। अद्वितीय॥ ४०६॥**
**विवेकु आपलें काम। सारूनि ठाकी जें धाम। निष्कर्षाचें नि:सीम। किंबहुना मी॥ ४०७॥**
**ऐसेसें हो अवधारा। तो अनन्याचा सोयरा। सांगतसे वीरा। पार्थासी॥ ४०८॥**

**अर्थ**—अर्जुना! ब्रह्म या नावाचा तात्पर्यार्थ मीच आहे. या सर्व शब्दांनी मीच संबोधिला जातो॥ ४०४॥ ज्याप्रमाणे चंद्रमंडळ आणि चंद्र हे दोन नव्हेत, त्याप्रमाणे मजहून ब्रह्म किंवा ब्रह्माहून मी यत्किंचितहि अलग नाही॥ ४०५॥ जे परब्रह्म नित्य आहे, अविकारी आहे, कशानेहि झाकले गेले नाही असे धर्मरूप जे झाले आहे, जे अमर्याद सुखरूप असून जे अद्वितीय म्हणजे दुसऱ्यावाचून केवळ एकटे आहे॥ ४०६॥ विवेकवृत्ति आपले (जडचैतन्याच्या निवाड्याचे) काम करून शेवटी जेथे स्थिर होते. फार काय सांगायचे! जे सर्व साराचे असीम सारभूत आहे, ते परब्रह्म मी आहे॥ ४०७॥ हे लक्षात घे, असे अनन्याचा आप्त भगवान श्रीकृष्ण अर्जुनाला सांगू लागला॥ ४०८॥

**गूढार्थदीपिका**—या श्लोकावर भाष्य करतांना भगवान श्रीशंकराचार्य म्हणतात. "ब्रह्मण: परमात्मनो हि यस्मात्प्रतिष्ठाऽहं प्रतिष्ठित्यस्मिन्निति प्रतिष्ठाऽहं प्रत्यगात्मा।........यया चेश्वरशक्त्या भक्तानुग्रहादि प्रयोजनाय ब्रह्म

प्रतिष्ठिते प्रवर्तते सा शक्तिर्ब्रह्मैवाहं शक्तिशक्तिमतोरनन्यत्वादित्यभिप्राय: । अथवा ब्रह्मशब्दवाच्यत्वात् सविकल्पकं ब्रह्म तस्य ब्रह्मणो निर्विकल्पकोऽहमेव नान्य: प्रतिष्ठा आश्रय:'' ज्या अर्थी ब्रह्माचा म्हणजे परमात्म्याचा मी आधार किंवा प्रत्यगात्मा आहे..........ज्या ईश्वरशक्तीने भक्तावर अनुग्रह करणे इत्यादि कार्यासाठी ब्रह्म प्रवृत्त होते ती शक्ति म्हणजे ब्रह्मच, ते मी आहे. शक्ति व शक्तिमान यांचे अभिन्नत्व असते अथवा ब्रह्म या शब्दाने उल्लेख केला असल्यामुळे येथील ब्रह्म सविकल्प आहे, त्या सविकल्प ब्रह्माची निर्विकल्प अशी मीच प्रतिष्ठा म्हणजे आधार आहे.

भाष्यात ''अहं प्रत्यगात्मा'', ''अहं निर्विकल्पक:'' असे शब्दप्रयोग आहेत. या ठिकाणी ''अहं'' म्हणजे 'मी हा शब्द भगवंताच्या सगुण साकार स्वरूपाला उद्देशूनच असल्यामुळे आचार्यांच्या भाष्याचाहि, (आम्ही मागे दाखविल्याप्रमाणेच) असा निष्कर्ष आहे की भगवंताची रामकृष्णादि सगुण साकारस्वरूपे कार्यब्रह्मरूप व क्रमाने मुक्ती देणारी नसून परब्रह्माप्रमाणेच शुद्ध व निरुपाधिक असे कारणब्रह्मरूप व साक्षात् मुक्ति देणारी आहेत.

**येथ धृतराष्ट्र म्हणे। संजया हें तूतें कोणें। पुसलेनिविण वायाणें। कां बोलसी॥ ४०९॥**
**माझी अवसरी ते फेडीं। विजयाची सांगें गुढी। येरु जीवी म्हणे सांडीं। गोठी इया॥ ४१०॥**
**संजयो विस्मयें मानसीं। आहा करूनी रसरसीं। म्हणे कैसें पां देवेंसीं। द्वंद्व यया॥ ४११॥**
**तरी कृपाळु तो तुष्टो। यया विवेकु हा घोंटो। मोहाचा फिटो। महारोगु॥ ४१२॥**
**संजयो ऐसें चिंतितां। संवादु तो सांभाळितां। हरिखाचा येतु चित्ता। महापूर॥ ४१३॥**
**म्हणोनि आतां येणें। उत्साहाचेनि अवतरणें। श्रीकृष्णाचें बोलणें। सांगिजेल॥ ४१४॥**
**तया अक्षराआंतील भावो। पाववीन मी तुमचा ठावो। आइका म्हणे ज्ञानदेवो। निवृत्तीचा॥ ४१५॥**

**इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां चतुर्दशोऽध्याय:॥१४॥**

**अर्थ—**तेव्हा धृतराष्ट्र म्हणाला, संजया! हे तुला कोणी विचारले? जे विचारले नाही ते का व्यर्थ सांगतोस॥ ४०९॥ या क्षणी माझ्या अंत:करणात जो प्रश्न आहे तो सोडव. विजयाची गुढी कोणाकडे उभारली जाईल ते सांग बाकीच्या ह्या सर्व गोष्टी अंत:करणातून सोडून दे॥ ४१०॥ हे ऐकून संजयाला मनात आश्चर्य वाटले आणि म्हणाला, अरे! अरे! भगवंतांनी रसभरित निरूपण केले व ते याला सुदैवाने प्राप्त झाले (पण याला ते आवडत नाही). याचे सुदैवाशी कसे वैर आहे, पाहा॥ ४११॥ तरी कृपाळु भगवान श्रीकृष्ण त्याला प्रसन्न होऊन कृपा करो, त्याला विवेक उत्पन्न होवो व त्याचा अविवेकरूपी महारोग नाहीसा होवो॥ ४१२॥ संजय असे मनात आणून श्रीकृष्णार्जुनाच्या संवादाचा मनात विचार करीत आहे, तोच त्याच्या चित्तात महा आनंदाचा पूर लोटला॥ ४१३॥ म्हणून प्राप्त झालेल्या उत्साहाने पुढे भगवान श्रीकृष्ण काय बोलले ते सांगणार आहे॥ ४१४॥ श्रीनिवृत्तिनाथाचे श्रीज्ञानेश्वर महाराज श्रोत्यांना म्हणतात, भगवंताच्या बोलण्यातील अक्षरांचा भावार्थ मी तुमच्या अंत:करणात उतरवीन, अवधान द्या॥ ४१५॥

**श्रीसद्गुरुकृपेने श्रीज्ञानेश्वरीच्या चौदाव्या अध्यायाचा अनुवाद गूढार्थदीपिकेसह संपूर्ण झाला तो सद्गुरुंच्या चरणी समर्पण असो.**

**॥ श्रीज्ञानेश्वर महाराजकी जय॥**



## समारोप

मागे तेराव्या अध्यायात क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या संयोगाने या जगाची उत्पत्ति होते व आत्मा गुणाच्या संगाने संसारी झाल्यासारखा भासतो, पुरुषाला सुखदु:खादि भोग होण्याला गुणसंगच कारण आहे; वास्तविक आत्मा केवळ असंग असून गुणातीत आहे. असे सांगितले.

या चौदाव्या अध्यायात आत्मा असंग असताना त्याला संग कसा होतो? क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचा संयोग म्हणजे काय? गुण म्हणजे काय व ते किती आहेत? ते कसे बंधन करतात? गुणातीत पुरुषाची लक्षणे कोणती? याचे प्रसंगाने वर्णन आले आहे.

भगवान म्हणतात, अर्जुना! ज्या ज्ञानाचा आश्रय करून या देहबंधापासून सुटून मुनी परम सिद्धीला प्राप्त झाले, ते ज्ञान तुला सांगतो, ऐक.

जीव मुळात परब्रह्मस्वरूप असून परब्रह्माचे सच्चिदानंदादि धर्म त्याचे ठिकाणी कायमच असतात; पण तो ते आपले धर्म विसरून त्याहून विपरीत धर्म त्याने आपले ठिकाणी मानून घेतले आहेत. म्हणून जीवाला आत्मज्ञान-म्हणजे माझ्या ठिकाणी आत्मधर्मच आहेत याची जाणीव-करून घ्यावी लागते.

परब्रह्माच्या धर्माची विस्मृति-म्हणजे परब्रह्माची विस्मृति होय. या विस्मृतीलाच अज्ञान किंवा अविद्या असेहि म्हणतात. "ब्रह्मसत्तयैव अज्ञानस्य सत्ता" अविद्या, ब्रह्मसत्तेवरच भासत असते. हिला स्वतंत्र अस्तित्व नाही. माझी विस्मृति झाली असता ही जागी होते व माझ्या सत्तेच्या आश्रयाने ती गरोदर होते व सर्व जग प्रसवते. परब्रह्माच्या सत्तेवर अविद्या भासते, म्हणून परब्रह्म हा जगताचा पिता असून अविद्येपासून सर्व ब्रह्मांड उत्पन्न झाले असल्यामुळे ती ब्रह्मांडाची माता होय. प्रकृतिपासूनच सत्व, रज, तम या तीन गुणांची उत्पत्ति झाली असून तेच जीवाला बंधन करीत असतात. त्यात सत्व हा निर्मळ, प्रकाशरूप व निरुपद्रवी असून सुख व ज्ञान यांच्या योगाने जीवाला बंधन करतो.

रजोगुण हा मनाचे रंजन करणारा असून तो वासना व आसक्ति यांना उत्पन्न करणारा आहे. तो जीवाला फळाच्या इच्छेने फलात आसक्त करून बंधन करतो.

तमोगुण हा सर्व जीवांना मोह पाडणारा असून मोह, आलस्य इत्यादि कर्मांनी बद्ध करतो.

जीवाने गुण व गुणांची कार्ये माझी आहेत, असे समजणे, हाच गुणाचा बंध होय. एऱ्हवी जड असे गुण चेतन-जीवाला कसे बांधणार?

रज व तम या गुणांचा अविर्भाव होऊन सत्वगुण उदय पावला असता ज्ञानाचा प्रकाश पडतो. सत्व व तम यांचा अविर्भाव होऊन रजोगुणाची वृद्धि झाली असता लोभ व कर्माची प्रवृत्ति वाढते व सत्त्व व रज यांचा अविर्भाव होऊन तमोगुण वाढला असता अविवेक, प्रमाद, मोह ही लक्षणे वाढतात. सत्त्वगुणाच्या प्रधान अवस्थेत मनुष्य मरण पावला तर तो स्वर्गादि उत्तम लोकांप्रत जातो. रजोगुणाच्या प्रधान अवस्थेत मरण पावला तर मनुष्यलोकांत जन्म घेतो व तमोगुणाच्या वाढलेल्या अवस्थेत मरण पावला असता तो कीटकादि पश्वादि योनीत जातो.

सात्त्विककर्माचे निर्मळ असे सात्त्विक फळ मिळते, रजोगुणी कर्माचे दु:ख हे फळ मिळते, व तामस कर्माचे अज्ञान हे फळ मिळते. यावरून पाश्चात्यांचा उत्क्रांतिवाद गीतेला मान्य नाही, हे उघड आहे.

जेव्हा जीव गुणावांचून दुसरा कर्ता नाही, असे पाहतो व गुणांच्या पलीकडे असलेल्या अपल्या स्वरूपाला

जाणतो, तेव्हा तो जन्म, जरा, दुःख यांपासून मुक्त होऊन माझ्या अविनाशी स्वरूपाला प्राप्त होतो.

यावर अर्जुन म्हणतो, हे श्रीकृष्णा! कोणत्या लक्षणांहून हा पुरुष तीन गुणांच्या पलीकडे गेला, असे समजावे? त्याचा आचार कसा असतो? व कशा प्रकारे तो तीन गुणांच्या पलीकडे जातो?

भगवान श्रीकृष्ण म्हणतात, सांगतो, ऐक. गुणातीत झालेला पुरुष प्रारब्धानुसार गुणांनी प्रवृत्त झाला असता त्या गुणांचा तो द्वेष करीत नाही अथवा ते (गुण) निवृत्त झाले असतां त्यांची इच्छा करीत नाही, उदासीनासारखा राहतो.

सुख-दुःख, प्रिय-अप्रिय, मान-अपमान, शत्रु-मित्र हे सर्व तो सारखेच मानतो, त्यांनी अंतःकरणातून सर्व कर्माचा त्याग केलेला असतो.

सारांश गुणातीत पुरुष गुणाला प्रवृत्त करीत नाही किंवा निवृत्त करीत नाही, अखंड साक्षी होऊन राहतो.

जो मला अनन्यभावाने शरण जाऊन माझ्या सगुण स्वरूपाची भक्ति करतो, तोच या तिन्ही गुणांचे उल्लंघन करून गुणातीत व निर्विकल्प ब्रह्मस्वरूप होतो.

भगवान म्हणतात, अर्जुना! ज्याप्रमाणे समुद्र व लाट हे सर्वतोपरि पाणीच असते, त्याप्रमाणे माझ्या सगुण-स्वरूपांत व निर्गुण परब्रह्मस्वरूपांत यत्किंचितहि भेद नाही. निर्गुण परब्रह्मस्वरूपा प्रमाणेच माझे सगुण श्रीकृष्णस्वरूपहि पूर्णब्रह्मच आहे.

**॥ श्रीमद्सद्गुरु श्रीज्ञानेश्वर महाराजार्पणमस्तु ॥**





॥ श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ ॥

# अध्याय-पंधरावा

**अवतरणिका—येथे श्री ज्ञानेश्वर महाराज मानसपूजेपासून अध्यायाच्या निरूपणास सुरुवात करतात.**

**आतां हृदय हें आपुलें। चौफळूनियां भलें। वरी बैसऊं पाउलें। श्रीगुरूचीं॥ १॥**

**अर्थ**—आता आपल्या हृदयाचा उत्तम चौरंग करून त्यावर श्रीगुरुचे चरण स्थापन करु—म्हणजे हृदयकमळाचे ठिकाणी श्रीगुरुचे चरण दृढ धारण करु॥ १॥

**गूढार्थदीपिका—चौफाळूनिया**-आत्मानात्मविवेक, वैराग्य, शमादि षट्क व तीव्र मुमुक्षा हे या हृदयचौरंगाचे चार पाय आहेत. या चार पायांच्या अभावी विषयाच्या ध्यानामुळे श्रीगुरुचे चरण हृदयात दृढ धरले जात नाहीत, असा अर्थ.

**ऐक्यभावाची अंजुळी। सर्वेंद्रियकुड्मळीं। भरूनियां पुष्पांजुळी। अर्घ्यु देवों॥ २॥**

**अर्थ**—भेद नाहीसा करून ऐक्यभावाच्या अंजुळीत सर्व इंद्रियांच्या फुललेल्या कळ्या भरून त्या चरणावर अर्घ्य देऊ—म्हणजे सर्व इंद्रियांना एकवटून त्यांचे व्यापार त्या चरणाचे ठिकाणीच अनन्यभावाने समर्पण करू॥ २॥

**अनन्योदकें धुवट। वासना जे तन्निष्ठ। तें लागलेसे अबोट। चंदनाचें॥ ३॥**

**अर्थ**—अनन्यतारूपी उदकाने धुवून शुद्ध झालेली एक गुरुचरणनिष्ठ वासना, हेच सुवासिक चंदनाचे बोट, मी त्या चरणाचे ठिकाणी लाविले आहे॥ ३॥

**गूढार्थदीपिका**—वासना शुद्ध व अशुद्ध अशी दोन प्रकारची आहे, हे मागे सांगितलेच आहे. (गू० दी० अ० ९ ओ० १८८)

विषयरहित अशा निष्काम भगवतप्राप्तीच्या इच्छेला प्रेम किंवा शुद्ध वासना म्हणतात. विषयकामनेचा नि:शेष त्याग केला असता ती स्वच्छ, शुद्ध, सात्त्विक व भगवन्निष्ठ होते, या एकनिष्ठ वासनेलाच येथे 'चंदनाचे बोट' असे म्हटले आहे. विषयवासना नाहीशी झाली तरच श्रीगुरुचे ठिकाणी खरे प्रेम जडते, असा अर्थ.

**प्रेमाचेनि भांगारें। निर्वाळूनि नूपुरें। लेवऊं सुकुमारें। पदें तियें॥ ४॥**

**अर्थ**—प्रेमरूपी सोन्याचे पैंजण घडवून ते श्रीगुरुच्या सुकुमार चरणांचे ठिकाणी लेववू॥ ४॥

**गूढार्थदीपिका**—श्रीगुरुच्या चरणाचे प्रेम करण्याला येथे सोन्याने अलंकृत करण्याची उपमा दिलेली आहे-म्हणजे अलंकाराने जशी शोभा येते तशी प्रेमाने केलेल्या सेवेला शोभा येते. प्रेम नसले तर कितीहि पूजा केली तरी ती व्यर्थ आहे, असा अर्थ.

**घणावली आवडी। अव्यभिचारें चोखडी। तिये घालूं जोडी। आंगोळिया॥ ५॥**

**अर्थ**—प्रबळ झालेल्या एकनिष्ठ प्रेमाच्या उत्तम आंगठ्या दोन चरणांच्या बोटात घालू॥ ५॥

**गूढार्थदीपिका**—एकनिष्ठतेने प्रेम वाढते व तेच चरणाच्या आंगठ्याप्रमाणे शोभू लागते किंवा चरणाच्या प्रबल अशा एकनिष्ठ प्रेमाने चरणाचा एक अंश देखील अत्यंत प्रिय वाटू लागतो, असा अर्थ.

**आनंदामोदबहळ। सात्त्विकाचें मुकुळ। तें उमललें अष्टदळ। ठेऊं वरी॥ ६॥**

**अर्थ**—आनंदरूप सुगंधाने पूर्ण भरलेली जी अष्टसात्त्विक भावांची कळी उमलली तेच अष्टदळात्मक कमळ वर वाहू॥ ६॥

**गूढार्थदीपिका**—श्रीगुरुच्या चरणाच्या प्रेमपूर्वक ध्यानाने उत्पन्न होणाऱ्या अष्टसात्त्विक भावाचे भोक्तृत्वहि, सुखाचा भोक्ता न होता, श्रीगुरुला समर्पण करून ज्ञानीभक्त केवळ आनंदरूप किंवा सुखरूप होऊन राहतात, असा भाव.

**अवतरणिका—अष्टसात्त्विक भावाच्या सुखाचा भोक्ता न होता, केवळ सुखरूप कसे व्हायचे, ते आता श्रीज्ञानेश्वर महाराज सांगतात.**

**तेथें अहं हा धूप जाळूं। नाहं तेजें वोवाळूं। सामरस्यें पोटाळूं। निरंतर॥ ७॥**

**अर्थ**—त्या ठिकाणी अहंतारूप धूप जाळू, 'मी नाही', 'सर्व एक श्रीगुरुच आहेत', या अद्वैतबुद्धि दीपाने चरणाची आरती करू व शेवटी श्रीगुरुच्या प्रेमाने साक्षित्वहि सोडून देऊन श्रीगुरुशी समरस होऊन श्रीगुरुचे चरण पोटाशी कवटाळून धरू॥ ७॥

**गूढार्थदीपिका—अहं का धूप जाळू—**

जीव मूळात पूर्ण परब्रह्मस्वरूप असून तो अहंतेमुळे निराळा झाला आहे, म्हणून अहं हे धूपाचे द्रव्य होय. तो अहंतारूप धूप जाळला पाहिजे.

**"अहंभावोदयाभावः बोधस्य परमावधिः"**

'मी ब्रह्म आहे' या निदिध्यासनाने ऐक्य करीत श्रीगुरुहून जीवाला अलग करणाऱ्या अहंभावाचा उदयच होऊ न देणे, याला 'अहं' धूप जाळणे म्हणतात.

**माझी तनु आणि प्राण। इया दोनी पाउवा लेऊं श्रीचरण। करु भोग-मोक्ष-निंबलोण। पायां तयां॥ ८॥**

**अर्थ**—माझे शरीर व प्राण यांच्या पादुका करून श्रीगुरुचरणी घालीन व त्या चरणावरून भोग व मोक्ष दोन्ही ओवाळून टाकीन॥ ८॥

**गूढार्थदीपिका—भोग-मोक्ष**-म्हणजे अन्वयावांचून नुसत्या व्यतिरेक ज्ञानाने प्राप्त होणारी जीवन्मुक्ति व विदेहमुक्ति.

एकरस परब्रह्माचे ठिकाणी ह्या अवस्था वस्तुतः नसून अज्ञानी जीवाच्या अपेक्षेने त्या कल्पिलेल्या आहेत.

येथे श्रीगुरुच्या ठिकाणी शिष्याचे जे आत्मवत् अमर्याद प्रेम वाढते त्याचे वर्णन केले आहे.

निर्गुण स्वरूपाच्या अनुभवाने सर्व प्राप्तीपेक्षा सगुणाचे प्रेम अधिक गोड वाटते, असा अर्थ.

**इया श्रीगुरुचरणसेवा। हों पात्र तया दैवा। जें सकळार्थमेळावा। पाटू बांधे॥ ९॥**

**अर्थ**—ज्या सुदैवाने संपूर्ण पुरुषार्थाच्या मेळाव्याच्या राज्यावर राज्याभिषेक होतो, त्या सुदैवाला या श्रीगुरुचरणसेवेने मी पात्र होवो॥ ९॥

**गूढार्थदीपिका**—एका श्रीगुरुच्या चरणसेवेने सर्व पुरुषार्थ साधतात, असा भाव.

**ब्रह्मीचें विसवणेंवरी। उन्मेख लाहे उजरी। जें वाचेतें इये करी। सुधासिंधु॥ १०॥**

**अर्थ**—सद्गुरुच्या चरणसेवेने प्राप्त होणाऱ्या ज्या सद्भाग्याने वाणी अमृताच्या सागरासारखी मधुर व परब्रह्माच्या निर्विकल्प स्थितीपर्यंत प्रकाश पाडणारी होते॥ १०॥

**गूढार्थदीपिका**—ज्ञानभक्तीने निःशेष अहंकाररहित झालेल्या व ब्रह्मानंदात डुल्लत असलेल्या भगवद्भक्ताच्या मुखातून निघणारे शब्द, अधिकारी शिष्याला परब्रह्माच्या स्वरूपाचा साक्षात् व पूर्ण अनुभव प्राप्त करून देणारे, असे प्रभावी असतात, असा अर्थ.

**पूर्णचंद्राचिया कोडी। वक्तृत्वा घापे कुरोंडी। तैसी आणि गोडी। अक्षरांतें॥ ११॥**
**सूर्यें अधिष्ठिली प्राची। जगा राणीव दे प्रकाशाची। तैशी वाचा श्रोतयां ज्ञानाची। दिवाळी करी॥ १२॥**
**नादब्रह्म खुजें। कैवल्यही तैसें न सजे। ऐसा बोलु देखिजे। जेणें दैवें॥ १३॥**
**श्रवणसुखाच्या मांडवीं। विश्व भोगी माधवी। तैसी सासिने बरवी। वाचावल्ली॥ १४॥**

**ठाव न पवतां जयाचा। मनेंसी मुरडली वाचा। तो देवो होय शब्दाचा। चमत्कारु॥ १५॥**
**जें ज्ञानासि न चोजवे। ध्यानासिही जें नागवें। तें अगोचर फावे। गोठीमाजीं॥ १६॥**
**येवढें एक सौभग। वळघे वाचेचें आंग। श्रीगुरुपदपद्मपराग। लाहे जैं कां॥ १७॥**

**अर्थ**—श्रीगुरुच्या कृपेने मुखातून निघणारे शब्द इतके आल्हादकारक व रसाळ असतात की त्याच्यावरून पौर्णिमेच्या पूर्ण चंद्राच्या चळथी ओवाळून टाकाव्या॥ ११॥ ज्याप्रमाणे पूर्व दिशेला सूर्य उगवून जगाला प्रकाशाचे साम्राज्य देतो, त्याप्रमाणे त्याची वाणी श्रोत्यांना ब्रह्मज्ञानाची दिवाळी (रेलचेल) करते॥ १२॥ श्रीगुरुच्या सेवेने प्राप्त होणाऱ्या शब्दाच्या सद्भाग्याची अनाहत दशनाद बरोबरी करू शकत नाहीत व मोक्षस्थितिहि तशी शोभत नाही॥ १३॥ श्रवणसुखाच्या मांडवात सर्व जग वसंत ऋतूची शोभा भोगील अशी त्याची वाणीरूप वेली उत्तम रीतीने बहरते॥ १४॥ ज्याच्या स्वरूपाला प्राप्त न होताच मनासह वाणी परत फिरते, असा तो परमात्मा त्याच्या शब्दाचा चमत्कार होतो-म्हणजे तो त्याच्या शब्दानेच अपरोक्ष होतो॥ १५॥ जे ज्ञानालाहि कळत नाही व ध्यानानेहि आकलन होत नाही असे ते इंद्रियातीत परब्रह्म त्याच्या नुसत्या बोलण्यात प्राप्त होते॥ १६॥ श्रीगुरुचरणकमलाचे ठिकाणी जेव्हा एकनिष्ठ प्रेम जडते तेव्हाच वाणीच्या ठिकाणी एवढे एक सौभाग्य प्राप्त होते॥ १७॥

**तरी बहु बोलूं काई। आजि तें आन ठायीं। मातेवाचूनि नाहीं। ज्ञानदेवो म्हणे॥ १८॥**
**जे तान्हेनि मियां अपत्यें। आणि माझे गुरु एकलौते। म्हणोनि कृपेसि एकहातें। जालें तिये॥ १९॥**
**पाहा पां भरोवरी आघवी। मेघ चातकांसी रिचवी। मजलागीं गोसावीं। तैसें केलें॥ २०॥**
**म्हणोनि रिकामें तोंड। करूं गेलें बडबड। कीं गीता ऐसें गोड। आतुडलें॥ २१॥**
**होय अदृष्ट आपैतें। तैं वाळूचि रत्नें परते। उजू आयुष्य तैं मारिते। लोभु करी॥ २२॥**
**आधणीं घातलिया हरळ। होती अमृताचे तांदुळ। जरी भुकेची राखे वेळ। श्रीजगन्नाथु॥ २३॥**
**तयापरी श्रीगुरु। करिती जैं अंगीकारु। तैं होऊनि ठाके संसारु। मोक्षमय आघवा॥ २४॥**

**अर्थ**—श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात की, आता फार काय बोलू! हे आतापर्यंत वर्णन केलेले वाणीचे सद्भाग्य प्रस्तुत माझ्यावांचून दुसऱ्याला प्राप्त झाले नाही॥ १८॥ कारण मी श्रीगुरुचे एकुलते एक तान्हे लेकरू असल्यामुळे त्यांच्या कृपेला एकतंत्री (सर्वस्वी) मीच (पात्र) झालो आहे॥ १९॥ हे पाहा! ज्याप्रमाणे मेघ आपला संपूर्ण पाण्याचा साठा केवळ चातक पक्ष्याकरिता रिचवितात त्याप्रमाणे श्रीगुरुनी माझ्यावरच आपल्या पूर्ण कृपेचा वर्षाव केला आहे.॥ २०॥ म्हणूनच माझे रिकामे-म्हणजे शास्त्राध्ययनरहित-तोंड बडबड करीत असता त्यातून गीतेचा गोड मथितार्थ व्यक्त झाला॥ २१॥ जर दैव अनुकूल असेल तर वाळूच रत्नरूप होते किंवा आयुष्य असले तर प्राण घेऊ पाहणाऱ्यालाहि दया उत्पन्न होते॥ २२॥ जर भगवान मनुष्याच्या भुकेच्या वेळेची काळजी वाहील तर, आधणाच्या पाण्यांत खडे टाकले असता देखील त्याचा अमृतासारखा स्वादिष्ट व मधुर भात होतो॥ २३॥ त्याप्रमाणे श्रीगुरुंनी आपला म्हणून मनुष्याचा अंगीकार केला असता त्याचा संपूर्ण संसारच मोक्षस्वरूप होऊन जातो॥ २४॥

**गूढार्थदीपिका**—श्रीगुरुनी अंगीकार करून ब्रह्मबोध केला असता नामरूपाचे ठिकाणची जगत्स्वरूप अविद्याभ्रांति नाहीशी होऊन एका शुद्ध परब्रह्माचाच हा सर्व नामरूपात्मक विलास होय, असे कळून येते व संपूर्ण दुःखाची निवृत्ति होऊन परमानंद प्राप्ति होते. संपूर्ण दुःखनिवृत्ति व परमानंद प्राप्ति यालाच वेदान्तात मोक्ष म्हणतात, अशा रीतीने सर्व नामरूपात्मक संसार मोक्षमय होतो.

**पहा पां काई श्रीनारायणें। तया पांडवांचें उणें। कीजेचि ना पुराणें। विश्ववंद्यें॥ २५॥**
**तैसें श्रीनिवृत्तिराजें। अज्ञानपण हें माझें। आणिलें वोजे। ज्ञानाचिया॥ २६॥**
**परि हें असो आतां। प्रेम रुळतसे बोलतां। कें गुरुगौरव वर्णितां। उन्मेष असे॥ २७॥**
**आतां तेणेंचि पसायें। तुम्हां संताचें मी पाये। वोळगेन अभिप्रायें। श्रीगीतेचेनि॥ २८॥**

**अर्थ**—हे पाहा! विश्वाला वंद्य व पुराणपुरुष अशा भगवान श्रीकृष्णाने त्या पांडवांचे उणे पडले असता धावून

येऊन पूर्ण केले नाही काय ?॥ २५ ॥ त्याप्रमाणे श्रीगुरु निवृत्तिनाथ महाराजांनी माझे अज्ञानपण सहज ज्ञानपणाला आणले॥ २६ ॥ हे आता असो! बोलता बोलता प्रेम क्षीण होते; पण श्रीगुरुचे यथार्थ माहात्म्य वर्णन केले जाईल असे ज्ञान कोठे आहे ?॥ २७ ॥ आता श्रीगुरुच्या त्याच कृपाप्रसादाने गीतेतील अभिप्राय सांगून तुम्हा संतांच्या चरणाची सेवा करीन॥ २८ ॥

**तरी तोचि प्रस्तुतीं। चौदाविया अध्यायाच्या अंतीं। निर्णयो कैवल्यपती। ऐसा केला॥ २९ ॥**
**जें ज्ञान जयाच्या हातीं। तोचि समर्थु मुक्ती। जैसा शतमख संपत्ती। स्वर्गीचिये॥ ३० ॥**
**कां शत एक जन्मां। जो जन्मोनि ब्रह्मकर्मा। करी तोचि ब्रह्मा। आनु नोहे॥ ३१ ॥**
**ना तरी सूर्याचा प्रकाशु। लाहे जेवीं डोळसु। तेवीं ज्ञानेंचि सौरसु। मोक्षाचा तो॥ ३२ ॥**
**तरी तया ज्ञानालागीं। कवणा पा योग्यता आंगीं। हें पहातां जगीं। देखिला एकु॥ ३३ ॥**
**जें पाताळींचेंही निधान। दावील कीर अंजन। परी होआवे लोचन। पायाळाचे॥ ३४ ॥**
**तैसें मोक्ष देईल ज्ञान। येथ कीर नाहीं आन। परी तेंचि थारे ऐसें मन। शुद्ध होआवें॥ ३५ ॥**
**तरी विरक्तीवांचूनि काहीं। ज्ञानासि तगणें नाहीं। हें विचारूनि ठाईं। ठेविलें देवें॥ ३६ ॥**

**अर्थ**—कैवल्याचा स्वामी भगवान श्रीकृष्णाने मागील चौदाव्या अध्यायाचे शेवटी असा निर्णय केला की॥ २९ ॥ ज्याप्रमाणे शंभर यज्ञ करणाराच स्वर्गाधिपति इंद्र होतो, त्याप्रमाणे ज्याला आत्मज्ञान प्राप्त झाले तोच मुक्त होऊ शकतो॥ ३० ॥ किंवा ज्याप्रमाणे एकशेएक जन्मपर्यंत सारखा ब्राह्मणकुळात जन्म होऊन जो ब्रह्मकर्म करीत राहतो तोच ब्रह्मदेव होतो. दुसरा कोणी होत नाही॥ ३१ ॥ किंवा ज्याप्रमाणे डोळस माणसालाच सूर्याचा प्रकाश उपयोगी पडतो, त्याप्रमाणे ज्ञानानेच मोक्षाची योग्यता प्राप्त होते॥ ३२ ॥ तरी ते ज्ञान प्राप्त करून घेण्याची किंवा बाणविण्याची योग्यता कोणाच्या ठिकाणी आहे याचा विचार करता एक आढळला॥ ३३ ॥ डोळ्यांना मांत्रिकाचे अंजन लाविले असता खोल भूमीत गुप्त असलेले धनहि निश्चित दिसू शकते; पण ते पायाळू पुरुषाच्या डोळ्याला लावायला पाहिजे॥ ३४ ॥ त्याप्रमाणे ज्ञान खरोखर मोक्ष देईल हे अन्यथा नाही, पण ते ज्ञान चित्तात दृढ ठसेल असे मन प्रथम शुद्ध व्हायला पाहिजे॥ ३५ ॥ म्हणून वैराग्यावांचून ज्ञान-म्हणजे ब्रह्मज्ञान-चित्तात दृढ ठसू शकत नाही, असे भगवंताने तेथेच सांगून ठेवले आहे.॥ ३६ ॥

**गूढार्थदीपिका—वैराग्य**-म्हणजे विषयांचा तिटकारा-जोपर्यंत उत्पन्न होत नाही तोपर्यंत चित्तात अखंड विषयाचेच प्रेम व ध्यान राहत असल्यामुळे कितीहि ब्रह्मविचार केला तरी तो चित्तात ठसत नाही; म्हणून ब्रह्मज्ञान दृढ होत नाही.

**आतां विरक्तीची कवण परी। जे येऊनि मनातें वरी। हेंही सर्वज्ञें श्रीहरी। देखिलें असे॥ ३७ ॥**
**जे विषें रांधिली रससोये। जैं जेवणारा ठाउवी होये। तैं तो ताटचि सांडूनि जाये। जयापरी॥ ३८ ॥**
**तैसी संसारा या समस्ता। जाणिजे जैं अनित्यता। तैं वैराग्य दवडितां। पाठीं लागे॥ ३९ ॥**
**आतां अनित्यत्व या कैसें। तेंचि वृक्षाकारमिषें। सांगिजत असे विश्वेशें। पंचदशीं॥ ४० ॥**
**उपडिलें कवतिकें। झाड येरी मोहरा ठाके। तें वेगें जैसें सुके। तैसें हें नोहे॥ ४१ ॥**
**याचि एकेपरी। रूपकाचिया कुसरी। सारीतसे वारी। संसाराची॥ ४२ ॥**
**करूनि संसार वावो। स्वरूपीं अहंतेचा ठावो। होआवया अध्यावो। पंधरावा हा॥ ४३ ॥**

**अर्थ**—आता हे वैराग्य अंत:करणात कोणत्या रीतीने ठसेल हेहि सर्वज्ञ अशा भगवंतांनी विचाराने ठरविले आहे॥ ३७ ॥ ज्याप्रमाणे स्वयंपाक विषाने तयार झाला असे जर जेवणाऱ्याला कळले तर, तो जसा ताट सोडून जातो॥ ३८ ॥ त्याप्रमाणे या सर्व संसाराची अनित्यता किंवा क्षणभंगुरता मनांत पक्की ठसली असता वैराग्य हाकलून लाविले तरी मागे लागते॥ ३९ ॥ आता हा संसार कसा क्षणभंगूर आहे हेच वृक्षाच्या रूपकाने पंधराव्या अध्यायात भगवान सांगतात॥ ४० ॥ एऱ्हवी जसे कोणतेहि झाड सहज उपटले असता त्याची मुळे वर येऊन आपल्या समोर

होतात व तो तात्काळ सुकू लागतो; पण हा संसारवृक्ष तसा नाही ॥ ४१ ॥ याच एका प्रकाराने व रूपकाच्या चातुर्याने संसाराची वारी संपते, असे प्रतिपादन करतात ॥ ४२ ॥ संसार मिथ्या ठरवून आत्मस्वरूपाचे ठिकाणी अहं स्थिर करण्याकरीता हा पंधरावा अध्याय सांगितला गेला आहे. ॥ ४३ ॥

**गूढार्थदीपिका**—'अहं' म्हणजे 'मी', हे स्फुरण आत्मस्वरूपाचे ठिकाणीच होत असते, पण जीव अज्ञानभ्रांतीने आत्मस्वरूप विसरून 'अहं' म्हणजे 'मी असे आपल्याला आत्मस्वरूपाहून निराळे समजतो व त्याला देहादि सर्व सत्य वाटत असल्यामुळे तो अहंभाव देहाचे ठिकाणी धारण करतो, आत्मविचाराने देहादि सर्व संसार मिथ्या ठरल्यावर अहंभाव सहजच आपल्या आत्मस्वरूपाचे ठिकाणी स्थिर होतो व जीवब्रह्माचे ऐक्य होऊन जीवाला 'मी ब्रह्म आहे' असा अनुभव येतो.

**आतां हेंचि आघवें। ग्रंथगर्भीचें चांगावें। उपलविजेल जीवें। आकर्णिजो॥ ४४॥**

**अर्थ**—आतां हाच सर्व गीताग्रंथात साठविला असलेला उत्तम अभिप्राय व्यक्त करतो, तो लक्ष देवून ऐका ॥ ४४ ॥

*श्रीभगवानुवाच*

**ऊर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम्। छन्दांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित्॥ १॥**

**अर्थ**—श्रीभगवान म्हणतात, अर्जुना! वर मुळे व खाली शाखा असलेल्या संसारवृक्षाला अविनाशी अश्वत्थवृक्ष म्हणतात. ऋग्वेदादि वेद हे त्याची पाने असून जो त्या अश्वत्थवृक्षाला जाणतो तोच वेद जाणणारा होय ॥ १ ॥

**तरी महानंदसमुद्र। जो पूर्णपूर्णिमाचंद्र। तो द्वारकेचा नरेंद्र। ऐसें म्हणे॥ ४५॥**

**अर्थ**—जो परमानंदाचा सागर व पौर्णिमेचा पूर्ण चंद्र आहे तो द्वारकेचा राजा भगवान श्रीकृष्ण असे म्हणाला ॥ ४५ ॥

**गूढार्थदीपिका**—येथे श्रीज्ञानेश्वर माऊलींनी भगवंताला महानंद समुद्राची उपमा देऊन भगवान श्रीकृष्णाचे सगुणसाकारस्वरूप भक्ताच्या निरुपम प्रेमवृत्तीमुळे अमर्याद ब्रह्मानंदाचा होणारा विवर्त आहे व ब्रह्म अफुट असल्यामुळे ब्रह्माची पूर्णता, अमर्यादता हे गुण विवर्ततहि कायम राहिली आहेत, असे सुचविले आहे. किंवा भगवान श्रीकृष्णसगुणस्वरुपाची प्रेमभक्ति करणाऱ्यांना अखंड अमर्याद ब्रह्मानंद प्राप्त होतो असे सुचविले आहे.

**अगा पैं पांडुकुमरा। येतां स्वरूपाचिया घरा। करीतसे आडवारा। विश्वाभासु जो॥ ४६॥**

**अर्थ**—अरे बाबा पांडुच्या मुला अर्जुना! आपण आपल्या आत्मस्वरूपाकडे यावयाला लागलो असता जो हा जगताचा भास प्रतिबंध करीत असतो. ॥ ४६ ॥

**गूढार्थदीपिका**—नामरूपात्मक जगताविषयी अनंत जन्मापासून दृढ झालेली सत्यबुद्धि मधून मधून स्फुरत राहून ती ब्रह्म विचाराने उत्पन्न होणाऱ्या "ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या" या बुद्धीला स्थिर होऊं देत नाही.

**तो हा जगडंबरु। नोहे येथ संसारु। हा जाणें महातरु। थांवला असे॥ ४७॥**
**परी येरां रुखांसारिखा। तळीं मूळें वरी शाखा। तैसा नोहे म्हणोनि लेखा। न ये कवणा॥ ४८॥**

**अर्थ**—हे अफाट जग, संसार नसून, बळावलेला एक महान् वृक्ष आहे असे जाण ॥ ४७ ॥ परंतु हा इतर वृक्षासारखा खाली मुळे व वर डाहाळ्या अशा प्रकारचा नसल्यामुळे कोणालाहि त्याचे मोजमाप करता येत नाही ॥ ४८ ॥

**गूढार्थदीपिका**—येथे माउलीने, या संसारवृक्षाला खाली मुळे व वर शाखा नाहीत म्हणजे तो केवळ काल्पनिक किंवा भ्रांतिजन्य आहे असेच सुचविले आहे.

**आगी कां कुऱ्हाडी। होय रिगावा जरी बुडीं। तरी हो कां भलतेवढी। वरिचील वाढी॥ ४९॥**
**जे तुटलिया मूळापाशीं। उलंडेल कां शाखांसी। परी तैशी गोठी कायशी। हा सोपा नव्हे॥ ५०॥**

**अर्थ**—वर कितीहि वाढ झाली असली तरी वृक्षाच्या मुळाशी अग्नि लावला किंवा कुऱ्हाडीचा घाव घातला

असता त्याची मुळे तुटून तो शाखांसहित उन्मळून पडतो; पण हा जगत्वृक्ष उन्मळून पडण्याजोगा तसा सोपा नाही. ॥ ४९-५० ॥

**गूढार्थदीपिका—** अनेक जन्मात भववृक्षाविषयी झालेल्या सत्यबुद्धीच्या अभ्यासजन्य संस्कारामुळे हा भववृक्ष काल्पनिक किंवा भ्रांतिजन्य आहे, हे बुद्धीत लवकर ठसत नाही, हेच "उलंडेल कां शाखांसी। परि तैसी गोठी कायसी" या चरणांनी सांगितले आहे.

**अर्जुना हें कवतिक। सांगतां असे अलौकिक। जे वाढी अधोमुख। रुखा यया॥ ५१ ॥**
**जैसा भानु उंची नेणो कें। रश्मिजाळ तळीं फांके। संसार हें कावरुखें। झाड तैसें॥ ५२ ॥**
**आणि आथी नाथी तितुकें। रुंधलें असें येणेंचि एकें। कल्पांतींचेनि उदकें। व्योम जैसें॥ ५३ ॥**
**कां रवीच्या अस्तमानीं। आंधारेनि कोंदे रजनी। तैसा हाचि गगनीं। मांडला असे॥ ५४ ॥**
**यया फळ ना चुंबितां। फूल ना तुरंबितां। जें कांहीं पांडुसुता। तें रुखुचि हा॥ ५५ ॥**

अर्थ—अर्जुना! या संसारवृक्षाचे असे अलौकिक आश्चर्य आहे की त्याची वाढ खाली आहे ॥ ५१ ॥ ज्याप्रमाणे सूर्य किती उंच आहे हे जाणता येत नाही, तरीपण त्याची किरणे पृथ्वीपर्यंत येतात, त्याप्रमाणे हा संसारवृक्ष किती उंच आहे हे समजत नाही, पण खाली वाढलेला दिसतो, असा चमत्कारिक आहे ॥ ५२ ॥ ज्याप्रमाणे कल्पाचे शेवटी सर्व आकाश पाण्याने भरून जावे, त्याप्रमाणे जेवढे काही "आहे-नाही" असे म्हणतो तेवढे सर्व या एकानेच व्यापिले आहे ॥ ५३ ॥ किंवा ज्याप्रमाणे सूर्य अस्तास गेला म्हणजे सर्वत्र अंधारमय रात्र होते, त्याप्रमाणे हा आकाशाच्या पोकळीत पसरला आहे ॥ ५४ ॥ या संसारवृक्षाचे फळ खावे तर याला फळच येत नाही. त्याच्या फुलाचा वास घ्यावा तर याला फूलच लागत नाही. जे काही आहे अर्जुना! सर्व तो वृक्षच आहे ॥ ५५ ॥

**हा उर्ध्वमूळ आहे। परी उन्मूळिला नोहे। येणेंचि हा होये । शाड्वळू गा॥ ५६ ॥**
**आणि उर्ध्वमूळ ऐसें। निगदिलें कीर असे। परी अधींही असोसें। मूळें यया॥ ५७ ॥**
**प्रबळला चौमेरीं। पिंपळा कां वडाचिया परी। जे पारंबियांमाझारीं। डाहाळिया असती॥ ५८ ॥**
**तेवींचि गा धनंजया। संसारतरु यया। अधींचि आथी खांदिया। हेंही नाहीं॥ ५९ ॥**
**तरी उर्ध्वाहीकडे। शाखांचे मांदोडे। दिसताति अपाडें। सासिन्नले॥ ६० ॥**
**जालें गगनचि पालवीये। कां वारा मांडला रुखाचेनि आयें। नाना अवस्थात्रयें। उदय केला असे॥ ६१ ॥**
**ऐसा हा एकु। विश्वाकार विटंकु। उदयला जाण रुखु। ऊर्ध्वमूळु॥ ६२ ॥**

**अर्थ—** याची मुळे वर आहेत खरी, पण तो उपटून पडलेला नव्हे. म्हणूनच अर्जुना! हा सदा हिरवागार असतो॥ ५६ ॥ याला वर मुळे आहेत असे जरी खरोखर सांगितले आहे, तरी खालीहि याला असंख्य मुळे आहेत॥ ५७ ॥ पिंपळ किंवा वडाच्या वृक्षाप्रमाणे हा चहूकडे पसरला असून त्याच्या पारंब्यामध्येहि डाहाळ्या आहेत॥ ५८ ॥ अर्जुना! त्याचप्रमाणे या संसार वृक्षाला केवळ खालीच खांद्या आहेत, असेहि नाही॥ ५९ ॥ तर वरहि शाखांचे अपार समुदाय पसरलेले दिसतात॥ ६० ॥ हा संसारवृक्ष म्हणजे जणुकाय आकाशालाच पाने फुटली किंवा वाराच संसारवृक्षाच्या आकाराने पसरला किंवा जागृति, स्वप्न, सुषुप्ति ह्या शब्दरूपाने असलेल्या तिन्ही अवस्था प्रत्यक्ष व्यक्त झाल्या॥ ६१ ॥ याप्रमाणे वर मुळे असलेला एक विश्वाकार उंच व धनदाट वृक्ष उदयास आला आहे, असे समज. ॥ ६२ ॥

**आतां ऊर्ध्व या कवण। येथें मूळ तें किं लक्षण। कां अधोमुखपण। शाखा कैसिया॥ ६३ ॥**
**अथवा द्रुमा यया। अधीं जिया मुळिया। तिया कोण कैसिया। ऊर्ध्व शाखा॥ ६४ ॥**
**आणि अश्वत्थु हा ऐसी। प्रसिद्धि कायसी। आत्मविदविलासीं। निर्णय केला॥ ६५ ॥**
**हें आघवेंचि बरवें। तुझिये प्रतीतीसि फावे। तैसेनि सांगों सोलिवें। विन्यासें गा॥ ६६ ॥**
**परी ऐकें गा सुभगा। हा प्रसंगु असे तुजचि- जोगा। कानचि करीं हो सर्वांगा। हियें आथिलिया॥ ६७ ॥**

**ऐसें प्रेमरसें सुरफुरें। बोलिलें जंव यादववीरें। तंव अवधान अर्जुनाकारें। मूर्त जालें॥ ६८॥**
**देव निरूपिती तें थेंकुलें। येवढें श्रोतेपण फांकलें। जैसें आकाशा खेंव पसरिलें। दाहीं दिशीं॥ ६९॥**
**श्रीकृष्णोक्तिसागरा। हा अगस्तीचि दुसरा। म्हणौनि घोंटु भरों पाहे एकसरा। अवधेयाचा॥ ७०॥**
**ऐसी सोय सांडूनि खवळिली। आवडी अर्जुनीं देवें देखिली। तेथ जालेनि सुखें केली। कुरवंडी तया॥ ७१॥**
**मग म्हणे धनंजया। तें ऊर्ध्व गा तरू यया। येणें रुखेंचि कां जया। ऊर्ध्वता गमे॥ ७२॥**

**अर्थ**—आता या संसारवृक्षाचे ऊर्ध्व काय? त्याच्या मूळाचे लक्षण काय? किंवा यांच्या शाखा खाली कशा गेल्या आहेत॥ ६३॥ अथवा या संसारवृक्षाच्या खाली गेलेली जी मुळे आहेत ती कोणती व कशी? व वर गेलेल्या शाखा कोणत्या आणि कशा आहेत॥ ६४॥ आणि या संसारवृक्षाला जे अश्वत्थ म्हणण्यात येते तो निर्णय ज्ञानी पुरुषांनी कशासाठी केला!॥ ६५॥ हे सर्व तुझ्या बुद्धीला उत्तम आकलन होईल अशा स्पष्ट रीतीने, अर्जुना! तुला सांगतो॥ ६६॥ हे भाग्यवान अर्जुना! या विषयीचे निरूपण तुलाच सांगण्याजोगे आहे; म्हणून सर्वांगाचे ठिकाणी कान करून पूर्ण एकाग्र अंत:करणाने ऐक॥ ६७॥ याप्रमाणे यादवांमध्ये पराक्रमी अशा भगवान श्रीकृष्णाने अत्यंत प्रेमाने म्हटले असता अवधानच अर्जुनाचे रूपाने मूर्तिमंत प्रगट झाले॥ ६८॥ ज्याप्रमाणे दहाहि दिशांनी आकाशाला कवटाळिले आहे, त्याप्रमाणे देवाचे संपूर्ण निरूपण हृदयाच्या मानाने छोटे होऊन हृदयात सामाविले जाईल एवढे अर्जुनाचे श्रोतेपण विस्तृत झाले॥ ६९॥ भगवान श्रीकृष्णाच्या निरूपणरूपी सागरास अर्जुन हा दुसरा अगस्तिच प्राप्त झाला; म्हणूनच तो भगवंताच्या संपूर्ण निरूपणाचा एकच घोट करू पाहत होता॥ ७०॥ याप्रमाणे अर्जुनाच्या अंत:करणात निरूपण ऐकण्याची आवड अमर्याद वाढली आहे, हे पाहून भगवान श्रीकृष्णाला जो आनंद झाला, तो अर्जुनावरून ओवाळून टाकला॥ ७१॥ मग भगवान म्हणाले, अर्जुना! ते (ब्रह्म) या वृक्षाचे वर आहे. या वृक्षामुळेच त्याला ऊर्ध्वपणा येतो॥ ७२॥

**गूढार्थदीपिका**—परब्रह्म हे संपूर्ण आकाशासह असलेल्या असार संसारवृक्षाच्या पलीकडे असल्यामुळे संसारवृक्षाच्या अपेक्षेनेच त्याला ऊर्ध्व असे म्हटले आहे, कठोपनिषद् वल्ली ६ श्रुति १-यातहि या संसारवृक्षाचे असेच वर्णन आले आहे.

**एऱ्हवीं मध्य ऊर्ध्व अध। हे नाहीं जेथ भेद। अद्वयासीं एकवद। जया ठायीं॥ ७३॥**
**जो नाइकिजतां नादु। जो असौरभ्य मकरंदु। जो आंगाथिला आनंदु। सुरतेंविण॥ ७४॥**
**जया जें आऱ्हां परौतें। जया जें पुढें माघौतें। दृष्येविण देखते। अदृश्य जें॥ ७५॥**
**उपाधीचा दुसरा। घालितां वोपसरा। नामरूपाचा संसारा। होय जयातें॥ ७६॥**

**अर्थ**—एऱ्हवी ते परब्रह्म अद्वैतरूपाने व्यापक असल्यामुळे त्याचे ठिकाणी मध्ये, वर, खाली असा मुळी भेदच नाही॥ ७३॥ जो न ऐकता येणारा अव्यक्त नाद होय, वास न घेता येणारा अव्यक्त सुवास होय व रतिक्रीडेवाचून पुष्ट असलेला आनंद होय॥ ७४॥ ती ब्रह्मवस्तु ज्या या संसारवृक्षाच्या अलीकडे, पलीकडे, मागे असून जी दृश्यरहित अशी केवळ प्रकाशरूप व अद्वितीय आहे॥ ७५॥ परब्रह्माचे ठिकाणी नामरूपाच्या भिन्न वस्तुत्वाचा मुलामा दिला असता ती नामरूपे उपाधि होऊन संसाररूप भासतात॥ ७६॥

**गूढार्थदीपिका**—आपला धर्म दुसऱ्या वस्तूचे ठिकाणी भासविण्याला किंवा वस्तूचे ठिकाणी मूळात नसलेला धर्म भासविण्याला कारण होणाऱ्या पदार्थाला उपाधि म्हणतात.

अफुट, अद्वैत, परब्रह्माचे ठिकाणी अनेक नामरूपामुळे अनेक प्रकारच्या संसाराचा केवळ भास होतो, संसाराचे खरोखर अस्तित्व नाही.

**ज्ञातृज्ञेयाविहीन। नुसधेंचि जें ज्ञान। सुखा भरलें गगन। गाळींव जें॥ ७७॥**
**जें कार्य ना कारण। जया दुजें ना एकपण। आपणयां जें जाण। आपणचि॥ ७८॥**
**ऐसें वस्तु जें साचें। तें ऊर्ध्व गा यया तरूचें। तेथ आर घेणें मूळाचें। तें ऐसें असे॥ ७९॥**

**तरी माया ऐसी ख्याती। नसतीच यया आथी। कां वांझेची संतती। वानणें जैसे॥ ८०॥**
**तैंसी सत् ना असत् होये। जे विचाराचें नाम न साहे। ऐसे यापरीची आहे। अनादि म्हणती॥ ८१॥**
**जे नाना तत्वांची मांदुस। जे जगदभ्राचें आकाश। जे आकारजाताचें दुस। घडी केलें॥ ८२॥**
**जे भवद्रुमबीजिका। जे प्रपंचचित्रभूमिका। विपरीतज्ञानदीपिका। सांचली जे॥ ८३॥**
**ते माया वस्तूचां ठायीं। असे जैसेनि नाहीं। मग वस्तुप्रभावचि पाही। प्रगट होय॥ ८४॥**

**अर्थ**—जी परब्रह्मवस्तु ज्ञातृज्ञेयविरहित केवळ ज्ञानरूप असून जे सुखाने भरलेले गाळीव आकाशच होय॥ ७७॥ जी कशापासून उत्पन्न होत नसून कशालाही उत्पन्न करीत नाही. जिच्या बरोबरीची दुसरी वस्तु नाही व दुसऱ्या वस्तूच्या अपेक्षेने जिला एकपणहि नाही. जी (ब्रह्मवस्तु) आपल्या ठिकाणी आपणच अशी द्वैताद्वैतरहित आहे, असे जाण॥ ७८॥ अशी जी खरी (ब्रह्म) वस्तु ती या वृक्षाचे ऊर्ध्व होय. या वस्तुच्या ठिकाणी संसारवृक्षाच्या मुळाचे अंकुर घेणे अशा प्रकारचे आहे॥ ७९॥ ज्याप्रमाणे वंध्येच्या नसलेल्या संततीचे वर्णन करावे त्याप्रमाणे व्यर्थच जिचे 'माया' असे नसतेच नांव प्रसिद्ध आहे॥ ८०॥ जी खरी किंवा खोटी म्हणता येत नाही, जी विचाराचे नाव सहन करीत नाही-म्हणजे जी विचाराने सिद्ध होत नाही. अशा प्रकारची ती आहे व ती अनादि आहे असेहि म्हणतात॥ ८१॥ जी अनेक पदार्थांनी भरलेली पेटीच होय. जी जगद्रूप अभ्र येण्याचे आकाश होय. जी अनेक प्रकारच्या आकाराच्या वस्त्राची केलेली घडी होय॥ ८२॥ अशी जी संसाररूपी वृक्षाचे बीज असून प्रपंचरूप नाना चित्रे काढण्याची भूमि होय. किंवा खरोखर जी विपरित ज्ञानाची अथवा भलतेच दाखविणारी प्रज्वलीत दिवटी आहे॥ ८३॥ ती माया, परब्रह्मवस्तूचे ठिकाणी 'नाही' सारखीच आहे. वास्तविक हे सर्व परब्रह्मवस्तूचेच सामर्थ्य प्रगट झाले आहे, असे समज॥ ८४॥

**गूढार्थदीपिका**—श्रीज्ञानेश्वर महाराजांनी अमृतानुभव प्रकरण सात-ओव्या ६४-७७ पर्यंत अज्ञानाचे अथवा मायेचे जे स्वरूप वर्णन केले आहे तसेच मायेचे स्वरूप येथेहि त्यानी सांगितले आहे.

या ओव्यांचा आशय असा की माया किंवा अज्ञान वस्तुत: नसून ती जीवाची नुसती कल्पना आहे; म्हणून जे काही नामरूपात्मक भासते ते सच्चिदानंद परब्रह्माहून भिन्न-जड-विनाशी जगत् नसून सच्चिदानंद परब्रह्मच आपल्या ऐश्वर्यशक्तीने प्रगट झाले आहे.

दिसणारे दृश्य दृष्ट्याहून निराळे नसून तो द्रष्टाच आहे असे माउलीने "जे दृश्य द्रष्टाचि आहे" (अमृ० प्र० ७-२१३) इत्यादि ओव्यांनी अमृतानुभवातहि सांगितले आहे.

**जेव्हां आपणया आली नीद। करी आपणपें जेवीं मुग्ध। कां काजळी आणि मंद। प्रभा दीपीं॥ ८५॥**
**स्वप्नीं प्रियापुढें तरुणांगी। निदेली चेवऊनि वेगीं। आलिंगिलेनिवीण आलिंगी। सकाम करी॥ ८६॥**
**तैसी स्वरूपीं जाली माया। आणि स्वरूप नेणणें जे धनंजया। तेंचि तरु यया। मूळ पहिलें॥ ८७॥**

**अर्थ**—जेव्हा आपल्याला झोप येते तेव्हा ती आपल्याला जशी विचारहीन करते किंवा दिव्यापासून झालेल्या काजळाने दिव्यांचा प्रकाश मंद होतो॥ ८५॥ किंवा ज्याप्रमाणे मनुष्य आपली तरुण स्त्री आपल्याजवळ निजली आहे असे स्वप्नात दिसताच ती जशी आलिंगन न देताच आलिंगन देत आहे असे भासविते व त्याला तात्काळ सकाम करून जागे करते॥ ८६॥ त्याप्रमाणे, अर्जुना! परब्रह्मस्वरूपाचे ठिकाणी माया आहे आणि जीवाने मी आपले आत्मस्वरूप न जाणणे हेच संसाररूपी अश्वत्थवृक्षाचे मूळ धरणे होय॥ ८७॥

**गूढार्थदीपिका—स्वरूप नेणणे**-म्हणजे 'मी ब्रह्म आहे' असे आपले स्वरूप न जाणणे किंवा 'सच्चिदानंद ब्रह्म मीच आहे' असे न जाणणे.

जीव स्वत:मूळचा ब्रह्मस्वरूप असताना तो मी ब्रह्म जाणत नाही म्हणतो या त्याच्या भ्रांतीला माया किंवा अज्ञान म्हणतात. या मायेचा किंवा भ्रांतीचा जीव अभिमान धरतो, पण ती परमेश्वराच्या सत्तेवर भासते.

**वस्तूसी आपुला जो अबोधु। तो ऊर्ध्वीं आठुळैजे कंदु। वेदांतींही हाचि प्रसिद्धु। बीजभावो॥ ८८॥**

**घनअज्ञानसुषुप्ती। तो बीजांकुरभावो म्हणती। येर स्वप्न हन जागृती। हा फळभावो तियेचा॥ ८९॥**

**अर्थ**—आपल्याला आत्मवस्तूचा बोध (ज्ञान) नाही असे जे जीवाला वाटते तोच संसारवृक्षाचा वर बांधला गेलेला कंद होय, असे वेदान्तात प्रसिद्ध आहे. त्याला संसारवृक्षाचा बीजभावहि म्हणतात॥ ८८॥ असे गाढ अज्ञान ज्या सुषुप्ति अवस्थेत असते त्या अवस्थेला बीजभाव किंवा अंकुरभाव म्हणतात. जागृति व स्वप्न हा तिचा फलरूप भाव होय॥ ८९॥

**गूढार्थदीपिका—बीजभाव**-म्हणजे संसारवृक्षाची अव्यक्त दशा.

**फलभाव**—म्हणजे संसारवृक्षाची नामरूपात्मक व्यक्त दशा.

**ऐसी यया वेदांतीं। निरूपण भाषा प्रतीती। परी तें असो प्रस्तुतीं। अज्ञान मूळ॥ ९०॥**
**तें ऊर्ध्व आत्मा निर्मळें। अधोर्ध्व सूचिती मूळें। बळिया बांधोनि आळें। मायायोगाचें॥ ९१॥**
**मग आधिलीं देहांतरें। उठती जियें अपारें। तें चौपासि घेऊनि आगारें। खोलावती॥ ९२॥**
**ऐसें भवद्रुमाचें मूळ। हें ऊर्ध्वी करी बळ। मग आग्रियांचें बेंबळ। अधीं दावी॥ ९३॥**
**तेथ चिद्वृत्ति पहिलें। महत्तत्त्व उमललें। तें पान वाल्हेंदुल्हें। एक निघे॥ ९४॥**
**मग सत्त्वरजतमात्मक। त्रिविध अहंकार जो एक। तो तिवणा अधोमुख। डिरू फुटे॥ ९५॥**
**तो बुध्दीची घेऊनि आगारी। भेदाची वृद्धि करी। तेथें मनाचें डाळ धरी। साजेपणें॥ ९६॥**

**अर्थ**—अशा प्रकाराने वेदान्तात भाषा वापरलेली दिसते असो. तूर्त एवढेच सांगावयचे की या संसारवृक्षाचे मूळ अज्ञान आहे॥ ९०॥ शुद्ध आत्मस्वरूप हे संसारवृक्षाचे ऊर्ध्व असून तेथे मायेचा संबंध हे बळकट आळे बांधले जाते असे सांगून संसारवृक्षाची मूळे खाली वर आहेत असे सूचविले आहे॥ ९१॥ मग खालचे जे नाना प्रकारचे असंख्य देह उत्पन्न होतात, ते चार प्रकारचे अंकुर घेऊन आणखी खोल जातात॥ ९२॥ असे हे संसारवृक्षाचे मूळ वर बलवान होऊन त्याला खाली अंकुराचे झुपकेच्या झुपके येतात॥ ९३॥ तेथे चैतन्यवृत्तिरूप बुद्धि हे जे पहिले तत्त्व प्रगट झाले ते या संसारवृक्षाला अत्यंत कोवळे पान फुटते॥ ९४॥ त्यानंतर त्याला सात्विक, राजस, तामस अशा तीन प्रकारच्या अहंकाराचा खाली वाढणारा तीन पानी कोंभ येतो॥ ९५॥ तो (अहंकार) बुद्धिरूपी शाखेचा आश्रय करून भेदाची वाढ करतो व तेथे मनाची डाहाळी ताजेपण धारण करते॥ ९६॥

**गूढार्थदीपिका**—मन नवी नवी कल्पना करीत असल्यामुळे मनाच्या डाहाळीच्या साजेपणाची उपमा दिली आहे.

**ऐसा मूळाचिया गाढिका। विकल्परस कोंवळिका। चित्तचतुष्टय डाहाळिका। कोंभैजे तो॥ ९७॥**

**अर्थ**—अशा प्रकारे मूळाच्या सुदृढतेमुळे व विकल्परूपी कोवळ्या रसाच्या पुष्टीमुळे त्याला चित्तचतुष्टयरूपी डाहाळीचा कोंभ निघतो॥ ९७॥

**गूढार्थदीपिका—चित्तचतुष्टय**-मन, बुद्धि, चित्त व अहंकार याला चित्तचतुष्टय म्हणतात.

**मग आकाश वायु द्योतक। आप पृथ्वी हे पांच फोंक। महाभूतांचे सारोक। सरळे होती॥ ९८॥**
**तैसीं श्रोत्रादि तन्मात्रें। तियें अंगवसां गर्भपत्रें। लुळलुळितें विचित्रें। उमळती गा॥ ९९॥**
**तेथ शब्दांकुर वरिपडी। श्रोत्रा वाढी देवढी। होता करित कांडीं। आकांक्षेचीं॥ १००॥**

**अर्थ**—मग आकाश, वायु, अग्नि, आप व पृथ्वी असे पंचमहाभूतांचे चांगले सरळ फाटे फुटतात॥ ९८॥ तसेच श्रोत्रादि तन्मात्रा (शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध) ही शेंड्यावरील न उमललेली कोवळी विचित्र पाने निघतात॥ ९९॥ तेथे शब्दरूपी अंकुराशी मिठी पडली असता श्रोत्रेंद्रियांची अधिक वाढ होऊन तिला आकांक्षेची कोंभे फुटतात॥ १००॥

**गूढार्थदीपिका**—कानाने वस्तूचे वर्णन ऐकून ती वस्तु प्राप्त व्हावी ही इच्छा बळावते असा अर्थ.

**अंगत्वचेचे वेलपल्लव। स्पर्शांकुरीं घेती धांव। तेथ बांबळ पडे अभिनव। विकारांचें॥ १०१॥**

**अर्थ**—जेव्हा अंगावरील त्वचेची वेलपालवी स्पर्शरूपी अंकूराकडे धाव घेते तेव्हा विकाराची विलक्षण वाढ होते॥ १०१ ॥

**गूढार्थदीपिका**—त्वचेशी स्पर्शविषयाचा संबंध झाला असता नाना प्रकारचे विकार वाढतात, असा अर्थ.

**पाठीं रूपपत्र पालोवेलीं। चक्षु लांब तें कांडें घाली। ते वेळीं व्यामोहता भली। पान्हेली जाय॥ १०२ ॥**

**अर्थ**—मग रूपपत्राची वाढ झाली असता चक्ष्वेंद्रियाला लांब पेरे निघतात तेव्हा बुद्धीत बरीच आसक्ति वाढते॥ १०२ ॥

**गूढार्थदीपिका—चक्षु लांब ते कांडे घाली**-म्हणजे दूर स्वर्गात असलेल्या व मरणानंतर प्राप्त होणाऱ्या अप्सरादिकांच्या रूपावर ते चक्ष्वेंद्रिय आसक्त होऊन धाव घेते.

**आणि रसाचे आंगवसे। वाढतां वेगें बहुवसें। जिव्हे आर्तीचीं असोसें। निघती बेंचें॥ १०३ ॥**
**तैसेंचि कोंभैलेनि गंधे। घ्राणाची डिरी थाव बांधे। तेथ तळु घे स्वानंदें। प्रलोभाचा॥ १०४ ॥**
**एवं महदहंबुद्धी। मनें महाभूतसमृध्दी। इये संसाराचिया अवधी। सासनिजे॥ १०५ ॥**
**किंबहुना इहीं आठें। आंगीं हा अधिक फांटे। परी शिंपीचि येवढें उमटे। रुपें जेवीं॥ १०६ ॥**
**कां समुद्राचेनि पैसारें। वरी तरंगता असारे। तैसें ब्रह्मचि होय वृक्षाकारें। अज्ञान मूळ॥ १०७ ॥**

**अर्थ**—रसविषयाची पाने वेगाने फार वाढली असता जिभेला नाना प्रकारचे रस चाखण्याच्या इच्छेची पुष्कळ पानात पाने फुटतात॥ १०३ ॥ तसेच कोंभरूप असलेल्या गंधविषयाने जेव्हा घ्राणेंद्रियरूप अंकुर बळावतो, तेव्हा घ्राणेंद्रिय आनंदाने लोभाच्या तळापर्यंत जाते-म्हणजे घ्राणेंद्रियाला सुगंधाची आसक्ति जडते॥ १०४ ॥ याप्रमाणे महत् म्हणजे अहंकार, बुद्धि, मन, पंचमहाभूते या आठ पदार्थांचा समुदाय संसाराच्या मर्यादेतच विस्तारला आहे॥ १०५ ॥ फार काय सांगावे! ज्याप्रमाणे जेवढी शिंप असते तेवढेच तिच्यावर रुपेहि भासते, त्याप्रमाणे परब्रह्मावर भासणारा हा संसारवृक्ष या आठ तत्त्वांच्या योगाने परब्रह्मासारखाच अमर्याद भासतो॥ १०६ ॥ किंवा जितका समुद्र पसरलेला असतो तितकेच तरंग पसरलेले दिसतात, त्याप्रमाणे अमर्याद परब्रह्मच अज्ञान मूळ घेऊन संसारवृक्षाकार भासते॥ १०७ ॥

**आतां याचाचि हा विस्तारु। हाचि यया पैसारु। जैसा आपणपें स्वप्नीं परिवारु। येकाकिया॥ १०८ ॥**
**परीं तें असो हें ऐसें। कावरें झाड उससे। यया महदादि आरवसें। अधोशाखा॥ १०९ ॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे एकच पुरुष स्वप्नात आपणच अनेक परिवाररूप होतो, त्याप्रमाणे परब्रह्माचाच हा विस्तार असून तेच आपण आपल्या ठिकाणी विस्तार पावले आहे॥ १०८ ॥ पण ते असो. अशा प्रकारचे हे भ्रांतिजन्य झाड वाढीस लागते. महादादि अंकुर ह्या याच्या खालच्या खांद्या होत॥ १०९ ॥

**आणि अश्वत्थु ऐसें ययातें। म्हणती ते जाणते। तेंही परिस हो येथें। सांगिजेल॥ ११० ॥**
**तरी अश्वत्थ म्हणिजे उखा। तोंवरि एकसारिखा। नाहीं निर्वाहो यया रुखा। प्रपंचरूपा॥ १११ ॥**
**जैसा न लोटतां क्षणु। मेघु होय नानावर्णु। कां विजु नसे संपूर्णु। निमेषभरी॥ ११२ ॥**
**कांपतया पद्मदळा। वरीलिया बैसका नाहीं जळा। कां चित्त जैसें व्याकुळा। माणुसांचे॥ ११३ ॥**
**तैसीचि ययाची स्थिती। नासत जाय क्षणक्षणाप्रती। म्हणौनि ययातें म्हणती। अश्वत्थ हा॥ ११४ ॥**

**अर्थ**—आणि या संसाराला अश्वत्थ असे जे जाणते पुरुष म्हणतात, त्याचेहि कारण सांगतो, ऐक॥ ११० ॥ तरी अश्वत्थ म्हणजे ज्या प्रपंचरूपवृक्षाची उद्यापर्यंत देखील एकसारखी स्थिति राहू शकत नाही असा॥ १११ ॥ ज्याप्रमाणे एक क्षण लोटत नाही तोच मेघाचे नाना रंग होतात किंवा बीज क्षणभरहि स्थिर राहत नाही॥ ११२ ॥ किंवा सारखे हालत असलेल्या कमळाच्या पाकळीवरील पाणी एका ठिकाणी स्थिर राहात नाही अथवा व्याकुळ माणसाचे चित्त क्षणभरहि स्थिर राहत नाही॥ ११३ ॥ त्याप्रमाणेच या प्रपंचवृक्षाची स्थिति आहे. तो क्षणोक्षणी नाश पावत जातो, म्हणून त्याला अश्वत्थ म्हणतात. ॥ ११४ ॥

**आणि अश्वत्थ येणें नांवें। पिंपळ म्हणती स्वभावें। परी तो अभिप्रावो नव्हे। श्रीहरीचा॥ ११५॥**
**एऱ्हवीं पिंपळ घडतां विखीं। मियां गति देखिली असे निकी। परी तें असो काय लौकिकीं। तुम्हां काज॥ ११६॥**
**म्हणौनि हा प्रस्तुतु। अलौकिक परिसा ग्रंथु। तरी क्षणिकत्वेंचि अश्वत्थु। बोलिजे हा॥ ११७॥**

**अर्थ**—आणि अश्वत्थ या नावाने पिपळाचा वृक्ष असा सहजच अर्थ घेतात; पण येथे भगवंताच्या म्हणण्याचा तसा अर्थ नाही॥ ११५॥ वास्तविक पाहता भगवंतानी संसारवृक्षाला हे जे नाव दिले आहे त्याच्या अर्थाची गति मी उत्तम रीतीने जाणली आहे. पण ते असो! तुम्हाला या लौकिक अर्थाचे काय करायचे आहे॥ ११६॥ म्हणून प्रस्तुतचा हा अलौकिक (आध्यात्मिक) गीता ग्रंथ ऐका आणि हा संसारवृक्ष क्षणिक असल्यामुळेच याला जाणते लोक अश्वत्थ म्हणतात॥ ११७॥

**आणिकही येक थोरु। यया अव्ययत्वाचा डगरु। आथी परी तो भीतरु। ऐसा आहे॥ ११८॥**
**जैसा मेघांचेनि तोंडें। सिंधु एके आंगें काढे। आणि नदी येरीकडे। भरितीचि असती॥ ११९॥**
**तेथ वोहटे ना चढे। ऐसा परिपूर्णुचि आवडे। परी ते फुली जंव नुघडे। मेघानदींची॥ १२०॥**
**ऐसें या रुखाचें होणेंजाणें। न तर्के होतेनि वहिलेपणें। म्हणौनि ययातें लोक म्हणे। अव्यय हा॥ १२१॥**
**एऱ्हवीं दानशीळ पुरुषु। वेंचकपणेंचि संचकु। तैसा व्ययेंही हा रुखु। अव्ययो गमे॥ १२२॥**
**जातां वेगें बहूवसें। न वचे कां भूमी रुतलें असे। रथाचें चक्र दिसे। जिया परी॥ १२३॥**
**तैसें काळातिक्रमें जे वाळे। ते भूतशाखा जेथ गळे। तेथ कोडीवरी उमाळे। उठती आणिक॥ १२४॥**
**परी येकी केधवां गेली। शाखा कोडी केधवां जाली। हें नेणवे जेवीं उमललीं। आषाढअभ्रें॥ १२५॥**

**अर्थ**—आणखी याच्यावर अविनाशी असा एक थोर आरोप आहे खरा; पण आंत तो हा असा आहे॥ ११८॥ ज्याप्रमाणे समुद्र एकीकडे मेघाच्या रूपाने आपल्यातून पाणी काढून घेतो तर दुसरीकडे नद्या भर घालीत असतात॥ ११९॥ म्हणून समुद्र कमी होत नाही किंवा भरला जात नाही. सदासर्वदा पूर्ण आहे, असा वाटतो. परंतु हे सर्व मेघ व नदी याचा संबंध बंद पडत नाही तोपर्यंतच असे वाटते॥ १२०॥ याप्रमाणे या संसारवृक्षाचे होणे-जाणे प्रवाहाप्रमाणे अगदी लागोपाठ होत असल्यामुळे लक्षात येत नाही; म्हणूनच लोक याला अव्यय म्हणतात॥ १२१॥ एऱ्हवी ज्याप्रमाणे दानशूर पुरुष दानाच्या द्वारा खर्च करण्याने संग्रहच करीत असतो त्याप्रमाणे लागोपाठ होणाऱ्या नाशामुळे हा संसारवृक्ष अविनाशी असा वाटतो॥ १२२॥ ज्याप्रमाणे फार वेगाने चालत असलेले रथाचे चक्र जात आहे असे वाटते॥ १२३॥ त्याप्रमाणे काळ लोटल्याबरोबर जो संसारवृक्षाच्या जीवशाखेची फांदी वाळून, गळून पडते तेथेच आणखी दुसऱ्या कोट्यावधी प्राणिरूप शाखांची उत्पत्ति होते॥ १२४॥ ज्याप्रमाणे वरचेवर अभ्रे येणाऱ्या आषाढ महिन्यात एक अभ्र केव्हा गेले व दुसरे केव्हा आले हे कळत नाही, त्याप्रमाणे एक फांदी केव्हा पडली व तेथेच असंख्य शाखा केव्हा उत्पन्न झाल्या हे लक्षात येत नाही॥ १२५॥

**महाकल्पाच्या शेवटीं। उदेलिया उन्मूळती सृष्टी। तैसेंचि आणिखीचें दांग उठी। सासिन्नलें॥ १२६॥**
**संहारवातें प्रचंडें। पडती प्रळयांतींचीं सालडें। तंव कल्पादीचीं जुंबाडें। पाल्हेजती॥ १२७॥**
**रिगे मन्वंतर मनुपुढें। वंशावरी वंशांचें मांडे। जैसी इक्षुवृद्धी कांडेंनकांडें। जिके जेवीं॥ १२८॥**
**कलियुगांतीं कोरडी। चहूं युगांचीं सालें सांडी। तंव कृतयुगाची पेली देव्हडी। पडे पुढती॥ १२९॥**
**वर्ततें वर्ष जाये। तें पुढिला मूळहारी होये। जैसा दिवसु जात कीं येत आहे। हें चोजवेना॥ १३०॥**
**जैशा वारियाचां झुळकां। सांदा ठाउवा नव्हे देखा। तैसिया उठती पडती शाखा। नेणों किती॥ १३१॥**
**एकी देहाची डिरी तुटे। तंव देहांकुरीं बहुवी फुटे। ऐसेनि भवतरु हा वाटे। अव्ययो ऐसा॥ १३२॥**

**अर्थ**—महाकल्पाच्या शेवटी प्रगट असलेल्या सृष्टी उन्मळून पडतात, त्याबरोबरच आणखी दुसऱ्या सृष्टीची पसरलेली अरण्ये उदयास येतात॥ १२६॥ प्रलयकालच्या संहारक वायुने महाप्रलयाच्या अंती संसारवृक्षाच्या साली पडतात तोच कल्पाच्या प्रारंभाची (नवीन सालीचे) झुपकेच्या झुपके उत्पन्न होतात॥ १२७॥ ज्याप्रमाणे उसाची वृद्धि

कांडाकांडांनी अधिक होत जाते, त्याप्रमाणे एका मन्वंतरानंतर दुसरा मनु व एका वंशानंतर दुसरी वंशावळी सुरू होते॥ १२८ ॥ कलियुग संपल्याबरोबर संसारवृक्ष चारी युगांची कवचे टाकून देतो व लगेच त्याला कृतयुगाची ओली साल दीडपट वाढीने प्राप्त होते॥ १२९ ॥ वर्तमान वर्षाचे संपणे हेच पुढील वर्षाचे मूळ होते, ज्याप्रमाणे दिवस संपला की नवीन आला हे कळत नाही॥ १३० ॥ ज्याप्रमाणे वाऱ्याच्या झुळुका सारख्या वाहत असल्यामुळे त्यांचा सांधा समजत नाही, त्याप्रमाणे या संसारवृक्षाच्या शाखा किती पडतात व किती उत्पन्न होतात हे सांगता येत नाही॥ १३१ ॥ या संसारवृक्षाची एक देहरूपी डाहाळी तुटते तोच त्या ठिकाणी दुसरे पुष्कळ देहरूपी अंकुर उत्पन्न होतात. ह्यामुळे हा संसारवृक्ष अव्यय आहे, असा वाटतो॥ १३२ ॥

**जैसें वाहतें पाणी जाय वेगें। तैसेंचि आणिक मिळे मागें। तेवीं असतचि असिजे जगें। मानिजे संत॥ १३३ ॥**
**कां लागोनि डोळा उघडे। तंव कोडीवरी घडे मोडे। तें नेणतया तरंग आवडे। नित्य ऐसा॥ १३४ ॥**
**वायसा एकें बुबुळें दोहीकडे। डोळा चाळितां अपाडें। दोन्हीं आथी ऐसा पडे। भ्रम जेवीं जगा॥ १३५ ॥**
**पैं भिंगोरी निधिये पडली। ते गमे भूमीसी जैसी जडली। ऐसा वेगातिशय भुली। हेतु होय॥ १३६ ॥**
**हें बहु असो झडिती। आंधारे भोवंडितां कोलती। ते दिसे जैसी आयती। चक्राकार॥ १३७ ॥**
**हा संसारवृक्ष तैसा। मोडत मांडत सहसा। न देखोनि लोक पिसा। अव्ययो मानी॥ १३८ ॥**
**परि ययाचा वेग देखे। जो हा क्षणिक ऐसा वोळखे। जाणे कोडिवेळां निमिखें। होत जात॥ १३९ ॥**
**नाहीं अज्ञानावांचूनि मूळ। ययाचें असिलेपण टवाळ। ऐसें झाड सिनसाळ। देखिलें जेणें॥ १४० ॥**
**तयातें गा पांडुसुता। मी सर्वज्ञही म्हणें जाणता। पैं वाग्ब्रह्मसिद्धांता। वंद्य तोचि॥ १४१ ॥**
**योगजाताचें जोडलें। तया एकासीचि उपयोगा गेलें। किंबहुना जियालें। ज्ञानही तेणें॥ १४२ ॥**
**हे असो बहु हे बोलणें। वानिजेल तो कवणें। जो भवरुख जाणे। उखि ऐसा॥ १४३ ॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे प्रवाहाचा एक लोट पुढे जातो तोच मागून दुसरा लोट येतो. ते एकामागून एक येणारे लोट निरनिराळे असले तरी पाण्याचा अखंड एक प्रवाह दिसतो, त्याप्रमाणे हा संसारवृक्ष क्षणोक्षणी नाश पावतो व उत्पन्न होतो तरी उत्पत्तिनाशाच्या वेगामुळे तो अखंड एकरूप आहे, असा वाटतो॥ १३३ ॥ डोळा लागून उघडतो तितक्या अवकाशात तरंगाच्या कोट्यावधी घडामोडी होतात; पण अज्ञानी पुरुषाला ती एकच लहरी आहे, असे वाटते॥ १३४ ॥ कावळ्याला एक बुबुळ असते व तेच बुबुळ तो दोन्ही डोळ्यात वेगाने फिरवितो; पण त्याला दोन डोळे आहेत असा भ्रम पाहणाऱ्यांना होतो॥ १३५ ॥ जमिनीवर वेगाने भोवरा फिरविला असता जसा तो जमिनीत स्थिर आहे असा वाटतो, त्याप्रमाणे अतिशय वेगच भ्रमाला कारण होतो॥ १३६ ॥ हा विषयविस्तार पुरे. पेटलेला टेंभा आंधारात अतिशय वेगाने फिरविला असता तो जसा सहजच चक्राकार दिसतो॥ १३७ ॥ त्याप्रमाणे हा संसारवृक्षहि वेगातिशयाने नाश पावत व उत्पन्न होत असल्यामुळे, ते न जाणणारे अज्ञानी लोक त्याला अव्यय मानतात॥ १३८ ॥ या वेगाकडे जो लक्ष देतो तो, हा संसारवृक्ष एका निमेषांत कोटीवेळा उत्पन्न होतो व नाश पावतो म्हणून क्षणिक आहे, असे जाणतो॥ १३९ ॥ या संसारवृक्षाचे अज्ञानावाचून दूसरे मूळ नाही, ज्याचे अस्तित्व खोटे आहे, असे झाड क्षणिक आहे, हे ज्यानी जाणले॥ १४० ॥ हे अर्जुना! तोच वेदान्तसिद्धान्ताला खरोखर जाणणारा व तोच पूज्य आहे, असे सर्वज्ञ असा मी म्हणतो॥ १४१ ॥ सर्व प्रकारच्या योगप्रक्रियेने प्राप्त होणारे फळ त्यालाच प्राप्त झाले. एवढेच नाही, तर त्याच्याच योगाने ज्ञान जिवंत राहते॥ १४२ ॥ हा पाल्हाळ पुरे. जो हा संसारवृक्ष खोटा आहे असे जाणतो त्याचे माहात्म्य कोण वर्णन करू शकेल?॥ १४३ ॥

**गूढार्थदीपिका**—या सर्व ओव्यातून श्रीज्ञानेश्वर माउलीनी जगताविषयी दृष्टिसृष्टिवाद मानला आहे. "यावत् दृष्टि तावत् सृष्टिः" जोपर्यंत पदार्थाची कल्पना आहे तोपर्यंत पदार्थ असतो व पदार्थ विसरला गेला की तो नाश पावतो, असा दृष्टिसृष्टिवादाचा सिद्धान्त आहे. पदार्थाच्या कल्पना क्षणोक्षणी बदलतात व पूर्वकल्पना विसरल्या जातात; म्हणूनच पदार्थ क्षणभंगुर मानले जातात. अर्थात् सर्व सृष्टि जीवाच्या कल्पनेने एकदम स्वप्नाप्रमाणे निर्माण

झाली असून ती कल्पनेच्या लयाबरोबर लय पावते असे येथे सांगितले आहे.

सृष्टीच्या उत्पत्तीचा व लयाचा क्रम हा मध्यम अधिकाऱ्यासाठी सांगितला असून सृष्टीची उत्पत्ति व लय स्वप्नाप्रमाणे युगपत् होतात हे श्रेष्ठ अधिकाऱ्याकरिता सांगितला आहे, असे वेदान्तशास्त्र म्हणते.

**अधश्चोर्ध्वं प्रसृतास्तस्य शाखा गुणप्रवृद्धा विषयप्रवालाः।**
**अधश्च मूलान्यनुसन्ततानि कर्मानुबन्धीनि मनुष्यलोके॥ २॥**

**अर्थ—**या संसारवृक्षाच्या फांद्या खाली वर पसरल्या आहेत व त्या सत्व, रज, तम या तीन गुणांनी वाढल्या आहेत. विषय हे त्याची पानरूपी अंकुरे होत. मनुष्यलोकात कर्मांना कारण होणारी (वासनारूपी) मुळे खाली पसरली आहेत॥ २॥

**मग ययाचि प्रपंचरूपा। अधोशाखिया पादपा। डाहाळिया जाती उमपा। ऊर्ध्वांही उजू॥ १४४॥**
**आणि अधीं फांकलीं डाळें। तियें होती मूळें। तयांही तळीं पघळे। वेल पालव॥ १४५॥**
**ऐसें जें आम्हीं। म्हणितलें उपक्रमीं। तेंही परिसें सुगमीं। बोलीं सांगों॥ १४६॥**
**तरी बद्धमूळ अज्ञानें। महदादिकीं सासनें। वेदांचीं थोर वनें। घेऊनियां॥ १४७॥**
**परि आधीं तंव स्वेदज। जरायुज उद्भिज अंडज। बुडौनि महाभुज। उठती चारी॥ १४८॥**
**यया एकैकाचेनि अणगटें। चौऱ्यांशीं लक्षधा फुटे। ते वेळीं जीवशाखीं फाटें। सैंघ चि होती॥ १४९॥**
**प्रसवत शाखा सरळिया। नाना सृष्टि डाहाळिया। आड फुटती माळिया। जातिचिया॥ १५०॥**
**स्त्री पुरुष नपुंसकें। हे व्यक्तिभेदांचे टके। आंदोळती आंगिकें। विकारभारें॥ १५१॥**
**जैसा वर्षाकाळ गगनीं। पाल्हेजे नवघनीं। तैसें आकारजात अज्ञानीं। वेलीं जाय॥ १५२॥**

**अर्थ—**खाली डाहाळ्या गेलेल्या या प्रपंचवृक्षाच्या असंख्य डाहाळ्या सरळ वरहि गेल्या आहेत॥ १४४॥ आणि खाली आलेल्या फांद्या मूळे होतात व त्यांना वेल, पाने फुटून त्या आणखी खाली जातात॥ १४५॥ असे जे आम्ही प्रारंभी म्हटले, ते का म्हटले, हे आता सोप्या भाषेत सांगतो. ते एक॥ १४६॥ दृढ झालेले अज्ञान व अहंकार, बुद्धि, मन, पंचमहाभूते ही उपकरणे यांच्या योगाने वेदांची थोर अरण्ये घेऊन स्वेदज, जारज, अंडज, उद्भिज असे हे चार फोक आधी बुडापासून उत्पन्न होतात॥ १४७-१४८॥ या एका फांदीच्या अंगावर चौऱ्यांशी लक्ष फांद्या फुटतात तेव्हा जीवशाखा असंख्य स्वरूपाची होते॥ १४९॥ अशा रीतीने सृष्टिरूप नाना डाहाळ्या सरळ वाढत असता त्या शाखेला मध्ये आडजातीच्या आडव्या फांद्या फुटतात॥ १५०॥ त्यातहि पुनः स्त्री, पुरुष, नपुंसक हे व्यक्तिभेदाचे प्रकार आंगच्या विकारभाराने एकमेकांवर आदळतात॥ १५१॥ ज्याप्रमाणे वर्षाकाळी आकाश नव्या नव्या मेघांनी व्यापिले जाते, त्याप्रमाणे असंख्य प्रकारचे आकार अज्ञानाने वाढू लागतात॥ १५२॥

**मग शाखांचेनि आंगभारें। लवोनि गुंफती परस्परें। गुणक्षोभाचे वारे। उदयजती॥ १५३॥**
**तेथ तेणें अचाटें। गुणांचेनि झडझडाटें। तिहीं ठायीं हा फांटे। ऊर्ध्वमूळ॥ १५४॥**

**अर्थ—**मग डाहाळ्या आंगच्या वजनाने वाकल्यामुळे परस्परात गुंततात व गुणक्षोभांचे वारे उत्पन्न होतात॥ १५३॥ तेव्हा गुणांच्या प्रबल क्षोभाने ज्याचे वर मूळ आहे असा हा संसारवृक्ष तीन ठिकाणी फाटतो॥ १५४॥

**ऐसा रजाचिया झुळुका। झडाडितां आगळिका। मनुष्यजाती शाखा। थोरावती॥ १५५॥**
**तिया ऊर्ध्वीं ना अधीं। माझारींचि कोंदाकोंदी। आड फुटती खांदी। चतुर्वर्णांच्या॥ १५६॥**
**तेथ विधिनिषेधीं सपल्लव। वेदवाक्यांचे अभिनव। पालव डोलती बरव। आपुलालियापरी॥ १५७॥**
**अर्थ काम पसरे। अग्रवनें घेती थारे। तेथ क्षणिकें पदांतरें। इहभोगांचीं॥ १५८॥**
**तेथ प्रवृत्तीचेनि वृद्धिलोभें। खांकरेजती शुभाशुभें। नानाकर्मांचे खांबे। नेणों किती॥ १५९॥**
**तेवींचि भोगक्षयें मागिलें। पडती देहांचीं बुडसळें। तंव पुढां वाढी पेले। नवेया देहांची॥ १६०॥**
**आणि शब्दादिक सुहावे। सहज रंगें हवावे। विषयपल्लव नवे। नित्य होती॥ १६१॥**

**ऐसे रजोवातें प्रचंडें। मनुष्यशाखांचे मांदोडे। वाढती तो एथ रूढे। मनुष्यलोक॥ १६२॥**

**अर्थ**—याप्रमाणे रजोगुणाच्या झुळुकामुळे तो अत्यंत वाढला असता मनुष्यजातिरूप डाहाळ्या बळावतात॥ १५५॥ त्या मनुष्यरूपी खांद्या वर किंवा खाली जात नसून तेथल्या तेथे मध्ये दाटू लागतात व त्यांना मध्ये ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र अशा चार वर्णाच्या खांद्या फुटतात॥ १५६॥ आपआपल्या वर्णानुसार वेदवचनाने लावून दिलेले विधिनिषेधरूप विचित्र पाने मनुष्यशाखेच्या ठिकाणी चांगल्या रीतीने शोभूत दिसतात॥ १५७॥ अर्थ (संपत्ति) व काम (विषयवासना) हे दोन पुरुषार्थ वाढले असता इहलोकातील क्षणिक विषयांच्या भोगाची निरनिराळी स्थानरूप पुढची पाने अंकुरित होतात॥ १५८॥ तेथे कर्म करण्याच्या प्रवृत्तीने वाढलेल्या लोभामुळे पुण्य-पाप उत्पन्न होऊन इष्ट, अनिष्ट, मिश्र अशा प्रकारच्या कर्माचे फाटे किती फुटतात हे समजत नाही॥ १५९॥ त्याचप्रमाणे प्रारब्ध भोगकर्म फळ देऊन संपले असता मागील देहाची खोडे पडतात तोच नवीन देह उत्पन्न होतात॥ १६०॥ आणि शोभिवंत अशा आपल्या रंगाने स्वभावत: चित्ताकर्षक असलेली शब्दादिक विषयरूपी नवी नवी पाने नित्य उत्पन्न होत जातात॥ १६१॥ याप्रमाणे रजोगुणी प्रचंड वायूने मनुष्यरूपी खांद्यांचे समुदाय जेथे वाढतात तो मनुष्यलोक होय॥ १६२॥

**गूढार्थदीपिका**—रजोगुण वाढला असता ज्यात कर्मप्रवृत्ति जास्त आहे, अशा मनुष्यलोकाची प्राप्ति होते.

**तैसाचि तो रजाचा वारा। नावेक धरी वोसरा। मग वाजों लागे घोरा। तमाचा तो॥ १६३॥**
**तेधवां याचि मनुष्यशाखा। नीच वासना अधीं देखा। पाल्हेजती डाहाळिका। कुकर्माचिया॥ १६४॥**
**अप्रवृत्तींचे खणुवाळे। फोक निघती सरळे। घेत पान पालव डाळें। प्रमादाचीं॥ १६५॥**
**बोलती निषेधनियमें। जिया ऋचा यजु:सामें। तो पाला तया घुमे। टकेयावरी॥ १६६॥**
**प्रतिपादिती अभिचार। आगम जे परमार। तेही पानीं घेती प्रसर। वासना वेली॥ १६७॥**
**तंव तंव होती थोराडें। अकर्माचीं तळबुडें। आणि जन्मशाखा पुढें पुढें। घेती धांव॥ १६८॥**
**तेथ चांडाळादि निकृष्टा। दोषजातीचा थोर फांटा। जाळ पडे कर्मभ्रष्टां। भुलोनियां॥ १६९॥**
**पशु पक्षी सूकर। व्याघ्र वृश्चिक विखार। हे आडशाखानिकर। थोरावती॥ १७०॥**
**परी ऐशा शाखा पांडवा। सर्वांगींही नित्य नवा। नरकभोग यावा। फळाचा तो॥ १७१॥**
**आणि हिंसा विषय पुढारी। कुकर्मसंगें धुरी धरी। जन्मवरी आगारी। वाढतीचि असे॥ १७२॥**
**ऐसे होती तरु तृण। लोह लोष्ट पाषाण। इया खांदिया तेवींचि जाण। फळेंही हेंचि॥ १७३॥**

**अर्थ**—त्याचप्रमाणे रजोगुणरूपी वारा क्षणभर ओसरला असता तमोगुणरूपी भयंकर वारा वाहू लागतो॥ १६३॥ तेव्हा याच मनुष्यशाखेला नीच कुकर्मे करण्याच्या वासनारूपी खाली जाणाऱ्या डाहाळ्या फुटतात, पाहा॥ १६४॥ निषिद्ध प्रवृत्तीचे कठीण सरळ कोंभ निघून त्यांना प्रमाद-म्हणजे बुद्धिपुर:सर शास्त्रविरुद्ध वागणे-ही पाने, अंकुर व फोक फुटतात॥ १६५॥ यजुर्वेद व सामवेद यांच्या ऋचांनी जे निषेध नियम सांगितले आहेत तोच खांद्यांच्या अग्रभागी वाऱ्याने वाहणारा पाला होय॥ १६६॥ दुसऱ्यांना मारक अशा जारण, मारण उच्चाटनादि अभिचार कर्माचे प्रतिपादन करणारे आगम ही पाने जसजशी वासनावेलीला फुटतात॥ १६७॥ तसतशी पापकर्माची खालची बुडे थोर होत जातात आणि जन्मरूपी शाखा पुढे पुढे धाव घेत जातात॥ १६८॥ तेथे दोषावह जातिरूप शाखेला मोठा फाटा फुटतो. तो फाटाच जाळे होतो व अविवेकाने कर्मभ्रष्ट झालेल्यांना भुलवून ते जाळे त्यांच्यावर पडते॥ १६९॥ तसेच पशु, पक्षी, डुक्कर, व्याघ्र, विंचू, सर्प अशा अवांतर जातीच्या शाखांचाहि समुदाय वाढतो॥ १७०॥ अर्जुना! परंतु अशा शाखांना सर्वांगाचे ठिकाणी येणारा तो पापकर्माचा नित्य नवा असा नरकरूप फळभोगच होय॥ १७१॥ आणि ज्यात हिंसा-विषय मुख्य आहे, अशा कुकर्माचे संगाने अग्रगण्य होऊन जन्मभर ह्या कुकर्माचे अंकुर वाढतच जातात॥ १७२॥ असे झाले असता वृक्ष, गवत, लोखंड, माती, दगड ह्या फांद्या होऊन तीच फळेहि होतात, असे जाण॥ १७३॥

**गूढार्थदीपिका**—तमोगुण अत्यंत वाढला असता मनुष्याचे ठिकाणी निषिद्धकर्माची प्रवृत्ति वाढून शेवटी तो व्याघ्रसर्पादि दु:खयोनीत जातो. पुढे ह्या अत्यंत पापाने प्राप्त होणाऱ्या व अत्यंत दु:खाने जीवाला मूर्च्छित करणाऱ्या वृक्ष, गवत, लोखंड, माती, दगड इत्यादि योनी त्याला प्राप्त होतात व तेथल्या तेथेच त्या पापांचे अत्यंत दु:खरूप फळहि मिळत असल्यामुळे ह्या योनी फळरूपहि आहेत, असा अर्थ.

**अर्जुना गा अवधारीं। मनुष्यालागोनि इया परी। वृद्धि स्थावरांतवरी। अधोशाखांची॥ १७४॥**

**अर्थ**—अर्जुना! ऐक. मनुष्यापासून स्थावरापर्यंत अशी खाली जाणाऱ्या फांद्यांची वाढ होते॥ १७४॥

**म्हणोनि जे मनुष्यडाळें। तिये जाणवीं अधींचि मूळें। जे एथूनि मग पघळे। संसारतरु॥ १७५॥**
**एऱ्हवीं ऊर्ध्वीचें पार्था। मुद्दल मूळ पाहतां। अधींचिया मध्यस्था। शाखा इया॥ १७६॥**
**परी तामसीं सात्त्विकीं। सुकृत दुष्कृतात्मकीं। विरूढती या शाखीं। अधोर्ध्वीचिया॥ १७७॥**

**अर्थ**—असा हा संसारवृक्ष खाली मनुष्यापासून वाढतो; म्हणून मनुष्यरूप डाहाळ्या ह्याच खालच्या खांद्याची मुळे आहेत॥ १७५॥ अर्जुना! साधारणत: वरचे मुख्य अज्ञानमूळ लक्षात घेता मनुष्यशाखा ह्या खाली गेलेल्या मध्यस्थ शाखा आहेत॥ १७६॥ ह्या मनुष्यशाखेच्या ठिकाणीच तमोगुणी म्हणून पापरूप व सत्वगुणी पुण्यरूप अशा खालच्या वरच्या शाखा वाढतात॥ १७७॥

**गूढार्थदीपिका**—मनुष्यच पुण्यकर्माने सद्गतीला जातो व पापकर्माने अधोगतीस जातो, असा भाव.

मनुष्य जन्माला आल्यानंतर उत्क्रांतिच होत जाते, या पाश्चात्य मताला आमच्या ज्ञानेश्वरादि सर्व संतांचा व शास्त्रांचा विरोध आहे, असे समजावे.

**आणि वेदत्रयीचिया पाना। नये अन्यत्र लागों अर्जुना। जे मनुष्यावांचूनि विधाना। विषय नाहीं॥ १७८॥**
**म्हणोनि तनु मानुषा। इया ऊर्ध्वमूळौनि जरी शाखा। तरी कर्मवृद्धीसि देखा। इयाचि मूळें॥ १७९॥**
**आणि आनीं तरी झाडीं। शाखा वाढतां मूळें गाढीं। मूळ गाढें तंव वाढी। पैस आथी॥ १८०॥**
**तैसेंचि इया शरीरा। कर्मे तंव देहा संसारा। आणि देह तंव व्यापारा। ना म्हणोचि नये॥ १८१॥**
**म्हणोनि देहें मानुषें। इयें मूळें होती न चुके। ऐसें जगज्जनकें। बोलिलें तेणें॥ १८२॥**

**अर्थ**—अर्जुना! ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद ही तीन पाने मनुष्यशाखेशिवाय दुसऱ्या शाखेला लागत नाहीत; कारण त्याचे विधान मनुष्याशिवाय दुसऱ्याकरिता केलेले नाही॥ १७८॥ म्हणून मनुष्याची शरीरे वरच्या मूळाच्या शाखा असल्या तरी कर्माच्या वाढीला हीच मुळे आहेत, असे समज॥ १७९॥ आणि इतर लौकिक झाडांच्या ठिकाणी असे दिसते की जसजशा त्यांच्या फांद्या मोठ्या होतात तसतशी त्याची मुळेहि जमिनीत दृढबद्ध होतात आणि मूळे जमिनीत जसजशी बळकट होतात तसतसा झाडांचा विस्तार वाढत जातो॥ १८०॥ तसेच या शरीराचे आहे. कर्म आहे तोपर्यंत देहाला व संसाराला येणे आहे व देह आहे तोपर्यंत कर्म नाही असे म्हणता येत नाही॥ १८१॥ म्हणून मनुष्यदेह हा मूळे झाल्यावाचून राहत नाही, असे जगांचा पिता भगवान श्रीकृष्ण यांनी सांगितले॥ १८२॥

**मग तमाचें तें दारुण। स्थिरावलेया वाउधाण। सत्त्वाची सुटे सत्राण। वाहुटळी॥ १८३॥**
**तैं याचि मनुष्याकारा। मूळीं सुवासना निघती आरा। घेऊनी फुटती कोंबारा। सुकृतांकुरीं॥ १८४॥**
**उकलतेनि उन्मेखें। प्रज्ञाकुशलतेंचि तिखें। डिरिया निघती निमिखें। बाबळैजुनी॥ १८५॥**
**मतीचे सोट वावे। घालिती स्फूर्तीचेनि थांवें। बुद्धि प्रकाश घे धांवें। विवेकाचेनि॥ १८६॥**
**तेथ मेधारसें सगर्भ। आस्थापत्रीं सबोंब। सरळ निघती कोंभ। सद्वृत्तीचे॥ १८७॥**
**सदाचाराचिया सहसा। टका उठती बहुवसा। घुमघुमिती घोषा। वेदपद्यांच्या॥ १८८॥**
**शिष्टागमविधानें। विविधयागवितानें। इयें पानावरी पानें। पालेजती॥ १८९॥**

**अर्थ**—मग तमोगुण भयंकर वाहटूळ थांबली की सत्वगुणाची मोठी वाहटूळ वाहू लागते॥ १८३॥ तेव्हा याच मनुष्यकाराच्या मूळाच्या ठिकाणी सद्वासनेचे कोंभ निघून त्याला पुण्याचे अंकुर येतात॥ १८४॥ ज्ञानाची वृद्धि होऊन

बुद्धीच्या चातुर्याच्या तीक्ष्ण डिरिया एका क्षणात पुष्कळ उत्पन्न होतात॥ १८५॥ ज्ञानशक्तीचे लांब सोट स्फूर्तीचे बळ देतात व बुद्धीचा प्रकाश विवेकापर्यंत (विवेक म्हणजे कल्याणाचे काय व अकल्याणाचे काय हे समजणे) धाव घेतो॥ १८६॥ तेथे स्मरणशक्तिरसाने गर्भयुक्त होऊन श्रद्धारूप पानाच्या ठिकाणी सद्‌वृत्तीचे (शास्त्रानुसार वर्तमानाचे) सुशोभित असे सरळ कोंभ निघतात॥ १८७॥ मग सहजगत्या सदाचरणाचे पुष्कळ अग्रभाग पुढे येतात व वेदशब्दाचा घोष करू लागतात॥ १८८॥ (''वेदप्रामाण्याभ्युपगन्तृत्वं शिष्टलक्षणम्'' वेदाचे प्रामाण्य मान्य करणे हे शिष्टाचे लक्षण होय) अशा शिष्टांनी केलेल्या आगमांतील विधाने-म्हणजे स्मृतिग्रंथातील आचाररूप विधाने-व नाना प्रकारच्या यागाचा विस्तार ही पानावर पाने फुटू लागतात॥१८९॥

**ऐसा यमदर्मी घोंसाळिया। उठती तपाचिया डाहाळिया। देती वैराग्यशाखा कवळिया। वेल्हाळपणें॥ १९०॥**
**विशिष्टां व्रतांचे फोक। धीराच्या अणगटीं तिख। जन्मवेगें ऊर्ध्वमुख। उंचावती॥ १९१॥**
**माजीं वेदांचा पाला दाट। तो करी सुविद्येचा झडझडाट। जंव वाजे अचाट। सत्त्वानिळु तो॥ १९२॥**
**तेथ धर्मडाळ बाहाळी। दिसती जन्मशाखा सरळी। तिया आड फुटती फळीं। स्वार्गादिकीं॥ १९३॥**
**पुढां उपरति रागें लोहिवी। धर्ममोक्षाची शाखा पालवी। पाल्हाजत नित्य नवी। वाढतीचि असे॥ १९४॥**

**अर्थ**—अशा यमदमाचे घोस लागलेल्या तपाच्या डहाळ्या उठतात व त्याला वैराग्याच्या शाखा फोफावून आलिंगन देतात॥ १९०॥ धैर्यरूपी अग्राने तीक्ष्ण असलेले विशिष्ट व्रतांचे फोक उत्पन्न होण्याच्या वेगाने वर मुख करून उंच जातात॥ १९१॥ जोपर्यंत सत्त्ववृद्धिरूप वायु सपाट्याने वाहतो तोपर्यंत वेदरूपी दाट पाला त्यात सुविद्येचा झणझणाट करीत राहतो॥ १९२॥ तेथे विस्तारलेल्या धर्मरूपी डाहाळीत ज्या जन्मरूपी सरळ शाखा दिसतात त्या स्वर्गादि फलरूपाने आडव्या फुटलेल्या असतात॥ १९३॥ (रागे-म्हणजे) विषयभोगाच्या आसक्तीमुळे (लोहिवी-म्हणजे) लाल झालेली धर्मशाखा फुटते व वैराग्याने मोक्षशाखा फुटते. त्या विस्तार पावून नित्य नवीन वाढतच असतात॥ १९४॥

**गूढार्थदीपिका**—प्रवृत्तिधर्म फळाशायुक्त, फळाशा रजोगुणी आणि ''रजोरागात्मकं विद्धि'' या भगवद्वचनानुसार लाल रंगयुक्त असल्यामुळे माउलीनेहि त्याचा येथे ''लोहिवी'' या शब्दाने उल्लेख केला आहे.

महाभारतातहि सत्वगुणाचा रंग पांढरा, रजोगुणाचा लाल व तमोगुणाचा काळा असे सत्वादि गुणप्रधान अशा लिंगदेहाचे रंग सांगितले आहेत. (शां० प० अ० २८०)

रजोगुण वाढला असता पुरुष स्वर्गादि प्राप्तीकरिता धर्माचरण करतो.

सात्विक पुरुष धर्मपरायण असतो. त्याच्या बुद्धीत सत्वगुण वाढला असता विषय अनित्य आहेत, त्यात सुख नाही, असे वैराग्य बुद्धीला होऊन ती निष्काम सदाचारी होते व मोक्षमार्गाला लागते, असा अर्थ.

**पैं रविचंद्रादि ग्रहवर। पितृ ऋषी विद्याधर। हे आडशाखा प्रकार। पैस घेती॥ १९५॥**
**याहीपासून उंचवडे। गुढले फळाचेनि बुडें। इंद्रादिक ते मांदोडे। थोर शाखांचे॥ १९६॥**
**मग तयांही उपरी डाहाळिया। तपोज्ञानीं उंचावलिया। मरीचि कश्यपादि इया। उपरी शाखा॥ १९७॥**
**एवं माळोवाळी उत्तरोत्तरु। ऊर्ध्वशाखांचा पैसारु। बुडीं साना अग्री थोरु। फलाढ्य हा॥ १९८॥**
**वरी उपरिशाखाही पाठीं। येती फळभार जे किरीटी। ते ब्रह्मेशान्त अणगटीं। कोंभ निघती॥ १९९॥**

**अर्थ**—मग रविचंद्रादि श्रेष्ठ ग्रह, पितर, ऋषि, विद्याधर ह्या आडशाला विस्तार पावतात॥ १९५॥ याच्याहिपेक्षा उंच गेलेल्या इंद्रादिक मोठ्या शाखांचे जुंबाडे आहेत व त्यांची बुडे फळांनी झाकली आहेत॥ १९६॥ त्यांच्याहि वर तपोधनाने उंच गेलेल्या मरीचिकश्यपादी वरच्या शाखा आहेत॥ १९७॥ अशाप्रमाणे पुढे पुढे वरच्या शाखेचा चहूकडे विस्तार झाला असून तो बुडाच्या ठिकाणी लहान व शेंड्याकडे फळांनी संपन्न होऊन थोर झाला आहे॥ १९८॥ या वरच्या शाखांच्या नंतरहि ज्या शाखा फळांनी भरून येतात, अर्जुना! त्या ब्रह्मलोक व शिवलोकरूप अणकुचीदार कोंभ होत॥ १९९॥

**फळाचेनि वोझेपणें। ऊर्ध्वीं वोवांडें दुणें। जंव माघौतें बैसणें। मूळींचि होय॥ २००॥**
**प्राकृताही तरी रुखा। जे फळें दाटली होय शाखा। ते वोवांडिली देखा। बुडासि ये॥ २०१॥**
**तैसें जेथूनि हा आघवा। संसारतरूचा उठावा। तियें मूळीं टेंकटी पांडवा। वाढतेनि ज्ञानें॥ २०२॥**

**अर्थ—**फळांच्या ओझ्याने झाडाच्या वरच्या खांद्या खाली दुप्पट वाकून पुन: मूळापर्यंत येतात॥ २००॥ लौकिक झाडाची शाखा देखील फळांनी दाटली की ती फळाच्या भाराने खाली वाकून बुडाकडे येते॥ २०१॥ त्याचप्रमाणे मग अर्जुना! येथे वाढत्या ज्ञानाने-म्हणजे ब्रह्मज्ञानाने-ज्या परब्रह्मरूप मुळापासून या संसारवृक्षाचा उठाव झाला आहे, त्या परब्रह्मरूप मूळालाच येऊन मिळतात॥ २०२॥

**गूढार्थदीपिका—**ब्रह्मादिलोकशाखांची मनुष्यलोक हीच मुळे असल्यामुळे सकाम तपादिकांनी ब्रह्मादि लोकास गेलेले पुरुष तेथे दिव्यलोक भोगून पुन: मनुष्यलोकांत परत येतात व निष्कामपुरुष, छांदोग्योपनिषदांत सांगितलेल्या सगुण उपासना करून देवयान मार्गाने ब्रह्मलोकात जातात व तेथे ब्रह्मज्ञान संपादन होऊन मुक्त होतात ''अनावृत्ति शब्दादनावृत्तिः........'' हे सूत्र देवयान मार्गाने जाणाऱ्या निष्काम उपासकांविषयीच आहे.

ब्रह्मज्ञान प्राप्त झाले असताच या ब्रह्मरूप मूळापाशी येता येते, येऱ्हवी नाही.

**म्हणौनि ब्रह्मेशानापरौतें। वाढणें नाहीं जीवातें। तेथूनि मग वरौते। ब्रह्मचि कीं॥ २०३॥**

**अर्थ—**म्हणून ब्रह्मलोक व शिवलोक यांच्या पलीकडे जीवाचे गमनागमन होत नाही; कारण त्या पलीकडे गमना-गमनरहित परब्रह्मच आहे॥ २०३॥

**गूढार्थदीपिका—**ब्रह्मलोक व शिवलोक येथपर्यंत जीवाची गति आहे.

**परी हें असो ऐसे। ब्रह्मादिक ते आंगवसे। ऊर्ध्वमूळासरिसे। न तुकती गा॥ २०४॥**
**आणीकही शाखा उपरता। जिया सनकादिकनामें विख्याता। तिया फळीं मूळीं नाडळतां। भरलिया ब्रह्मीं॥ २०५॥**

**अर्थ—**सांगायचे तात्पर्य हे की संसारवृक्षाचे शेंडे जे ब्रह्मलोक व शिवलोक ते ऊर्ध्वमूळ जे ब्रह्म त्याच्या बरोबरीचे नाहीत॥ २०४॥ आणखीहि त्यांच्यावर ज्या सनकादिक नावांच्या प्रसिद्ध शाखा आहेत त्यांना फळे मुळे काही एक नसून त्या नुसत्या परब्रह्मातच भरल्या आहेत॥ २०५॥

**गूढार्थदीपिका—**सनकादिक हे परब्रह्माचे ज्ञानशक्त्यवतार असल्यामुळे ते जन्ममृत्युरहित असे सदेह पूर्ण परब्रह्मस्वरूपच आहेत, असा अर्थ.

**ऐसी मनुष्यापासूनि जाणावी। ऊर्ध्वी ब्रह्मादिशेष पालवी। शाखांची वाढी बरवी। उंचावे पैं॥ २०६॥**
**पार्था ऊर्ध्वीचिया ब्रह्मादि। मनुष्यत्वचि होय आदि। म्हणौनि इयें अधीं। म्हणितली मूळें॥ २०७॥**
**एवं तुज अलौकिकु। हा अधोर्ध्वशाखु। सांगितला भवरुखु। ऊर्ध्वमूळु॥ २०८॥**
**आणि अधींची हीं मूळें। उपपत्तीं परिसविलीं सविवळें। आतां परिस उन्मूळे। कैसेनि हा॥ २०९॥**

**अर्थ—**याप्रमाणे मनुष्यापासून शेवटी ब्रह्मशिवादि लोकांपर्यंत अशी ही वर शाखांची चांगली सविस्तर वाढ झाली आहे, असे समजावे॥ २०६॥ अर्जुना! वरील ब्रह्मादिलोकरूप शाखांना मनुष्यत्वच कारण असल्यामुळे मनुष्यलोकाला त्यांची खालची मूळे आम्ही म्हटले आहे॥ २०७॥ याप्रमाणे अर्जुना! ज्याच्या खांद्या खाली-वर गेल्या आहेत व मूळ वर आहे अशा या अलौकिक संसारवृक्षाचे वर्णन तुला सांगितले॥ २०८॥ आणि हा संसारवृक्षाच्या खालच्या मूळाविषयीहि खुलासेवार उपपत्ति तुला ऐकविली, आता हा वृक्ष कशाने उपडला जातो, हे सांगतो, ऐक॥ २०९॥

**न रूपमस्येह तथोपलभ्यते नान्तो न चादिर्न च सम्प्रतिष्ठा।**
**अश्वत्थमेनं सुविरूढमूलमसङ्गशस्त्रेण दृढेन छित्त्वा॥ ३॥**

**अर्थ—**ज्ञानविचार केला असता या संसारवृक्षाचे स्वरूप वर्णन केल्याप्रमाणे दिसून येत नाही. याला आदिअंत नसून याचे अस्तित्वहि नाही. दृढ बद्धमूल झालेला हा अश्वत्थवृक्ष, मी असंग आहे, अशा बळकट ज्ञानविचाररूप शस्त्राने तोडून टाकावा॥ ३॥

**परी तुझ्या हन पोटीं। ऐसें गमेल किरीटी। जे एवढें झाड उत्पाटी। ऐसें कायि असे॥ २१०॥**
**कें ब्रह्मयाच्या शेवटवरी। ऊर्ध्व शाखांची थोरी। आणि मूळ तंव निराकारीं। ऊर्ध्वीं असे॥ २११॥**
**हा स्थावराही तळीं। फांकत असे अधींच्या डाळीं। माजीं धांवतसे दुजां मूळीं। मनुष्यरूपीं॥ २१२॥**
**ऐसा गाढा आणि अफाटु। आतां कोण करी यया शेवटु। तरी झणी हा हळुवटु। धरिसी भावो॥ २१३॥**

**अर्थ**—अर्जुना! तुझ्या मनात असे येईल की एवढे मोठे झाड उपटून टाकता येईल असे काय आहे?॥ २१०॥ कारण की ह्या संसारवृक्षाच्या शाखा वर ब्रह्मलोकापर्यंत विस्तारल्या असून त्याची मुळे वर निराकार परब्रह्माचे ठिकाणी आहेत॥ २११॥ हा संसारवृक्ष मधल्या दुसऱ्या मनुष्यरूप मूळापासून वृक्षादि स्थावराच्याहि खाली लोष्टपाषाणादि ह्या खालच्या डाहाळ्यांनी पसरलेला आहे॥ २१२॥ अशा दृढमूळ व अफाट पसरलेल्या या संसारवृक्षाचा नाश कोणाच्याने होईल अशी कदाचित् थोडीशी तुझ्या मनात शंका येईल॥ २१३॥

**परी हा उन्मूळावया दोषें। येथ सायासचि कायिसे। काय बाळा बागुल देशें। दवडावा आहे॥ २१४॥**
**गंधर्वदुर्ग कायी पाडावे। काय शशविषाण मोडावें। होआवें मग तोडावें। खपुष्प कीं॥ २१५॥**
**तैसा संसारु हा वीरा। रूख नाहीं साचोकारा। मा उन्मूळणीं दरारा। कायिसा तरी॥ २१६॥**
**आम्हीं सांगितली जे परी। मूळडाळांची उजरी। ते वांझेचीं घरभरीं। लेंकुरें जैशीं॥ २१७॥**
**काय कीजती चेइलेपणीं। स्वप्नींचीं तियें बोलणीं। तैशी जाण ते कहाणी। दुगळीचि ते॥ २१८॥**
**वांचूनि आम्हीं निरूपिलें जैसें। ययाचें अचळ मूळ असे तैसें। आणि तैसाचि जरी हा असे। साचोकारा॥ २१९॥**
**तरी कोणाचेनि संतानें। निपजती या उन्मूळणें। काय फुंकिलिया गगनें। जाइजेल गा॥ २२०॥**
**म्हणौनि पैं धनंजया। आम्हीं वानिलें रूप तें माया। कासवीचेनि तुपें राया। वोगरिलें जैसें॥ २२१॥**

**अर्थ**—परन्तु या संसारवृक्षाला उपटून टाकण्याच्या उद्देशाने काय श्रम करावे लागतील? काय लहान मुलाला बागुल देशांतरात हाकून द्यावयाचा असतो?॥ २१४॥ गंधर्वनगराचा कोट पाडावा लागतो काय? आकाशाला पुष्प असले तरच तोडणार ना!॥ २१५॥ त्याप्रमाणे, हे योद्ध्या अर्जुना! हा संसारवृक्ष खरोखर नाहीच; मग तो तोडून टाकण्यात काय धाक वाटणार?॥ २१६॥ आम्ही प्रपंचवृक्षाची जी वाढ सांगितली ती घरभर असलेल्या वांझेच्या मुलांप्रमाणे होय॥ २१७॥ जाण आल्यानंतर स्वप्नातील बडबड काय कामाची? त्याप्रमाणे संसारवृक्षाची संपूर्ण कहाणी अर्थहीन आहे, असे जाण॥ २१८॥ यावाचून आम्ही निरूपण केल्याप्रमाणे जर हा संसारवृक्ष खरोखरच दृढबद्धमूळ व सत्य असता तर कोणाच्या संततीला तो उपटून टाकता आला असता? नुसत्या फुंकण्याने अभ्र नाहीसे होत असते काय?॥ २१९-२२०॥ म्हणून ज्याप्रमाणे कासवीच्या तुपाने केलेल्या पदार्थाचे पात्र वाढून राजापुढे मांडावे, त्याप्रमाणे तुला संसारवृक्षाचे जे वर्णन करून सांगितले ते जीवाला झालेल्या अज्ञानभ्रांतीचे वर्णन होय, असे जाण॥ २२१॥

**गूढार्थदीपिका**—कासवीला दूध नसते. ती आपल्या पिलांचे पोषण दृष्टीने करते; म्हणून तिच्या दुधापासून तूप होणे शक्य नाही. अर्थात कासवीच्या तुपाने पक्वान्न तयार करून राजापुढे मांडणे हे केवळ अर्थहीन शब्दमात्र होत. त्याप्रमाणेच ज्ञानदृष्टीने पाहता संसारसृष्टीचे वर्णन केवळ शब्दमात्र आहे, वस्तुनिष्ठ नाही, असा अर्थ.

**मृगजळाचीं गा तळीं। तियें दिठी दुरूनिचि न्याहाळीं। वांचूनि तेणें पाणियें साळी केळी। लाविसी काई॥ २२२॥**
**मूळ अज्ञानचि तंव लटिकें। मा तयाचें कार्य हें केतुकें। म्हणोनि संसाररुख सत्य कें। वावोचि गा॥ २२३॥**

**अर्थ**—अर्जुना! मृगजळाची भरलेली तळी दुरून दृष्टीने पाहावी, त्यापासून त्या पाण्याच्या योगाने धान्य व केळी पिकविता येईल काय?॥ २२२॥ या संसारवृक्षाचे मूळ जे अज्ञान तेच खोटे म्हणजे भ्रांतिरूप आहे. मग त्यापासून उत्पन्न झालेले संसाररूप कार्य कोठून खरे होणार; म्हणून संसारवृक्ष सत्य कोठला? तो खोटाच आहे॥ २२३॥

**गूढार्थदीपिका**—अमृतानुभवातहि पुन: माउलीने ''म्हणौनि दृश्य ते वावो। देखिले जरी'' या चरणाने असेच सांगितले आहे.

**आणि अंत यया नाहीं। ऐसें बोलिजे जें कांहीं। तेंही साचचि पाहीं। येके परी॥ २२४॥**
**तरी प्रबोध जंव नोहे। तंव निद्रे काय अंत आहे। कीं रात्री न सरे तंव न पाहे। तया आरौतें॥ २२५॥**
**तैसा जंव पार्था। विवेकु नुधवी माथा। तंव अंतु नाहीं अश्वत्था। भवरूखा यया॥ २२६॥**
**वाजतें वारें निवांत। जंव न राहे जेथिंचें तेथ। तंव तरंगता अनंत। म्हणावीचि कीं॥ २२७॥**
**म्हणौनि सूर्य जैं हारपे। तैं मृगजळाभास लोपे। कां प्रभा जाय दीपें। मालवलेनि॥ २२८॥**
**तैसें मूळ बीज अविद्या खाये। तें ज्ञान जैं उभें होये। तैचि यया अंत आहे। एऱ्हवीं नाहीं॥ २२९॥**

**अर्थ—**आणि या संसारवृक्षाला अंत नाही–म्हणजे त्याचा नाश होत नाही–असे जे म्हटले जाते, तेहि एका दृष्टीने खरे आहे पाहा!॥ २२४॥ जाग येत नाही तोपर्यंत झोपेचा नाश होतो काय? (पाहे तंव रात्र सरे की तया आरौते) पहाट झाल्याबरोबर रात्र संपते की त्यापूर्वी?॥ २२५॥ त्याप्रमाणेच अर्जुना! आत्मानात्मविवेक जोपर्यंत चित्तांत उत्पन्न होत नाही तोपर्यंत या संसारवृक्षाचा अंत होत नाही॥ २२६॥ जोपर्यंत वाहणारा वारा शांत होऊन जेथल्या तेथे स्थिर होत नाही तोपर्यंत समुद्राचे पाणी असंख्य तरंगरूप होत राहणारच॥ २२७॥ म्हणून सूर्य अस्तास गेला असताच मृगजळाचा भास नाहीसा होतो किंवा दिवा विझविला असता प्रकाश नाहीसा होतो॥ २२८॥ त्याप्रमाणे संसारवृक्षाचे मूळबीज जी अविद्या ती ज्या ज्ञानाने नाहीशी होते ते ब्रह्मज्ञान प्रगट झाले तरच या संसाररूप वृक्षाचा नाश होतो, एऱ्हवी नाही॥ २२९॥

**तेवींचि हा अनादी। ऐसी आथी शाब्दी। तो आळु नोहे अनुरोधी। बोल यया॥ २३०॥**
**जे संसारवृक्षाच्या ठायीं। साचोकार तंव नाहीं। मा नाहीं तया आदि काई। कोण होईल॥ २३१॥**
**जो साच जेथूनि उपजे। तयातें आदि हें साजे। आतां नाहींचि तो म्हणिजे। कोठूनियां॥ २३२॥**
**म्हणौनि जन्मे ना आहे। तैसिया सांगों कवण माये। यालागीं नाहींपणेंचि होये। अनादि हा॥ २३३॥**
**वांझेचिया लेंका। कैंची जन्मपत्रिका। नभीं निळी भूमिका। कें कल्पूं पां॥ २३४॥**
**व्योमकुसुमाचा पांडवा। कवणें देंठ तोडावा। म्हणौनि नाहीं ऐसिया भवा। आदि कैंची॥ २३५॥**
**जैसें घटाचें नाहींपण। असतचि असे केलेनिवीण। तैसा समूळ वृक्षु जाण। अनादि हा॥ २३६॥**
**अर्जुना ऐसेनि पाहीं। आद्यंतु ययासि नाहीं। माजीं स्थिती आभासे कांही। परी टवाळ ते गा॥ २३७॥**

**अर्थ—**त्याप्रमाणे या संसारवृक्षाला जो अनादि शब्द लावला जातो तो आरोपमात्र नसून या आमच्या केलेल्या निरूपणाला अनुसरूनच आहे॥ २३०॥ कारण या संसारवृक्षाचे ठिकाणी यत्किंचितहि सत्यता नाही. म्हणजे तो जर अस्तित्वातच नाही तर त्याची उत्पत्ति कशी असणार व कोण करणार?॥ २३१॥ ज्या वस्तूपासून एखादी वस्तु उत्पन्न होते ती वस्तु त्या वस्तूचे कारण आहे व ती उत्पन्न झाली हे म्हणणे खरोखर योग्य होते. आता संसारवृक्षाचे अस्तित्व सिद्ध होत नाही तर तो कोणापासून उत्पन्न झाला असे म्हणायचे!॥ २३२॥ म्हणून अर्जुना! जे उत्पन्न होत नाही व अस्तित्वातहि नाही अशाची माय कोण म्हणून सांगता येईल बरे. अर्थात अस्तित्वात नसल्यामुळे हा (संसारवृक्ष) अनादि म्हटला जातो॥ २३३॥ वंध्येच्या मुलाची पत्रिका कोठून असणार? आकाशात नीळी भूमि असते अशी कल्पना कशी करता येईल?॥ २३४॥ अर्जुना! आकाशपुष्पाचे देठ कोणी तोडावे? म्हणून नसलेल्या संसाराला कारण व उत्पत्ति कोठून असणार?॥ २३५॥ ज्याप्रमाणे घटांचे नसणे उत्पन्न केल्यावाचून असते त्याप्रमाणे संसारवृक्ष खरोखरच नाही, म्हणून अनादि आहे, असे जाण॥ २३६॥ अर्जुना! या दृष्टीनेच या संसारवृक्षाला आदिअंत नसून मध्ये जी काही त्याची स्थिति भासते ती भ्रांतिजन्य म्हणून खोटी आहे॥ २३७॥

**ब्रह्मगिरीहूनि न निगे। आणि समुद्रींहीं कीर न रिगे। तरी माजीं दिसे वाउगें। मृगांबु जैसें॥ २३८॥**
**तैसा आद्यंतीं कीर नाहीं। आणि साचही नोहे कहीं। परि लटिकेपणाची नवाई। पडिभासे गा॥ २३९॥**
**नाना रंगीं गजबजे। जैसें इंद्रधनुष्य देखिजे। तैसा नेणतया आपजे। आहे ऐसा॥ २४०॥**
**ऐसेनि स्थितीचिये वेळे। भुलवी अज्ञानाचे डोळे। लाघवी हरी मेखळे। लोकु जैसा॥ २४१॥**

**आणि नसतीचि श्यामिका। व्योमीं दिसे तैसी दिसो कां। तरी दिसणेंही क्षणा एका। होय जाय॥ २४२॥**
**स्वप्नींही मानिलें लटिकें। तरी निर्वाहो कां एकसारिखें। तेवीं आभासु हा क्षणिके। रिताचि गा॥ २४३॥**
**देखतां आहे आवडे। घेऊं जाइजे तरी नातुडे। जैसा टिकु कीजे माकडे। जळामाजीं॥ २४४॥**
**तरंगभंगु सांडीं पडे। विजूही न पुरे होडे। आभाससि तेणें पाडें। होणें जाणें गा॥ २४५॥**
**जैसा ग्रीष्मशेषींचा वारा। नेणिजे समोर कीं पाठीमोरा। तैसी स्थिती नाहीं तरुवरा। भवरूपा यया॥ २४६॥**
**एवं आदि ना अंत स्थिती। ना रूप ययासि आथी। आतां कायसी कुंथाकुंथी। उन्मूळणीं गा॥ २४७॥**
**आपुलिया अज्ञानासाठीं। नव्हता थांवला किरीटी। तरि आतां आत्मज्ञानाच्या लोटीं। खांडेनि गा॥ २४८॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे मृगजळाचा प्रवाह ब्रह्मगिरीहून निघत नसतो व समुद्रासहि मिळत नाही, परंतु मध्येच व्यर्थ भासतो॥ २३८॥ त्याप्रमाणे ज्याला उत्पत्ति-नाश मुळीच नाही व कधी खराहि नाही, परंतु खोटेपणाचे कौतुक असे आहे की वस्तु नसून भासते॥ २३९॥ ज्याप्रमाणे आकाशात नाना रंगांनी भरलेले इंद्रधनुष्य दिसते, त्याप्रमाणे अज्ञानी लोकांना संसारवृक्ष असल्यासारखा प्राप्त होतो॥ २४०॥ ज्याप्रमाणे गारुडी दोरीचा साप दाखवून लोकांना भूलवितो तसेच स्थितिकाळी अज्ञानी पुरुषाला, संसार खरा आहे, असा भ्रम होतो॥ २४१॥ ज्याप्रमाणे आकाशात नसलेला काळसरपणा दिसतो, तसा दिसेना कां! पण ते दिसणेहि एक क्षणात होते व जाते॥ २४२॥ स्वप्नामध्ये आपण पदार्थ खोटे मानले तरी तेथे ते पदार्थ एकसारखे टिकून राहतात काय? ज्याप्रमाणे हा प्रपंचाचा भास क्षणिक असल्यामुळे वस्तुहीन असा व्यर्थ आहे॥ २४३॥ ज्याप्रमाणे माकडाने पाण्यात आपली स्थिति करावी (माकड पाण्यात क्षणभरहि स्थिर राहत नाही) त्याप्रमाणे हा संसारवृक्ष 'आहे' असा वाटतो. धरु जाता हा सापडत नाही॥ २४४॥ तरंगाचे उठणे-मावळणे किंवा विजेचे चमकणे लोपणे यांची देखील संसारवृक्षाच्या भासाशी तुलना करता येत नाही इतका तो त्यांच्यापेक्षाहि क्षणिक आहे॥ २४५॥ ज्याप्रमाणे ग्रीष्मऋतूच्या अंती सुटणारा वारा समोरून येतो की पाठीमागून येतो हे समजत नाही, तशी या संसारवृक्षाची स्थिति लक्षात येत नाही॥ २४६॥ याप्रमाणे ज्या संसारवृक्षाला उत्पत्ति व नाश नाही किंवा रूपहि नाही त्याला उपटून टाकण्याची काय खटपट करावी लागणार!॥ २४७॥ अर्जुना! मुळीच अस्तित्वात नसलेला हा संसारवृक्ष अज्ञानभ्रमाने बलवान झाला आहे; म्हणून तो आत्मज्ञानरूपी खड्गाने कापून काढ॥ २४८॥

**वांचूनि ज्ञानेंवीण एकें। उपाय करिसी जितुके। तिहीं गुंफसि अधिकें। रुखीं इये॥ २४९॥**

**अर्थ**—नाही तर, संसारवृक्ष तोडण्याकरिता एका आत्मज्ञानावाचून जितके उपाय करशील तितका तू अधिक त्या वृक्षात गुरफटशील॥ २४९॥

**गूढार्थदीपिका**—आत्मज्ञानावाचून अज्ञानाने संसाराला सत्य समजून व आत्मस्वरूपाला विसरून जे काही उपाय होतील ते सर्व अहंकारपूर्वक होत असल्यामुळे संसार कायमच राहतो, असा भाव.

**मग किती खांदोखांदी। यया हिंडावें ऊर्ध्वीं अधीं। म्हणौनि मूळचि अज्ञान छेदीं। सम्यक्ज्ञानें॥ २५०॥**
**एऱ्हवीं दोरीचिया उरगा। डांगा मेळवितां पैं गा। तो वावोचि भारु गा। केला होय॥ २५१॥**
**तरावया मृगजळाची गंगा। डोणीलागीं धांवतां दांगा-। माजीं वोहळें बुडिजे पैं गा। साच जेवीं॥ २५२॥**
**तेवीं नाथिलिया संसारा। उपायीं जाचतया वीरा। आपणपें लोपे वारा। विकोपीं जाय॥ २५३॥**
**म्हणोनि स्वप्नींचेया भया। ओखद चेवोचि धनंजया। तेवीं अज्ञानमूळा यया। ज्ञानचि खड्ग॥ २५४॥**

**अर्थ**—मग किती तरी वेळ त्याच्या वर-खाली पसरलेल्या खांद्यावर फिरत राहावे लागणार. म्हणून यथार्थज्ञानाने या संसारवृक्षाचे मूळ जे अज्ञान ते तोडूक टाक॥ २५०॥ नाही तर ज्याप्रमाणे दोरीवर भासलेल्या सर्पाला मारण्याकरिता काठ्या मिळविण्याचा केलेला प्रयत्न व्यर्थ शीणच ठरतो॥ २५१॥ किंवा भासलेल्या मृगजळाच्या गंगेतून पार होण्याकरिता होडी करावी म्हणून लाकडे आणण्या करिता जंगलात गेले असता एखाद्या ओढ्यात जसे खरेच बुडावे॥ २५२॥ त्याप्रमाणे अस्तित्वात नसलेल्या या संसारवृक्षाचा नाश करण्याच्या उपायाचे श्रम करणारा

आत्मस्वरूप विसरतो व त्याच्या अंगात शिरलेला प्रयत्नाचा वारा शेवटी विकोपात परिणाम पावतो ॥ २५३ ॥ म्हणून स्वप्नात लागलेल्या शस्त्राच्या घावाला जसे जागे होणे हेच औषध आहे, त्याप्रमाणे अज्ञानमूळ असलेल्या संसारवृक्षाला कापून काढण्याकरिता आत्मज्ञान हेच उत्तम शस्त्र होय ॥ २५४ ॥

**परि तेंचि लीला परजवे। तैसें वैराग्याचे नीच नवें। अभंगबळ होआवें। बुद्धीसी गा॥ २५५॥**
**उठिलेनि वैराग्यें जेणें। हा त्रिवर्गु ऐसा सांडणें। जैसें वमुनियां सुणें। आतांचि गेलें॥ २५६॥**
**हा ठायवरी पांडवा। पदार्थजातीं आघवा। विटवी तो होआवा। वैराग्यलाठु॥ २५७॥**

**अर्थ**—पण ते ज्ञानखड्ग हाती सहज पेलता येईल असे बुद्धीला वैराग्याचे क्षीण न होणारे व अखंड बळ असायला पाहिजे ॥ २५५ ॥ प्राप्त झालेले वैराग्य असे असावे की ज्यायोगे चित्ताला धर्म, अर्थ व काम हे तिन्ही पुरुषार्थ आताच ओकून गेलेल्या कुत्र्याच्या ओकारीप्रमाणे किळसवाणे वाटून चित्त निःशेष त्याचा त्याग करील ॥ २५६ ॥ अर्जुना! येथपर्यंत इहपरलोकातील सर्व पदार्थांचा वीट येईल अशा प्रकारच्या वैराग्याचे उत्तम बळ पाहिजे ॥ २५७ ॥

**मग देहाहंतेचें दळें। सांडूनि एकेचि वेळे। प्रत्यक्बुद्धी करतळें। हातवसावें॥ २५८॥**
**निसळें विवेकसाहणे। जे ब्रह्माहमस्मिबोधें सणाणें। मग पुरतेंनि बोधें उटणें। एकलेंचि॥ २५९॥**

**अर्थ**—मग स्थूळ-सूक्ष्म-कारण या तिन्ही देहांचे कवच एकदम टाकून देऊन मी प्रत्यक् आत्मस्वरूप आहे, अशी बुद्धि धारण करावी ॥ २५८ ॥ "मी ब्रह्म आहे" ह्या एका तीक्ष्णबोधाचा पूर्ण निश्चय होईपर्यंत निर्दोष आत्मानात्मविवेकरूपी साहाणेवर ते ज्ञानखड्ग घासत राहावे ॥ २५९ ॥

**गूढार्थदीपिका**—या ओवीत "अहं ब्रह्मास्मि" बोध पूर्ण होईपर्यंत प्रथम आत्मानात्मविवेकाचे श्रवण करण्यास सांगितले आहे.

**परि निश्चयाचें मुष्टिबळ। पाहावें एकदोन वेळ। मग तुळावें अति चोखाळ। मननवरी॥ २६०॥**

**अर्थ**—पण बोधाचा केलेला निश्चय किती दृढ झाला आहे याची एक-दोनदा परीक्षा पाहावी व मग त्या बोधाला साधक अशा उपपत्तीने त्याचे मनन करावे ॥ २६० ॥

**गूढार्थदीपिका**—बाधकशंकांनी बोध डळमळित होऊ नये म्हणून साधकाला येथे मनन करण्यास सांगितले आहे.

**पाठीं हतियेरां आपणयां। निदिध्यासें एक जालिया। पुढे दुजें नुरेल घाया-। पुरतें गा॥ २६१॥**

**अर्थ**—नंतर निदिध्यासनाने ज्ञानखड्ग व आपण एक झाल्यावर त्या ज्ञानखड्गाचा घाव घालण्याकरिता आपल्याहून निराळे काही एक शिल्लक राहणार नाही ॥ २६१ ॥

**गूढार्थदीपिका**—येथे निदिध्यासनाने "अहं ब्रह्मास्मि" या बोधाचा प्रवाह कधीहि खंडित न होता अखंड राहतो व प्रपंचवृक्षाचा अत्यंत अभाव होतो-म्हणजे प्रपंच मुळी भासतच नाही असे सांगितले आहे.

**तें आत्मज्ञानाचें खांडें। अद्वैतप्रभेचेनि वाढें। नेदील उरों कवणेकडे। भववृक्षासि॥ २६२॥**

**अर्थ**—अद्वैतबुद्धीने तीक्ष्ण झालेले ते आत्मज्ञानाचे शस्त्र संसारवृक्षाला कोठेच उरू देणार नाही ॥ २६२ ॥

**गूढार्थदीपिका**—प्राप्त झालेल्या ज्ञानाने ब्रह्म अफुट, अद्वैत, अविक्रिय आहे, म्हणून प्रपंचवृक्षाला अस्तित्वच नाही, असे कळून येते, असा भाव.

**शरदागमींचा वारा। जैसा केरु फेडी अंबरा। कां उदयला रवी आंधारा। घोंटु भरी॥ २६३॥**
**नाना उपवढ होतां खेंवो। नुरे स्वप्नसंभ्रमाचा ठावो। स्वप्रतीतिधारेचा वाहो। करील तैसें॥ २६४॥**
**तेव्हां ऊर्ध्व कां अधोमूळ। कां अर्धीचें हन शाखाडाळ। तें कांहींचि न दिसे मृगजळ। चांदिणां जेवीं॥ २६५॥**
**ऐसेनि गा वीरनाथा। आत्मज्ञानाचिया खड्गलता। छेदूनियां भवाश्वत्था। ऊर्ध्वमूळातें॥ २६६॥**

**अर्थ**—ज्या शरदऋतूच्या आगमनाबरोबर वाहणारा वारा आकाशातील अभ्रांचा केर नाहीसा करतो किंवा सूर्य

उगवला असता तो आंधार गिळून टाकतो॥ २६३ ॥ अथवा जाग येताक्षणीच स्वप्न निःशेष नाहीसे होते, त्याप्रमाणे त्या स्वरूपाच्या स्वानुभवाचा अखंड प्रवाह तसेच करील-म्हणजे संसारवृक्ष मुळीच भासू देणार नाही॥ २६४॥ ज्याप्रमाणे चांदण्यात मृगजळ दिसत नाही, त्याप्रमाणे आत्मानुभवाच्या अखंड वृत्ति प्रवाहात संसारवृक्षाची वरची मुळे की खालची मुळे किंवा खालच्या शाखा-डाहाळ्या हे काही एक दिसणार नाही॥ २६५॥ हे योद्ध्यामध्ये श्रेष्ठ अर्जुना! अशा रीतीने आत्मज्ञानरूपी तरवारीने संसाररूपी वर मुळे असलेल्या संसारवृक्षाला तोडून टाक॥ २६६॥

**ततः पदं तत्परिमार्गितव्यं यस्मिन्गता न निवर्तन्ति भूयः।**
**तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये यतः प्रवृत्तिः प्रसृता पुराणी॥ ४॥**

**अर्थ**—ज्या पदाचे ठिकाणी प्राप्त झालेले पुरुष पुनः संसारात परत येत नाहीत व ज्यापासून अनादि संसारचक्राची प्रवृत्ति झाली आहे त्या आद्य पुरुषाला मी शरण आहे, अशा भावनेने त्या पदाचा शोध करावा॥ ४॥

**मग इदंतेसि वाळलें। जें मीपणेंवीण डाहारलें। तें रूप पाहिजे आपलें। आपणचि॥ २६७॥**

**अर्थ**—मग 'हे असे' म्हणून दाखविले जाईल, अशा दृश्यकोटीत जे येत नाही, तसेच जे मीपणा वाचून प्रसिद्धीस आले आहे-म्हणजे मीपणाहि जेथे सहन होत नाही-ते आपले स्वरूप आपणच पाहावे॥ २६७॥

**गूढार्थदीपिका**—आत्मस्वरूप, अहंता किंवा द्रष्ट्रत्व व इदंता किंवा दृश्यत्व या दोघांनाहि प्रकाशित करणारे असे केवळ ज्ञानरूप आहे, असे आपण ओळखले पाहिजे.

**परि दर्पणाचेंनि आधारें। एकचि करून दुसरें। मुख पाहाती गव्हारें। तैसें नको हो॥ २६८॥**
**हें पाहाणें ऐसें असे वीरा। जैसा न मोडलिया विहिरा। मग आपलिया उगमीं झरा। भरोनि ठाके॥ २६९॥**
**नातरी आटलिया अंभ। निजबिंबी प्रतिबिंब। नेहटे कां नभीं नभ। घटाभावीं॥ २७०॥**
**ना ना इंधनांशु सरलेया। वन्हि परते जेवीं आपणपयां। तैसे आपेंआप धनंजया। न्याहाळणें जें॥ २७१॥**
**जिव्हें आपली चवी चाखणें। चक्षु निज बुबुळ देखणें। आहे तया ऐसें निरीक्षणें। आपुलें पैं॥ २७२॥**
**कां प्रभेसि प्रभा मिळे। गगन गगनावरी लोळे। नाना पाणी भरलें खोळे। पाणियाचिये॥ २७३॥**
**आपणचि आपणयातें। पाहिजे जें अद्वैतें। तें ऐसें होय निरुतें। बोलिजतु असे॥ २७४॥**
**जें पाहिजतेनवीण पाहिजे। कांही नेणणाचि जाणिजे। आद्यपुरुष कां म्हणिजे। जया ठायातें॥ २७५॥**

**अर्थ**—पण आरशाचे साह्याने एकच मुख दोन मुखे करून जसे मूर्ख लोक आपल्या मुखाला पाहतात तसे मात्र आत्मस्वरूपाला पाहता कामा नये॥ २६८॥ हे वीरा अर्जुना! विहिरीत येणारे पाणी ज्याप्रमाणे विहिर उकरण्यापूर्वी उगमात साठविलेले असते, हे आपण जाणतो त्याप्रमाणे आपण आपल्या आत्मस्वरूपाला पाहणे आहे॥ २६९॥ किंवा ज्याप्रमाणे पाणी आटले असता त्यात पडलेले प्रतिबिंब बिंबाशी किंवा घट नाहीसा झाला की घटाकाश महाकाशाशी एकरूप होऊन राहते॥ २७०॥ किंवा अर्जुना! लाकडाचे जळणे संपले असता अग्नि आपल्या स्वरूपात मिळतो, त्याप्रमाणे आपणच आपल्याला जे पाहणे, तेच आपले स्वरूप पाहणे होय (आपण आपल्यासच ब्रह्मस्वरूप समजावे, असा अर्थ)॥ २७१॥ जिव्हेने आपली चव चाखण्यासारखे किंवा डोळ्याने आपले बुबुळ पाहण्यासारखे आपण आपल्याला पाहणे आहे॥ २७२॥ किंवा प्रकाशाने प्रकाशास मिळावे, आकाशाने आकाशावर लोळावे किंवा पाण्याच्या पिशवीत पाणी भरावे॥ २७३॥ अद्वैतदृष्टीने आपण आपल्याला जे पाहणे आहे ते खरोखर अशा प्रकारचे आहे, सांगतो, ऐक॥ २७४॥ जे आत्मस्वरूप पाहिल्यावाचून पाहायचे असते, काही न जाणता जाणायचे असते ज्या आत्मस्वरूपाला आद्यपुरुष म्हणतात॥ २७५॥

**गूढार्थदीपिका**—अहंता, इदंता इत्यादि सर्व दृश्य नामरूपाहून आपल्याला निराळे करीत शेवटी उरलेल्या केवळ सत्तेशी एकरूप होऊन राहणे याला आत्मस्वरूप पाहणे म्हणतात व हाच निर्गुण आत्मस्वरूपाचा प्रत्यय होय.

**तेथही उपाधीचा वोथंबा। घेऊनि श्रुति उभविती जिभा। मग नामरूपाचा बडंबा। करिती वायां॥ २७६॥**
**पैं भवस्वर्गा उबगले। मुमुक्षु योगज्ञाना वळघले। पुढती न यों इया निगाले। पैजा जेथ॥ २७७॥**

**संसाराचिया पायां पुढां। पळती वीतराग होडा। ओलांडोनि ब्रह्मपदाचा कर्मकडा। घालिती मागां॥ २७८॥**
**अहंतादिभावां आपुलियां। झाडा देऊनि आघवेयां। पत्र घेती ज्ञानिये जया। मूळघरासी॥ २७९॥**
**पैं जेथुनी हे एवढी। विश्वपरंपरेची वेलांडी। वाढती आशा जैसी कोरडी। निदैवाची॥ २८०॥**
**जिये कां वस्तूचें नेणणें। आणिले थोर जगा जाणणें। नाहीं तें नांदविलें जेणें। मीं तूं जगीं॥ २८१॥**
**पार्था तें वस्तु पहिलें। आपणपें पैं आपुलें। पाहिजे जैसें हिंवलें। हिंव हिंवे॥ २८२॥**
**आणीकही एक तया। वोळखण असे धनंजया। तरी जया कां भेटलिया। येणेंचि नाहीं॥ २८३॥**
**परी तया भेटती ऐसे। जे ज्ञाने सर्वत्र सरिसे। महाप्रळयांबूचें जैसें। भरलेपण॥ २८४॥**

**अर्थ**—अशाहि आत्मस्वरूपाच्या ठिकाणी उपाधि कल्पून मग त्याच्या आश्रयाने श्रुती नामरूपाचा वाचेने व्यर्थ गलबला करतात॥ २७६॥ संसारसुख व स्वर्गसुख या दोहोंनाहि तुच्छ मानून यात पुन: पडायचे नाही या प्रतिज्ञेने योग व ज्ञान या मार्गाला लागलेले मुमुक्षु॥ २७७॥ वैराग्यसंपन्न होऊन पैजेने जेथे संसाराची मांडणी आहे त्याच्या पलीकडे धावतात व ब्रह्मलोकरूपी कर्मकड्याला ओलांडून तोहि मागे टाकतात॥ २७८॥ जे ज्ञानी आपल्या अहंतादि सर्व भावांना नि:शेष सोडून देऊन आपल्या मूळ ब्रह्मपदाची सनद घेतात॥ २७९॥ दुर्दैवी पुरुषाची आशा जशी निष्फळ वाढते त्याप्रमाणे जेथून ह्या विश्वपरंपरेची वाढ व्यर्थ होत असते॥ २८०॥ ज्या वस्तूच्या अज्ञानामुळे एवढ्या मोठ्या जगाचे जाणणे अस्तित्वात आले व नसतेच मी-तूं पण रूढविले गेले॥ २८१॥ अर्जुना! ज्याप्रमाणे हिवाने हिवच कुडकुडूं लागावे, त्याप्रमाणे ती वस्तुच आपले पहिले-म्हणजे मूळ स्वरूप होय, असे जाणावे॥ २८२॥ अर्जुना! आणखी एक त्या वस्तूची ओळख आहे की जिला प्राप्त झाले असता पुन: संसारात परत यावे लागत नाही॥ २८३॥ महाप्रलयातील पाणी जसे सर्वत्र भरलेले असते, त्याप्रमाणे ज्ञानी पुरुष त्या स्वरूपाला असे भेटतात की ते ज्ञानाने सर्वत्र सारखे आपणच होऊन जातात॥ २८४॥

**निर्मानमोहा जितसङ्गदोषा अध्यात्मनित्या विनिवृत्तकामा:।**
**द्वन्द्वैर्विमुक्ता: सुखदु:खसञ्ज्ञैर्गच्छन्त्यमूढा: पदमव्ययं तत्॥ ५॥**

**अर्थ**—मान म्हणजे सत्कार, मोह म्हणजे अविवेक यांचा ज्यांनी त्याग केला आहे, आसक्ति व आसक्तीचे दोष ज्यांनी जिंकले आहेत, आत्मस्वरूपाचे ठिकाणी रममाण होणारे, निष्काम झालेले, सुखदु:खादि द्वंद्वापासून मुक्त झालेले, असे ते ज्ञानी पुरुष त्या अविनाशी पदाला प्राप्त होतात॥ ५॥

**जया पुरुषांचें कां मन। सांडोनि गेले मोहमान। वर्षांतीं जैसें घन। आकाशातें॥ २८५॥**
**निकवड्या निष्ठुरा। उबगिजे जेवीं सोयरा। तैसे नागवती विकारां। वेटाळूं जे॥ २८६॥**
**फळली केळी उन्मळे। तैसी आत्मलाभें प्रबळें। जयांची क्रिया ढाळेंढाळें। गळती आहे॥ २८७॥**
**आगी लागलिया रुखीं। देखोनि सैरा पळती पक्षी। तैसें सांडिले अशेखीं। विकल्पीं जे॥ २८८॥**
**आइकें सकळ दोषतृणीं। अंकुरिजती जिये मेदिनी। तिये भेदबुद्धीची काहाणी। नाहीं जयातें॥ २८९॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे वर्षाऋतूचे शेवटी आकाशातील अभ्रे निघून जातात, त्याप्रमाणे ज्याच्या मनातून मान व मोह हे नि:शेष नाहीसे झाले॥ २८५॥ ज्याप्रमाणे दरिद्री व निष्ठुर अशा पुरुषाची त्याचे आप्त उपेक्षा करतात, त्याप्रमाणे ज्याचे मन विकाराच्या स्वाधीन होत नाही॥ २८६॥ ज्याप्रमाणे फळलेले केळीचे झाड उन्मुळून पडते, त्याप्रमाणे प्रबळ आत्मप्राप्तीमुळे ज्याची कर्मप्रवृत्ति क्रमाक्रमाने क्षीण होत जाते॥ २८७॥ ज्याप्रमाणे वृक्षाला आग लागलेली पाहून त्यावरील पक्षी सैरावैरा पळतात त्याप्रमाणे संपूर्ण विकल्पांनी ज्याला सोडले आहे॥ २८८॥ अर्जुना! ऐक. संपूर्ण दोषरूपी गवताचे अंकुर ज्या द्वैतबुद्धिरूप भूमीत उगवतात त्या द्वैतबुद्धीची वार्ताहि ज्यांना नसते॥ २८९॥

**गूढार्थदीपिका**—ज्ञान्याची बुद्धि अखंड अद्वैत परब्रह्मरूप होऊन राहते. तिचा भंग न होता त्याची इंद्रिये मात्र पूर्वीच्या अभ्यासामुळे झालेल्या संस्काराप्रमाणे वागतात. ते शेण व अन्न एकरूप समजत नाहीत, हे लक्षात ठेवावे. नाहीतर कुत्र्यात व त्यांच्यात काहीहि फरक राहणार नाही. सर्व खरे भूतपूर्व व वर्तमान ज्ञानी ''भावाद्वैतं सदा कुर्यात्

क्रियाद्वैतं न कर्हिचित्'' या आचार्यवचनाप्रमाणे सर्व वस्तूंचे भावरूप अस्तित्व एक अद्वैतरूप आहे भिन्न भिन्न नाही अशी अद्वैतदृष्टि करीत आले व करीत असतात. व क्रियांचे अद्वैत कोणी समजत नसत व समजत नाहीत.

**सूर्योदयासरिसी। रात्री पळोनि जाय आपैसी। गेली देहअहंता तैसी। अविद्येसवें॥ २९०॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे सूर्योदय झाल्याबरोबर रात्र आपोआप जाते, त्याप्रमाणे आत्मज्ञानाने अविद्येचा नाश झाला की त्याबरोबरच ज्याची देहअहंताहि नाश पावते॥ २९०॥

**गूढार्थदीपिका**—आत्मज्ञान झाल्यावर ज्ञान्याचा अहं ''मी ब्रह्म'' म्हणून आत्मस्वरूपाचे ठिकाणी स्थिर होत असल्यामुळे व त्याचे तो अखंड चिंतन करीत असल्यामुळे त्याचा 'अहं' पुन: देहावर कधी येत नाही, असा अर्थ.

**पैं आयुष्यहीना जीवातें। शरीर सांडी जेवीं अवचितें। तेवीं निदसुरें द्वैतें। सांडिले जे॥ २९१॥**
**लोहाचें सांकडें परिसा। न जोडे अंधारू रवि जैसा। द्वैतबुद्धीचा तैसा। सदा दुकाळ जया॥ २९२॥**
**अगा सुखदु:खाकारें। द्वंद्वें देहीं जियें गोचरें। तियें जयां कां समोरें। होतीचिना॥ २९३॥**
**स्वप्नींचें राज्य कां मरण। नोहे हर्षशोकासि कारण। उपवढलिया जाण। जियापरी॥ २९४॥**
**तैसें सुखदु:खरूपीं। द्वंद्वीं जे पुण्यपापीं। न घेपिजतीं सर्पीं। गरुड जैसे॥ २९५॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे आयुष्य सरलेल्या जीवास शरीर एकदम सोडते, त्याप्रमाणे अज्ञानजन्य द्वैताने ज्यांना सोडले॥ २९१॥ ज्याप्रमाणे परिसाला लोखंडाचे संकट पडत नाही किंवा सूर्याला आंधार दिसत नाही, त्याप्रमाणे ज्यांचेजवळ द्वैतबुद्धीचा सदा दुष्काळ असतो॥ २९२॥ अर्जुना! अज्ञानी लोकांच्या देहाच्या ठिकाणी सुखदु:खाच्या रूपाने जे परस्परविरुद्ध भाव दिसून पडतात ते त्याला कधी भासतच नाहीत॥ २९३॥ ज्याप्रमाणे स्वप्नातील राज्यप्राप्ति किंवा मरण, जागे झाल्यावर हर्षाला किंवा शोकाला कारण होत नाही किंवा गरुड सर्पाकडून धरला जात नाही, त्याप्रमाणे पुण्य-पापरूप कर्मानी उत्पन्न होणारी सुखदु:खरूप द्वंद्वे ज्याला होत नाहीत॥ २९४-२९५॥

**आणि अनात्मवर्गनीर। सांडूनि आत्मरसाचें क्षीर। चरताति जे सविचार। राजहंस॥ २९६॥**
**जैसा वर्षोनि भूतळीं। आपला रस अंशुमाळी। मागौता आणि रश्मिजाळीं। बिंबासीचि॥ २९७॥**
**तैसें आत्मभ्रांतीसाठीं। वस्तु विखुरली बारावाटीं। ते एकवटिती ज्ञानदृष्टी। अखंड जे॥ २९८॥**
**किंबहुना आत्मयाचा। निर्धारीं विवेक जयांचा। बुडाला वोघ गंगेचा। सिंधूमांजी जैसा॥ २९९॥**
**पैं आघवेंचि आपुलेपणें। नुरेचि जयां अभिलषणें। जैसें येथूनि पऱ्हां जाणें। आकाशा नाहीं॥ ३००॥**
**जैसा अग्नीचा डोंगरु। नेघे कोणी बीजअंकुरु। तैसा मनीं जयांच्या विकारु। उदयजेना॥ ३०१॥**
**जैसा काढिलिया मंदराचळु। राहे क्षीराब्धि निश्चळु। तैसा नुठी जयां सळू। कामोर्मींचा॥ ३०२॥**
**चंद्रमा कळीं धाला। न दिसे कोणें आंगीं वोसावला। तेवीं अपेक्षेचा अवखळा। न पडे जयां॥ ३०३॥**
**हें किती बोलूं असांगडें। जेवीं परमाणु नुरे वायूपुढें। तैसें विषयांचें नावडे। नांवचि जयां॥ ३०४॥**
**एवं जे जे कोणी ऐसे। केले ज्ञानाख्यहुताशें। ते तेथ मिळती जैसें। हेमीं हेम॥ ३०५॥**
**तेथ म्हणिजे कवणें ठाईं। ऐसेंही पुससी कांहीं। तरी तें पद गा नाहीं। वेंचु जया॥ ३०६॥**
**दृश्यपणें देखिजे। कां ज्ञेयत्वें जाणिजे। अमुकें ऐसें म्हणिजे। तें जें नव्हे॥ ३०७॥**

**अर्थ**—जे ज्ञानीपुरुष, आत्म्याहून निराळे असणारे संपूर्ण जडवर्गरूपी पाणी टाकून देऊन आत्मरूपी दुग्धाचे प्राशन करणारे विचारवंत राजहंस होत॥ २९६॥ ज्याप्रमाणे सूर्य आपण शोषलेल्या पाण्याचा वर्षाव करून पुन: आपल्या किरणांनी तो बिंबाच्या ठिकाणी आणतो॥ २९७॥ त्याप्रमाणे अज्ञानभ्रांतिमुळे अनंत प्रकारांनी विखुरलेली आत्मवस्तु जे ज्ञानीपुरुष ज्ञानदृष्टीने अखंड एकरूप पाहतात॥ २९८॥ फार काय सांगावे! ज्याप्रमाणे गंगेचा ओघ समुद्रास मिळून समुद्ररूप होऊन जातो, त्याप्रमाणे ज्यांचा विवेक एका आत्म्याचाच निर्धार करणारा होतो॥ २९९॥ ज्याप्रमाणे सर्वत्र पसरले असल्यामुळे आकाशाला एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जावे लागत नाही, त्याप्रमाणे मीच सर्व झालो आहे, ह्या ज्ञानबुद्धीमुळे ज्या ज्ञान्याला दुसऱ्या कशाची इच्छाच राहत नाही॥ ३००॥ ज्याप्रमाणे

अग्नीच्या डोंगरावर कोणताहि अंकुर उत्पन्न होत नाही, त्याप्रमाणे ज्यांच्या अंत:करणात कोणत्याहि विकाराचा अंकुरच उत्पन्न होत नाही॥ ३०१॥ ज्याप्रमाणे क्षीरसमुद्रातून मंदार पर्वत काढून घेतल्यावर तो जसा शांत झाला, त्याप्रमाणे ज्याच्या अंत:करणात कामाची ऊर्मीदेखील उठतच नाही॥ ३०२॥ सोळा कळ्यांनी पूर्ण झालेला पौर्णिमेचा चंद्र कोठेहि अपूर्ण दिसत नाही, त्याप्रमाणे ज्याच्या अंगी पूर्णता बाणल्यामुळे अपेक्षा करण्याकरिता न्यूनताच भासत नाही॥ ३०३॥ किती बोलायचे! तो अवर्णनीय आहे. ज्याप्रमाणे सुटलेल्या वायुपुढे धुळीचा कण टिकत नाही, त्याप्रमाणे ज्यांना विषयाचे नावहि आवडत नाही॥ ३०४॥ ज्ञानाग्नीने जे जे कोणी असे केले गेले ते, सोन्यात सोने मिळवावे, त्याप्रमाणे तेथे (अव्यय परब्रह्माशी) मिळतात॥ ३०५॥ तेथे म्हणजे कोठे? असेहि कदाचित् विचारशील तर जे कधी नाशच पावत नाही, असे ते पद होय॥ ३०६॥ जे दृश्य म्हणजे डोळ्यांनी पाहण्याचा विषय किंवा ज्ञेय म्हणजे जाणण्याचा विषय व अमुक म्हणून जे बोटाने दाखविता येत नाही॥ ३०७॥

**गूढार्थदीपिका—**मर्यादित वस्तुच प्रत्यक्षादि प्रमाणाने जाणली जाते व बोटाने दाखविता येते. ब्रह्म अमर्याद असल्यामुळे व प्रमाणाच्याहि आधी स्वयंसिद्ध व सूक्ष्म असल्यामुळे ते प्रमाणाने जाणले जाऊ शकत नाही व बोटाने दाखविता येत नाही.

**न तद्भासयते सूर्यो न शशाङ्को न पावकः। यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम॥ ६॥**

**अर्थ—**सूर्य, चंद्र किंवा अग्नि देखील त्या पदाला प्रकाशित करू शकत नाहीत. जेथे गेले असता पुरुष पुन: परत येत नाहीत, ते माझे परम स्थान होय॥ ६॥

**पैं दीपाचिया बंबाळीं। कां चंद्र हन जें उजळी। हें काय बोलों अंशुमाळी। प्रकाशी जें॥ ३०८॥**
**तें आघवेंचि दिसणें। जयातें कां न देखणें। विश्व भासतसे जेणें। लपालेनी॥ ३०९॥**

**अर्थ—**अनेक टेंभ्याच्या उजेडाने किंवा चंद्राच्या उजेडाने, एवढेच नाही तर सूर्याच्या प्रकाशाने जेवढे काही दिसते त्या सर्वाचे दिसणे म्हणजे त्याचे न दिसणे होय. जे स्वरूप लोपले असताच विश्व दिसू लागते॥ ३०८-३०९॥

**गूढार्थदीपिका—**परमात्मप्रकाश लोपला असल्यामुळे म्हणजे परमात्मप्रकाशाच्या अज्ञानामुळे परमात्मप्रकाशाहून निराळे चंद्र, सूर्य, अग्नि इत्यादि भौतिक प्रकाश दिसत आहेत; म्हणून असे हे प्रकाश दिसतात तोपर्यंत परमात्मप्रकाश दिसणे शक्य नाही, असा अर्थ.

**जैसें शिंपीपण हारपे। तंव तंव खरें होय रुपें। कां दोरी लपतां सापें। फार होइजे॥ ३१०॥**
**तैसीं चंद्रसूर्यादि थोरें। इयें तेजें जियें फारें। तियें जयाचेनि आंधारें। प्रकाशती॥ ३११॥**

**अर्थ—**ज्याप्रमाणे जशी जशी शिंप दिसेनाशी होते तसे तसे त्यावर रुपे खरे वाटू लागते किंवा जशी जशी दोरी दिसत नाही तसा तसा सर्पाचा भास दृढ होतो॥ ३१०॥ त्याप्रमाणे जे चंद्रसूर्यादि थोर प्रकाशमान पदार्थ ज्याच्या योगाने थोर प्रकाशमान झाले आहेत॥ ३११॥

**गूढार्थदीपिका—**सृष्टीतील स्थावर जंगम पदार्थांचे ठिकाणी असणारी कार्यकारी शक्ति ही परमात्म्याचीच आहे, असा भाव.

**ते वस्तु कीं तेजोराशी। सर्वभूतात्मक सरिसी। चंद्रसूर्याच्या मानसीं। प्रकाशे जे॥ ३१२॥**
**म्हणौनि चंद्रसूर्य कडवसां। पडती वस्तूच्या प्रकाशा। यालागीं तेज जें तेजसा। तें वस्तूचें आंग॥ ३१३॥**
**आणि जयाच्या प्रकाशीं। जग हारपे चंद्रार्केसीं। सचंद्र नक्षत्रें जैसीं। दिनोदयीं॥ ३१४॥**
**नातरी प्रबोधलिये वेळे। ते स्वप्नींची दिंडी मावळे। कां नुरेचि सांजवेळे। मृगतृष्णिका॥ ३१५॥**
**तैसा जिये वस्तूच्या ठायीं। कोण्हीच कां आभासु नाहीं। तें माझें निजधाम पाहीं। पाटाचें गा॥ ३१६॥**

**अर्थ—**ती वस्तु म्हणजे तेजाची राशीच होय. ती पदार्थमात्राचे ठिकाणी सारखी असून चंद्रसूर्याचे अंतर्यामीहि तीच प्रकाशते॥ ३१२॥ त्या ब्रह्मस्वरूपाच्या प्रकाशापुढे चंद्रसूर्य हे तेजोहीन पदार्थ आहेत, म्हणून तेजस्वी वस्तुमध्ये जे तेज दिसते ते ज्या ब्रह्मवस्तूचेच परिवर्तित अंगतेज होय॥ ३१३॥ आणि ज्याप्रमाणे सूर्योदय झाला असता नक्षत्रासहित

चंद्र लोपला जातो त्याप्रमाणे ज्याच्या प्रकाशात चंद्रसूर्यासहित विश्व लोपले जाते॥ ३१४॥ किंवा ज्याप्रमाणे जाग आल्याबरोबर स्वप्नातील देखावा मावळतो किंवा संध्याकाळी मृगजळाचा भास उरत नाही॥ ३१५॥ त्याप्रमाणे ज्या स्वरूपाचे ठिकाणी त्याच्याहून अन्य कोणताच दृश्यभास भासत नाही, ते माझे सर्वोच्च धाम होय॥ ३१६॥

**गूढार्थदीपिका**—निर्गुण निराकार ब्रह्मस्वरूपाचे ठिकाणी त्यावाचून दुसरा कोणताच आभास राहत नाही, असे येथे जसे सांगितले आहे, तसाच "कंसमर्दने मुरलीवादने अघटित केले असे। की आभास काहीच उरला नसे" या पदाने एकनाथादि संतांनीहि आपल्या सगुणभक्तीचा अनुभव सांगितला आहे.

किंवा जे परब्रह्म अद्वैत भासरहित आहे, असे श्रुति म्हणते त्याचा अनुभव निर्गुणज्ञान्यांना व्यवहारकाली येत नसून समाधिकालीच येऊ शकतो. पण ज्ञानानंतरहि सगुणभक्ति करणाऱ्या भक्तांना मात्र हा अनुभव "समाधिव्युत्थानी हरि विलसे। याविण काही अन्य न भासे" सदासर्वदा असतो असे एकनाथ म्हणतात.

**पुढती जे तेथ गेले। ते न घेती माघौतीं पाउलें। महोदधीं कां मिनले। स्रोत जैसे॥ ३१७॥**
**कां लवणाची कुंजरी। सूदलिया लवणसागरीं। होयचि ना माघारी। परती जैसी॥ ३१८॥**
**नाना गेलिया अंतराळा। न येतीचि वन्हिज्वाळा। नाहीं तप्तलोहौनि जळा। निघणें जेवीं॥ ३१९॥**
**तेवीं मजसीं एकवाट। जे जाले ज्ञानें चोखट। तयां पुनरावृत्तीची वाट। मोडली गा॥ ३२०॥**

**अर्थ**—जसे नदीचे प्रवाह समुद्रात मिळाले असता पुन: परत फिरत नाहीत, त्याप्रमाणे जे माझ्या या परमपदाला प्राप्त झाले ते पुन: माघारा फिरत नाहीत॥ ३१७॥ किंवा मिठाची केलेली हत्तीण क्षार समुद्रात बुडविली असता ज्याप्रमाणे ती माघारी परत फिरत नाही॥ ३१८॥ किंवा आकाशात गेलेल्या अग्नीच्या ज्वाळा परत येत नाहीत अथवा तापलेल्या लोखंडावर टाकलेल्या पाण्याला पुन: परत येणे नाही॥ ३१९॥ त्याप्रमाणे शुद्धज्ञानाने सकार्य अविद्या नष्ट होऊन जे माझ्याशी ऐक्य पावले त्यांची संसारात परत येण्याची वाटच मोडली जाते॥ ३२०॥

**तेथ प्रज्ञापृथ्वीचा रावो। पार्थु म्हणे जी जी पसावो। परी विनंती एकी देवो। चित्त देतु॥ ३२१॥**
**तरी देवेंसि स्वयें एक होती। मग माघौते जे न येती। ते देवेंसि भिन्न आथी। कीं अभिन्न जी॥ ३२२॥**
**जरी भिन्नचि अनादिसिद्ध। तरी न येती हें असंबद्ध। जे फुलां गेलें षट्पद। ते फुलेंचि होती कां॥ ३२३॥**
**पैं लक्ष्याहुनि अनारिसें। बाण लक्ष्यीं शिवोनि जैसे। मागुते पडती तैसे। येतीचि ते॥ ३२४॥**
**नातरी तूंचि ते स्वभावें। तरी कोणें कोणेसि मिळावें। आपणयासी आपण रुपावें। शस्त्रें केवीं॥ ३२५॥**
**म्हणोनि तुजसी अभिन्ना जीवां। तुझा संयोगवियोगु देवा। न ये बोलो अवयवां। शरीरेसीं॥ ३२६॥**
**आणि जे सदां वेगळे तुजसीं। तया मिळणी नाहीं कोणे दिवसीं। मा येती न येती हे कायसी। वायबुद्धि॥ ३२७॥**
**तरी कोण गा तूतें। पावोनि न येती माघौते। हें विश्वतोमुखा मातें। बुझावीं जी॥ ३२८॥**

**अर्थ**—हे ऐकून प्रज्ञारूप पृथ्वीचा राजा अर्जुन म्हणाला, अहो जी भगवंता! हा तुमचा प्रसाद आहे, पण माझी एक प्रार्थना आहे, देवांनी चित्त द्यावे॥ ३२१॥ देवा! जे तुमच्याशी एकरूप होऊन परत येत नाहीत ते तुमच्याहून भिन्न आहेत की अभिन्न आहेत॥ ३२२॥ जर मूळचे ते तुमच्याहून स्वत:सिद्ध भिन्नच असतील तर पुन: परत येत नाहीत हे बोलणे असंबद्ध आहे. झाडांच्या फुलांवर गेलेले भ्रमर फुलेच होऊन जातात काय?॥ ३२३॥ ज्याप्रमाणे बाण जेथे मारावयाचा, त्या लक्ष्याहून निराळा असलेला, तो लक्ष्याला स्पर्श करून जसा अलग पडतो, त्याप्रमाणे तुम्हाला प्राप्त झालेले परत येतीलच॥ ३२४॥ किंवा तेहि स्वभावत: तूच असशील तर कोणी कोणात मिळायचे? एकच शस्त्र आपणातच आपण कसे खुपसले जाईल?॥ ३२५॥ म्हणून ज्याप्रमाणे शरीराशी अवयवांचा संयोग-वियोग कल्पिता येत नाही त्याप्रमाणे तुझ्याशी अभिन्न असलेल्या जीवाचाही तुझ्याशीच संयोगवियोग कल्पिता येणार नाही॥ ३२६॥ आणि जे सदासर्वदा तुझ्याहून भिन्न आहेत ते केव्हाहि तुझ्याशी मिळू शकत नाहीत; मग ते तुम्हाला प्राप्त होतात, परत येत नाहीत, हे बोलणे व्यर्थ आहे॥ ३२७॥ तरी तुम्हाला प्राप्त होऊन परत येत नाहीत ते कोण, हे सर्वत्र मुखे असलेल्या भगवंता! मला समजावून सांगा॥ ३२८॥

**इये आक्षेपीं अर्जुनाच्या। तो शिरोमणि सर्वज्ञांचा। तोषला बोध शिष्याचा। देखोनियां॥ ३२९॥**
**मग म्हणे गा महामती। मातें पावोनि न येती पुढती। ते भिन्नाभिन्न रिती। आहाती दोनी॥ ३३०॥**
**जैं विवेकें खोलें पाहिजे। तरी मी तेचि ते सहजें। ना आहाचवाहाच तरी दुजे। ऐसेही गमती॥ ३३१॥**
**जैसें पाणियांहि वेगळ। तळपतां दिसती कल्लोळ। एऱ्हवीं तरी निखिळ। पाणीचि तें॥ ३३२॥**
**कां सुवर्णाहूनि आनें। लेणीं गमती भिन्नें। मग पाहिजे तंव सोनें। आघवेंचि तें॥ ३३३॥**
**तैसें ज्ञानाचिये दिठी। मजसीं अभिन्नचि ते किरीटी। येर भिन्नपण तें उठी। अज्ञानास्तव॥ ३३४॥**
**आणि साचोकारेनि वस्तुविचारें। कैंचे मज एकासि दुसरें। जें भिन्नाभिन्नव्यवहारें। उमसिजेल॥ ३३५॥**
**आघवेंचि आकाश सूनि पोटीं। बिंबचि जैं आते खोटी। तैं प्रतिबिंब कें उठी। कें रश्मि शिरे॥ ३३६॥**
**कां कल्पांतींचिया पाणिया। काय वोत भरताती धनंजया। म्हणोनि कैंचे अंश अविक्रिया। एका मज॥ ३३७॥**
**परी ओघाचेनि मेळें। पाणी उजू परी वांकुडें जालें। रवी दुजेपण आलें। तोयबगें॥ ३३८॥**
**व्योम चौफळें कीं वाटोळें। हें ऐसें कायसयाही मिळे। परी घटमठीं वेंटाळे। तैसेंही आथी॥ ३३९॥**
**हां गा निद्रेचेनि आधारें। काय एकलेनि जग न भरे। स्वप्नीचेनि जैं अवतरे। रायपणें॥ ३४०॥**
**कां मिनलेनि किडाळें। वानिभेदासि ये सोळें। तैसा स्वमाये वेंटाळें। शुद्ध जैं मी॥ ३४१॥**

**अर्थ**—अर्जुनाने असा आक्षेप घेतला असता सर्वज्ञांचा शिरोमणि श्रीकृष्ण आपल्या प्रिय शिष्याचा बोध पाहून प्रसन्न झाले॥ ३२९॥ मग भगवान श्रीकृष्ण म्हणाले, हे बुद्धिमान अर्जुना! जो मला प्राप्त होऊन परत येत नाही, त्याचे माझ्याहून भिन्न व माझ्याशी अभिन्न असे दोन ही प्रकार आहेत॥ ३३०॥ खोल अशा विवेकदृष्टीने पाहता मी व ते स्वभावत: एक आहोत व नुसते वरवर दृष्टीने पाहता ते माझ्याहून भिन्नहि दिसतात॥ ३३१॥ ज्याप्रमाणे पाण्यावर उठलेले कल्लोळ वेगळे असे दिसतात, पण ते खरोखर पाणीरूपच असतात॥ ३३२॥ किंवा सोन्याहून अलंकार निराळे वाटतात, पण विचार करून पाहू गेल्यास ते संपूर्ण सोनेच असते॥ ३३३॥ त्याप्रमाणे अर्जुना! ज्ञानदृष्टीने पाहता ते माझ्याशी अभिन्नच आहेत. बाकी अज्ञानामुळे ते माझ्याहून भिन्न वाटतात॥ ३३४॥ खरोखर ब्रह्मवस्तूचा विचार केला असता माझ्या (अफुट, अद्वैतरूप, अमर्याद, अविक्रिय अशा) स्वरूपाचे ठिकाणी भिन्नाभिन्न शब्दाचा व्यवहार लागू पडेल अशी दुसरी वस्तु कोठून असणार?॥ ३३५॥ सर्व आकाश पोटात घालून सर्व एक बिंबच झाले तर त्याचे प्रतिबिंब कोठे पडेल किंवा त्याची किरणे कोठे शिरतील?॥ ३३६॥ किंवा अर्जुना! कल्पाच्या शेवटी सर्व ब्रह्मांड बुडून जलमय करणाऱ्या पाण्याला, नद्यांना पूर येऊन फुटलेले त्याचे प्रवाह भरतात काय? म्हणून अपरिणामी, अफुट, अवयव नसणाऱ्या अशाला माझे अंश कोठून असणार?॥ ३३७॥ पाणी सरळच असते, पण प्रवाहामुळे ते वाकडे होते. सूर्य एकच पण पाण्याच्या संबंधामुळे त्याला दोनपणा येतो॥ ३३८॥ वाटोळे किंवा चौकोनी या आकाराला आकाश कसे प्राप्त होईल? पण ते घटात किंवा मठात सापडले असता तसेहि होते॥ ३३९॥ झोपेमध्ये जेव्हा मी सार्वभौम राजा झालो असे स्वप्न पडते तेव्हा एकच पुरुष जगभर होत नाही काय?॥ ३४०॥ किंवा हीणकटाने मिसळलेले शुद्ध सोने नाना प्रकारच्या कसोटीचे होते, त्याप्रमाणे शुद्ध अद्वैतस्वरूप जो मी, जेव्हा आपल्या मायेने वेटाळला जातो॥ ३४१॥

**गूढार्थदीपिका—तैसा स्वमाये वेटाळे**

''तैसा स्वमाये वेटाळे'' या पदावरून माया एक पदार्थ आहे व तिचा व ब्रह्माचा केव्हा तरी संबंध होऊन जीव उत्पन्न झाला असे माउलीचे म्हणणे आहे, असे कोणी समजू नये. कारण तसे सिद्धच होत नाही. जीवाने कल्पिलेल्या 'मी ब्रह्म जाणत नाही' इत्यादि भ्रांतिरूप मायेचा व जीवाचा जो अनादि संबंध आहे त्याचे जीवाचे ठिकाणी कसे व कोणते परिणाम होतात एवढेच माउलीने येथे दाखविले आहे.

**तैं अज्ञान एक रूढे। तेणें कोहं विकल्पाचें मांडे। मग विवरूनि कीजे फुडें। देहोऽहं ऐसें॥ ३४२॥**

**अर्थ**—तेव्हा मी ब्रह्म जाणत नाही असे एक अज्ञान रूढ होते व त्याच्या योगाने 'कोहं' मी कोण असा

विकल्प उठतो व पुढे विचार करून तो 'देहोहं', मी देह आहे, असे म्हणतो ॥ ३४२ ॥

**गूढार्थदीपिका-अज्ञान एक रूढे**—आत्मविस्मृतिरूप मायाभ्रांतीलाच अज्ञान असे नाव रूढ होते किंवा भ्रांत झालेला जीव मी ब्रह्म जाणत नाही असे आत्मस्वरूपाविषयीचे अज्ञान बोलत असतो.

**कोहंविकल्पाचे मांडे**-मग जीवाच्या ठिकाणी असलेल्या त्या आत्मविस्मृतिरूप अज्ञानाचा भ्रांतीने "कोऽहं" म्हणजे 'मी कोण' असा विकल्प उठतो व जीव अज्ञानाने विचार करूनच मी म्हणजे देह असा निश्चय करतो, असा अर्थ.

**ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः। मनः षष्ठानीन्द्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति ॥ ७ ॥**

**अर्थ**—ह्या संसारात जो जीव म्हणून प्रसिद्ध आहे तो माझाच अनादि अंश आहे-म्हणजे अंशासारखा आहे. तो आपआपल्या गोलकाच्या ठिकाणी असलेल्या व मन ज्यांच्यात सहावे आहे अशा इंद्रियांना आकर्षण करतो-म्हणजे ताब्यांत ठेवतो ॥ ७ ॥

**ऐसें शरीराचि येवढें। जैं आत्मज्ञान वेगळें पडे। तैं माझा अंशु ऐसें आवडे। थोडेपणें ॥ ३४३ ॥**

**अर्थ**—ज्ञानरूप आत्मा जेव्हा देहाहंतेमुळे देहापुरता व वेगळा वाटतो तेव्हा (तो सर्वव्यापक असूनहि) माझ्या अंशासारखा मर्यादित भासतो ॥ ३४३ ॥

**गूढार्थदीपिका**—दृष्टिसृष्टिवादाच्या दृष्टीने जीव एकच आहे व तोच एकजीववाद "ममैवांशो जीवलोके" या श्लोकात घेतला आहे. आणि "अंशो नानाव्यपदेशात्" (ब्र० सू० २-३-४३) या सूत्रात सत्तात्रयवादानुसार जीवाचे नानात्व मानून भाष्यकाराने भाष्य केले आहे किंवा दृष्टिसृष्टिवादातील नाना अंतःकरणप्रतिबिंबित नाना जीवाभासाला धरून भाष्य केले आहे, असे समजावे.

परब्रह्म निरवयव असल्यामुळे ते विभागले जाऊ शकत नाही. ते अखंड अफुटच राहते; म्हणून जीव खरो-खरच परमेश्वराचा अंश आहे, असे मानता येत नाही, असे भगवान आचार्यांनी वरील सूत्रावर भाष्य करतांना स्पष्ट केले आहे.

जीव पूर्ण परब्रह्मस्वरूपच असून मायाभ्रांतीने तो आपल्याला जे शरीरापुरते मर्यादित मानतो, त्या त्याच्या भ्रांत मर्यादित समजुतीला धरून येथे 'अंश' शब्द वापरला आहे.

**समुद्र कां वायुवशें। तरंगाकार उल्लसे। तो समुद्रांशु ऐसा दिसे। सानिवा जेवीं ॥ ३४४ ॥**
**तेवीं जडातें जीवविता। देहअहंता उपजविता। मी जीव गमें पांडुसुता। जीवलोकीं ॥ ३४५ ॥**

**अर्थ**—वाऱ्यामुळे समुद्रावर तरंग उसळला की तो जसा समुद्राच्या एका छोट्याशा अंशासारखा भासतो ॥ ३४४ ॥ त्याप्रमाणे अर्जुना! जडाला सचेतन करणारा व देहाची अहंता उत्पन्न करणारा मीच जीवलोकांत 'जीव' असा वाटतो ॥ ३४५ ॥

**गूढार्थदीपिका—मी जीव गमे**-सच्चिदानंद परब्रह्म अखंड मायारहित शुद्धच असते. जीवाच्या ठिकाणी असलेल्या माया भ्रांतीला तेज आधार आहे. दृष्टिसृष्टिवादात मायोपहित ब्रह्मालाच जीव म्हणतात व त्या वादाच्या दृष्टीने मी शुद्धब्रह्मच मायेला आधार असल्यामुळे जीवरूप भासतो, असे "मी जीव गमे" या पदाने सुचविले आहे.

**पैं जीवाचिया बोधा। गोचरु जो हा धांदा। तो जीवलोक शब्दा। अभिप्रावो ॥ ३४६ ॥**
**अगा उपजणें निमणें। हें साचचि जें कां मानणें। तो जीवलोकु मी म्हणें। संसारु हन ॥ ३४७ ॥**

**अर्थ**—जीवाच्या ज्ञानाला विषय होणारा जेवढा सर्व व्यवहार आहे, तोच सर्व 'जीवलोके' या शब्दाचा अभिप्रेत अर्थ आहे ॥ ३४६ ॥ उत्पत्ति व नाश हे जेथे खरे मानले जातात, त्यालाच जीवलोके किंवा संसार असे मी म्हणतो ॥ ३४७ ॥

**गूढार्थदीपिका**—अविनाशी परब्रह्माचे उत्पत्ति-नाशच राहू शकत नाहीत व अद्वितीय परब्रह्माशिवाय दुसरी वस्तुच नसल्यामुळे दुसऱ्या कोणाचे उत्पत्ति-नाश असू शकत नाहीत. असे असताना उत्पत्ति-नाश खरे आहेत अशी जेथे भ्रांति आहे, तो 'जीवलोक' होय.

**एवंविध जीवलोकीं। तूं मातें ऐसा अवलोकीं। जैसा चंद्रु कां उदकीं। उदकातीत॥ ३४८॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे पाण्यात चंद्राचे बिंब पडले तरी चंद्र हा पाण्याहून निराळा असतो, त्याप्रमाणे जीवलोकातहि मला जीवलोकाहून निराळे पाहा॥ ३४८॥

**गूढार्थदीपिका**—दृष्टिसृष्टिवादानुसार अंत:करणस्थ जीवाभास किंवा सृष्टिदृष्टिवादानुसार अविद्यायुक्त जीवच बद्धयुक्त मानला जातो; पण परमेश्वराला कोणी निरुपाधिक, कोणी मायोपाधिक, कोणी मायाधार असे अनेक प्रकारे मानले असले तरी कोणी त्याला बद्ध मानले नाही. सर्वांनी त्याला नित्य मुक्तच मानले आहे. म्हणून परमेश्वराचे अवतारहि कोण्याहि प्रकारे परमेश्वरापेक्षा न्यून किंवा अपूर्ण असू शकत नाहीत.

**पैं काश्मीराचा रवा। कुंकुमावरी पांडवा। आणिका गमे लोहिवा। तो तरी नव्हे॥ ३४९॥**
**तैसें अनादिपण न मोडे। माझें अक्रियत्व न खंडे। परी कर्ता भोक्ता ऐसें आवडे। ते जाण गा भ्रांती॥ ३५०॥**
**किंबहुना आत्मा चोखटु। होऊनि प्रकृतीसी एकवटु। बांधे प्रकृतिधर्माचा पाटु। आपणपयां॥ ३५१॥**
**पैं मनादि साही इंद्रियें। श्रोत्रादि प्रकृतिकार्यें। तिये माझीं म्हणौनि होये। व्यापारारूढ॥ ३५२॥**

**अर्थ**—अर्जुना! स्फटिकाचा तुकडा कुंकुमावर पडला तर इतरांना तो लाल दिसतो, पण तो लाल होत नाही॥ ३४९॥ त्याप्रमाणे माझे अनादिपण नाहीसे होत नाही व अक्रियत्व कधीहि भंग पावत नाही, तरी मला जे कर्ता भोक्ता समजतात ती केवळ भ्रांति आहे, असे जाण॥ ३५०॥ फार काय सांगायचे! आत्मा (जीवात्मा) अत्यंत शुद्ध, निर्मळ आहे; पण तो प्रकृतीशी ऐक्य पावल्याप्रमाणे होऊन आपले ठिकाणी प्रकृतीच्या धर्माचा प्रवाह लावून घेतो॥ ३५१॥ मनासह सहा श्रोत्रादि इंद्रिये जी प्रकृतीचे कार्य होत, ती माझी आहेत, असे समजून जीवात्मा त्यांच्या व्यापारावर आरूढ होतो-म्हणजे ते व्यापार मी केले असा अहंकार धारण करतो॥ ३५२॥

**जैसें स्वप्नीं परिव्राजें। आपणपयां आपण कुटुंब होईजे। मग तयाचेनि धांविजे। मोहें सैरा॥ ३५३॥**
**तैसा आपलिया विस्मृती। आत्मा आपणचि प्रकृती-। सारिखा गमोनि पुढती। तियेसीचि भजे॥ ३५४॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे कुटुंबाची आसक्ति राहिलेला संन्यासी स्वप्नामध्ये आपणच आपले कुटुंब होऊन त्यांच्या मोहाने सैरावैरा धावतो॥ ३५३॥ त्याप्रमाणेच जीवात्मा आपला मूळ ब्रह्मपणा विसरून आपणच प्रकृतिसारखा भासतो व पुढे तिच्याच ठिकाणी आसक्त होतो॥ ३५४॥

**गूढार्थदीपिका**—येथे "आत्मा" याचा शुद्ध आत्मा असा अर्थ नसून "जीवात्मा" असा अर्थ आहे.

**मनाच्या रथीं वळघे। श्रवणाच्या द्वारें निघे। मग शब्दाचिया रिघे। रानामाजीं॥ ३५५॥**
**तोचि प्रकृतीचा वागोरा। करी त्वचेचिया मोहरा। आणि स्पर्शाचिया घोरा। वना जाय॥ ३५६॥**
**कोणे एके अवसरीं। रिघोनि नेत्राच्या द्वारीं। मग रूपाच्या डोंगरीं। सैरा हिंडे॥ ३५७॥**
**कां रसनेचिया वाटा। निघोनि गा सुभटा। रसाचा दरकुटा। भरोंचि लागे॥ ३५८॥**
**नातरी येणेंचि घ्राणें। मदंश करी निघणें। मग गंधाचीं दारुणें। आडवें लंघी॥ ३५९॥**
**ऐसेनि देहेंद्रियनायकें। धरूनि मन जवळिकें। भोगिजती शब्दादिकें। विषयभरणें॥ ३६०॥**

**अर्थ**—मनाच्या रथावर बसून श्रवणेंद्रियद्वारा बाहेर पडतो व मग शब्दाच्या अरण्यांत शिरतो-म्हणजे नाना प्रकारचे शब्द ऐकतो॥ ३५५॥ तोच प्रकृतीचा लगाम करून त्वचेंद्रिय मार्गाने स्पर्शरूपी घोर वनांत शिरतो॥ ३५६॥ केव्हा नेत्रेंद्रियाच्या द्वारे बाहेर निघून रूपविषयाच्या डोंगरावर सैरावैरा भटकतो॥ ३५७॥ किंवा, हे थोर योद्धया अर्जुना! रसनेंद्रियाच्या वाटेने जाण्याला निघून रसाची दरी भरू लागतो॥ ३५८॥ किंवा माझा अंशरूप जीवात्मा घ्राणेंद्रियाच्या द्वाराने बाहेर निघण्याची तयारी करून गंधरूपी दाट अरण्ये ओलांडतो॥ ३५९॥ याप्रमाणे दहा इंद्रियांचा स्वामी जो जीवात्मा तो मनाला जवळ करून शरीराचे पोषण करणारे शब्दादि विषय भोगतो॥ ३६०॥

**शरीरं यदवाप्नोति यच्चाप्युत्क्रामतीश्वर:। गृहीत्वैतानि संयाति वायुर्गन्धानिवाशयात्॥ ८॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे वायु पुष्पांचा सुगंध घेऊन जातो, त्याप्रमाणे संघातरूप शरीराचा स्वामी जीव जेव्हा देह सोडून दुसरा देह घेतो तेव्हा तो मनासह सर्व इंद्रियांना घेऊनच जातो॥ ८॥

**गूढार्थदीपिका**—मरतेवेळी जीव हा स्थूलदेह येथेच सोडून दहा इंद्रिये, पंचप्राण, मन व बुद्धि ही सतरा तत्वे मिळून झालेल्या लिंगदेहास मात्र घेऊन जातो, असा भाव.

वेदान्तसूत्र ३-१-१ मध्ये भाष्यकारांनी याचा विचार केला आहे.

**परी कर्ता भोक्ता ऐसें। हें जीवाचें तैंचि दिसे। जैं शरीरीं कां पैसे। येकाधिये॥ ३६१॥**

**अर्थ**—जेव्हा जीव एखादे शरीरात प्रवेश करतो तेव्हाच त्याचे कर्तृत्व भोक्तृत्व दिसते॥ ३६१॥

**गूढार्थदीपिका**—कर्तृत्व भोक्तृत्व हे दोन्ही लिंगशरीरान्तर्गत मनाचे धर्म असले तरी लिंग शरीर हे स्थूल शरीरावाचून नुसते एकटे राहू शकत नाही व स्थूल शरीर घेतल्याशिवाय कर्तृत्व भोक्तृत्व हे प्रगटहि होत नाहीत.

**जैसा आथिला आणि विलासिया। तैंचि वोळखों ये धनंजया। जैं राजसेव्या ठाया। वस्तीसि ये॥ ३६२॥**
**तैसा अहंकर्तृत्वाचा वाढ। कां विषयेंद्रियांचा धुमाड। हा जाणिजे तैं निवाड। जैं देह पावे॥ ३६३॥**
**अथवा शरीरातें सांडी। तऱ्ही इंद्रियांची तांडी। हे आपणपयांसवें काढी। घेऊनि जाय॥ ३६४॥**
**जैसा अपमानिला अतिथि। ने सुकृताची संपत्ति। कां साइखडेयाची गति। सूत्रतंतू॥ ३६५॥**
**नाना मावळतेनि तपनें। नेइजती लोकांचीं दर्शनें। हें असो द्रुती पवनें। नेइजे जैसी॥ ३६६॥**
**तेवीं मनषष्ठां ययां। इंद्रियांतें धनंजया। देहराजु ने देहा-। पासूनि गेला॥ ३६७॥**

**अर्थ**—अर्जुना! ज्याप्रमाणे राजाने ज्या नगरात वस्ति केली आहे तेथेच जेव्हा मनुष्य येऊन राहतो तेव्हाच तो श्रीमंत व विलासी भोग करणारा आहे, असे कळून यते॥ ३६२॥ त्याप्रमाणेच जेव्हा स्थूल देह प्राप्त होतो तेव्हाच कर्तृत्वाहंकाराची वाढ व विषय इंद्रिये यांचा जोराचा उठाव असतो. असाच निर्णय जाण॥ ३६३॥ तसेच देह सोडतेवेळी हा जीवात्मा मन व इंद्रिये यांचा समुदाय आपल्याबरोबर घेऊन जातो॥ ३६४॥ ज्याप्रमाणे आलेल्या अतिथीचा अपमान झाला असता तो यजमानाची पुण्यसंपत्ति घेऊन जातो किंवा बाहुल्याचे चळणवळण सूत्र हालविणाऱ्याचे स्वाधीन असते॥ ३६५॥ किंवा मावळता सूर्य लोकांची दृष्टि घेऊन जातो अथवा वायु जसा सुगंध घेऊन जातो॥ ३६६॥ त्याप्रमाणे अर्जुना! देहाचा राजा जीवात्मा देह सोडून जाताना मन व इंद्रिये यांना घेऊन जातो॥ ३६७॥

**श्रोत्रं चक्षुः स्पर्शनं च रसनं घ्राणमेव च। अधिष्ठाय मनश्चायं विषयानुपसेवते॥ ९॥**

**अर्थ**—श्रवणेंद्रिय, चक्षुरिंद्रिय, स्पर्शेंद्रिय, वागिंद्रिय, घ्राणेंद्रिय व मन यांच्यावर आरूढ होऊन म्हणजे यांचा अभिमान धरून जीवात्मा विषय भोगतो॥ ९॥

**मग येथ अथवा स्वर्गीं। जेथ जें देह आपंगी। तेथ तैसेंचि पुढती पांगी। मनादिक॥ ३६८॥**
**जैसा मालवलिया दिवा। प्रभेसीं जाय पांडवा। मग उजळिजे तेथ तेधवां। तैसाचि फांके॥ ३६९॥**
**परी ऐसैसिया राहाटी। अविवेकियांचि दिठी। येतुलें हें किरीटी। गमेचि गा॥ ३७०॥**
**जे आत्मा देहासी आला। आणि विषयो येणेंचि भोगिला। अथवा देहोनि गेला। हें साचचि मानी॥ ३७१॥**
**एऱ्हवीं येणें आणि जाणें। कां करणें आणि भोगणें। हें प्रकृतीचें तेणें। मानियेलें॥ ३७२॥**

**अर्थ**—मग इहलोकात असो किंवा स्वर्गलोकात असो जेथे जेथे जसा देह प्राप्त होतो तेथे तेथे तो मनासह इंद्रियांचा आश्रय करतो॥ ३६८॥ अर्जुना! ज्याप्रमाणे दिवा विझविला असता तो प्रकाश घेऊन जातो व पुन: उजळला की सहजच प्रकाशासहच उजळला जातो॥ ३६९॥ अर्जुना! अशा राहाटीमुळे अज्ञानी लोकांच्या दृष्टीला याप्रमाणे वाटत असते की॥ ३७०॥ आत्मा देहात आला म्हणजे जन्मला, विषय यानेच भोगला किंवा हाच देहातून गेला, हे सर्व ते खरे मानतात॥ ३७१॥ वास्तविक पाहता येणे-जाणे (जन्म-मृत्यु) किंवा करणे-भोगणे हे सर्व प्रकृतीचे धर्म आहेत, पण जीवाने ते धर्म आपल्या ठिकाणी मानून घेतले आहेत॥ ३७२॥

**उत्क्रामन्तं स्थितं वापि भुञ्जानं वा गुणान्वितम् । विमूढा नानुपश्यन्ति पश्यन्ति ज्ञानचक्षुषः ॥ १० ॥**
**यतन्तो योगिनश्चैनं पश्यन्त्यात्मन्यवस्थितम् । यतन्तोऽप्यकृतात्मानो नैनं पश्यन्त्यचेतसः ॥ ११ ॥**

**अर्थ**—देह सोडून जाताना, देहात असताना, विषयादि भोग भोगताना अथवा गुणयुक्त असताना अज्ञानी लोक आपल्या स्वरूपास पाहत नाहीत. ज्यांना ज्ञानदृष्टि प्राप्त झाली ते मात्र पाहतात ॥ १० ॥ शमदमादिद्वारा परमेश्वरप्राप्तीचा अभ्यास करणारे योगी आपल्या बुद्धीचे ठिकाणी परमेश्वरास पाहतात व परमेश्वराच्या प्राप्तीची इच्छा करणारे पण शमदमादिद्वारा चित्त शुद्ध न केल्यामुळे ज्यांचे चित्त स्वाधीन झाले नाही, असे पुरुष परमेश्वरास पाहू शकत नाहीत ॥ ११ ॥

**परी देहाचें मोटकें उभें। आणि चेतना तेथ उपलभे। तिये चळवळेचेनि लोभें। आला म्हणती ॥ ३७३ ॥**
**तैसेंचि तयां संगतीं। इंद्रियें आपलालां अर्थीं वर्तती। तया नांव सुभद्रापती। भोगणें जया ॥ ३७४ ॥**
**पाठीं भोगक्षीण आपैसें। देह गेलिया तें न दिसे। तेथें गेला गेला ऐसें। बोभाती गा ॥ ३७५ ॥**
**पैं रुख डोलत देखावा। तरी वारा वाजत मानावा। रुख नसे तेथें पांडवा। नाही तो गा ॥ ३७६ ॥**
**कां आरसा समोर ठेविजे। आणि आपणपें तेथ देखिजे। तरी तेधवांचि जालें मानिजे। काय आधीं नाहीं ॥ ३७७ ॥**
**कां परता केलिया आरिसा। लोपु जाला तया आभासा। तरी आपणपें नाहीं ऐसा। निश्चयो करावा ॥ ३७८ ॥**
**शब्द तरी आकाशाचा। परी कपाळीं पिटे मेघांचा। कां चंद्रीं वेग अभ्राचा। आरोपिजे ॥ ३७९ ॥**
**तैसे होइजे जाइजे देहें। तें आत्मसत्ते अविक्रिये। निष्टंकिती गा मोहें। आंधळे ते ॥ ३८० ॥**

**अर्थ**—देह थोडा तयार होऊन चेतनाची चळवळ दिसू लागली की चळवळीमुळे लोभ उत्पन्न होऊन जीव जन्माला आला असे मनुष्य म्हणू लागतो ॥ ३७३ ॥ त्याप्रमाणेच त्या चेतनाचे संगतीने इंद्रिये जी आपआपल्या विषयाचे ठिकाणी प्रवृत्त होतात, हे अर्जुना! त्याला त्या चेतनाचे भोगणे म्हणतात ॥ ३७४ ॥ नंतर आपोआपच भोग क्षीण होऊन देह पडला की चेतना दिसत नाही तेव्हा तो गेला गेला म्हणून रडतात ॥ ३७५ ॥ वृक्ष हालत असला तर वारा वाहत आहे असे म्हणावे आणि अर्जुना! त्याचे हालणे बंद झाले म्हणजे वारा नाही, असे म्हणावे काय? ॥ ३७६ ॥ किंवा आरसा समोर ठेवला असता त्यात आपले मुख आपण प्रतिबिंबित झालेले पाहतो; म्हणून आपण तेव्हाच उत्पन्न झालो, आधी नव्हतो, असे मानायचे काय? ॥ ३७७ ॥ किंवा आरसा बाजूला नेला असता त्यात पडलेले प्रतिबिंब दिसेनासे होते, तेव्हा आपण नाही असा निश्चय करावा काय? ॥ ३७८ ॥ ध्वनि आकाशाचा गुण होय, पण तो अभ्राच्या कपाळी लावला जातो किंवा अभ्रांचा वेग चंद्रावर आरोपित केला जातो ॥ ३७९ ॥ त्याप्रमाणे येणे जाणे देहासच लागू आहे. असे असताना अविक्रिय अशा आत्मसत्तेच्या ठिकाणी जे त्याचा आरोप करतात ते अविचाराने आंधळे झाले आहेत, असे समजावे ॥ ३८० ॥

**येथ आत्मा आत्मयाच्या ठायीं। देखिजे देहींचा धर्मु देहीं। ऐसे देखणें ते पाहीं। आन आहाती ॥ ३८१ ॥**

**अर्थ**—येथे आत्मा आपल्या ठिकाणीच आहे व देहाचे धर्म देहाच्या ठिकाणीच आहेत, असे जे पाहणे ते काही वेगळेच आहे, पाहा! ॥ ३८१ ॥

**गूढार्थदीपिका**—देहधर्माचा आत्म्याचे ठिकाणी व चैतन्य धर्माचा देहाच्या ठिकाणी मिथ्या आरोप करून जीव संसाराचा मिथ्याच अनुभव घेतात.

**ज्ञानें कां जयांचे डोळे। देखोनि न राहाती देहींचे खोळे। सूर्यरश्मी आणियाळे। ग्रीष्मीं जैसें ॥ ३८२ ॥**
**तैसी विवेकाचेनि पैसें। जयांची स्फूर्ती स्वरूपीं बैसे। ते ज्ञानिये देखती ऐसें। आत्मयातें ॥ ३८३ ॥**
**जैसें तारांगणीं भरलें। गगन समुद्रीं बिंबलें। परी तें तुटोनि नाहीं पडिलें। ऐसें निवडे ॥ ३८४ ॥**
**गगन गगनींचि आहे। हें आभासे तें वाये। तैसा आत्मा देखती देहें। गंवसिलाही ॥ ३८५ ॥**
**खळाळाच्या लगबगीं। फेडूनि खळाळाच्या भागीं। देखिजे चंद्रिका कां उगी। चंद्रीं जेवीं ॥ ३८६ ॥**
**कां नाडरचि भरे शोषे। सूर्य तो जैसा तैसाचि असे। देह होतां जातां तैसें। देखती मातें ॥ ३८७ ॥**

**घट मठ घडले। तेचि पाठीं मोडले। परि आकाश तें संचलें। असतचि असे॥ ३८८॥**
**तैसें अखंडे आत्मसत्ते। अज्ञानदृष्टिकल्पितें। हें देहचि होतें जातें। जाणती फुडें॥ ३८९॥**
**चैतन्य चढे ना वोहटे। चेष्टवी ना चेष्टे। ऐसें आत्मज्ञानें चोखटें। जाणती ते॥ ३९०॥**

अर्थ—ज्याप्रमाणे ग्रीष्मऋतूत सूर्याची प्रखर किरणे ढगात अडकून पडत नाहीत, त्याप्रमाणे आत्मस्वरूपाला पाहून ज्याचे डोळे किंवा ज्याची दृष्टि देहरूपी खोळीतच पडत नाही॥ ३८२॥ तसेच आत्मानात्मविचाराने ज्यांची अहंवृत्ति देहाला सोडून आत्मस्वरूपाचे ठिकाणी स्थिर झाली असे ज्ञानी पुरुष अशा प्रकारे आत्मस्वरूपाला पाहतात॥ ३८३॥ ज्याप्रमाणे नक्षत्रांनी भरलेले आकाश समुद्रात प्रतिबिंबित होते परंतु ते तुटून पडले नाही असाच निश्चय राहतो॥ ३८४॥ आकाश आकाशाचे ठिकाणीच असून समुद्रात जे आकाश भासत आहे ते खोटे आहे (असे मनुष्य जाणतो). त्याप्रमाणे देहाचे ठिकाणी चैतन्याची सत्ता दिसत असली तरी आत्मा देहाहून निराळा आपल्याच ठिकाणी आहे, असे ते ज्ञानी पुरुष जाणतात॥ ३८५॥ नदीच्या प्रवाहाच्या वेगामुळे होणाऱ्या पाण्याच्या खळखळीत चंद्राचा प्रकाश खळखळत दिसत असला तरी तो प्रकाश चंद्राच्या ठिकाणी व स्थिर आहे, असे आपण जाणत असतो॥ ३८६॥ किंवा पाण्याचे डबके पाण्याने भरते व सुकते (त्यामुळे त्यात पडलेले प्रतिबिंब दिसते व नाहीसे होते); पण सूर्य जशाच्या तसाच राहतो, त्याप्रमाणे देह होत जात असताना मी अखंड निर्विकार राहतो, असे ज्ञानी पुरुष मला जाणतात॥ ३८७॥ ज्याप्रमाणे घट, मठ तयार केले व नंतर ते मोडले, पण आकाश जसेच्या तसेच (उत्पत्ति-नाश रहित राहते)॥ ३८८॥ त्याप्रमाणे अखंड अशा आत्मसत्तेवरच अज्ञानदृष्टीने कल्पिलेले देह होतात-जातात, असे ते ज्ञानी पुरुष स्पष्ट जाणतात॥ ३८९॥ चैतन्य अधिक होत नाही किंवा कमीहि होत नाही. ते काही करवतहि नाही व करीत नाही, असे ज्ञानी पुरुष शुद्ध आत्मज्ञानाने जाणत असतात॥ ३९०॥

**आणि ज्ञानही आपैतें होईल। प्रज्ञा परमाणुही उगाणा देईल। सकळ शास्त्रांचें येईल। सर्वस्व हातां॥ ३९१॥**
**परी ते व्युपत्ती ऐसी। जरी विरक्ती न रिगे मानसीं। तरी सर्वात्मका मजसीं। नव्हेचि भेटी॥ ३९२॥**
**पैं तोंड भरो कां विचारा। आणि अंत:करणीं विषयांसी थारा। तरी नातुडें धनुर्धरा। त्रिशुद्धी मी॥ ३९३॥**

**अर्थ**—आणि ज्ञान प्राप्त होईल, बुद्धि परमाणूचीहि गणती सांगेल, सर्व शास्त्रांचे सिद्धान्त हाती येतील॥ ३९१॥ पण उपपत्तीने असे शब्दज्ञान होऊनहि चित्तात दृढ वैराग्य बाणले नाही तर, सर्वान्तर्यामि राहणारा जो मी, त्या माझ्याशी ऐक्य होऊ शकत नाही॥ ३९२॥ तोंडभर ब्रह्मविचार बोलता येऊनहि जर अंत:करणात विषयाचे चिंतन राहील तर, हे अर्जुना! माझी प्राप्ति होणार नाही, हे त्रिवार सत्य आहे॥ ३९३॥

**गूढार्थदीपिका**—''विवेकाविण वैराग्य आंधळे। वैराग्यविण विवेक पांगळे। हे एकएका अवेगळे। झाल्याविण न कळे परमार्थ॥ ७४॥'' (चतु:श्लोकी भाग०) वैराग्यावाचून ज्ञान शब्दमात्रच राहते व ते मनुष्याला कृतार्थ करू शकत नाही असे नाथांनीहि चतु:श्लोकी भागवतात म्हटले आहे.

**हां गा वोसणतयाच्या ग्रंथीं। काइ तुटती संसारगुंती। कीं परिवसिलिया पोथी। वाचिली होय॥ ३९४॥**
**नाना बांधोनियां डोळे। घ्राणीं लाविजती मुक्ताफळें। तरी तयांचें काय कळे। मोल मान॥ ३९५॥**
**तैसा चित्तीं अहंते ठावो। आणि जिभे सकळशास्त्रांचा सरावो। ऐसेनि कोडी एक जन्म जावो। परी न पविजे मातें॥ ३९६॥**
**जो एक मी कां समस्तीं। व्यापकु असें भूतजातीं। ऐक तिये व्याप्ती। रूप करूं॥ ३९७॥**

**अर्थ**—स्वप्नात ब्रह्मविचाराचे ग्रंथ बरळण्याने संसाराचे बंधन तुटेल काय? किंवा पोथीवरून हात फिरविला असता पोथी वाचली असे होते काय?॥ ३९४॥ किंवा डोळे बांधून मोत्ये नाकास लाविली असता त्याची किंमत व वजन कळेल काय?॥ ३९५॥ त्याप्रमाणे चित्तात देहाहंकार कायम राहून वाचेला सर्व शास्त्रे मुखपाठ झाली तरी कोट्यावधी जन्म घेऊनहि माझी प्राप्ति होणार नाही॥ ३९६॥ जो मी एक अद्वैतस्वरूप सर्व प्राणीमात्रांच्या ठिकाणी व्यापून आहे, त्या माझ्या व्याप्तीचे स्वरूप सांगतो, ऐक॥ ३९७॥

**यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेऽखिलम्। यच्चन्द्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकम्॥ १२॥**

**अर्थ**—सर्व जगाला भासविणारे सूर्याचे जे तेज आहे, तसेच चंद्राचे आणि अग्नीचे ठिकाणी जे तेज आहे, ते माझेच आहे, असे जाण॥ १२ ॥

**तरी सूर्यासकट आघवी। हे विश्वरचना जे दावी। ते दीप्ति माझी जाणावी। आद्यंतीं आहे॥ ३९८ ॥**
**जळ शोषूनि गेलिया सविता। ओलांश पुरवीतसे जे माधौता। ते चंद्रीं पांडुसुता। ज्योत्स्ना माझी॥ ३९९ ॥**
**आणि दहन पाचन सिद्धी। करीतसे जे निरवधी। ते हुताशीं तेजोवृद्धी। माझीचि गा॥ ४०० ॥**

**अर्थ**—सूर्यासह सर्व प्रपंचरचना दाखविणारे जे तेज (ज्ञानप्रकाश) आहे ते माझेच असून जे जगाच्या पूर्वी व जगाच्या नंतरहि राहते॥ ३९८ ॥ अर्जुना! सूर्याने जल शोषून घेतल्यानंतर वनस्पतींना ओलावा पुरविणारा चंद्राचे ठिकाणचा (शांत) प्रकाश माझाच होय॥ ३९९ ॥ आणि अमर्याद जाळणारी व खाल्लेले पचविणारी जी अग्नीचे ठिकाणी तेजाची वाढ दिसून येते ती माझीच आहे॥ ४०० ॥

**गामाविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा । पुष्णामि चौषधीः सर्वाः सोमो भूत्वा रसात्मकः॥ १३ ॥**

**अर्थ**—पृथ्वीत राहून मीच आपल्या सामर्थ्याने सर्व भूतांचे धारण करतो व रसात्मक असा चंद्र होऊन सर्व वनस्पतीचे पोषण करतो॥ १३ ॥

**मी रिगालों असें भूतळीं। म्हणौनि समुद्रमहाजळीं। हे पांसूचि ढेंपुळी। विरेचिना॥ ४०१ ॥**
**आणि भूतेंही चराचरें। हे धरितसे जियें अपारें। तियें मीचि धरीं धरे। रिगोनियां॥ ४०२ ॥**
**गगनीं मीं पांडुसुता। चंद्राचेनि मिसें अमृता। भरला जालों चालता। सरोवरु॥ ४०३ ॥**
**तेथूनि फांकती रश्मिकर। ते पाट पेलूनि अपार। सर्वौषधींचे आगर। भरित असें मी॥ ४०४ ॥**
**ऐसेनि सस्यादिकां सकळां। करीं धान्यजाती सुकाळा। दें अन्नद्वारा जिव्हाळा। भूतजातां॥ ४०५ ॥**
**आणि निपजविलें अन्न। तरी तैसें कैचें दीपन। जेणें जिरूनि समाधान। भोगिती जीव॥ ४०६ ॥**

**अर्थ**—मी पृथ्वीच्या पोटात शिरलो असल्यामुळेच समुद्रासारखे अफाट जळ देखील पृथ्वीसारख्या मातीच्या ढेकळाला विरघळू शकत नाही॥ ४०१ ॥ आणि भूमी जी चराचर अमर्याद भूतसृष्टीला धारण करते ते मीच तिच्यात शिरून धारण करतो॥ ४०२ ॥ हे अर्जुना! मीच आकाशात चंद्राचे रूपाने अमृताचे चालते सरोवर झालो आहे॥ ४०३ ॥ तेथून अलग अलग निघालेले असंख्य किरणरूपी ओघ धारण करून सर्व औषधींच्या मळ्याचे मीच पोषण करीत असतो॥ ४०४ ॥ अशा रीतीने सर्व तृणधान्य इत्यादिकांची समृद्धि करतो व त्या अन्नाचे द्वारा भूतमात्रांना जगवितो॥ ४०५ ॥ अशा रीतीने प्राणीमात्रांचे तयार झालेले अन्न, खाल्ले जाऊन, ज्या तेजाने ते पचले जाते व प्राणीमात्र समाधान पावतात ते तेज कसे आहे, पाहा॥ ४०६ ॥

**अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः । प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधम्॥ १४ ॥**

**अर्थ**—मीच जठराग्नि होऊन प्राणिमात्रांच्या देहाचा आश्रय केला आहे व प्राण व अपान यांच्या साहाय्याने चारहि प्रकारचे खाल्लेले अन्न पचवितो॥ १४ ॥

**म्हणौनि प्राणिजातांच्या घटीं। करूनि कंदावरी आगिठी। दीप्ति जठरीं किरीटी। मीचि जालों॥ ४०७ ॥**
**प्राणापानाच्या जोडभातीं। फुंकफुंकोनियां अहोराती। आटीतसें नेणों किती। उदरामाजीं॥ ४०८ ॥**
**शुष्कें अथवा स्निग्धें। सुपक्वें कां विदग्धें। परी मीचि गा चतुर्विधें। अन्नें पचीं॥ ४०९ ॥**
**एवं मीचि आघवें जन। जना जीवविते मीचि जीवन। जीवनीं मुख्य साधन। वन्हिही मीचि॥ ४१० ॥**

**अर्थ**—म्हणून सर्व प्राणिमात्रांच्या पोटात नाभिस्थानी शेगडी तयार करून त्यातील जठराग्नि मीच झालो आहे॥ ४०७ ॥ अहोरात्र प्राणापानाचा जोडभाता फुंकून मी पोटामध्ये किती अन्न पचवितो त्याची गणतीच नाही॥ ४०८ ॥ शुष्क अथवा स्नेहयुक्त, चांगले शिजलेले अथवा अर्धकच्चे असे चारहि प्रकारचे खाल्लेले अन्न मीच पचवितो॥ ४०९ ॥ अशा रीतीने मीच सर्व लोक झालो आहे, सर्वांना जगविणारे अन्न मीच आहे. जिवंत राहण्याला मुख्य साधन जो अग्नि तो मीच आहे॥ ४१० ॥

**आतां ऐसियाहीवरी काई। सांगों व्याप्ती नवाई। येथ दुजें नाहींची घेईं। सर्वत्र मी गा॥ ४११॥**

**अर्थ**—अर्जुना! आता इतके सांगितल्यावर आणखी माझ्या व्याप्तीचे विशेष स्वरूप काय सांगायचे राहिले? येथे दुसरे काहीच नाही. मीच सर्वत्र आहे, असे समज॥ ४११॥

**गूढार्थदीपिका**—सूर्य, चंद्र, अग्नि, पृथ्वी इत्यादि सर्व भौतिक पदार्थ जड व काल्पनिक असल्यामुळे त्यांच्या ठिकाणी दिसून येणाऱ्या धारण, प्रकाशन, प्रीणन, पाचन, पोषण इत्यादि शक्ति त्यांच्या नाहीत. त्या सर्व ब्रह्मांडाला अधिष्ठित असलेल्या परमात्म्याच्या आहेत. असे येथील वरील १२ ते १४ श्लोकातून सुचविले आहे. त्या शक्तीचे दर्शन झाले असता तेथे परमात्म्याची भावना केली पाहिजे.

**तरी कैसेनि पां वेखें। सदा सुखियें एकें। एकें तियें दुःखें। क्रांत भूतें॥ ४१२॥**
**जैसी सगळिये पाटणीं। एकेंचि दीपें दिवे लावणी। जालिया कां न देखणीं। उरलीं एकें॥ ४१३॥**
**ऐसी हन उखिविखी। करित आहासी मानसीं कीं। तरी परिस तेही निकी। शंका फेडीं॥ ४१४॥**
**पैं आघवा मीचि असें। येथ नाहीं कीर अनारिसें। परी प्राणियांचिया उल्लासें। बुद्धी ऐसा॥ ४१५॥**

**अर्थ**—अशी एक अद्वैत ब्रह्मवस्तुच असताना तेथे कित्येक जीव सदा सुखी व कित्येक दुःखाने व्याप्त असे दिसतात ते कोणत्या दृष्टीने?॥ ४१२॥ संपूर्ण शहरात एका दिव्याने सर्व दिवे लावले असता काही दिवे लागले नाहीत असे राहील काय?॥ ४१३॥ तुझ्या मनात त्या मिथ्या भासाविषयी अशी शंका असेल तर त्या शंकेचे निरसन करू, नीट ऐक॥ ४१४॥ सर्व काही मीच आहे, यात काही अन्यथा नाही; पण प्राण्याच्या बुद्ध्यनुसार मी भासतो॥ ४१५॥

**गूढार्थदीपिका**—सर्वच परमात्मा असला तरी तो प्राण्यांच्या बुद्धीला त्यांच्या पुण्य-पापरूप कर्मानुसार अनुकूल किंवा प्रतिकूल भासतो व त्यामुळे प्राणी सुखदुःख भोगतात, असा अर्थ.

**जैसें एकचि आकाशध्वनी। वाद्यविशेषीं आनानीं। वाजावें पडे भिन्नीं। नादांतरीं॥ ४१६॥**
**कां लोकचेष्टीं वेगळाला। जो हा एकचि भानु उगवला। तो आनानी परी गेला। उपयोगासी॥ ४१७॥**
**नाना बीजधर्मानुरूप। झाडीं उपजवी आप। तैसें परिणमलें स्वरूप। माझें जीवां॥ ४१८॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे आकाशाचा ध्वनि एकच असला तरी तो निरनिराळ्या वाद्यात निरनिराळ्या नादांचा होतो॥ ४१६॥ किंवा आकाशात उगवणारा सूर्य एकच असला तरी जसा तो लोकांचे निरनिराळे व्यापार करण्यास उपयोगाचा होतो॥ ४१७॥ जसे पाणी बीजाच्या धर्माप्रमाणे झाडांना उत्पन्न करते, त्याप्रमाणे माझे स्वरूपहि जीवांना त्यांच्या कर्मानुसार निरनिराळ्या रीतीने अनुभवास येते॥ ४१८॥

**गूढार्थदीपिका**—आकाश, पाणी यांच्याप्रमाणे परमात्मा सर्वत्र सम आहे; पण निरनिराळ्या बीजाप्रमाणे निरनिराळ्या कर्मानुसार ते परमेश्वराला विषम पाहतात.

**अगा नेणा आणि चतुरा। पुढां नीळयांचा दुसरा। नेणा सर्प जाला येरा। सुखालागीं॥ ४१९॥**
**हें असो स्वातीचें उदक। शुक्तीं मोतीं व्याळीं विख। तैसा सज्ञानांसी मी सुख। दुःख तों अज्ञानांसी॥ ४२०॥**

**अर्थ**—नीलमण्याचा दोनसरी हार, न जाणणाऱ्यापुढे, सर्परूप भासून दुःख देतो व जाणणाऱ्यांना सुख देतो॥ ४१९॥ हे असो स्वातीचे पाणी शिंपेत पडून मोतीरूप होते व तेच सर्पाचे तोंडात पडून विष रूप होते, त्याप्रमाणे मी ज्ञानीपुरुषाला सर्वत्र सुखरूप भासत असून अज्ञान्याला दुःखरूप भासतो॥ ४२०॥

**गूढार्थदीपिका**—सर्वत्र एक सुखरूप परमात्माच भरला असल्यामुळे त्याला जाणले असता सर्व संसारच सुखाचा होतो व त्याला विसरले असता संसार दुःखाचा होतो. दुःख हे केवळ अज्ञानजन्य आहे. असा अर्थ.

**सर्वस्य चाहं हृदि सन्निविष्टो मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च । वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो वेदान्तकृद्वेदविदेव चाहम्॥ १५॥**

**अर्थ**—मी सर्वांच्या हृदयात वसत असून माझ्यामुळे स्मृति म्हणजे आठवण, ज्ञान आणि विस्मरण होत असते. सर्व वेदांनी मीच एक जाणला जातो, मीच वेदान्त संप्रदाय उत्पन्न करणारा असून वेद जाणणाराहि मीच आहे॥ १५॥

**एऱ्हवीं सर्वांच्या हृदयदेशीं। मी अमुका आहें ऐसी। जे बुद्धि स्फुरे अहर्निशीं। ते वस्तु गा मी॥ ४२१॥**

**अर्थ**—साधारणत: सर्वांच्या हृदयामध्ये, मी अमुक आहे, अशी जी बुद्धि सदासर्वदा स्फुरते ती वस्तु मी आहे॥ ४२१॥

**गूढार्थदीपिका**—"मी अमुक आहे" असे जे बुद्धीचे स्फुरण तेच माझे स्वरूप होय असे जे येथे भगवंतांने म्हटले आहे, ते स्थूल दृष्टीने म्हटले आहे. वास्तविक परमात्मा त्या स्फुरणालाहि आधार आहे; पण त्या स्फुरणाच्या द्वारा आधाररूप परमात्म्याचे ग्रहण होते; म्हणून 'मी' रूपाने होणारे स्फुरण माझेच स्वरूप होय. असे भगवंताने म्हटले आहे.

**परी संतासवें वसतां। योगज्ञानीं पैसतां। गुरुचरण उपासितां। वैराग्येंसी॥ ४२२॥**
**येणेंचि सत्कर्में। अशेषही अज्ञान विरमे। जयांचें अहं विश्रामे। आत्मरूपीं॥ ४२३॥**
**ते आपेआप देखोनि देखीं। मियां आत्मेनि सदा सुखी। येथें मीवांचून अवलोकीं। आन हेतु असे॥ ४२४॥**

**अर्थ**—परंतु संताच्या संगतीत राहून दृढ वैराग्यपूर्वक योग व ज्ञानाचा अभ्यास केला असता व श्रीगुरुची उपासना केली असता॥ ४२२॥ याच पुण्य कर्माच्या योगाने अज्ञान नि:शेष नाहीसे होऊन आत्मस्वरूपाचे ठिकाणी ज्यांचा अहं विश्राम पावतो॥ ४२३॥ ते आपणच आत्मदृष्टीने आपल्याला पाहतात व त्यांचा आत्मा मीच असल्यामुळे ते सदा सुखी असतात. येथे मला जाणण्याकरिता माझ्याहून दुसरे निमित्त आहे काय?॥ ४२४॥

**गूढार्थदीपिका**—परमात्मा व बुद्धीचे अहंस्फुरण यांचा विवेक इतका सूक्ष्म आहे की तो संतसमागम व संतांची सेवा यावाचून अनुभविला जाऊ शकत नाही.

**अगा सूर्योदयो जालिया। सूर्ये सूर्यचि पहावा धनंजया। तेवीं मातें मियां जाणावया। मीचि हेतु॥ ४२५॥**
**ना शरीरपरातें सेवितां। संसारगौरवचि ऐकतां। देहीं जयांची अहंता। बुडोनि ठेली॥ ४२६॥**
**ते स्वर्गसंसारालागीं। धांवतां कर्ममार्गीं। दु:खाच्या सेलभागीं। विभागी होती॥ ४२७॥**
**परी हेंही होणें अर्जुना। मजचिस्तव तया अज्ञाना। जैसा जागताचि हेतु स्वप्ना। निद्रेतें होय॥ ४२८॥**

**अर्थ**—अर्जुना! ज्याप्रमाणे सूर्योदय झाला असता सूर्यानेच सूर्य पाहिला जातो त्याप्रमाणे मला जाणण्याकरिता मीच निमित्त आहे॥ ४२५॥ देहासक्त अशा अज्ञानी पुरुषांची सेवा करून व संसारसुखाचा बडेजाव ऐकून ज्यांचा अहंभाव देहाचे ठिकाणी दृढ झाला-म्हणजे देहबुद्धि दृढ झाली॥ ४२६॥ ते संसार व स्वर्ग यांच्या प्राप्तीकरिताच सारखी कर्मे करतात व पराकाष्ठेचे दु:ख भोगतात॥ ४२७॥ अर्जुना! पण ज्याप्रमाणे जागणाराच स्वप्नाला व निद्रेला कारण होतो, त्याप्रमाणे हेहि (दु:खहि) या अज्ञानी पुरुषांना माझ्यामुळेच प्राप्त होते॥ ४२८॥

**गूढार्थदीपिका**—'अहं ब्रह्मास्मि' ही ज्ञानवृत्ति व 'मी अज्ञानी आहे' ही अज्ञानवृत्ति या दोघांनाही भगवंतच आधार असल्यामुळे भगवंतापासूनच ज्ञान्याला ज्ञानाने सुखफल व अज्ञान्याला अज्ञानाचे दु:खफल मिळत असते, असा अर्थ.

**पैं अभ्रें दिवस हरपला। तोही दिवसेंचि जाणों आला। तेवीं मी नेणोनि विषयो देखिला। मजचिस्तव भूतीं॥ ४२९॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे अभ्रे आल्याने दिवस बुडतो, हेहि दिवसामुळेच कळते, त्याप्रमाणे मला विसरले तरी माझ्यामुळेच प्राणी विषय जाणतात॥ ४२९॥

**गूढार्थदीपिका**—भगवंताच्या सच्चिदानंद स्वरूपाचे वृत्तिरूपी विशेष ज्ञान जीव विसरला आहे, म्हणून त्याला भगवंताचा साक्षात्कार होत नाही. पण जीवाचे ठिकाणी भगवंताच्या सच्चिदानंदाचा सत्तारूप सामान्य प्रकाश असल्यामुळे तो त्या प्रकाशाच्या योगानेच सर्व विषयरूप जग जाणतो.

भगवंताच्या सामान्य स्वरूपावर जग भासते व त्याच्या विशेषरूपाने जगताची निवृत्ति होते असे वेदान्तात मानले आहे.

**एवं निद्रा कां जागणिया। प्रबोधुचि हेतु धनंजया। तेवीं ज्ञाना अज्ञाना जीवांचिया। मीचि मूळ॥ ४३०॥**

**अर्थ**—याप्रमाणे निद्रा व जागे होणे या दोहोलाहि जागृतिच, ज्याप्रमाणे मूळ कारण असते, त्याप्रमाणे जीवाच्या ज्ञानाला व अज्ञानाला मीच कारण आहे॥ ४३०॥

**गूढार्थदीपिका**—ज्ञान व अज्ञान ह्या दोन्ही वृत्ती पूर्व अनादिसिद्ध भगवत्सत्तेनेच सत्तावान होऊन जीवाला मुक्त किंवा बंधन करण्यास समर्थ होतात, असा अर्थ.

**जैसें सर्पत्वा कां दोरा। दोरुचि मूळ धनुर्धरा। तैसा ज्ञाना अज्ञानाचिया संसारा। मियांचि सिध्दी॥ ४३१॥**
**म्हणौनि जैसा असें तैसया। मातें नेणोनि धनंजया। वेदु जाणों गेला तंव तया। जालिया शाखा॥ ४३२॥**
**तरी तिहीं शाखाभेदीं। मीचि जाणिजे त्रिशुद्धी। जैसा पूर्वापरा नदी। समुद्रचि ठी॥ ४३३॥**

**अर्थ**—सर्प किंवा दोर दिसण्याला जसा दोरच कारण आहे, त्याप्रमाणे ज्ञान व अज्ञानाच्या देखाव्याला मीच निमित्त असतो॥ ४३१॥ म्हणून अर्जुना! वेद मला जाणायला गेला, पण मी जसा आहे तसा मला न जाणल्यामुळे त्याच्या शाखा झाल्या॥ ४३२॥ ज्याप्रमाणे पूर्वेकडे वाहणाऱ्या व पश्चिमेकडे वाहणाऱ्या सर्व नद्यांना समुद्र हाच शेवट होतो, त्याप्रमाणे वेदाच्या सर्व शाखांनी मीच जाणला जातो, हे त्रिवार सत्य आहे॥ ४३३॥

**गूढार्थदीपिका**—अज्ञानाच्या दृष्टीनेच वेदाच्या भिन्न शाखा व भिन्न प्रतिपाद्य विषय दिसतात. ज्ञानदृष्टीने पाहता एक अद्वैतब्रह्मच वेदाचा प्रतिपाद्य विषय आहे.

**आणि महासिद्धांतापासीं। श्रुति हारपती शब्देसीं। जैसिया सगंधा आकाशीं। वातलहरी॥ ४३४॥**
**तैसें समस्तही श्रुतिजात। ठाके लाजिलें ऐसें निवांत। तें मीचि करीं यथावत। प्रकटोनियां॥ ४३५॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे वासाला वाहून नेणाऱ्या वाऱ्याच्या झुळुका आकाशात लोप पावतात, त्याप्रमाणे शब्दासह सर्व वेदच महासिद्धान्तात म्हणजे "एकमेवाद्वितीयम्" या सिद्धान्तात लुप्त होतात॥ ४३४॥ तसेच सर्व श्रुती लाजून निवांत झाल्या म्हणजे लीन होऊन अव्यक्त झाल्या असता त्या पुन: पूर्ववत् मीच प्रगट करतो॥ ४३५॥

**पाठीं श्रुतीसहित अशेष। जग हारपे जेथ नि:शेष। तें निजज्ञानही चोख। जाणता मीचि॥ ४३६॥**
**जैसें निदेलिया जागिजे। तेव्हां स्वप्नीचे कीर नाहीं दुजें। परि एकत्वही देखों पाविजे। आपलेंचि॥ ४३७॥**
**तैंसें आपलें अद्वयपण। मी जाणतसें दुजेनवीण। तयाही बोधाकारण। जाणता मीचि॥ ४३८॥**
**मग आगी लागलिया कापुरा। ना काजळी ना वैश्वानरा। उरणें नाही वीरा। जयापरी॥ ४३९॥**
**तेवीं समूळ अविद्या खाये। तें ज्ञानही जैं बुडोनि जाये। तऱ्ही जें नाहीं कीर नोहे। आणि न साहे असणेंही॥ ४४०॥**
**पैं विश्व घेऊनि गेला मार्गेसीं। तया चोरातें कवण कें गिवसी। जे कोणी एकी दशा ऐसी। शुद्ध ते मी॥ ४४१॥**
**ऐसें जडाजड व्याप्ती। रूप करितां कैवल्यपती। ठी केली निरूपहितीं। आपुल्या रूपीं॥ ४४२॥**
**तो आघवाचि बोधु सहसा। अर्जुनीं उमटला कैसा। व्योमींचा चंद्रोदयो जैसा। क्षीरार्णवीं॥ ४४३॥**

**अर्थ**—नंतर वेदासह संपूर्ण जगत् ज्या ठिकाणी नि:शेष नाहीसे होते, ते आपले शुद्ध अद्वैतज्ञानहि मीच जाणत असतो॥ ४३६॥ ज्याप्रमाणे निजलेला मनुष्य जागा झाला असता स्वप्नातील पदार्थ खरोखर दुसरे नाहीत असे पाहतो व जागेपणाचे एकटेपण हि आपणच पाहतो॥ ४३७॥ त्याप्रमाणे मी आपले अद्वैतस्वरूप, त्याहून भिन्न न होता, जाणत असतो आणि त्या अद्वैतस्थितीला जाणणाऱ्या ज्ञानालाहि मीच जाणत असतो॥ ४३८॥ मग ज्याप्रमाणे, अर्जुना! कापुराला अग्नि लागला असता शेवटी काजळ किंवा अग्नि काही एक उरत नाही॥ ४३९॥ त्याप्रमाणे जेव्हा ज्ञानाने समूळ अविद्येचा नाश होऊन अविद्येचा नाश करणारे ज्ञानहि नाहीसे होते, तेव्हा 'नाही' हे खरोखर नसते व "आहे" म्हणणेहि तेथे सहन होत नाही॥ ४४०॥ जो चोर, होते-नव्हते संपूर्ण घेऊन जाऊन ज्याने मार्गाचा मागमूसहि ठेवला नाही त्या चोराला कोण व कोठे पकडणार? (अशा चोरासारखी) जी कोणी एक शुद्ध दशा आहे ते माझे स्वरूप होय॥ ४४१॥ अशी संपूर्ण चराचराचे ठिकाणी व्याप्ति सांगत असताना भगवान श्रीकृष्णांनी त्याचा शेवट आपल्या निरुपाधिक स्वरूपाचे ठिकाणी केला॥ ४४२॥ भगवान श्रीकृष्णांनी केलेला संपूर्ण बोध अर्जुनाचे ठिकाणी कसा प्रगट झाला म्हणाल तर ज्याप्रमाणे आकाशातील चंद्रोदय क्षीरसमुद्रात (मूळचाच) होता त्याप्रमाणे॥ ४४३॥

**गूढार्थदीपिका**—ज्याप्रमाणे क्षीरसमुद्राचे मंथन करून काढलेला चंद्रच भगवंताने आकाशात स्थापन केला, त्याप्रमाणे भगवंतांनी केलेला उपदेश अर्जुनाचे ठिकाणीच मूळचाच लीन असलेला उद्‌बुद्ध झाला, असा अर्थ.

**कां प्रतिभिंती चोखटे। समोरील चित्र उमटे। तैसा अर्जुनें आणि वैकुंठें। नांदतसे बोधु॥ ४४४॥**

**अर्थ**—किंवा ज्याप्रमाणे चकचकित केलेल्या भिंतीमध्ये तिच्या समोर असलेले भिंतीवरील चित्र प्रतिबिंबित होते त्याप्रमाणे अर्जुन व श्रीकृष्ण यांचे ठिकाणी एकच ब्रह्मज्ञान नांदत होते॥ ४४४॥

**गूढार्थदीपिका**—गुरुपरंपरेने गुरुशिष्यात असा एकच बोध नांदत असतो, म्हणून गुरुपरंपरेचे शास्त्रात महत्व वर्णन केले आहे. ब्रह्म अफुट सर्वत्र एक अद्वितीयच असल्यामुळे त्याचा बोधहि सर्व गुरुशिष्याचे ठिकाणी एकरूपच असणार, भिन्न राहू शकत नाही व तसा कृतयुगापासून आतापर्यंत झालेल्या ज्ञानीपुरुषांचा एकरूप अनुभव दिसतोहि.

"कोणाचे काही न घेसी। आपुलेही तैसेचि न देसी। नेणो जाणो भोगिसी। गौरव कैसे" (अमृ० प्र० ९-६६)

गुरुने मला काही नविन प्राप्त करून दिले असे शिष्याला काही वाटत नाही व गुरुलाहि मी शिष्याला अधिक काही दिले असे वाटत नसते. असे असूनहि 'अहं ब्रह्म' हे वाग्‌ऋण फेडण्याकरिता गुरुचे सेव्यत्व कायमच राहते असे माउलींनी अमृतानुभवात सांगितलेहि आहे.

**तरी बाप वस्तुस्वभावो। फावे तंव तंव गोडिये थांवो। म्हणौनि अनुभवियांचा रावो। अर्जुन म्हणे॥ ४४५॥**
**जी व्यापकपण बोलतां। निरुपाधिक जें आतां। स्वरूप प्रसंगता। बोलिलें देवो॥ ४४६॥**
**तें एक वेळ अव्यंगवाणें। कीजो कां मज सांगणें। तेथ द्वारकेचा नाथु म्हणे। भलें केलें॥ ४४७॥**

**अर्थ**—परब्रह्म वस्तु परम प्रेमरूप आहे व परम प्रेमरूप वस्तूचा असा स्वभाव असतो की जसजशी तिची गोडी अनुभवाची तसतसे चित्त तेथे अधिक स्थिर होत जाते. म्हणून ब्रह्मवस्तूचा अनुभव येणाऱ्यामध्ये श्रेष्ठ असा अर्जुन म्हणतो॥ ४४५॥ भगवंता! आपले व्यापकपण सांगत असताना प्रसंगाने आपण आपल्या निरुपाधिक स्वरूपाचा उल्लेख केला॥ ४४६॥ ते आपले निर्दोष असे निरुपाधिक स्वरूप एकदा मला सांगा! तेव्हा अर्जुनाचे भाषण ऐकून द्वारकेचे राजे भगवान श्रीकृष्ण म्हणाले 'अर्जुना! फार चांगले विचारलेस'॥ ४४७॥

**गूढार्थदीपिका**—निर्गुणस्वरूप निरुपाधिक आहे, हे अर्जुनाला माहित होतेच; पण भगवंताच्या सगुणसाकार-स्वरूपाचाहि निरुपाधिक उत्तम पुरुषात अंतर्भाव होतो की नाही हे जाणून घेण्याकरिताच 'आपले निरुपाधिक स्वरूप सांगा' अशी अर्जुनाने भगवंताला विनंति केली.

**पैं अर्जुना आम्हांहि वाडेंकोडें। अखंड बोलों आवडे। परी काय कीजे न जोडे। पुसतें ऐसें॥ ४४८॥**
**आजि मनोरथांसि फळ। जोडलासि तूं केवळ। जे तोंड भरूनि निखळ। आलासि पुसों॥ ४४९॥**
**जें अद्वैतावरीही भोगिजे। तें अनुभवींचें तूं विरजें। पुसोनि मज माझें। देतोसि सुख॥ ४५०॥**
**जैसा आरिसा आलिया जवळा। दिसे आपणपें आपलां डोळां। तैसा संवादिया तूं निर्मळा। शिरोमणी॥ ४५१॥**
**तुवां नेणोनि पुसावें। मग आम्ही परिसऊं बैसावें। तो गा हा पाड नव्हे। सोयरेया॥ ४५२॥**
**ऐसें म्हणौनि आलिंगिलें। कृपादृष्टी अवलोकिलें। मग देवो काय बोलिले। अर्जुनेंसीं॥ ४५३॥**

**अर्थ**—अर्जुना! आम्हालाहि मोठ्या आवडीने या आत्मस्वरूपाविषयी सदासर्वदा चर्चा करावीशी वाटते, पण काय करावे! तसा विचारणाराच कोणी भेटत नाही॥ ४४८॥ तू तोंड भरून विचारण्याला आलास, म्हणून आज तुझ्या योगानेच माझे मनोरथ सफल झाले॥ ४४९॥ अद्वैतप्राप्तीनंतरहि अनुभवसुख भोगायला जे साह्यभूत होते, तेच तू विचारून मला माझे सुख देत आहेस॥ ४५०॥ ज्याप्रमाणे आरसा समोर आला असता आपल्याला आपला डोळा दिसतो, त्याप्रमाणे निर्मळ संवाद करणाऱ्यांमध्ये श्रेष्ठ असा तू मला मिळाला आहेस॥ ४५१॥ हे माझ्या सोयऱ्या अर्जुना! समजत नाही, म्हणून तू विचारावे व मग मी उत्तर द्यावे, तसे हे नाही॥ ४५२॥ इतके बोलल्यावर देवांनी अर्जुनाला आलिंगन दिले व त्याच्याकडे कृपादृष्टीने पाहिल्यावर, काय म्हणाले (ते ऐका)॥ ४५३॥

**पैं दोही वोठीं एक बोलणें। दोहीं चरणीं एक चालणें। तैसें पुसणें सांगणें। तुझें माझें॥ ४५४॥**

**एवं आम्हीं तुम्हीं येथें। देखावें एका अर्थातें। सांगतें पुसतें येथें। दोन्हीं एक॥ ४५५॥**
**ऐसा बोलत देवो भुलला मोहें। अर्जुनातें आलिंगूनि ठाये। मग बिहाला म्हणे नोहे। आवडी हे॥ ४५६॥**
**जाले इक्षुरसाचे ढाळ। तरी लवण देणें किडाळ। जे संवादसुखाचें रसाळ। नासेल थितें॥ ४५७॥**
**आर्धीच आम्हां यया कांहीं। नरनारायणासी भिन्न नाहीं। परी आतां जिरो माझ्या ठाईं। वेगु हा माझा॥ ४५८॥**
**इया बुद्धी सहसा। श्रीकृष्ण म्हणे वीरेशा। पै गा तो तुवां कैसा। प्रश्नु केला॥ ४५९॥**
**जो अर्जुन कृष्णीं विरत होता। तो परतोनिया मागुता। प्रश्नावळीची कथा। ऐकों आला॥ ४६०॥**

**अर्थ**—जसा दोन ओठांनी एक शब्द निघतो, दोन पायांनी एकच चालणे होते, त्याप्रमाणे तुझे विचारणे व माझे सांगणे एका निरुपाधिक स्वरूपाविषयीच आहे॥ ४५४॥ याप्रमाणे तुम्ही व आम्ही एकाच अर्थाला घेतले पाहिजे; कारण विचारणारा व सांगणारा दोन्ही एकच आहेत॥ ४५५॥ असे बोलत असता देव अर्जुनाच्या प्रेमाने भुलले व ठिकाणीच (मनाने) त्याला आलिंगन देऊन मग चित्तात भिऊन म्हणाले यावेळी हे प्रेम बरे नव्हे॥ ४५६॥ जसे उसाच्या रसाची ढेप करावयाची असली तर मीठ देणे वाईट, तसे असलेल्या संवादसुखाचे रसाळपणात (त्या प्रेमाने) बिघाड होईल॥ ४५७॥ हा नर व मी नारायण या नरनारायणांमध्ये आधीच भेद नाही; पण हा माझ्या आलेल्या प्रेमाचा वेग माझ्यामध्ये जिरो!॥ ४५८॥ अशी बुद्धि धारण करून श्रीकृष्ण म्हणाले, अर्जुना! तू कोणता प्रश्न विचारीत होतास बरे!॥ ४५९॥ जो अर्जुन श्रीकृष्णाशी ऐक्य पावत होता, तो देवाचे बोलणे ऐकल्याबरोबर प्रश्नाची उत्तरे ऐकण्याकरिता पुन: देहावर आला॥ ४६०॥

**येथ सद्गदें बोलें। अर्जुनें जी जी म्हणितलें। निरुपाधिक आपुलें। रूप सांगा॥ ४६१॥**
**यया बोला तो शार्ङ्गी। तेंचि सांगावयालागीं। उपाधी दोहीं भागीं। निरूपीत असे॥ ४६२॥**
**पुसिलिया निरुपहित। उपाधि कां सांगे येथ। हें कोण्हाही प्रस्तुत। गमे जरी॥ ४६३॥**
**तरी ताकाचे अंश फेडणें। याचि नांव लोणी काढणें। चोखाचिये शुद्धी तोडणें। कीडचि जेवीं॥ ४६४॥**
**बाबुळीचि सारावी हातें। परी पाणी तंव असे आइतें। अभ्रचि जावें गगन तें। सिद्धचि कीं॥ ४६५॥**
**वरील कोंड्याचा गुंडाळा। झाडूनि केलिया वेगळा। कणु घेतां विरंगोळा। असे काई॥ ४६६॥**
**तैसा उपाधि उपाहितां। शेवट जेथ विचारितां। तें कोणातेंही न पुसतां। निरुपाधिक॥ ४६७॥**
**जैसें न सांगणेवरी। बाळा पतीसी रूप करी। बोल निमालेपणें विवरी। अचर्चातें॥ ४६८॥**
**पैं सांगणेयाजोगें नव्हे। तेथिचें सांगणें ऐसें आहे। म्हणौनि उपाधि लक्षण हे। बोलिजे आदि॥ ४६९॥**
**पाडिव्याची चंद्ररेखा। निरुती दावावया शाखा। दाविजे तेवीं औपाधिका। बोली इया॥ ४७०॥**

**अर्थ**—तेथे सद्गद वाणीने अर्जुन म्हणू लागला, अहो जी भगवंता! तुम्ही आपल्या निरुपाधिक स्वरूपाचे वर्णन करा॥ ४६१॥ हे बोलणे ऐकून भगवान श्रीकृष्ण तेच सांगण्याकरिता उपाधीचा दोघाशी संबंध आहे, असे सांगू लागले॥ ४६२॥ अर्जुनाने आपले निरुपाधिक स्वरूप सांगा, असे म्हटले असता, उपाधीचा संबंध देव कां सांगतात अशी कोणाला शंका येईल॥ ४६३॥ पण ज्याप्रमाणे ताकाचा अंश निराळा करणे म्हणजेच लोणी काढणे होय किंवा सोने शुद्ध करणे म्हणजेच हीणकट भाग अलग करणे होय॥ ४६४॥ किंवा शेवाळ हाताने दूर केले की पाणी शुद्धच असते. अभ्र गेले की आकाश निर्मळच असते॥ ४६५॥ धान्याच्या वर असलेल्या कोंड्याचा गुंडाळा झाडून दूर केल्यावर धान्याचा कण घेण्यास काही प्रतिबंध होतो काय?॥ ४६६॥ त्याप्रमाणे ज्या वस्तूचे ठिकाणी उपाधि व उपाधीचा आधार होणे विचाराने सिद्ध होत नाही ती आपोआपच निरुपाधिक आहे, असे कळून येते॥ ४६७॥ ज्याप्रमाणे नववधु न बोलण्यानेच आपल्या पतीच्या स्वरूपाची ओळख करून देते किंवा जी वस्तु शब्दाचे पलीकडे आहे, अशा शब्दाचे पलीकडे असलेल्या वस्तूचे विवरण मौन करते॥ ४६८॥ जी वस्तु सांगण्याजोगी नाही त्या वस्तूचे सांगणे असेच आहे; म्हणून प्रथम उपाधीचे लक्षण (कोणाचे ठिकाणी आहे, ते) सांगतो॥ ४६९॥ शुक्लपक्षाच्या प्रतिपदेच्या दिवशी चंद्राची कोर दाखविण्याकरिता ज्याप्रमाणे झाडाच्या फांदीचा संबंध घ्यावा लागतो, त्याप्रमाणे निरुपाधिक स्वरूप दाखविण्याकरिता उपाधीचा संबंध असलेल्या विषयीचे हे बोलणे आहे॥ ४७०॥

**गूढार्थदीपिका**—निरुपाधिक परब्रह्म उपाधीने झाकले गेले आहे. उपाधि व औपाधिक यांचा व्यतिरेक केला असता उरलेले परब्रह्म साहजिकच निरुपाधिक असते व केवळ बुद्धिवृत्तीने अनुभविण्याजोगे आहे. शब्दाने सांगता येण्याजोगे नाही, असा अर्थ.

**द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च। क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते॥ १६॥**

**अर्थ**—या लोकात क्षर व अक्षर असे दोन पुरुष आहेत. सर्व भूते क्षरपुरुष असून कूटस्थाला अक्षरपुरुष म्हणतात॥ १६॥

**मग तो म्हणे गा सव्यसाची। पैं इये संसारपाटणींची। वस्ती साविया टांची। दुपुरुषीं॥ ४७१॥**

**अर्थ**—मग भगवान म्हणतात, अर्जुना! संसारनगरात खरोखर पाहता जी वस्ति आहे ती दोन मर्यादित पुरुषांनीच केलेली आहे॥ ४७१॥

**गूढार्थदीपिका**—क्षरपुरुष उपाधिगत असून अक्षरपुरुष उपाधीला आधार असल्यामुळे या दोघांशीच उपाधीचा संबंध आहे व उपाधीमुळे हे दोन मर्यादित झाले आहेत.

**जैसी आघवांचि गगनीं। नांदतें दिवोरात्री दोन्ही। तैसे संसारराजधानीं। दोन्हीचि हे॥ ४७२॥**
**आणिकही तिजा पुरुषु आहे। परी तो या दोहींचें नांव न साहे। जो उदेला गावेंसीं खाये। दोहींतें ययां॥ ४७३॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे संपूर्ण आकाशात दिवस—रात्र हे दोघेच नांदतात त्याप्रमाणे संसाररूपी राजधानीत हे दोघेच आहेत॥ ४७२॥ आणखी एक तिसरा पुरुष आहे; पण तो या दोघांचे नावहि सहन करित नाही; कारण तो प्रगट झाला की या संसारनगरासह तो या दोघांनाहि गिळून टाकतो॥ ४७३॥

**गूढार्थदीपिका**—हा तिसरा पुरुष सच्चिदानंदघन, अद्वैतस्वरूप व व्यापक असल्यामुळे याचा अनुभव आला असता त्याच्यैाहून निराळ्या अशा उपाधि व उपाधिगताचे नावच राहत नाही, असा अर्थ.

**परी ते तंव गोठी असो। आधीं दोहींची हे परियेसो। संसारग्रामा वसों। आलें असती॥ ४७४॥**
**एक आंधळा वेडा पंगु। येर सर्वांगें पुरता चांगु। परी ग्रामगुणें संगु। घडला दोघां॥ ४७५॥**
**तया एका नाम क्षरु। येरातें म्हणती अक्षरु। इहीं दोहींचि परी संसारु। कोंदला असे॥ ४७६॥**
**आतां क्षरु तो कवणु। अक्षरु तो किंलक्षण। हा अभिप्रावो संपूर्णु। विवंचूं गा॥ ४७७॥**

**अर्थ**—पण त्याची गोष्ट तूर्त बाजूला असू दे. अगोदर संसारग्रामात वस्ति करण्याकरिता आलेल्या क्षर व अक्षर या दोघांविषयीच ऐकवितो॥ ४७४॥ या दोघांपैकी एक आंधळा, वेडा, पांगळा असून दुसरा सर्वांगाने चांगला पूर्ण आहे, परंतु एकाच गावात असल्यामुळे त्या दोघांचा संबंध घडला॥ ४७५॥ एकाला क्षर म्हणतात व दुसऱ्याचे नाव अक्षर आहे; पण सर्व संसार या दोघांनीच भरला आहे॥ ४७६॥ आता क्षरपुरुष कोण व अक्षरपुरुषाचे लक्षण काय? या संपूर्ण अभिप्रायाचे आम्ही स्पष्टीकरण करू॥ ४७७॥

**तरी महदहंकारा। लागुनियां धनुर्धरा। तृणांतींचा पांगोरा-। वरी पैं गा॥ ४७८॥**
**जें कांहीं सानें थोर। चालतें अथवा स्थिर। किंबहुना गोचर। मनबुद्धींसि जें॥ ४७९॥**
**जेतुलें पांचभौतिक घडतें। जें नामरूपा सांपडतें। गुणत्रयाच्या पडतें। कामठां जें॥ ४८०॥**
**भूताकृतीचें नाणें। घडत भांगारें जेणें। काळासिं जूं खेळणें। जिहीं कवडां॥ ४८१॥**
**जाणणेंचि विपरीतें। जें जें कांही जाणिजतें। जें प्रतिक्षणीं निमतें। होऊनियां॥ ४८२॥**
**अगा काढूनि भ्रांतीचें दांग। उभवी सृष्टीचें आंग। हें असो बहु जग। जया नाम॥ ४८३॥**

**अर्थ**—अर्जुना! महत्-अहंतेपासून तृणाच्या शेवटील अग्रापर्यंत॥ ४७८॥ जेवढे काही लहान-मोठे, स्थावर-जंगम आहे; किंबहुना जेवढे मनबुद्धीला गोचर होणारे आहे॥ ४७९॥ जेवढे काही पंचभूतांपासून उत्पन्न झाले आहे, जे नामरूपात सापडले आहे व जे त्रिगुणाच्या टांकसाळेत उत्पन्न होते॥ ४८०॥ ज्या सोन्याचे भूतांची आकृति हे नाणे बनते. ज्या कवड्यांनी काळाशी द्यूत खेळले जाते॥ ४८१॥ जे काही विपरीत ज्ञानानेच जाणले जाते व जे

प्रतिक्षणी उत्पन्न होऊन नाश पावते ॥ ४८२ ॥ ज्या सृष्टीचे स्वरूप भ्रांतिरूप दाट जंगल काढून तयार केले जाते. हे असो बहु काय सांगायचे! ज्याला जग म्हणतात ॥ ४८३ ॥

**पैं अष्टधा भिन्न ऐसें। जे दाविलें प्रकृतिमिसें। जे क्षेत्रद्वारा छत्तिसें। भागीं केलें ॥ ४८४ ॥**
**हें मागील सांगो किती। अगा आतांचि जें प्रस्तुती। वृक्षाकार रूपक रीती। निरूपिलें ॥ ४८५ ॥**
**तें आघवेंचि साकार। कल्पूनी आपणपयां पुर। जालें असे तदनुसार। चैतन्यचि ॥ ४८६ ॥**
**जैसा कुहां आपणचि बिंबे। सिंह प्रतिबिंब पाहतां क्षोभे। मग क्षोभला समारंभें। घाली तेथ ॥ ४८७ ॥**
**कां सलिलीं असतचि असे। व्योमावरी व्योम बिंबे जैसें। अद्वैत होऊनि तैसें। द्वैत घेपे ॥ ४८८ ॥**
**अर्जुना गा यापरी। साकार कल्पूनि पुरी। आत्मा विस्मृतीची करी। निद्रा तेथ ॥ ४८९ ॥**
**पैं स्वप्नीं सेजार देखिजे। मग पहुडणें जैसें तेथ कीजे। तैसें पुरीं शयन जाणिजे। आत्मयासी ॥ ४९० ॥**
**पाठीं तिये निद्रेचेनि भरें। मी सुखी दुःखी म्हणत घोरें। अहंममतेचेनि थोरें। वोसणाये सादें ॥ ४९१ ॥**
**हा जनकु हे माता। हा मी गौर हीन पुरता। पुत्र वित्त कांता। माझें हें ना ॥ ४९२ ॥**

**अर्थ**—जे आठ प्रकारच्या प्रकृतिरूपाने मागे सांगितले गेले किंवा जे छत्तीस विभागाने क्षेत्र म्हणून सांगितले गेले ॥ ४८४ ॥ अर्जुना! मागील किती सांगू! याच अध्यायात प्रथमारंभी वृक्षाचे रूपक करून जे सांगितले गेले ॥ ४८५ ॥ त्या सर्व साकाराला आपल्या राहावयाच्या नगराची कल्पना करून एक चैतन्यच त्याप्रमाणे झाले आहे ॥ ४८६ ॥ ज्याप्रमाणे सिंह विहिरीत आपले प्रतिबिंब पाहून क्षुब्ध होतो व दुसरा सिंह आहे, असे समजून आवेशाने त्यात उडी घालतो ॥ ४८७ ॥ किंवा ज्याप्रमाणे पाण्यामध्ये आकाश असतेच, त्यावरच आकाशाचे प्रतिबिंब पडते, त्याप्रमाणे अद्वैत आत्माच आपले अद्वैतस्वरूप विसरून द्वैत घेतो ॥ ४८८ ॥ अर्जुना! याप्रमाणे जो सर्व साकाररूप नगरीची कल्पना करून आपल्या स्वरूपाच्या विस्मृतीची तेथे निद्रा करतो-(म्हणजे जीवचैतन्यच आपल्या ठिकाणी साकार देहाची कल्पना करून व हे माझे स्वरूप आहे, असे समजून त्याचा अभिमान धरतो व आपले अद्वैत स्वरूप विसरतो) ॥ ४८९ ॥ ज्याप्रमाणे निद्रिस्थ पुरुष स्वप्नात आंथरुण घातलेले पाहतो व त्यावर जाऊन मी निजलो असे पाहतो तशी या संसारनगरात आत्म्याने निद्रा केली आहे, असे समजावे ॥ ४९० ॥ नंतर त्या निद्रेच्या भरात 'मी सुखी', 'मी दुःखी' असे घोरतो व अहंता-ममता यांच्या योगाने 'मी' व 'माझे' असे मोठ्याने बरळतो ॥ ४९१ ॥ हे माझे वडील, ही माझी आई, मी गोरा, मी अभागी, मी अव्यंग, पुत्र-वित्त-कांता हे माझे आहेत ना! ॥ ४९२ ॥

**ऐसिया वळघोनि स्वप्ना। धांवत भवस्वर्गाचिया राना। तया चैतन्या नाम अर्जुना। क्षर पुरुष गा ॥ ४९३ ॥**
**आतां ऐक क्षेत्रज्ञु येणें। नामें जयातें बोलणें। जग जीवु कां म्हणे। जिये दशेतें ॥ ४९४ ॥**

**अर्थ**—अशा रीतीने स्वप्नभूत जगताला कवटाळून संसार व स्वर्गादि अरण्यात फिरणाऱ्या चैतन्याला, अर्जुना! क्षरपुरुष म्हणतात ॥ ४९३ ॥ आता क्षेत्रज्ञ या नावाने ज्याला ओळखले जाते व ज्या दशेला सर्व लोक जीव म्हणतात ॥ ४९४ ॥

**गूढार्थदीपिका**—येथे 'जीव', 'जगत्' या शब्दांनी दृष्टिसृष्टिवाद्यांप्रमाणे सर्व जगताचा जीव एकच आहे, असा एकजीववाद स्वीकारला आहे.

**जो आपुलेनि विसरें। सर्वभूतत्वें अनुकरे। तो आत्मा बोलिजे क्षरें। पुरुषनामें ॥ ४९५ ॥**
**जे तो वस्तुस्थिती पुरता। म्हणौनि आली पुरुषता। वरी देहपुरीं निदैजतां। पुरुषनामे ॥ ४९६ ॥**
**आणि क्षरपणाचा नाथिला। आळु यया ऐसेनि आला। जे उपाधीचि आतला। म्हणोनियां ॥ ४९७ ॥**

**अर्थ**—जो आपल्या स्वरूपाला विसरून सर्व भूतस्वरूप होतो, त्या आत्म्याला क्षरपुरुष समजावे ॥ ४९४ ॥ त्याची मूळची स्थिति तशीच पूर्ण आहे, म्हणून त्याला पुरुष म्हणतात. वर आणखी तो देहरूपी नगरामध्ये निजला आहे, म्हणून त्याला पुरुष म्हणतात ॥ ४९६ ॥ हा उपाधीत सापडला आहे; म्हणून त्याच्यावर क्षर म्हणजे नाशिवंत असा खोटाच आरोप आला आहे ॥ ४९७ ॥

**गूढार्थदीपिका**—जेव्हा चैतन्य उपाधीच्या स्वाधीन झाल्यासारखे व जागृति आणि स्वप्न या दोन अवस्थेत सुखदु:खादि भोग भोगत आहे, अशा सारखे भासते, तेव्हा त्या चैतन्याला, 'क्षर' संज्ञा दिली जाते.

**जैसी खळाळीचिया उदका-। सरसीं उदाळे चंद्रिका। तैसा विकारां औपाधिकां। ऐसाचि गमे॥ ४९८॥**
**कां खळाळु मोटका शोषे। आणि चंद्रिका तैं सरिसींच भ्रंशे। तैसा उपाधिनाशीं न दिसे। उपाधिकु॥ ४९९॥**
**ऐसें उपाधीचेनि पाडें। क्षणिकत्व यातें जोडे। तेणें खोंकरपणें घडे। क्षर हें नांम॥ ५००॥**
**एवं जीवचैतन्य आघवें। हें क्षर पुरुष जाणावें। आतां रूप करूं बरवें। अक्षरासी॥ ५०१॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे वाहणाऱ्या पाण्याच्या खळाळीबरोबर चंद्राच्या प्रकाश उसळल्यासारखा दिसतो, त्याप्रमाणे आत्माहि विकारांच्या उपाधिमुळे तसा झालेला दिसतो॥ ४९८॥ खळाळ नाहीसा झाला असता त्याबरोबर चंद्राच्या प्रकाशाचे उसळणेहि नाहीसे होते, त्याप्रमाणे उपाधि नाश पावल्याबरोबर त्याचे उपाधिजन्य धर्महि नाहीसे होतात॥ ४९९॥ याप्रमाणे उपाधीच्या योगाने आत्म्याचे ठिकाणी क्षणिकत्व भासते व त्या क्षणिकतेमुळे 'क्षर' हे नाव आले आहे॥ ५००॥ याप्रमाणे संपूर्ण जीवचेतन हे आहे, याला 'क्षरपुरुष' म्हणतात असे जाण. आता अक्षरपुरुषाचे स्पष्ट लक्षण सांगतो, ऐक॥ ५०१॥

**गूढार्थदीपिका**—मी अज्ञानी आहे, मी जन्मतो, मी मरतो, मी सुखी, मी दु:खी, इत्यादि सत्व-रज-तम या त्रिगुणांचे, देहाचे, इंद्रियांचे, मनाचे जे शास्त्रातून धर्म सांगितले आहेत, हे आपल्या ठिकाणी मानून घेणाऱ्या चेतनाला क्षरपुरुष म्हणतात.

**तरी अक्षर जो दुसरा। पुरुष पैं धनुर्धरा। तो मध्यस्थ गा गिरिवरां। मेरु जैसा॥ ५०२॥**
**जे तो पृथ्वी पाताळ स्वर्गीं। इहीं न भेदे तिहीं भागीं। तैसा दोहीं ज्ञानाज्ञानांगीं। पडेना जो॥ ५०३॥**

**अर्थ**—अर्जुना! ज्याप्रमाणे सर्व पर्वताच्या मध्ये मेरुपर्वत जसा मध्यस्थ आहे, त्याप्रमाणे अक्षरपुरुष हा उत्तमपुरुष व क्षरपुरुष यांच्यामध्ये आहे॥ ५०२॥ कारण जो पृथ्वी-पाताळ-स्वर्ग या तीन विभागात पडत नाही. तसेच जो ज्ञान व अज्ञान या दोन भागातहि सापडत नाही॥ ५०३॥

**गूढार्थदीपिका**—जीव आपले ठिकाणी सर्व क्रियांचा, गुणागुणांचा, धर्माचा, गुणांचा वगैरेचा आपल्याशी अहंकारद्वारा संबंध लावून घेतो; पण फक्त अज्ञानाला आधार असणाऱ्या अक्षरपुरुषाचे ठिकाणी अहंकारादि कोणत्याहि वृत्ती नसतात; म्हणून त्याच्याच-म्हणजे अक्षरपुरुषात-भेद उत्पन्न होत नाही.

**ना यथार्थज्ञानें एक होणें। ना अन्यथात्वें दुजें घेणें। ऐसें निखळ जें नेणणें। तेंचि तें रूप॥ ५०४॥**
**पांसुता नि:शेष जाये। ना घटभांडादिकें होये। तया मृत्पिंडा ऐसें आहे। मध्यस्थ जें॥ ५०५॥**
**पैं आटोनि गेलिया सागरु। मग तरंगु ना नीरु। तया ऐशी अनाकारु। जे दशा गा॥ ५०६॥**
**पार्था जागणें तरी बुडे। परी स्वप्नाचें कांही न मांडे। तैसिये निद्रे सांगडें। न्याहाळणे जे॥ ५०७॥**
**विश्व आघवेंचि मावळे। आणि आत्मबोधु तरी नुजळे। तिये अज्ञानदशे केवळे। अक्षरु नाम॥ ५०८॥**

**अर्थ**—यथार्थज्ञानानेहि तो एकरूप होत नाही किंवा अनेक होऊन भेदहि पावत नाही असे जे निव्वळ नेणतेपण ते त्या अक्षरपुरुषाचे रूप होय॥ ५०४॥ कणरूपी धुळीची अवस्था नि:शेष नाहीशी होऊन घटभांडादि होण्यापूर्वी मध्ये जी ओली पिंडरूप मातीची अवस्था असते, त्याप्रमाणे या अक्षरपुरुषाची स्थिति आहे॥ ५०५॥ ज्याप्रमाणे समुद्र आटला असता पाणी राहत नाही व तरंगहि उठत नाही, त्याप्रमाणे आकाराला येण्यापूर्वीची आकाररहित जी दशा असते॥ ५०६॥ अर्जुना! जागणे नाहीसे होऊन स्वप्न पडण्यापूर्वी जसे निद्रेचे स्वरूप असते, तशी अक्षरपुरुषाची स्थिति समजावी॥ ५०७॥ विश्व संपूर्ण नाहीसे होऊन आत्मबोधहि प्रगट झाला नाही, अशा त्या केवळ अज्ञानदशेला अक्षर हे नाव आहे॥ ५०८॥

**सर्वा कळीं सांडिलें जैसें। चंद्रपण उरे अंवसे। रूप जाणावें तैसें। अक्षराचें॥ ५०९॥**
**पैं सर्वोपाधिविनाशें। हे जीवदशा जेथ पैसे। फळपाकांत जैसें। झाड बीजीं॥ ५१०॥**

**तैसें उपाधी उपहित। थोकोनि ठाके जेथ। तयातें अव्यक्त। बोलती गा॥ ५११॥**
**घनअज्ञान सुषुप्ती। तो बीजभाव म्हणती। येर स्वप्न हन जागृती। फळभाव तो॥ ५१२॥**
**जयासी कां बीजभावो। वेदांतीं केला ऐसा आवो। तो तया पुरुषा ठावो। अक्षराचा॥ ५१३॥**
**जेथुनि अन्यथाज्ञान। फांकोनि जागृति स्वप्न। नानाबुद्धीचें रान। रिगालें असे॥ ५१४॥**
**जीवत्व जेथुनी किरीटी। विश्व उठवितचि उठी। ते उभय भेदांची मिठी। अक्षरु पुरुषु॥ ५१५॥**

**अर्थ**—सर्व कळा नाहीशा होऊन ज्याप्रमाणे अमावस्येला कळाहीन चंद्र राहतो, त्याप्रमाणे अक्षर पुरुषाचे स्वरूप जाणावे॥ ५०९॥ ज्याप्रमाणे फळाचा परिपाक होई पर्यंत वाढणारे झाड प्रथम बीजात असते, त्याप्रमाणे सर्व उपाधीचा नाश होऊन जीवदशा नाहीशी होऊन जेथे राहते॥ ५१०॥ तसेच उपाधि व उपहितपणा हे दोन्ही जेथे बंद राहतात (लीन होऊन असतात) त्या दशेला अव्यक्तदशा म्हणतात॥ ५११॥ या अव्यक्तदशेलाच घन अज्ञान, सुषुप्ति किंवा बीज भाव म्हणतात व स्वप्न, जागृति यांना व्यक्त वा फलभाव म्हणतात॥ ५१२॥ वेदान्तशास्त्रात ज्या दशेला सर्व जगताचा अव्यक्तभाव किंवा बीजभाव म्हटले आहे तेच अक्षरपुरुषाचे ठिकाण होय॥ ५१३॥ जेथून विपरीत ज्ञान विस्तार पावून बुद्धीचे जागृत-स्वप्नरूप नाना प्रकारचे अरण्य तयार झाले॥ ५१४॥ अर्जुना! जेथून विश्वाची उत्पत्ति घेऊनच विश्वाच्या पसाऱ्यासह जीवदशा व्यक्त होते व जेथे जीवत्व व विश्व या उभयतांचा भेद नाहीसा होतो, ती अज्ञानदशा अक्षरपुरुष होय॥ ५१५॥

**येरु क्षरु पुरुष कां जनीं। जिहीं खेळें जागृतीं स्वप्नीं। तिया अवस्था जो दोन्ही। वियाला गा॥ ५१६॥**
**पैं अज्ञानघनसुषुप्ती। ऐसैसी जे कां ख्याती। या उणी येकी प्राप्ती। ब्रह्माची जे॥ ५१७॥**
**साचचि पुढती वीरा। जरी न येतां स्वप्न जागरा। तरी ब्रह्मभावो साचोकारा। म्हणों येतां॥ ५१८॥**
**परी प्रकृतिपुरुष दोनी। अभ्रें जालीं जिये गगनीं। क्षेत्रक्षेत्रज्ञ स्वप्नीं। देखिला जियें॥ ५१९॥**
**हें असो अधोशाखा। या संसाररूपा रुखा। मूळ तें पुरुषा। अक्षराचें॥ ५२०॥**
**हा पुरुष कां म्हणिजे। जे पूर्णपणेंचि निजें। पैं मायापुरीं पहुडिजे। तेणेंही बोलें॥ ५२१॥**

**अर्थ**—दुसरा जो क्षरपुरुष आहे, तो ज्या जागृति-स्वप्न या दोन अवस्थेत खेळ खेळतो त्या दोन्ही अवस्थेला ज्यांनी जन्म दिला, (त्याला अक्षरपुरुष म्हणतात)॥ ५१६॥ अज्ञान किंवा गाढ निद्रा म्हणून जी अवस्था प्रसिद्ध आहे त्या अवस्थेला अक्षरपुरुष म्हणतात. या अव्यक्तदशेत एक ब्रह्मप्राप्तिच कमी आहे किंवा "या उणी" म्हणजे ही अव्यक्तदशा नाहीशी झाली की ब्रह्माचीच प्राप्ति होते॥ ५१७॥ हे वीरा अर्जुना! या अवस्थेत गेल्यानंतर मागाहून जीव जर जागृति व स्वप्न या अवस्थेत आला नसता तर खरोखर त्या अवस्थेला ब्रह्मस्थितिच म्हणता आली असती॥ ५१८॥ ज्या आकाशात प्रकृति व पुरुष ही दोन अभ्रे आली व ज्या स्वप्नात क्षेत्रक्षेत्रज्ञ यांना पाहिले॥ ५१९॥ हे असो संसारवृक्षाच्या ज्या खालच्या शाखा आहेत त्यांचे अक्षरपुरुष हे मूळ आहे॥ ५२०॥ याला पुरुष का म्हणतात याचे कारण असे आहे की तो पूर्ण राहूनच निजतो व तो मायापुरीत निजतो, म्हणूनहि त्याला पुरुष म्हणतात॥ ५२१॥

**आणि विकारांचि जे वारी। ते विपरीत ज्ञानाची परी। नेणिजे जिये माझारीं। ते सुषुप्ती गा हा॥ ५२२॥**
**म्हणौनि यया आपैसें। क्षरणें पां नसे। आणिकेंही हा न नाशे। ज्ञाना उणें॥ ५२३॥**
**यालागीं हा अक्षरु। ऐसा वेदांतीं डगरु। केला देखसी थोरु। सिद्धांताचा॥ ५२४॥**
**ऐसें जीवकार्यकारण। जया मायासंगचि लक्षण। अक्षर पुरुष जाण। चैतन्य तें॥ ५२५॥**

**अर्थ**—आणि कार्यरूपाने पुन: विकारदशेस प्राप्त होणे हा विपरीत ज्ञानाचाच प्रकार होय आणि याचे ज्ञान ज्या अवस्थेत नाही त्याला सुषुप्ति म्हणतात॥ ५२२॥ म्हणूनच हा आपोआप झिजत नाही व ज्ञानाशिवाय दुसऱ्या कशाने नाश पावत नाही॥ ५२३॥ म्हणून हा अक्षर आहे असा वेदान्तशास्त्रात डंका वाजला असून देशी भाषेतहि असा थोर सिद्धान्त केला आहे॥ ५२४॥ ते चैतन्यच अक्षरपुरुष होय व तेच मायासंगतीने कार्यरूप जीव किंवा

कारणरूप जीव होते किंवा याप्रमाणे जीव, कार्य, कारण याचे, मायेचा संग, हेच लक्षण असून अक्षरपुरुष हा चैतन्यस्वरूपच आहे, असे जाण॥ ५२५॥

**गूढार्थदीपिका**—मायेचे कार्य जे अंत:करण त्याच्या संगतीने ज्याला क्षरपुरुष म्हटले आहे तो कार्यरूप जीव होय व ज्याला येथे अक्षरपुरुष म्हटले आहे तो कारणरूप जीव होय. किंवा जीव, कार्य, कारण या तिघांचेहि ठिकाणी मायेचा संग आहे. अक्षरपुरुष मात्र नुसता मायेला आधार असल्यामुळे चैतन्यस्वरूपच आहे.

**उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः। यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः॥ १७॥**

**अर्थ**—आता परमात्मा म्हणून जो उत्तम पुरुष सांगितला आहे तो यांच्याहून निराळा असून तो अविनाशी व तिन्ही लोकांना व्यापून त्यांचे धारण व नियंत्रण करणारा आहे॥ १७॥

**आतां अन्यथाज्ञानीं। या दोनी अवस्था जया जनीं। तया हरपती घनीं। अज्ञानतत्त्वीं॥ ५२६॥**
**तें अज्ञान ज्ञानीं बुडालिया। ज्ञानें कीर्तिमुखत्व केलिया। जैसा वन्हि काष्ठ जाळूनियां। स्वयें जळे॥ ५२७॥**
**तैसें अज्ञान ज्ञानें नेलें। आपण वस्तु देऊनि गेलें। ऐसें जाणणेनिवीण उरलें। जाणतें जे॥ ५२८॥**

**अर्थ**—आता विपरीत ज्ञानरूप स्वप्न व जागृति अशा त्या दोन अवस्था ज्या गाढ निद्रारूप अज्ञानावस्थेत लीन होतात॥ ५२६॥ ज्ञानाने ते अज्ञान खाऊन टाकून ज्ञानाने शंकराच्या कीर्तीमुखगणाप्रमाणे होऊन राहिले असता ज्याप्रमाणे काष्ठ जाळून अग्नि स्वत:, विराम पावतो॥ ५२७॥ त्याप्रमाणे ज्ञानाने अज्ञान नाहीसे होऊन ज्ञानहि नाहीसे झाले असता 'जाणले या भावावाचून' जे नुसते जाणीवरूप राहते॥ ५२८॥

**गूढार्थदीपिका**—"तैसे आपणया आपण। जाणते नव्हे जाण। म्हणोनि ज्ञानपणेविण। ज्ञानमात्र जे"

(अमृ० प्र० ४-२२)

या ओवीत जसे परब्रह्म जाणतेपणावाचून केवळ ज्ञानस्वरूप आहे असे माउलीने अमृतानुभवात सांगितले आहे तेच, या ओवीत सांगितले आहे-म्हणजे शुद्ध परब्रह्म प्रकाशक आहे, जाणणारे नाही किंवा त्याच्या ठिकाणी जाणण्याची जाणीव उत्पन्न होत नाही असे ते निर्विकल्प आहे.

**तें तो गा उत्तम पुरुषु। जो तृतीय कां निष्कर्षु। दोहींहून आणिकु। मागिला जो॥ ५२९॥**

**अर्थ**—मागे जे दोन पुरुष सांगितले त्याच्याहून (मागला) जो निराळा असा तिसरा पुरुष मायासंपर्करहित असून त्याला उत्तम पुरुष म्हणतात॥ ५२९॥

**गूढार्थदीपिका**—या निरुपाधिक उत्तम पुरुषाला माउलीने ईश्वर, परमात्मा इत्यादि शब्द लावून सगुण-साकार भगवंताचाहि या निरुपाधिक उत्तम पुरुषातच अंतर्भाव केला आहे. निर्गुणपरब्रह्म अधिष्ठानरूप असून अवतार त्याचे विवर्त आहेत. परब्रह्माचे निरवयव, अफुट, निर्गुण, निराकार, मायारहित, अविनाशी, सर्वव्यापी, अविकारी, पूर्ण व सच्चिदानंद इत्यादि धर्म नित्य असल्यामुळे त्याचे अंश पडून अवतार हे अधिष्ठानाहून निराळे व अपूर्ण होत नाहीत. अर्थात् अवतार देखील निरुपाधिक मायारहित अनध्यस्तविवर्त ठरतात, असा अर्जुनाचा विचाराने निश्चय झाला.

"निर्गुणाहूनि सगुण न्यून। म्हणे तो केवळ मूर्ख जाण। सगुण-निर्गुण दोन्ही समान। न्यून पूर्ण असेना॥" (ए० भा० अ० ११-१४५८) या ओवीत नाथांनीहि असेच सांगितले असून "तुज सगुण म्हणो की निर्गुण रे। सगुण निर्गुण एक गोविंद रे" या अभंगात माउलीने असेच म्हटले आहे.

**सुषुप्ती आणि स्वप्ना-। पासूनि बहुवें अर्जुना। जागणें जैसें आना। बोधाचेंचि॥ ५३०॥**
**कां रश्मी हन मृगजळा-। पासूनि अर्कमंडळा। अफाटु तेवीं वेगळा। उत्तम गा॥ ५३१॥**
**हें ना काष्ठींच्या काष्ठाहुनी। अनारिसा जैसा वन्ही। तैसा क्षराक्षरापासुनी। आनचि तो॥ ५३२॥**
**पैं ग्रासूनि आपली मर्यादा। एक करीत नदीनदां। उठी कल्पांतीं उदावादा। एकार्णवाचा॥ ५३३॥**
**तैसें स्वप्न ना सुषुप्ती। ना जागराची गोठी आथी। जैसी गिळिली दिवोराती। प्रळयतेजें॥ ५३४॥**
**मग एकपण ना दुजें। असें नाहीं हें नेणिजे। अनुभव निर्बुजे। बुडाला जेथें॥ ५३५॥**

**ऐसें आथि जें कांहीं। तें तो उत्तमपुरुष पाहीं। जें परमात्मा इहीं। बोलिजे नामीं॥५३६॥**
**तेंही एथ न मिसळतां। बोलणें जीवत्वें पांडुसुता। जैसी बुडणेयाची वार्ता। थडियेचा कीजे॥५३७॥**

**अर्थ**—अर्जुना! ज्याप्रमाणे स्वप्न व निद्रा याहून जागृति ही पुष्कळ प्रकारांनी निराळी अशी यथार्थबोधाची असते॥५३०॥ किंवा सूर्य किरणे व मृगजळ यांच्यापासून सूर्यमंडळ विस्तीर्ण आहे, त्याप्रमाणे हा उत्तमपुरुष या दोन्ही पुरुषाहून अमर्याद आहे॥५३१॥ एवढेच नाही तर, नाना प्रकारच्या लाकडात असलेला अग्नि जसा त्या त्या काष्ठाहून निराळा असतो, त्याप्रमाणे हा उत्तमपुरुष क्षराक्षराहून वेगळा आहे॥५३२॥ ज्याप्रमाणे प्रलयामध्ये समुद्र आपली मर्यादा नाहीशी करून व सर्व नदनद्यांना एकत्र करून एकार्णवाचे पूर्णत्व प्रगट करतो॥५३३॥ ज्याप्रमाणे प्रलयाच्या तेजात दिवस-रात्र नाहीसे होतात, त्याप्रमाणे ज्याचे ठिकाणी स्वप्न-सुषुप्ति नसून जागृतीचीहि गोष्ट नाही॥५३४॥ मग जेथे अद्वैताची जाणीव नाही व द्वैताचीहि जाणीव नाही, 'आहे', 'नाही' असे ज्याच्याविषयी बोलता येत नाही, ज्याच्या योगाने अनुभवहि कासावीस होऊन नाहीसा होतो-म्हणजे जाणतेपणहि जेथे उरत नाही॥५३५॥ अशी जी काही वस्तु आहे ती तो उत्तमपुरुष होय, असे जाण. व तीच वस्तु 'परमात्मा' या शब्दाने बोलिली जाते॥५३६॥ अर्जुना! ज्याप्रमाणे नदीच्या काठावर असलेला व 'मी बुडालो नाही' असे न जाणणारा मनुष्य भ्रमाने जसा आपल्या बुडण्याची गोष्ट करतो॥५३७॥

**गूढार्थदीपिका**—निरुपाधिक आत्मस्वरूप किंवा भगवत्स्वरूप जाणले जात नाही किंवा त्याच्याशी ऐक्य होत नाही, तोपर्यंतच जीवत्व आहे. परमात्म्याशी एकदा ऐक्य झाले की सर्व तोच भासतो. मग जीवत्व वगैरे काही एक उरत नाही.

**तैसें विवेकाचिये कांठीं। उभें ठाकलेया किरीटी। पारावाराचिया गोठी। करणें वेदां॥५३८॥**
**म्हणौनि पुरुष क्षराक्षर। दोन्हीं देखोनि अवर। यातें म्हणती पर। आत्मरूप॥५३९॥**
**अर्जुना ऐसिया परी। परमात्मा शब्दवरी। सूचिजे गा अवधारीं। पुरुषोत्तम॥५४०॥**
**एऱ्हवीं न बोलणेंनि बोलणें। जेथिंचें सर्व नेणिवा जाणणें। कांहींच न होनि होणें। जे वस्तु गा॥५४१॥**
**सोहं तेंही अस्तवलें। जेथ सांगतेंचि सांगणें जालें। द्रष्टृत्वेंसी गेलें। दृश्य जेथ॥५४२॥**
**आतां बिंबा आणि प्रतिबिंबा-। माजीं कैंची हें म्हणों नये प्रभा। जऱ्ही कैसेनि हे लाभा। जायेचि ना॥५४३॥**
**कां घ्राणा फुला दोहीं। द्रुती असे जे माझारिलां ठायीं। ते न दिसे तरी नाहीं। ऐसें बोलों नये॥५४४॥**
**तैसें द्रष्टा दृश्य हें जाये। मग कोण म्हणे काय आहे। हेंचि अनुभवें तेंचि पाहे। रूप तया॥५४५॥**

**अर्थ**—अर्जुना! विवेकाच्या काठी उभे राहूनच, पलीकडे काय आहे व अलीकडे काय आहे, याविषयी वेदाला गोष्टी करायच्या असतात॥५३८॥ म्हणून क्षर व अक्षर या दोन्ही औपाधिक पुरुषांना खालचे व परमात्म्याला पलीकडचा आत्मरूप म्हणतात॥५३९॥ अर्जुना! याप्रमाणे उत्तमपुरुषच परमात्मा या नावाने सुचविला जातो, हे ध्यानात घे॥५४०॥ वास्तविक पाहता काही न बोलणे हेच ज्या वस्तुविषयी बोलणे आहे, काही न जाणणे हे ज्या वस्तूचे जाणणे होय व काहीच न होऊन राहणे हे ज्या वस्तुचे होणे होय॥५४१॥ जेथे 'सोऽहं' ही जाणीव नाहीशी होते, जेथे सांगणाराच सांगणे होऊन जातो व ब्रह्मासह दृश्य जेथे नाहीसे होते॥५४२॥ आता बिंब व प्रतिबिंब यांच्यामधील प्रभेचा कोणत्याहि रीतीने जरी लाभ होत नाही, तरी ती आली कोठून असे म्हणू नये॥५४३॥ किंवा घ्राणेंद्रिय व फूल या दोघांमध्ये असलेला सुवास दिसत नाही, म्हणून तो नाही, असे म्हणता येत नाही॥५४४॥ त्याप्रमाणे द्रष्टा व दृश्य हे नाहीसे झाल्यावर काही आहे, असे कोण म्हणणार? असा जो अनुभव हेच ज्याचे स्वरूप आहे॥५४५॥

**जो प्रकाश्येंवीण प्रकाशु। ईशितव्येवीण ईशु। आपणेनीचि अवकाशु। वसवीत असे जो॥५४६॥**
**जो नादें ऐकिजता नादु। स्वादें चाखिजता स्वादु। जो भोगिजतसे आनंदु। आनंदेंचि॥५४७॥**
**जो पूर्णतेचा परिणाम। पुरुष गा सर्वोत्तम। विश्रांतीचाही विश्राम। विराला जेथें॥५४८॥**

**सुखासि सुख जोडिलें। जें तेज तेजासि सांपडलें। शून्यही बुडालें। महाशून्यीं जिये॥ ५४९॥**

**अर्थ**—प्रकाशल्या जाणाऱ्या वस्तुवाचून जो प्रकाशरूप आहे, जो नियम्य वस्तुवाचून नियमन करणारा आहे व जो आपणच सर्व आकाशात भरून आहे॥ ५४६॥ जो नादालाच ऐकू येणारा नाद होय. स्वादालाच चाखता येणारा स्वाद असून आनंदालाच भोगता येणारा आनंद होय॥ ५४७॥ जो पुरुषोत्तम पूर्णतेचा परिणाम (म्हणजे पूर्णता पूर्णरूपाने परिणाम पावते) होय; म्हणून तो सर्वापेक्षा उत्तम आहे व विश्रांतीने होणारा विश्रामहि जेथे नाहीसा झाला॥ ५४८॥ जे सुखाला मिळालेले सुख होय, जे तेजास प्राप्त झालेले तेज होय. ज्या महाशून्यात शून्यहि नाहीसे होते॥ ५४९॥

**गूढार्थदीपिका-महाशून्य**-म्हणजे अमर्याद सत्ता. **शून्य**—म्हणजे मर्यादित सत्ता.

**जो विकासाहीवरी उरता। ग्रासातेंही ग्रासूनि पुरता। जो बहुतें पाडें बहुतां-। पासूनि बहु॥ ५५०॥**
**पैं नेणतयाप्रती। रुपेपणाची प्रतीती। रूपें न होऊनि शुक्ती। दावीं जेवीं॥ ५५१॥**
**कां नाना अलंकारदशे। सोनें न लपत लपालें असे। विश्व न होनियां तैसें। विश्व जो धरी॥ ५५२॥**

**अर्थ**—जगत्‌रूपकार्याचेहि पलीकडे कार्यरहित असा उरणारा आहे, जो संहाराला नाहीसा करून पूर्ण आहे. थोर थोर पदार्थाच्या तुलनेत पाहता जो त्या सर्वापेक्षा अपरिमित श्रेष्ठ आहे॥ ५५०॥ ज्याप्रमाणे शिंप न जाणणाऱ्याला ती चांदी न होताच आपल्याला चांदीरूप भासविते॥ ५५१॥ किंवा ज्याप्रमाणे सोने अलंकार दशेतहि न लोपले जाता लोपले जाते, त्याप्रमाणे जो विश्व न होताच विश्वाला धारण करतो॥ ५५२॥

**गूढार्थदीपिका**—ज्याप्रमाणे अलंकाराकडेच लक्ष देणाऱ्याला सोने दिसत नाही, त्याप्रमाणे जड-विनाशी जगताकडेच लक्ष देणाऱ्याला परमात्मा दिसत नाही. वास्तविक अलंकार जसे सोनेच असते तसे जगत् सच्चिदानंदब्रह्मच आहे.

**हें असो जलतरंगा। नाहीं सिनानपण जेवीं गा। तेवीं सत्ता प्रकाश जगा। आपणचि जो॥ ५५३॥**
**आपलिया संकोच विकाशा। आपणचि रूप वीरेशा। हा जळीं चंद्र हन जैसा। समग्र गा॥ ५५४॥**
**तैसा विश्वपणें कांहीं होये। विश्वलोपीं केहीं न जाये। जैसा रात्री दिवसें नोहे। द्विधा रवि॥ ५५५॥**
**तैसा कहींचि कोणीकडे। कायिसेनिहि वेंचीं न पडे। जयाचें सांगडें। जयासीचि॥ ५५६॥**

**अर्थ**—हे, असो. ज्याप्रमाणे पाणी व तरंग हे परस्पर यत्किंचितहि निराळे नसतात, त्याप्रमाणे जो जगाची सत्ता व चैतन्य आपणच झाला आहे॥ ५५३॥ हे वीरामध्ये श्रेष्ठ असलेल्या अर्जुना! ज्याप्रमाणे चंद्र पाण्यातील आपल्या संकोच विकासाला (प्रतिबिंबित होण्याला व प्रतिबिंबित न होण्याला) आपणच कारण होतो॥ ५५४॥ त्याप्रमाणे परमात्माहि विश्वरूपाने रूपांतराला येतो अथवा विश्व लोपले असता तो कोठे तरी जातो, असे मुळीच नाही. ज्याप्रमाणे सूर्याला रात्र व दिवस यांचे योगाने दोनपणा येत नाही॥ ५५५॥ त्याप्रमाणे जो कोणीकडे कशानीहि यत्किंचितहि न्यून होत नाही. ज्याची तुलना ज्याच्याशीच करता येते॥ ५५६॥

**गूढार्थदीपिका**—या सर्व ओव्यातून माउलीने परमात्मा ज्ञातृत्वभोक्तृत्वरहित केवल निर्विकल्प सच्चिदानंदस्वरूप आहे, हे दाखविले आहे.

"**ऐसिया निरुपमावरी। आपुलिये विलासवरी। आत्मा राणीव करी। आपुल्या ठायी**" (अमृ० प्र० ७-२६८) या अमृतानुभवातील ओवीत माउलीने असेच सांगितले आहे.

**यस्मात्क्षरमतीतोऽहमक्षरादपि चोत्तमः। अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः॥ १८॥**

**अर्थ**—मी क्षरपुरुषाच्या पलीकडे असून अक्षरपुरुषापेक्षाहि उत्तम आहे, म्हणूनच मी वेद, शास्त्रे व लोक यांच्यात पुरुषोत्तम या नावाने प्रसिद्ध आहे॥ १८॥

**जो आपणपेंचि आपणया। प्रकाशीतसे धनंजया। काय बहु बोलों जया। नाहीं दुजे॥ ५५७॥**
**तो गा मी निरुपाधिकु। क्षराक्षरोत्तमु एकु। म्हणोनि म्हणे वेद लोकु। पुरुषोत्तमु॥ ५५८॥**

**अर्थ**—अर्जुना! जो आपणच आपल्याला प्रकाशित करतो. फार काय सांगू! ज्याचे ठिकाणी दुसरे काहीच नाही॥ ५५७॥ तो मी अत्यंत उपाधिरहित व क्षर व अक्षर या दोन्ही पुरुषांपेक्षा श्रेष्ठ आहे, म्हणूनच मला वेद व लोक पुरुषोत्तम म्हणतात॥ ५५८॥

**यो मामेवमसम्मूढो जानाति पुरुषोत्तमम्। स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत॥ १९॥**

**अर्थ**—जो पुरुष ज्ञानसंपन्न होऊन याप्रमाणे मला (उत्तमपुरुषाला) जाणतो तो सर्व जाणणारा होऊन सर्व भावाने माझेच भजन करतो॥ १९॥

**परी हें असो ऐसिया। मज पुरुषोत्तमातें धनंजया। जाणे जो पाहलेया। ज्ञानमित्रें॥ ५५९॥**
**चेइलिया आपुलें ज्ञान। जैसें नाहींचि होय स्वप्न। तैसें स्फुरतें जया त्रिभुवन। वावो जालें॥ ५६०॥**
**कां हातीं घेतलिया माळा। फिटे सर्पाभासाचा कंटाळा। तैसा माझेनि बोधे टवाळा। नागवे तो॥ ५६१॥**
**लेणें सोनेंचि जो जाणे। तो लेणेपण तें वावो म्हणे। तेवीं मी जाणोनि जेणें। वाळिला भेद॥ ५६२॥**

**अर्थ**—हे आता असो! पण अर्जुना! ज्ञानरूपी सूर्याने म्हणजे ज्ञानदृष्टीने माझ्या या पुरुषोत्तम स्वरूपाला ओळखले असता, ज्याप्रमाणे जाग आली असता संपूर्ण स्वप्नातील देखावा मावळतो, त्याप्रमाणे ज्याला भासत असलेले त्रिभुवन मुळीच अस्तित्वात नाही असा प्रत्यय येतो॥ ५५९-५६०॥ किंवा ज्याप्रमाणे हा सर्प नव्हे, माळ आहे, असे जाणून माळ हाती घेतल्याबरोबर सर्पाच्या भासाने वाटलेली भीति निःशेष नाहीशी होते, त्याप्रमाणे ज्याला माझ्या पुरुषोत्तम स्वरूपाचे ज्ञान झाले, तो ह्या खोट्या जगद्रूप भासाने फसला जात नाही॥ ५६१॥ ज्याप्रमाणे अलंकार सोनेच आहे, असे जो जाणतो, तो सोन्याहून अलंकाराचा भिन्नपणा खोटा (व्यर्थ) समजतो, त्याप्रमाणे माझ्या पुरुषोत्तम स्वरूपाला जाणून ज्याने (नामरूपाचाहि) सर्व भिन्नपणा नाहीसा केला॥ ५६२॥

**मग म्हणे सर्वत्र सच्चिदानंदु। मीचि एकु स्वतःसिद्धु। जो आपणेनसीं भेदु। नेणोनि जाणे॥ ५६३॥**
**तेणेंचि सर्व जाणितलें। हेंही म्हणणें थेंकुलें। जे तया सर्व उरलें। द्वैत नाहीं॥ ५६४॥**

**अर्थ**—मग आपल्यालाहि माझ्याहून भिन्न न पाहता मीच एक सर्वत्र सच्चिदानंदस्वरूपाने भरलो आहे, असे जो जाणतो॥ ५६३॥ त्यानीच सर्व जाणले, हेहि म्हणणे जेथे कमी पडते; कारण सर्वत्र म्हणण्यापुरते त्याला आपल्याहून भिन्न असे काही उरतच नाही॥ ५६४॥

**गूढार्थदीपिका**—येथे माउलीने हा अन्वय सांगितला आहे.

**म्हणोनि माझिया भजना। उचितु तोचि अर्जुना। गगन जैसें आलिंगना। गगनाचिया॥ ५६५॥**

**अर्थ**—म्हणून आकाशाला आलिंगन देण्यास ज्याप्रमाणे आकाशच योग्य असते, त्याप्रमाणे, हे अर्जुना! माझे भजनास तोच योग्य आहे॥ ५६५॥

**गूढार्थदीपिका**—खरी भक्ति ज्ञानानंतरच होते, हे माउलीनी येथे स्पष्ट केले आहे.

**क्षीरसागरा परगुणें। कीजे क्षीरसागरचिपणें। अमृतचि होऊनि मिळणें। अमृतीं जेवीं॥ ५६६॥**
**साडेपंधरा मिसळावें। तैं साडेपंधरेंचि होआवें। तेवीं मी जालिया संभवे। भक्ति माझी॥ ५६७॥**
**हां गा सिंधुसि आनी होती। तरी गंगा कैसेनि मिळती। म्हणौनि मी न होतां भक्ती। अन्वयो आहे॥ ५६८॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे क्षीरसागराला क्षीरसागराचाच पाहुणचार योग्य होतो किंवा अमृत होऊनच अमृतात मिळता येते॥ ५६६॥ सोन्यात मिसळायचे असल्यास सोनेच झाले पाहिजे, त्याप्रमाणे मी झालो-म्हणजे माझ्याशी ज्ञानाने ऐक्य झाले-असताच माझी भक्ति संभवते॥ ५६७॥ गंगा समुद्राहून भिन्न असती तर ती समुद्रास कशी मिळाली असती, त्याप्रमाणे जीव माझ्याशी ऐक्य न पावता अन्वय भक्ति होईल काय?॥ ५६८॥

**गूढार्थदीपिका**—येथे श्रीज्ञानेश्वर माउलींनी अन्वयाला भक्ति म्हटले आहे. नाथांनीहि चतुःश्लोकी भागवतात "अन्वय माझी पूर्णभक्ति। व्यतिरेक शुद्ध ब्रह्मस्थिति" (ओ०६१९) या ओवीने असेच सांगितले आहे.

"सात्वस्मिन् परमप्रेमरूपा" डोळ्यांनी दिसणाऱ्या अशा सगुण परमेश्वराचे ठिकाणी परम प्रेम असणे ही भक्ति

होय, असे भगवान नारदांनी आपल्या भक्ति सूत्रात म्हटले असून परमेश्वराचे ठिकाणी परम प्रेम याला भक्ति म्हणतात असे शांडिल्यानी ''परानुरक्तिरीश्वरे'' या सूत्रात भक्तीचे स्वरूप वर्णिले आहे.

नाथांनी नाथभागवतादिकांतून व श्रीज्ञानेश्वर माउलींनी श्रीज्ञानेश्वर्यादिकांतून असेच भक्तिचे स्वरूप वर्णिले आहे.

अन्वय म्हणजे भक्ति व सगुण परमेश्वराचे ठिकाणी प्रेम असणे म्हणजे भक्ति अशा या भक्तिच्या दोन लक्षणात बाह्यत: भिन्नता दिसत असली तरी अन्वयाने नामरूपे ही पूर्ण ब्रह्मस्वरूप आहेत, असा प्रत्यय येऊन भगवंताच्या नामरूपाचे ठिकाणीहि परम प्रेम अनायासेच जडते-म्हणजेच नामरूपात्मक सगुणसाकार परमेश्वराचे ठिकाणी प्रेम जडते. म्हणूनच नाथांनी व माउलींनी अन्वयालाच भक्ति म्हणून भक्तीच्या दोन्ही लक्षणातील विरोध नाहीसा केला आहे.

अर्थातच ''सर्वं खल्विदं ब्रह्म'' या अन्वयाने होत असलेल्या परमप्रेमरूप भक्तीत अहंभाव शिल्लक राहत नाही तसेच एका परब्रह्माशिवाय सर्व विवर्तच असल्यामुळे जगत् व सगुण श्रीहरि दोघेच विवर्त असणार यात शंका नाही; पण अध्यस्त अशा जगताच्या नामरूपाचा जड-विनाशी वस्तुभावात्मक प्रत्ययामुळे जसा त्याच्या, त्याला आधारभूत असणाऱ्या सच्चिदानंद परब्रह्माच्या प्रत्ययाला पूर्वसंस्कारामुळे विकल्प उठून प्रतिबंध होतो, तसा नामरूपासह सच्चिदानंद परब्रह्मस्वरूप भासणाऱ्या अनध्यस्तविवर्त अशा सगुण श्रीहरीच्या नामरूपांचा प्रतिबंध होत नाही.

अर्थातच ''सर्वं खल्विदं ब्रह्म'' या अन्वयात म्हणा किंवा भक्तीत म्हणा अहंभाव शिल्लक राहत नाही, हे उघड आहे.

**ऐसियालागीं सर्व प्रकारीं। जैसा कल्लोळ अनन्य सागरीं। तैसा मातें अवधारीं। भजिन्नला जो॥ ५६९॥**
**सूर्या आणि प्रभे। एकवंकी जेणें लोभें। तो पाड मानूं लाभे। भजना तया॥ ५७०॥**

**अर्थ**—याकरिता ज्याप्रमाणे तरंग सागराहून निराळा न होता सर्व प्रकारांनी समुद्रावर खेळतो, त्याप्रमाणे माझेच जो सर्व भावांनी भजन करतो॥ ५६९॥ सूर्य व त्याची प्रभा यांचे जे स्वाभाविक प्रेमैक्य आहे त्याचीच उपमा त्याच्या भजनाला देता येईल॥ ५७०॥

**इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयानघ। एतद्बुद्ध्वा बुद्धिमान्स्यात्कृतकृत्यश्च भारत॥ २०॥**

**ॐतत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे**
**पुरुषोत्तमयोगो नाम पञ्चदशोऽध्याय:॥ १५॥**

**अर्थ**—हे निष्पाप अर्जुना! अत्यंत गुप्त असलेले असे हे शास्त्र मी तुला सांगितले आहे. हे जाणणारा पुरुषच खरा बुद्धिमान होय व तोच कृतकृत्य होतो॥ २०॥

**एवं कथिलयादारभ्य। जें हें सर्व शास्त्रैकलभ्य। उपनिषदां सौरभ्य। कमळदळां जेवीं॥ ५७१॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे कमलदलात सुगंध असतो, त्याप्रमाणे हा अध्याय म्हणजे सांगण्याला आरंभ केल्यापासून सर्व शास्त्रांच्या एकवाक्यतेने लाभणारा उपनिषदातील सुगंध आहे, असे जाण॥ ५७१॥

**गूढार्थदीपिका**—या पंधराव्या अध्यायात जे सांगितले आहे, तेच सर्व शास्त्राचे व उपनिषदांचे सारभूत सिद्धान्त होत, असा अर्थ.

**हें शब्दब्रह्माचें मथितें। व्यासप्रज्ञेचेनि हातें। मथूनि काढिलें आयितें। सार आम्हीं॥ ५७२॥**
**जे ज्ञानामृताची जान्हवी। जे आनंदचंद्रींची सतरावी। विचारक्षीरार्णवींची नवी। लक्ष्मी जे हे॥ ५७३॥**
**म्हणोनि आपुलेनि पदें वर्णें। अर्थाचेनि जीवेंप्राणें। मी वांचोनि हों नेणें। आन कांहीं॥ ५७४॥**

**अर्थ**—भगवान व्यासाच्या बुद्धिरूप हाताने शब्दब्रह्मरूपी वेदांचे मंथन करून हे आयते सार आम्ही काढून ठेवले आहे॥ ५७२॥ ही ज्ञानरूपी अमृताची गंगाच आहे किंवा ही आनंदरूपी चंद्राची सतरावी कळा आहे अथवा ही विचाररूपी क्षीरसागरातून निघालेली नवी लक्ष्मी आहे॥ ५७३॥ म्हणून ही गीता आपल्या अक्षर-वर्ण-पदाने व

अर्थरूप जीवाप्रमाणे मज भगवंतावाचून दुसरे काही होणे जाणत नाही॥ ५७४॥

**गूढार्थदीपिका**—गीतेची अक्षरे-पदे-वर्ण हे सर्व भगवद्‌रूपच आहेत, असा भाव.

**क्षराक्षरत्वें समोर जालें। तयांचें पुरुषत्व वाळिलें। मग सर्वस्व मज दिधलें। पुरुषोत्तमीं॥ ५७५॥**

**म्हणौनि जगीं गीता। मियां आत्मेनि पतिव्रता। जे हे प्रस्तुत तुवां आतां। आकर्णिली॥ ५७६॥**

**अर्थ**—क्षर व अक्षर हे दोन्ही ज्ञेयकोटीत किंवा दृश्यकोटीत असल्यामुळे त्याठिकाणी पुरुषत्व नाही असे सांगून शेवटी माझ्या पुरुषोत्तम स्वरूपाचे ठिकाणी सर्वस्व अर्पण केले॥ ५७५॥ म्हणून सध्या तू जी गीता ऐकलीस ती या जगात मज आत्मस्वरूपाचे योगानेच पतिव्रता झाली आहे॥ ५७६॥

**गूढार्थदीपिका**—गीता सर्वतोपरि परमेश्वराचेच प्रतिपादन करते, असा अर्थ.

**साचचि बोलाचें नव्हे हें शास्त्र। पैं संसार जिणतें हे शस्त्र। आत्मा अवतरविते मंत्र। अक्षरें इयें॥ ५७७॥**

**परी तुज पुढां सांगितलें। तें अर्जुना ऐंसें जालें। जें गौप्यधन काढिलें। माझें आजि तुवां॥ ५७८॥**

**मज चैतन्यशंभूचा माथां। जो निक्षेपु होता पार्था। तया गौतम जालासि आस्था। निधी तूं गा॥ ५७९॥**

**चोखटिवा आपुलिया। पुढिला उगाणा घेयावया। तया दर्पणाचीचि परी धनंजया। केली आम्हां॥ ५८०॥**

**कां भरलें चंद्रतारांगणीं। नभ सिंधू आपणयामाजीं आणी। तैसा गीतेसीं मी अंत:करणीं। सूदला तुवां॥ ५८१॥**

**अर्थ**—खरोखर हे नुसते बोलण्याजोगे शास्त्र नव्हे ते संसार जिंकणारे शस्त्र आहे व आत्म्याला प्रगट करणारी-म्हणजे सर्व सगुणसाकार ब्रह्मस्वरूपच आहे, असा प्रत्यय आणून देणारी-ही मंत्राक्षरे होत॥ ५७७॥ अर्जुना! तुझ्यासमोर जे निरूपण केले ते त्वां आज माझे गुप्तधनच काढले असे समज॥ ५७८॥ हे अर्जुना! मज चैतन्यरूपी शंकराचे मस्तकावर जो ज्ञानगंगेचा साठा होता तो तू आज श्रद्धेचे कोठार असा गौतम होऊन बाहेर काढलास॥ ५७९॥ हे अर्जुना! आपल्या शुद्ध निरुपाधिक स्वरूपाचा अनुभव घेण्याकरिता तू आम्हाला, स्वरूपाला समोर करून दाखविणारा, आरसा झाला आहेस॥ ५८०॥ किंवा ज्या प्रमाणे चंद्रनक्षत्रांनी भरलेले आकाश, समुद्र आपल्यामध्ये दाखवितो, त्याप्रमाणे गीतेसह मला त्वां आपल्या अंत:करणात साठविलेस॥ ५८१॥

**जे त्रिविध मळकटा। तूं सांडिलासी सुभटा। म्हणौनि गीतेसीं मज वसौटा। जालासि गा॥ ५८२॥**

**परी हें बोलों काय गीता। जे हे माझी उन्मेषलता। जाणे तो समस्ता। मोहा मुके॥ ५८३॥**

**सेविली अमृतसरिता। रोग दवडूनि पंडुसुता। अमरपण उचिता। देऊनि घाली॥ ५८४॥**

**तैसी गीता हे जाणितलिया। काय विस्मयो मोह जावया। परी आत्मज्ञानें आपणपयां। मिळिजे येथ॥ ५८५॥**

**जया आत्मज्ञानाच्या ठायीं। कर्म आपुलेया जीविता पाहीं। होऊनियां उतराई। लया जाय॥ ५८६॥**

**हारपलें दावूनि जैसा। मागु सरे वीरविलासा। ज्ञानचि कळस वळघे तैसा। कर्मप्रासादा॥ ५८७॥**

**अर्थ**—हे उत्तम योद्ध्या अर्जुना! तिन्ही प्रकारच्या दोषांपासून तू मुक्त झालास, म्हणून गीतेसह माझे राहण्याचे स्थान झाला आहेस॥ ५८२॥ फार काय सांगावे! माझी ज्ञानवल्ली जी गीता ती जो जाणतो तो सर्व मोहापासून मुक्त होतो॥ ५८३॥ ज्याप्रमाणे अर्जुना! अमृताच्या नदीचे सेवन केले असता ती संपूर्ण रोगाला नाहीसे करून योग्य अमरपण देते॥ ५८४॥ त्याप्रमाणे ही गीता जाणली असता मोह जाईल यात आश्चर्य नाही; पण गीतेने आत्मस्वरूपाचे ज्ञान होऊन आपण आपल्याशी ऐक्य पावतो॥ ५८५॥ पाहा! ज्या आत्मज्ञानाचे ठिकाणी कर्म आपल्या जीविताचे निंबलोण करून लय पावते॥ ५८६॥ हे वीरश्रेष्ठा अर्जुना! ज्याप्रमाणे हरविलेली वस्तु सापडवून देऊन शोधणे बंद पडते, त्याप्रमाणे निष्कामकर्मरूपी मंदिरावरच ज्ञानाचा कळस चढतो॥ ५८७॥

**म्हणौनि ज्ञानिया पुरुषा। कृत्य करू सरलें देखा। ऐसा अनाथांचा सखा। बोलिला तो॥ ५८८॥**

**तें श्रीकृष्णवचनामृत। पार्थी भरोनि असे वोसंडत। मग व्यासकृपा प्राप्त। संजयासी॥ ५८९॥**

**तो धृतराष्ट्रराया। सूतसे पान करावया। म्हणौनि जीवितान्त तया। नोहेचि भारी॥ ५९०॥**

**एन्हवी गीताश्रवणअवसरीं। आवडों लागतां अनधिकारी। परी सेखीं तेचि उजरी। पातला भली॥ ५९१॥**

**जेव्हां द्राक्षीं दूध घातलें। तेव्हां वायां गेलें गमलें। परी फळपाकीं दुणावलें। देखिजे जेवीं॥ ५९२॥**
**तैसीं श्रीहरीवक्त्रींचीं अक्षरें। संजयें सांगितलीं आदरें। तिहीं अंधु तोही अवसरें। सुखिया जाला॥ ५९३॥**

**अर्थ**—म्हणून ज्ञानी पुरुषाला कर्म करण्याचे बंधन राहत नाही, पाहा! असे अनाथांचे बंधु भगवान श्रीकृष्ण म्हणाले॥ ५८८॥ भगवान श्रीकृष्णाच्या मुखातून निघालेले हे ज्ञानामृत. अर्जुनाचे अंत:करणात पूर्ण भरून वाहू लागले व भगवान व्यासांच्या कृपेने ते संजयालाहि प्राप्त झाले॥ ५८९॥ तो संजय धृतराष्ट्र राजाला ते ज्ञानामृत प्राशन करावयाला देत होता, म्हणूनच त्याला मरणसमयी दु:ख झाले नाही॥ ५९०॥ राजा धृतराष्ट्र, गीता श्रवण करीत असताना जरी अनधिकारी वाटत होता, तरी शेवटी गीताश्रवणाने त्याला सद्गतिच प्राप्त झाली॥ ५९१॥ ज्याप्रमाणे द्राक्षाच्या झाडांना दूध घालतांना ते व्यर्थ गेले असे प्रथम वाटते; पण त्याने फळाची गोडी दुप्पट वाढली असे मागाहून जसे दिसून येते॥ ५९२॥ त्याप्रमाणे भगवंताच्या मुखातून निघालेली अक्षरे संजयाने श्रद्धेने सांगितली, पण ती ऐकून शेवटी धृतराष्ट्रहि त्या बोधामृताने सुखी झाला॥ ५९३॥

**तेंचि म्हाटेनि विन्यासें। मियां उन्मेषें ठसें ठोंबसें। जाणें नेणें तैसें। निरोपिलें॥ ५९४॥**
**सेवंतीये अरसिकांही। आंग पाहतां विशेष तरी नाहीं। परी सौरभ्य नेलें तिहीं। भ्रमरीं जाणिजे॥ ५९५॥**
**तैसें घडतें प्रमेय घेइजे। उणें तें मज देइजे। जें नेणणें हेंचि सहजें। रूप कीं बाळा॥ ५९६॥**
**परी नेणतें जऱ्ही होये। तऱ्ही देखोनि बाप कीं माये। हर्ष केंही न समाये। चोज करिती॥ ५९७॥**
**तैसें संत माहेर माझें। तुम्ही मिनलिया मी लाडैजे। तेंचि ग्रंथाचेनि व्याजें। जाणिजो जी॥ ५९८॥**
**आतां विश्वात्मकु हा माझा। स्वामी श्रीनिवृत्तिराजा। तो अवधारू वाक्यपूजा। ज्ञानदेवो म्हणे॥ ५९९॥**

**इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां पञ्चदशोऽध्याय:॥ १५॥**

**अर्थ**—त्याचे मी अजाणत्याने ओबडधोबड मराठी भाषेत रचना करून कळले, न कळले अशा ज्ञानाने निरूपण केले॥ ५९४॥ अरसिक पुरुष शेवंतीचे फूल पाहील तर त्याला विशेष काही दिसून येणार नाही; पण त्यातील विशेष जो सुगंध तो मात्र भ्रमरच लुटतो, हे लक्षात ठेवा॥ ५९५॥ त्याप्रमाणे या ग्रंथात जे सिद्धान्त मान्य असतील ते स्वीकारावे व न्यून (चूक) वाटतील ते परत द्यावे; कारण सर्व न समजणे हेच लहान मुलाचे स्वाभाविक स्वरूप असते॥ ५९६॥ तरी ज्याप्रमाणे लहान मूल अज्ञानी असले तरी आईबाप त्याला पाहून हर्षभरित होतात व त्याचे कोडकौतुकच करतात॥ ५९७॥ त्याप्रमाणे तुम्ही संतश्रोते माझे माहेर आहात. तुम्ही भेटलात म्हणून मी तुमच्याशी जे लडिवाळपणाने वागावे ते या ग्रंथाच्या मिषानेच होय, असे जाणा॥ ५९८॥ श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात, माझे विश्वस्वरूपी श्रीगुरु निवृत्तिनाथ महाराज ही वचनरूपी पूजा श्रवण करोत॥ ५९९॥

**श्रीसद्गुरुकृपेने ह्या पंधराव्या अध्यायाचा अनुवाद गूढार्थदीपिकेसह पूर्ण झाला तो त्यांचे चरणी समर्पण असो.**



## समारोप

मागील चौदाव्या अध्यायाच्या शेवटी भगवंतांनी सांगितले की ज्याला आत्मज्ञान झाले तोच मुक्त होऊ शकतो. पण ते ज्ञान, वैराग्यावाचून चित्तात दृढ ठसू शकत नाही. संसाराची अनित्यता मनात पक्की ठसली असताच वैराग्य प्राप्त होते; म्हणून वैराग्य उत्पन्न होण्याकरिता या पंधराव्या अध्यायात भगवंतांनी वृक्षाच्या रूपकाने या संसाराची अनित्यता दाखविली आहे.

भगवान म्हणतात, अर्जुना! वर मुळे व खाली शाखा असलेल्या संसारवृक्षाला अश्वत्थ म्हणतात. ऋग्वेदादि वेद त्याची पाने असून जो त्या अश्वत्थवृक्षाला जाणतो, तोच वेद जाणणारा होय. या संसारवृक्षाच्या फांद्या खाली, वर पसरल्या असून सत्व, रज, तम या तीन गुणांनी वाढल्या आहेत. विषय त्यांची पाने, अंकुरे होत. मनुष्यलोकात कर्मांना कारण होणारी वासनारूपी मूळे खाली पसरली आहेत.

ज्ञानविचार केला असता या संसारवृक्षाचे स्वरूप वर्णन केल्याप्रमाणे दिसत नाही. त्याला आदि-अंत नसून त्याचे अस्तित्वहि सिद्ध होत नाही. हा संसारवृक्ष अज्ञानभ्रमाने बलवान झाला आहे. ही अज्ञानमूळे असलेल्या संसारवृक्षाला कापून काढण्याकरिता आत्मज्ञान हेच उत्तम खड्ग होय. तेव्हा आत्मज्ञानरूपी तरवारीने हा संसारवृक्ष समूळ तोडून ज्या पदाचे ठिकाणी प्राप्त झालेले पुरुष पुन: संसारात परत येत नाहीत व ज्यापासून अनादि संसारचक्राची प्रवृत्ति झाली आहे, त्या पदाला शरण जाऊन त्याचा शोध करावा.

सत्कार, अविवेक यांचा त्याग करणारे, आसक्ति व आसक्तीचे दोष जिंकणारे, आत्मस्वरूपाचे ठिकाणी रममाण होणारे, निष्काम झालेले व सुखदु:खापासून मुक्त झालेले ज्ञानी पुरुष त्या अविनाशी पदाला प्राप्त होतात.

सूर्य, चंद्र किंवा अग्नि हे देखील त्या पदाला प्रकाशित करू शकत नाहीत. ते माझे परमस्थान होय.

या संसारात जो जीव म्हणून प्रसिद्ध आहे तो माझाच अंश आहे. जीव हा पूर्ण परब्रह्मस्वरूपच असून मायाभ्रांतीने तो आपल्याला शरीरापुरते मर्यादित मानतो, जीव हा, मरतेवेळी स्थूलदेह येथेच सोडून दहा इंद्रिये, पंचप्राण, मन व बुद्धि या सतरा तत्वे मिळून झालेल्या लिंगदेहास मात्र घेऊन जातो. पंचज्ञानेंद्रियांचा अभिमान धरून जीवात्मा विषय भोगतो. देह सोडून जाताना, देहात असताना, विषयादि भोग भोगताना अथवा गुणयुक्त असताना अज्ञानी लोक आपल्या स्वरूपास पाहत नाहीत. शमदमादि द्वारा परमेश्वरप्राप्तीचा अभ्यास करणारे योगी मात्र आपल्या सूक्ष्म झालेल्या बुद्धीने परमेश्वरास पाहतात. ज्यांनी आपले चित्त शुद्ध केले नाही ते परमेश्वरास पाहू शकत नाहीत. सूर्य, चंद्र, अग्नि इत्यादि सर्व भौतिक पदार्थ जड व काल्पनिक असल्यामुळे त्यांच्या ठिकाणी दिसून येणाऱ्या शक्ति त्यांच्या नसून सर्व ब्रह्मांडाला अधिष्ठित असलेल्या परमात्म्याच्या आहेत.

भगवान म्हणतात, मीच सर्वांच्या हृदयात वसत असून माझ्यामुळे आठवण, ज्ञान व विस्मरण होत असते. सर्व वेदांनी मीच जाणला जातो मीच वेदान्तसंप्रदाय उत्पन्न करणारा असून वेद जाणणाराहि मीच आहे.

या शरीरात परमात्मा व जीव हे दोघेहि एकाच ठिकाणी आहेत. पण जीव हा उपाधिगत असून परमात्मा उपाधिरहित आहे. या परमात्म्याला उत्तम पुरुषहि म्हणतात. उपाधिगत जीवाची मर्यादा समजली असता उपाधिरहित जो परमात्मा तोहि अनायासे गोचर होतो, म्हणून भगवान म्हणतात, अर्जुना! तुला मी आधी उपाधिगत जीवाची मर्यादा सांगतो, ऐक.

हा जीव, मुख्य जीव किंवा एकजीव अथवा अक्षरपुरुष व जीवाभास किंवा क्षरपुरुष असा दोन प्रकारचा आहे. अंत:करणप्रतिबिंबित जीवाभासाला क्षरपुरुष म्हणतात. ज्याप्रमाणे पाण्याचे चांचल्यादि धर्म पाण्यातील प्रतिबिंबाचे ठिकाणी दिसून पडतात, त्याप्रमाणे मनाचे सुखदु:खादि, प्राणाचे क्षुधा-तृषादि, इंद्रियांचे, अंधत्व,

मूकत्व, पटुत्वादि, देहाचे गौरकृष्णादि धर्म उपाधिगत क्षरपुरुष आपले ठिकाणी भ्रांतीने मानून घेतो. या प्रतिबिंबरूप जीवाभावाला जो बिंबरूप अक्षरपुरुष आहे, तो कार्यरूप अंत:करणउपाधीचे कारण जी माया किंवा अज्ञान याला नुसता आधार आहे. अक्षरपुरुषाचे ठिकाणी मी जाणतो किंवा जाणत नाही या दोन्ही वृत्ती नसतात. आकाराला येण्यापूर्वी जशी मातीची दशा आकाररहित असते, तशी या अक्षरपुरुषाची अव्यक्त दशा असते. यथार्थज्ञानाने एकरूप न होता किंवा अनेकरूप होऊन भेद न पावता जे निव्वळ नेणतेपण ते या अक्षरपुरुषाचे स्वरूप होय. येथपर्यंत जीवदशा आहे.

यापलीकडे उत्तम पुरुष किंवा परमात्माच आहे व अर्थातच तो निरुपाधिक आहे. हा निरुपाधिक परमात्मा सगुण व निर्गुण असा दोन प्रकारचा आहे.

सगुण परमात्मा विवर्तरूप असून निर्गुण परमात्मा अधिष्ठानरूप आहे. या सगुणसाकार परमात्मरूप विवर्तात अधिष्ठानरूप परमात्मा लोपला जात नाही. उलट स्पष्ट अनुभवाला येतो.

अधिष्ठान ज्ञानाने विवर्तरूप सगुण परमात्म्याची निवृत्ति होत नाही व अधिष्ठानरूप निर्गुण परमात्मस्वरूपाशी तो अभिन्नच राहतो; म्हणून त्या सगुणसाकार परमात्म्याला निरुपाधिक अथवा अनध्यस्तविवर्त म्हणतात. जो अविनाशी आहे व तिन्ही लोकांना व्यापून त्यांचे धारण व नियंत्रण करणारा आहे तो मीच आहे. अर्जुना! वेदशास्त्रे व लोक यांच्यात पुरुषोत्तम या नावाने मीच प्रसिद्ध आहे. जो पुरुष ज्ञानसंपन्न होऊन याप्रमाणे मला जाणतो, तो सर्व जाणणारा होऊन सर्व भावाने माझेच भजन करतो. तोच खरा बुद्धिमान होय व तोच कृतकृत्य होय.

**॥ श्रीमद्‌सद्‌गुरु श्रीज्ञानेश्वर महाराजार्पणमस्तु ॥**



॥ श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ॥

# अध्याय सोळावा

**मावळवीत विश्वाभासु। नवल उदयला चंडांशु। अद्वयाब्जिनीविकाशु। वंदूं आतां॥ १॥**

**अर्थ**—अद्वैतसत्तारूप कमलाला विकसित करून संपूर्ण विश्वाचा भास नाहीसा करणारा असा हा आश्चर्यकारक प्रखर किरणरूपी ज्ञानसूर्य उगवला आहे. त्यालाच आता वंदन करू॥ १॥

**गूढार्थदीपिका**—प्राकृत सूर्याच्या प्रकाशाने विश्व दिसते, पण ब्रह्मज्ञानरूपी सूर्याचा उदय झाला असता विश्व मावळते व त्याचाच एक प्रकाश दिसतो, असा श्रीज्ञानेश्वर महाराज आपला अनुभव सांगतात.

**जो अविद्याराती रुसोनियां। गिळी ज्ञानाज्ञानचांदणियां। जो सुदिनु करी ज्ञानियां। स्वबोधाचा॥ २॥**

**अर्थ**—हा ज्ञानसूर्य अविद्यारूप रात्र नाहीशी करून व त्यात चमकणाऱ्या ज्ञान व अज्ञानवृत्तिरूप चांदण्या गिळून ज्ञानी पुरुषाला आत्मबोधाचा अखंड दिवसच उजाडवितो॥ २॥

**गूढार्थदीपिका—ज्ञानाज्ञान चांदणियां**-अविद्या त्रिगुणात्मक असून ज्ञान म्हणजे जाणणे, हे सत्वगुणाचे कार्य असल्यामुळे व अज्ञान म्हणजे न जाणणे, हें तमोगुणाचे कार्य असल्यामुळे ज्ञानाज्ञानाला माउलीने अविद्यारात्रीतील चांदण्याची उपमा दिली आहे.

**जेणें विवळतिये सवळें। लाहोनि आत्मज्ञानाचे डोळे। सांडिती देहाहंतेचीं अविसाळें। जीवपक्षी॥ ३॥**

**अर्थ**—ज्या आत्मज्ञानाच्या उदयाबरोबर प्राप्त झालेल्या ज्ञानप्रकाश दृष्टीमुळे जीवपक्षी देहअहंतारूपी घरटे सोडून जातो॥ ३॥

**गूढार्थदीपिका**—आत्मज्ञान झाले असता मी देह आहे, अशी मर्यादित बुद्धि न राहता, सर्वत्र मीच आहे, अशी व्यापक बुद्धि होते.

**लिंगदेहकमळाचा। पोटीं वेंचयता चिद्भ्रमराचा। बंदिमोक्षु जयाचा। उदैला होय॥ ४॥**

**अर्थ**—ज्या आत्मज्ञानरूपी सूर्याच्या उदयाबरोबर लिंगदेहरूपी कमळात अडकून पडून मरणपरंपरा भोगणाऱ्या जीवचैतन्यरूपी भ्रमराच्या बंदिवासाचा मोक्ष होतो॥ ४॥

**शब्दाचिया आसकडीं। भेदनदीच्या दोहीं थडीं। आरडत विरहवेडीं। बुद्धिबोधु॥ ५॥**

**अर्थ**—बुद्धि व यथार्थबोध हे दोन चक्रवाक पक्षी शब्दाच्या भिन्नार्थरूपी अडचणीत सापडल्यामुळे परस्परांचा वियोग होऊन ते दोघे भेदनदीच्या दोन काठावर विरहाने वेडे होऊन अनादि कालापासून ओरडत बसले आहेत॥ ५॥

**गूढार्थदीपिका**—चक्रवाक पक्षी पाण्याचे ठिकाणी राहतात व ते अत्यंत कामासक्त असून परस्परांपासून किंचित् दूर झाले तर परस्परांच्या विरहाने ओरडतात असा पुराणातून उल्लेख आहे.

आत्मज्ञान होण्यापूर्वी शब्दाचा विश्वरूप अर्थ करून केवळ जाणीवरूप ज्ञानापासून ज्ञातृपणाने भिन्न पडणारी बुद्धि भोक्तृपणाने अनादिकालापासून दुःख भोगते.

**तया चक्रवाकांचें मिथुन। सामरस्याचें समाधान। भोगवी जो चिद्गगन-। भुवनदिवा॥ ६॥**

**अर्थ**—जो चिदाकाशातील अखंड प्रकाशरूप गुरुरूप सूर्य या बोधबुद्धिरूप चक्रवाकपक्षांच्या जोडप्याकडून समरस ऐक्यतेच्या भेटीचे सुख भोगवितो॥ ६॥

**गूढार्थदीपिका**—आत्मज्ञान झाले असता सर्व शब्द साक्षात् किंवा परंपरेने एका समरस अद्वैत परब्रह्माचेच प्रतिपादन करतात, असे जाणून बुद्धि ज्ञानाशी एकरूप होते व दु:खातून मुक्त होते.

**जेणें पाहालिये पाहांटे। भेदाची चोरळी फिटे। रिघती आत्मानुभववाटे। पांथिक योगी॥ ७॥**

**अर्थ**—ज्याच्या ज्ञानप्रकाशाच्या पाहाटेमुळे भेदाची चोरवेळच नाहीशी होते व परमार्थमार्गाने जाऊ पाहणारे वाटसरू जे योगी ते आत्मानुभवाच्या वाटेने जाऊ लागतात॥ ७॥

**गूढार्थदीपिका**—आत्मज्ञानाने परब्रह्माची एक अफुट, अद्वैतसत्ताच अनुभवाला येते, असा अर्थ.

**जयाचेनि विवेककिरणसंगें। उन्मेखसूर्यकांत फुणगें। दीपले जाळिती दांगें। संसाराचीं॥ ८॥**
**जयाचा रश्मिपुंजु निबरु। होतां स्वरूप उखरीं स्थिरु। ये महासिद्धीचा पूरु। मृगजळ तें॥ ९॥**

**अर्थ**—ज्याच्या विवेकरूपी किरणाने ज्ञानरूपी सूर्यकान्त मण्यातून निघणाऱ्या ठिणग्याचा प्रकाश संसाररूप अरण्ये जाळतो॥ ८॥ ज्याचा तीव्र किरणरूपी समुदाय आत्मस्वरूपी माळजमिनीवर स्थिर झाला असता महासिद्धीचा जो जगद्रूप पूर येतो ते मृगजळ होय॥ ९॥

**गूढार्थदीपिका**—आत्मस्वरूपाला 'उखर' म्हणजे माळ जमिनीची उपमा देऊन परब्रह्मापासून जगत् उत्पन्न होणे शक्य नाही. हेच येथे सुचविले आहे.

**जो प्रत्यग्बोधाचिया माथया। सोहंतेचां माध्यान्हीं आलिया। लपे आत्मभ्रांतिछाया। आपणपां तळीं॥ १०॥**

**अर्थ**—जो सर्वान्तिर्यामी प्रत्यक्स्वरूप आत्मज्ञानरूप सूर्य माथ्यावर येऊन सोहंरूप माध्यान्हवेळ झाली असता-म्हणजे अहं ब्रह्मास्मि हा बोध दृढ झाला असता-आत्मविस्मृतिरूप भ्रांति आपल्या खालीच लोपली जाते.॥ १०॥

**गूढार्थदीपिका**—अमृतानुभव प्रकरण तीन, ओवी तीसमध्येहि माउलीने असेच म्हटले आहे (ना तरी माध्यान्ह काळी। छाया न दिसे वेगळी। असे पायातळी। रिगोनिया)

**ते वेळी विश्वस्वप्नासहितें। कोण अन्यथामतिनिद्रेतें। सांभाळी नुरेचि जेथें। मायाराती॥ ११॥**

**अर्थ**—तेव्हा मायाभ्रांतिरूप रात्र मुळीच उरत नाही. मग विश्वरूप स्वप्नासहित असलेल्या विपरीत ज्ञानरूप निद्रेला कोण सांभाळणार?॥ ११॥

**गूढार्थदीपिका**—आत्मज्ञानाने मायारूप भ्रांति नाहीशी झाली की विपरीत बुद्धि व प्रपंचभास हेहि नाहीसे होतात, असा अर्थ.

**म्हणौनि अद्वयबोधपाटणीं। तेथ महानंदाची दाटणी। मग सुखानुभूतीचीं घेणीं देणीं। मंदावों लागती॥ १२॥**

**अर्थ**—अशा त्या अद्वैतज्ञानरूप शहरात एक ब्रह्मानंदाची दाटी असते; म्हणून सुखानुभवाच्या देण्याघेण्याचा व्यवहार क्षीण होऊ लागतो॥ १२॥

**गूढार्थदीपिका**—आत्मज्ञानाचा अद्वैतबोध दृढ झाला असता सुखाचे भोक्तृत्व देखील स्फुरत नाही व जीव सुखाचा भोक्ता होण्यापुरता देखील निराळा राहत नाही. केवळ सुखस्वरूप होऊन जातो.

**किंबहुना ऐसैसें। मुक्तकैवल्य सुदिवसें। सदा लाहिजे कां प्रकाशें। जयाचेनि॥ १३॥**

**अर्थ**—फार काय सांगावे! ज्याच्या ज्ञानप्रकाशाने वर सांगितल्याप्रमाणे सदासर्वदा उपाधीपासून मुक्त झालेला असा केवळ एक आत्मस्वरूपच होऊन राहतो॥ १३॥

**गूढार्थदीपिका**—आत्मज्ञानाने उपाधिपासून खरोखर मुक्त होऊन आत्मस्वरूप झालेला ज्ञानीपुरुष पुन: कधीहि, कोणत्याहि व कशाहि प्रसंगी उपाधीशी ऐक्य पावू शकत नाही, असा अर्थ.

**अपरोक्षानुभूति**—

**तत्त्वज्ञानोदयादूर्ध्वं प्रारब्धं नैव विद्यते। देहादीनामसत्यत्वाद्यथा स्वप्नो विबोधतः॥ ९१॥**
**कर्मजन्मान्तरकृतं प्रारब्धमिति कीर्तितम्। तत्तु जन्मान्तराभावात्पुंसो नैवास्ति कर्हिचित्॥ ९२॥**
**स्वप्नदेहो यथाऽध्यस्तस्तथैवायं हि देहकः। अध्यस्तस्य कुतो जन्म जन्माभावे हि तत्कुतः॥ ९३॥**

**उपादानं प्रपंचस्य मृद्भांडस्येव कथ्यते। अज्ञानं चैव वेदान्तैस्तस्मिन्नष्टे क्व विश्वता॥ ९४॥**
**यथा रज्जुं परित्यज्य सर्पं गृण्हाति वै भ्रमात्। तद्वत्सत्यमविज्ञाय जगत्पश्यति मूढधीः॥ ९५॥**
**रज्जुरूपे परिज्ञाते सर्पभ्रांतिर्न तिष्ठति। अधिष्ठाने तथा इति प्रपंचः शून्यतां व्रजेत्॥ ९६॥**
**देहस्यापि प्रपंचत्वात्प्रारब्धावस्थितिः कुतः। अज्ञानिजनबोधार्थं प्रारब्धं वक्ति वैं श्रुतिः॥ ९७॥**

**भावार्थ**—ज्याप्रमाणे जाग आलेल्या माणसाचे स्वप्न शिल्लक राहत नाही, त्याप्रमाणे देहादिक सर्व केवळ भासमात्र आहेत, म्हणून खोटे असल्यामुळे आत्मज्ञान प्राप्त झाल्यानंतर प्रारब्ध शेष राहत नाही॥ ९१ ॥ मागील जन्मात केलेले कर्म या जन्मात प्रारब्धरूप होते, असे म्हटले आहे; परंतु आत्मज्ञानविचाराने मागील जन्म, कर्म इत्यादिकांचे देखील अस्तित्वच सिद्ध होत नसल्यामुळे जीवाला खरोखर मागील जन्महि नव्हते॥ ९२ ॥ स्वप्नातील देह जसा काल्पनिक असतो, तसाच हा देहादि काल्पनिकच आहे. अशा काल्पनिक देहाचा जन्म कसा होणार? व जन्मच नाही तर प्रारब्ध कोठे राहणार?॥ ९३ ॥ म्हणूनच माती जशी मडक्याचे उपादानकारण होय, असे म्हटले जाते, त्याप्रमाणे या सर्व प्रपंचाचे अज्ञान हे उपादानकारण होय असे वेदान्तशास्त्रात सांगितले आहे. ते अज्ञान नाहीसे झाल्यावर तो प्रपंच कोठे भासणार?॥ ९४ ॥ ज्याप्रमाणे दोरी टाकून देऊन भ्रमाने सर्प घेतला जातो, त्याप्रमाणे अज्ञानी लोक परब्रह्म जाणत नसल्यामुळे परब्रह्माला जगद्रूपाने पाहतात॥ ९५ ॥ ज्याप्रमाणे दोरी जाणल्यावर सर्पाभास उरत नाही, त्याप्रमाणे जगताच्या अधिष्ठानभूत परब्रह्माला जाणल्यावर जगत् शून्यस्वरूप होते॥ ९६ ॥ देहहि प्रपंचातीलच असल्यामुळे देहच शून्यस्वरूप आहे, तर प्रारब्धाची स्थिति कोठून असणार? अज्ञान्याच्या शंकांचे निरसन करण्याकरिता श्रुतींनी ज्ञान्याच्या ठिकाणी प्रारब्ध राहते, असे सांगितले आहे; वस्तुतः नाही॥ ९७ ॥

असे आचार्यांनीहि अपरोक्षानुभूतीत म्हटले आहे. श्रीतुकाराम महाराजहि "संचित क्रियमाण। भक्तां प्रारब्ध नाही जाण" या अभंगात असेच म्हणतात.

**जो निजधामव्योमींचा रावो। उदैलाचि उदैजतखेंवो। फेडी पूर्वादि दिशांसि ठावो। उदयास्ताचा॥ १४॥**
**न दिसणें दिसणेंनसीं मावळवी। दोहीं झांकिलें तें सैंघ पालवी। काय बहु बोलों ते आघवी। उखाचि आनी॥ १५ ॥**
**तो अहोरात्रांचा पैलकडु। कोणें देखावा ज्ञानमार्तंडु। जो प्रकाश्येंवीण सुरवाडु। प्रकाशाचा॥ १६॥**
**तया चित्सूर्या श्रीनिवृत्ती। आतां नमो म्हणों पुढतपुढती। जे बाधका येइजतसे स्तुती। बोलाचिया॥ १७॥**
**देवाचें महिमान पाहोनियां। स्तुति तरी येइजे चांगावया। जरी स्तव्यबुद्धीसीं लया। जाइजे कां॥ १८॥**

**अर्थ**—जो चित्सूर्य आपणच आपल्या चिदाकाशाचा स्वामी असून ज्ञानरूपाने उदय पावताक्षणीच पूर्वादि दिशांच्या उदय-अस्तांचा ठावठिकाणहि उरूं देत नाही॥ १४॥ पदार्थाचे दिसणे न दिसणे हे दोन्ही नाहीसे करून पदार्थांनी झाकले गेलेले परब्रह्म सर्वत्र प्रत्ययाला आणून देतो. फार काय सांगू! ही चित्सूर्याचे होणारी पाहाट काही वेगळीच आहे॥ १५॥ जो दिवस-रात्र यांचे पलीकडील तीर असून अन्य प्रकाशांनी प्रकाशला न जाता केवळ प्रकाशाचाच सुकाळ आहे, तो ज्ञानसूर्य कोणी पाहावा!॥ १६॥ शब्दांनी केली जाणारी स्तुति त्याच्या स्वरूपाला बाधकच होत असल्यामुळे त्या चित्स्वरूपी श्रीनिवृत्तिनाथांना आता वारंवार नमस्कार असो, असेच मी म्हणतो॥ १७॥ श्रीगुरुचा महिमा पाहून त्याची चांगली योग्य स्तुति होण्याकरिता श्रीगुरुस्तवनास योग्य व मी स्तवनकर्ता या दोन बुद्धी लयाला गेल्या पाहिजेत॥ १८॥

**गूढार्थदीपिका**—अद्वैतस्वरूपाची, त्याहून भिन्न राहून केलेली स्तुति लटकीच होय, असा अर्थ.

**जो सर्व नेणिवां जाणिजे। मौनाचिया मिठीया वानिजे। कांहींच न होनि आणिजे। आपणपयां जो॥ १९॥**

**अर्थ**—काही न जाणता ज्याला जाणावे, मौनाला मिठी मारून त्याची स्तुति करावी व जो काही एक न होऊ देता (आपण) आपल्याशी ऐक्य करतो॥ १९॥

**गूढार्थदीपिका**—सच्चिदानंद आत्मस्वरूप सर्व विशेषणरहित असे निर्विशेष आहे, असा अर्थ.

**जया तुझिया उद्देशासाठीं। पश्यंती मध्यमा पोटीं। सूनि परेसींही पाठीं। वैखरी विरे॥ २०॥**

**तया तूतें मी सेवकपणें। लेववीं बोलकेया स्तोत्राचें लेणें। हें उपसाहावेंही म्हणतां उणें। अद्वयानंदा॥ २१ ॥**

**अर्थ**—ज्या तुझ्या प्राप्तीकरिता परावाणीसह पश्यंति, मध्यमा वाणीला पोटात घालून वैखरी वाणी लय पावते॥ २० ॥ आपले ठिकाणी सेवकपणा घेऊन शब्दरूप स्तोत्रांचे अलंकार तुम्हाला लेववित आहे, ह्याची क्षमा करा. हे अद्वयानंद श्रीगुरुनाथा! हे म्हणणेहि आयोग्यच होणार आहे॥ २१ ॥

**गूढार्थदीपिका**—निर्विशेष आत्मस्वरूप श्रीगुरुचे ठिकाणी केलेली स्तुति अयोग्य होत असली तरी सेवकभावाने केलेल्या स्तुतीच्या योगाने ग्रंथकर्तृत्वादिकांचा अहंकार उठत नाही व क्षमायाचनेने अयोग्यता या दोषांचाहि परिहार होऊन सेवक गुरुकृपापात्र होतो.

**परी रंकें अमृताचा सागरु। देखिलिया पडे उचिताचा विसरु। मग करूं धांवे पाहुणेरु। शाकांचा तया॥ २२॥**
**तेथ शाकुही कीर बहुत म्हणावा। तयाचा हर्षवेगुचि तो घ्यावा। उजळोनि दिव्यतेजा हातिवा। ते भक्तीचि पाहावी॥ २३ ॥**
**बाळा उचित जाणणें होये। तरी बाळपणचि कें आहे। परी साचचि येरी माये। म्हणोनि तोषे॥ २४॥**
**हां गा गांवरसें भरलें। पाणी पाठीं पाय देत आलें। तें गंगा काय म्हणितलें। परतें सर॥ २५॥**
**जी भृगूचा कैसा अपकारु। कीं तो मानूनि प्रियोपचारु। काय तोषेचिना शार्ङ्गधरु। गुरुत्वासीं॥ २६॥**
**की आंधारें खतेलें अंबर। जाले दिवसनाथा समोर। तेणें तयातें पऱ्हा सर। म्हणितलें काई॥ २७॥**
**तेवीं भेदबुद्धीचिये तुळे। घालूनि सूर्यश्लेषाचें कांटाळें। तुकलासी ते येकी वेळे। उपसाहिजो जी॥ २८॥**

**अर्थ**—पण दरिद्री पुरुषाने अमृताचा समुद्र पाहिला असता आनंदाचे भरात त्याला योग्य सत्कार करण्याचे विसरतो मग तो त्याला शाकभाज्यांचा पाहूणचार करण्याला धावतो॥ २२॥ तेथे शाकभाज्यांचा तरी पाहुणचार पुष्कळच झाला. खरोखर ज्या आनंदाने तो पाहुणचार करतो त्या आनंदाकडेच लक्ष दिले पाहिजे. तेज:पुंज सूर्याला काडवातीने ज्या भक्तीने ओवाळले जाते त्या भक्तीकडेच पाहावे लागते॥ २३॥ योग्य काय ते लेकराला समजले असते तर त्याला लेकरू कसे म्हणता आले असते; पण त्याची आई खरोखरच जन्मदात्री असते म्हणूनच ती त्याच्या कोणत्याहि चेष्टेचा आनंदच मानते॥ २४॥ गावातील सर्व पाणी वेऊन झालेला ओघ गंगेत मिळू लागला तर, गंगा त्याला 'बाजूला हो' म्हणते काय?॥ २५॥ भृगुऋषीचा केवढा अपराध होता, पण ब्राह्मण म्हणून गुरु मानल्यामुळे त्या अपराधास प्रिय भक्ताने अर्पिलेल्या उपचारासारखे मानून भगवान संतुष्ट झाले नाहीत काय?॥ २६॥ किंवा आंधाराने व्यापलेले आकाश सूर्यासमोर झाले असता त्याने त्याला "दूर हो" असे म्हटले काय?॥ २७॥ त्याप्रमाणे भेदबुद्धीच्या तराजूने सूर्यादिकांची उपमारूप वजने टाकून तुझी तुलना केली त्या अपराधाची क्षमा करावी॥ २८॥

**गूढार्थदीपिका**—अभेद अशा श्रीगुरुचे ठिकाणी भेद कल्पून तुलना केली, अनुपमाला उपमा दिली, हा अपराध झाला असे माउली म्हणते.

**जिहीं ध्यानाचां डोळां पाहिलासी। वेदादि वाचां वानिलासी। जें उपसाहिलें तयांसी। ते आम्हांही करीं॥ २९ ॥**
**परी मी आजि तुझ्या गुणीं। लांचावलों अपराधु न गणीं। भलतें करीं परी अर्धधणीं। नुठी कदा॥ ३० ॥**

**अर्थ**—ज्यांनी तुम्हाला ध्यानरूप डोळ्यांनी पाहिले, वेदादि शब्दांनी तुमचे वर्णन केले त्यांचे अपराध आपण जसे पोटात घातले तसे माझेहि अपराध आपण पोटात घालावे॥ २९ ॥ पण मी आज तुमचे गुणवर्णन करण्यात लुब्ध झालो असल्यामुळे तुम्ही तो अपराध मानू नये. आपण काही करा, पण मी अर्धपोटी उठणार नाही॥ ३० ॥

**मियां गीता येणें नांवें। तुझें पसायामृत सुहावें। वानूं लाधलों तें दुणेन थावें। दैवलें दैवे॥ ३१ ॥**
**माझिया सत्यवादाचें तप। वाचा केलें बहुत कल्प। तया फळांचें हें महाद्वीप। पातली प्रभु॥ ३२ ॥**

**अर्थ**—गीता या नावाने असलेले जे तुझे आवडते प्रसादामृत त्याचे जे मी वर्णन करू लागलो त्या सद्भाग्याने मी दुप्पट जोराने भाग्यवान झालो॥ ३१ ॥ हे प्रभो! असे वाटते की माझ्या वाणीने कल्पानुकल्प सत्य बोलण्याचे जे तप केले त्याचे तिला गीतारूप अफाट बेट हे फळ प्राप्त झाले॥ ३२ ॥

**गूढार्थदीपिका**—गीतेची एवढी थोरवी आहे की कोणत्याहि रीतीने तिचा आश्रय करण्याची बुद्धि होणे हे

कल्पानुकल्प केलेल्या सत्यवादासारख्या महातपाचे फळ होय, असा माउलीच्या म्हणण्याचा भाव.

**पुण्यें पोशिलीं असाधारणें। तियें तुझे गुण वानणें। देऊनि मज उत्तीर्णें। जालीं आजी॥ ३३॥**

**अर्थ**—मी थोर थोर पुण्यकर्मे जी संपादन केली तीच आज मला तुझे गुणवर्णन करण्याचे ठिकाणी गोडी लावून देऊन माझ्या ऋणातून मुक्त झाली॥ ३३॥

**गूढार्थदीपिका**—निष्काम कर्माचरणाने भगवत्कृपा होऊन भगवंताच्या गुणांचे वर्णन करण्याची गोडी लागते, असा भाव.

**जी जीवित्वाच्या आडवीं। आतुडलों होतों मरणगांवीं। ते अवदसाचि आघवी। फेडिली आजी॥ ३४॥**
**जे गीता येणें नांवें नावाणिगी। जे अविद्या जिणोनि दाटुगी। ते कीर्ती तुझी आम्हांजोगी। वानावया जाली॥ ३५॥**
**पैं निर्धना घरीं वानिवसे। महालक्ष्मीचि येऊनि बैसे। तयातें निर्धन ऐसें। म्हणों ये काई॥ ३६॥**
**कां अंधकाराचिया ठाया। दैवें सूर्यु आलिया। तो अंधारुचि जगा यया। प्रकाशु नोहे॥ ३७॥**
**जया देवाची पाहतां थोरी। विश्व परमाणुही दशा न धरी। तो भावाचिये सरोभरी। नव्हेचि काई॥ ३८॥**
**तैसा मी गीता वाखाणीं। हे खपुष्पाची तुरंबणी। परी समर्थे तुवां शिरयाणी। फेडिली ते॥ ३९॥**
**म्हणौनि तुझेनि प्रसादें। मी गीतापद्यें अगाधें। निरूपीन जी विशदें। ज्ञानदेवो म्हणे॥ ४०॥**

**अर्थ**—अहो जी सद्‌गुरुनाथा! जीवपणाच्या अरण्यातील मरणगावात जो मी सापडलो होती ती माझी दुर्दशा आज तुम्ही नि:शेष नाहीशी केली॥ ३४॥ कारण अविद्येचा फडशा पाडून बलवान झालेली व गीता या नावाने प्रसिद्धीस आलेली तुझी अगाध कीर्ति आम्हाला वर्णन करण्याजोगी झाली आहे॥ ३५॥ दरिद्री पुरुषाचे घरी अकस्मात् महालक्ष्मी येऊन बसली तर त्याला दरिद्री म्हणता येईल काय?॥ ३६॥ अंध:काराचे ठिकाणी दैवाने सूर्य प्राप्त झाला तर आंधारच जगाला प्रकाश होणार नाही काय?॥ ३७॥ ज्या भगवंताचा महिमा लक्षात घेता हे संपूर्ण ब्रह्मांड देखील त्याच्यापुढे परमाणुएवढेहि म्हणता येणार नाही, तो परमात्मा प्रेमाधीन होऊन भक्ताचा भाव असेल तसा होत नाही काय?॥ ३८॥ त्याप्रमाणे मी गीतेचे व्याख्यान करणे म्हणजे आकाशपुष्पाचा वास घेण्यासारखे आहे. पण त्वां माझी ती हौस पुरविलीस॥ ३९॥ म्हणून श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात, हे सद्‌गुरुनाथा! गीतेची पदे अशा गंभीर अर्थाने भरलेली असली तरी मी तुमच्या कृपाप्रसादाने त्यांच्या अर्थाचे स्पष्ट निरूपण करीन॥ ४०॥

**तरी अध्यायीं पंधरावां। श्रीकृष्णें तया पांडवा। शास्त्रसिद्धांतु आघवा। उगाणिला॥ ४१॥**
**जे वृक्षरूपक परिभाषा। केलें उपाधि रूप अशेषा। सद्वैद्यें जैसें दोषा। अंगलीना॥ ४२॥**
**आणि कूटस्थु जो अक्षरु। दाविला पुरुषप्रकारु। तेणें उपहिताही आकारु। चैतन्या केला॥ ४३॥**
**पाठीं उत्तमपुरुष। शब्दाचें करूनि मिष। दाविलें चोख। आत्मतत्त्व॥ ४४॥**
**आत्मविषयीं आंतुवट। साधन जें आंगदट। ज्ञान हेंही स्पष्ट। चावळला॥ ४५॥**
**म्हणौनि इये अध्यायीं। निरूप्य नुरेचि कांहीं। आतां गुरुशिष्यां दोहीं। स्नेहो लाहणा॥ ४६॥**

**अर्थ**—तरी मागील पंधराव्या अध्यायात भगवान श्रीकृष्णाने अर्जुनाला वेदान्तशास्त्रातील संपूर्ण सारभूत सिद्धान्त स्पष्ट करून सांगितला॥ ४१॥ ज्याप्रमाणे चांगल्या वैद्याने शरीरात भिनलेल्या दोषांचे निदान करावे, त्याप्रमाणे भगवंताने वृक्षाच्या रूपकपरिभाषेने संपूर्ण उपाधीचे वर्णन केले॥ ४२॥ आणि पुरुषाचा प्रकार जो कूटस्थ अक्षरपुरुष त्याचे वर्णन करून मायेला आधार होणाऱ्या चैतन्यालाहि मर्यादा आहे, असे दाखविले॥ ४३॥ नंतर शब्दाच्या निमित्ताने उत्तमपुरुष हे नाव देऊन शुद्ध आत्मस्वरूप दाखविले॥ ४४॥ आणि आत्मप्राप्तीला अत्यंत जवळ असे अंतरंग साधन ज्ञान आहे हेहि भगवंताने सांगितले॥ ४५॥ म्हणून या सोळाव्या अध्यायात काही सांगावयाचे राहिले नाही, आता गुरुशिष्य या दोघांमध्ये एक प्रेम मात्र प्राप्त झाले॥ ४६॥

**गूढार्थदीपिका**—आत्मज्ञान झाल्यावर शिष्याचे गुरुच्या ठिकाणी कृतज्ञताबुद्धीमुळे प्रेम असते व शिष्य कृतकृत्य झाला हे पाहून गुरुचे त्याच्यावर पुत्रवत् वात्सल्यप्रेम असते.

**एवं इयेविषयीं कीर। जाणते बुझावले अपार। परी मुमुक्षु इतर। साकांक्ष जाले॥ ४७॥**
**त्या मज पुरुषोत्तमा। ज्ञानें भेटे जो सुवर्मा। तो सर्वज्ञु तोचि सीमा। भक्तीचीही॥ ४८॥**

**अर्थ**—याप्रमाणे या सिद्धान्ताविषयी जाणत्यांचे खरोखर पूर्ण समाधान झाले, पण इतर मुमुक्षु जे होते त्यांना मात्र आणखी ऐकण्याची इच्छा उत्पन्न झाली॥ ४७॥ जो ज्ञानाने मज पुरुषोत्तमाला प्राप्त होतो तोच, हे उत्तम क्षत्रिया अर्जुना! सर्वज्ञ-म्हणजे ज्यांनी सर्व जाणले, आता काही जाणावयाचे राहिले नाही असा-होय व तोच भक्तीची पराकाष्ठा होय॥ ४८॥

**गूढार्थदीपिका**—अन्वयपूर्ण ज्ञान्याचे सगुण श्रीहरीवर आत्मवत् प्रेम जडते, म्हणून येथे त्या ज्ञान्याला भक्तीची सीमा म्हटले आहे. याचे विवरण आम्ही मागे पंधराव्या अध्यायाच्या शेवटी ओवी ५६८ वरील गूढार्थदीपिकेत केले आहे.

**ऐसें हें त्रैलोक्यनायकें। बोलिलें अध्यायान्त श्लोकें। तेथें ज्ञानचि बहुतेकें। वानिलें तोषें॥ ४९॥**
**भरूनि प्रपंचाचा घोंटु। कीजे देखताचि देखतयां दृष्टु। आनंदसाम्राज्यीं पाट। बांधिजे जीवा॥ ५०॥**
**येवढेया लाठेपणाचा उपावो। आनु नाहींचि म्हणे देवो। हा सम्यग्ज्ञानाचा रावो। उपायांमाजीं॥ ५१॥**
**ऐसे आत्मजिज्ञासु जे होते। तिहीं तोषलेनि चित्तें। आदरें तया ज्ञानातें। वोवाळिलें जीवें॥ ५२॥**
**आतां आवडी जेथ पडे। तयाचि अवसरीं पुढें पुढें। रिगों लागे हें घडे। प्रेम ऐसें॥ ५३॥**
**म्हणौनि जिज्ञासूंच्या पैकीं। ज्ञानीं प्रतीती होय ना जंव निकी। तंव योगक्षेमु ज्ञानविखीं। स्फुरेलचि कीं॥ ५४॥**
**म्हणोनि तेंचि सम्यग्ज्ञान। कैसेनि होय स्वाधीन। जालिया वृद्धियत्न। घडेल केवीं॥ ५५॥**

**अर्थ**—असे जे त्रैलोक्याचे स्वामी भगवान श्रीकृष्ण यांनी मागील अध्यायाच्या शेवटील श्लोकाने विशेषत: ज्ञानाचे महत्व संतोषाने वर्णन केले॥ ४९॥ प्रपंचाचे मूळ अस्तित्व नाहीसे करून, पाहणाराच आपल्याला पाहतो आणि जीवाला आनंदसाम्राज्यावर पट्टाभिषेक होतो॥ ५०॥ श्रीकृष्ण म्हणतात, अर्जुना! एवढा सामर्थ्यवान उपाय ज्ञानावाचून दुसरा नाही; म्हणून ह्या यथार्थ ज्ञानोपायाला सर्व उपायांचा राजा म्हणतात॥ ५१॥ असे जे आत्मजिज्ञासू होते त्यांनी हे उत्तर ऐकून संतुष्ट चित्ताने त्या ज्ञानाविषयी अत्यंत आदर दाखविण्याकरिता त्यावरून आपला जीवभाव ओवाळून टाकला॥ ५२॥ ज्या पदार्थाची आवडी मनात उत्पन्न होते त्या पदार्थाविषयी शंका मनाच्या पुढे पुढे येत असतात. प्रेमामुळेच असे घडत असते॥ ५३॥ म्हणून मुमुक्षुपैकी काहींच्या ठिकाणी जोपर्यंत ज्ञानाचा दृढ अनुभव येत नाही तोपर्यंत ज्ञानाची प्राप्ति कशी करून घ्यावयाची व प्राप्त झाल्यावर त्याचे संरक्षण कसे करावे, ही शंका उत्पन्न होणार!॥ ५४॥ म्हणून ते यथार्थज्ञान कोणत्या उपायाने प्राप्त होईल व प्राप्त झाल्यावर ते वृद्धिंगत म्हणजे व्यापक होऊन दृढ कसे होईल॥ ५५॥

**कां उपजोंचि जें न लाहे। जें उपजलेंही अव्हांटा सूये। तें ज्ञानीं विरुद्ध काय आहे। हें जाणावें कीं॥ ५६॥**
**मग जाणतया जें विरू। तयाची वाट वाहती करूं। ज्ञाना हित तेंचि विचारूं। सर्वभावें॥ ५७॥**
**ऐसा जिज्ञासु तुम्हीं समस्तीं। भावो जो धरिला असे चित्तीं। तो पुरवावया लक्ष्मीपती। बोलिजेल॥ ५८॥**

**अर्थ**—किंवा ज्या (प्रतिबंधामुळे) आत्मज्ञान होऊ शकत नाही व उत्पन्न झाले तर भलत्या वाटेने निघून जाते, असे ज्ञानाच्या विरुद्ध काय आहे, हे जाणले पाहिजे ना!॥ ५६॥ मग ज्ञान्याच्या विरुद्ध जे प्रतिबंध असतील ते दूर करून ज्ञानाची वाट वाहती (सर्वांना जाता येण्याजोगी मोकळी) करू व ज्ञानाला हितकर काय जे असेल त्याचाच सर्व भावाने विचार करू॥ ५७॥ तुम्ही ज्ञानजिज्ञासूंनी असा जो भाव अंत:करणात धरून ठेवला तो तुमचा मनोरथ जेणे करून पूर्ण होईल असे भगवान लक्ष्मीपति (या अध्यायात) बोलतील॥ ५८॥

**ज्ञानांसि सुजन्म जोडे। आपली विश्रांतिही वरी वाढे। ते संपत्तीचे पवाडे। सांगिजेल दैवी॥ ५९॥**
**आणि ज्ञानाचेंनि कामाकारें। जे रागद्वेषांसि दे थारे। तिये आसुरियेहि घोरे। करील रूप॥ ६०॥**
**सहज इष्टानिष्टकरणी। दोघीचि इया कवतुकिणी। हे नवमाध्यायीं उभारणी। केली होती॥ ६१॥**

**तेथ साउमा घेयावा उवावो। तंव वोडवला आन प्रस्तावो। तरी तयां प्रसंगें आतां देवो। निरूपीत असे॥ ६२॥**
**या निरूपणाचेनि नांवें। अध्याय पद सोळावें। लावणी पाहतां जाणावें। मागिलावरी॥ ६३॥**
**परी हें असो आतां प्रस्तुतीं। ज्ञानाच्या हिताहितीं। समर्था संपत्ती। इयाचि दोन्ही॥ ६४॥**
**जे मुमुक्षुमार्गींची बोळावी। जे मोहरात्रीची धर्मदिवी। ते आधी तंव दैवी। संपत्ती ऐका॥ ६५॥**
**जेथ एक एकातें पोखी। ऐसे बहुत पदार्थ येकीं। संपादिजती ते लोकीं। संपत्ति म्हणिजे॥ ६६॥**
**ते दैवी सुख संभवी। तेथ दैवगुणे येकोपजीवी। जाली म्हणौनि दैवी। संपत्ति हे॥ ६७॥**

**अर्थ**—ज्याच्या योगाने आत्मज्ञान सुलभ व उत्तम रीतीने अंत:करणात प्रगट होईल व आणखी चित्ताची पूर्ण शांती होईल त्या दैवी संपत्तीची महति भगवान सांगतील॥ ५९॥ तसेच जी संपत्ति अज्ञानामुळे उत्पन्न होणाऱ्या विषयवासनेच्या रूपाने रागद्वेषाला आश्रय देते, त्या अत्यंत घोर आसुरी संपत्तीचे स्वरूप वर्णन करतील॥ ६०॥ ह्या दोन संपत्तीच इष्ट म्हणजे कल्याण व अनिष्ट म्हणजे अकल्याण करण्याचे कौतुक करून दाखविणाऱ्या आहेत, असा मागे नवव्या अध्यायात उपक्रम करण्यात आला होता॥ ६१॥ (त्यांचा) साक्षात् तेथेच सविस्तर विचार करायचा; पण मध्ये निराळा प्रसंग उद्भवल्यामुळे तो तेथे करता आला नाही. आता भगवान येथे प्रसंगाने त्याचा उलगडा करतात॥ ६२॥ त्या दोन संपत्तीच्या निरूपणाचे नाव म्हणजे सोळावा अध्याय होय. या अध्यायाची मांडणी पाहता मागील पंधराव्या अध्यायावरच ती झाली आहे, असे जाणावे॥ ६३॥ आता हे पुरे. प्रस्तुत सांगण्याचे तात्पर्य इतकेच की ज्ञानाचे हित व अहित करण्यास अनुक्रमे ह्या दोन संपत्तिच समर्थ आहेत॥ ६४॥ जी संपत्ति संसारातून मुक्त होऊ इच्छिणाऱ्यांना परमार्थ मार्गाने शेवटपर्यंत पोहोचविते व जी अज्ञानअंधकारात मार्ग दाखविणारी धर्मरूप दिवटी आहे, अशा त्या दैवी संपत्तीचे अगोदर वर्णन ऐका॥ ६५॥ जेथे जेव्हा एक दुसऱ्याला पोषण करणारे असे अनेक पदार्थ ज्या एका वस्तूने संपादन केले जातात, तेव्हा त्या एका वस्तुला जगात संपत्ति म्हणतात॥ ६६॥ ती देवाच्या ठिकाणी असणारी म्हणून सुख देणारी व देवाच्या ठिकाणी असणाऱ्या एका सत्वगुणाचाच आश्रय धरून राहणारी म्हणून तिला दैवी संपत्ति म्हणतात॥ ६७॥

*श्रीभगवानुवाच*

**अभयं सत्त्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः। दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम्॥ १॥**

**अर्थ**—श्रीभगवान म्हणतात, अभय (भीति सोडणे), चित्तशुद्धि, ज्ञान व योगाचे ठिकाणी तत्परता, दान, दम (इंद्रियनिग्रह), यज्ञ (यागादि), स्वाध्याय (वेदशास्त्रादि अध्ययन), तप, आर्जव (मनाचा सरळपणा)॥ १॥

**आतां तयाचि दैवगुणां-। माजीं धुरेचा बैसणा। बैसे तया आकर्णा। अभय ऐसें॥ ६८॥**
**तरी न घालूनि महापुरीं। न घेपे बुडणयाची शियारी। कां रोगु न गणिजे घरीं। पथ्याचिया॥ ६९॥**
**तैसा कर्माकर्माचिया मोहरा। उठूं नेदूनि अहंकारा। संसाराचा दरारा। सांडणें येणें॥ ७०॥**
**अथवा ऐक्यभावाचेनि पैसें। दुजे मानूनि आत्मा ऐसें। भयवार्ता देशें। दवडणें जे॥ ७१॥**
**पाणी बुडवूं ये मिठातें। तंव मीठचि पाणी आतें। तेवीं आपण जालेनि अद्वैतें। नाशे भय॥ ७२॥**
**अगा अभय येणें नांवें। बोलिजे तें हें जाणावें। सम्यग्ज्ञानाचें आघवें। धांवणें हें॥ ७३॥**

**अर्थ**—आता या दैवी सात्विक गुणांमध्ये ज्याला अग्रसरत्वाचा मान दिला आहे व ज्याला अभय म्हणतात, त्याचे लक्षण ऐका॥ ६८॥ जसे पुरांत उडी घेतली नाही तर, बुडण्याची भीति राहत नाही किंवा पथ्याने वागणाऱ्याला रोगाची भीति नसते॥ ६९॥ त्याप्रमाणे पापपुण्यकर्म करण्याकरिता अहंकार उठू न देऊन त्यामुळे कर्माकर्माने प्राप्त होणाऱ्या संसाराचे भय सोडून देणे॥ ७०॥ अथवा सर्वत्र आपला एकात्मभाव जाणून आत्म्याला भिन्न मानल्याने उत्पन्न होणारे भय नाहीसे करणे॥ ७१॥ जेव्हा पाणी मिठाला बुडवू पाहते तेव्हा मीठच पाणी होऊन जाते, त्याप्रमाणे आपणच अद्वैतरूप झाले असता भयच नाहीसे होते॥ ७२॥ अर्जुना! अभय या नावाने जे बोलले जाते ते हे होय असे जाण. हा संपूर्ण यथार्थज्ञानाचा रक्षकच होय॥ ७३॥

**गूढार्थदीपिका**—अभय ज्याला प्राप्त झाले त्याला यथार्थज्ञान प्राप्त होतेच असे समजावे.

**आतां सत्त्वशुद्धी जे म्हणिजे। ते ऐशा चिन्हीं जाणिजे। तरी जळे ना विझे। राखोंडीं जैसी॥ ७४॥**
**कां पाडिवा वाढी न मगे। अंवसे तुटी सांडूनि मार्गे। माजीं अतिसूक्ष्म अंगें। चंद्र जैसा राहे॥ ७५॥**
**नातरी वार्षिया सांडिली। ग्रीष्में नाहीं मांडिली। माजीं निजरूपें निवडली। गंगा जैसी॥ ७६॥**
**तैसी संकल्पविकल्पाची वोढी। सांडूनि रजतमाची कावडी। भोगितां निजधर्माची आवडी। बुद्धी उरे॥ ७७॥**
**इंद्रियवर्गें दाखविलिया। विरुद्धा अथवा भलीया। विस्मयो कांहीं केलिया। नुठी चित्तीं॥ ७८॥**
**गांवा गेलिया वल्लभु। पतिव्रतेचा विरहक्षोभु। भलतेसणी हानिलाभु। न मनी जेवीं॥ ७९॥**
**तेवीं सत्स्वरूप रुचलेपणें। बुद्धी जें ऐसें अनन्य होणें। ते सत्त्वशुद्धी म्हणे। केशिहंता॥ ८०॥**

**अर्थ**—आता जिला सत्वशुद्धि म्हणजे अंत:करणशुद्धि म्हणतात ती या लक्षणाने जाण. ज्याप्रमाणे राख जळत नाही व विझत नाही किंवा ज्याप्रमाणे अमावस्येला झालेला कलेचा क्षय मागे टाकून देऊन प्रतिपदेला होणारी कलेची वाढ दिसत नाही तरी मध्ये चंद्र जसा अत्यंत सूक्ष्म असतो॥ ७४-७५॥ किंवा वर्षाऋतूने सोडली असता (वर्षाऋतु संपल्यानंतर) व ग्रीष्मऋतूने बर्फ वितळून गंगेच्या प्रवाहाला पुरवठा केला नसता मध्ये (शरद, हेमंत इत्यादि चार ऋतुमध्ये) ती जशी निव्वळ आपल्या स्वरूपाने राहते॥ ७६॥ त्याप्रमाणे संकल्पविकल्पाची ओढ व रजतमगुणाचे ओझे टाकून बुद्धि केवळ आपल्या सत्पक्षपाती धर्माची आवड धरून राहते॥ ७७॥ इंद्रियाच्या समुदायाने चित्ताला अपायकारक किंवा हितकर असे काहीहि दाखविले तरी नवल असे कधी वाटत नाही॥ ७८॥ प्रिय पति गावास गेल्यामुळे त्याच्या विरहाने व्याकुल झालेली पतिव्रता स्त्री ज्याप्रमाणे वाटेल तसे नुकसान किंवा लाभ झाला तरी त्याला ती जुमानित नाही॥ ७९॥ त्याप्रमाणे सद्ब्रह्मस्वरूपाची आवड उत्पन्न होऊन चित्ताचे एक त्याचेच ठिकाणी पतिव्रतेसारखे अनन्य होणे, ही चित्तशुद्धि होय, असे केशिदैत्याला मारणारे श्रीकृष्ण म्हणतात॥ ८०॥

**आतां आत्मलाभाविखीं। ज्ञानयोगामाजीं एकीं। जे आपुलिया ठाकीं। हांवे भरे॥ ८१॥**
**तेथ सगळिये चित्तवृत्ती। त्याग करणें ऐशा रीती। निष्कामें पूर्णाहुती। हुताशीं जैसी॥ ८२॥**
**कां सुकुळीनें आपुली। आत्मजा सत्कुळींचि दिधली। हें असो लक्ष्मी स्थिरावली। मुकुंदीं जैसी॥ ८३॥**
**तैसेनि निर्विकल्पपणें। जें योगज्ञानींच या वृत्तिक होणें। तो तिजा गुण म्हणे। श्रीकृष्णनाथ॥ ८४॥**
**आतां देहवाचाचित्तें। यथासंपन्नें वित्तें। वैरी जालियाही आर्तातें। न वंचणें जें कां॥ ८५॥**
**फुली फळी छाया। मूळीं पत्री ही धनंजया। वाटेचा न चुके आलिया। वृक्ष जैसा॥ ८६॥**
**तैसें मनौनि धनवरी। विद्यमानें आल्या अवसरीं। श्रांतांचिये मनोहारीं। उपयोगा जाणें॥ ८७॥**
**तया नांव जाण दान। जें मोक्षनिधानाचें अंजन। हें असो ऐक चिन्ह। दमाचें तें॥ ८८॥**

**अर्थ**—आत्मलाभ करून घेण्याकरिता ज्ञान व योग या दोहो मार्गापैकी जो मार्ग आपल्या अधिकारानुसार असेल व करण्याची इच्छा असेल त्या मार्गाकरिता जशी अग्निमध्ये पूर्णाहूति टाकावी त्याप्रमाणे निष्काम चित्ताने सर्व वृत्तींचा त्याग करणे॥ ८१-८२॥ किंवा ज्याप्रमाणे उत्तम कुलवंताने आपली कन्या कुलीन घराण्यातच दिली किंवा लक्ष्मी भगवंताचे ठिकाणी स्थिर झाली॥ ८३॥ त्याप्रमाणे विकल्परहित चित्ताने योग अथवा ज्ञान या मार्गाच्या ठिकाणी अंत:करण लावणे, हा दैवी संपत्तीतील तिसरा गुण होय, असे भगवान म्हणतात॥ ८४॥ आपला शत्रु असला तरी संकटात सापडला असता कायावाचामनाने व यथाप्राप्त संपत्तीने त्याच्याशी प्रतारणा न करणे॥ ८५॥ ज्याप्रमाणे मार्गावर असलेला वृक्ष फूल, फळ, छाया, मूळ, पान यापैकी अर्जुना! जे लागेल ते आलेल्या वाटसरूला देण्याला चुकत नाही॥ ८६॥ त्याप्रमाणे, आलेल्या दु:खितांच्या मनाचे समाधान होईल, अशा रीतीने प्राप्त असलेल्या तन-मन-धनाने त्याच्या उपयोगी पडणे॥ ८७॥ त्याला दान म्हणतात, असे जाण. जे मोक्षरूप संपत्ति दाखविणारे अंजनच होय. हे असो आता दमाचे चिन्ह ऐक॥ ८८॥

**तरी विषयेंद्रिय मिळणी। करूनि घापे वितुटणी। जैसें तोडिजे गढूळ पाणी। पारकेया॥ ८९॥**

**तैसा विषयजातांचा वारा। वाजों नेदिजे इंद्रियद्वारां। इयें बांधोनि प्रत्याहारा। हातीं वोपी॥ ९०॥**
**आंतुला चित्ताचे अंगवरीं। प्रवृत्ति पेलोनि माघारी। आगी सुयिजे दाहींही द्वारीं। वैराग्याची॥ ९१॥**
**श्वासोच्छ्वासाहुनी बहुवसें। व्रतें आचरें खरपुसें। वोसंतितां रात्रिदिवसें। नाराणुक जया॥ ९२॥**
**पैं दमु ऐसें म्हणिपे। तो हा जाण स्वरूपें। यज्ञार्थहि संक्षेपें। सांगो ऐक॥ ९३॥**

**अर्थ—**ज्याप्रमाणे शुद्ध करणारे निवळीचे बी वगैरे पदार्थ गढूळपणा व पाणी यांचा संबंध तोडतात, त्याप्रमाणे विषय व इंद्रिये यांचा जो संबंधच होऊ देत नाही॥ ८९॥ याप्रमाणे विषयाचा वारा इंद्रियांच्या द्वारांना लागू न देता त्याना एकत्र बांधून जो प्रत्याहाराच्या हाती देतो॥ ९०॥ शरीरापर्यंत असलेल्या कर्माच्या प्रवृत्तीला आत चित्तापर्यंत माघार घ्यायला लावून दाहाहि इंद्रियांच्या द्वारात वैराग्याचा अग्नि पेटवावा॥ ९१॥ श्वासोच्छ्वासाहून पुष्कळ व कडक अशा व्रतांचे रात्रंदिवस आचरण करण्याने ज्याला क्षणभर देखील उसंत मिळत नाही॥ ९२॥ ज्याला दम म्हणतात, तो अशा स्वरूपाचा आहे, असे जाण. आता यज्ञाचा योग्य अर्थ संक्षेपाने सांगतो, तोहि ऐक॥ ९३॥

**तरी ब्राह्मण करूनि धुरे। स्त्रियादिक पैल मेरे। माझारीं अधिकारें। आपुलालेनि॥ ९४॥**
**जया जे सर्वोत्तम। भजनीय देवताधर्म। तें तेणें यथागम-। विधी यजिजे॥ ९५॥**
**जैसा द्विज षट्कर्में करी। शूद्र तयातें नमस्कारी। कीं दोहींसिही सरोभरी। निपजे यागु॥ ९६॥**
**तैसें अधिकारपर्यालोचें। हें यज्ञ करणें सर्वांचें। परी विष फळाशेचें। न घापे माजीं॥ ९७॥**
**आणि मी कर्ता ऐसा भावो। नेदिजे देहाचेनि द्वारें जावों। ना वेदाज्ञेसि तरी ठावो। होइजे स्वयें॥ ९८॥**
**अर्जुना एवं यज्ञ। सर्वत्र जाण साज्ञ। कैवल्यमार्गींचा अभिज्ञ। सांगाती हा॥ ९९॥**

**अर्थ—**प्रथम ब्राह्मणापासून सुरू करून स्त्री शूद्रापर्यंत मध्ये त्यांच्या त्यांच्या अधिकारानुसार देवतेला उद्देशून ज्याला जे आचारधर्म उत्तम म्हणून सांगितले असतील त्याचे त्यांनी शास्त्रानुसार आचरण करावे॥ ९४-९५॥ उदाहरणार्थ ज्याप्रमाणे ब्राह्मण, शास्त्रानुसार अध्ययन, अध्यापन, यजन, याजन, दान व प्रतिग्रह ही सहा कर्मे करतो व शूद्र ब्राह्मणाला नुसता नमस्कार करतो. पण दोघांनाहि सारखाच यज्ञ घडतो॥ ९६॥ कोणाचा कसा अधिकार आहे, हे पाहून शास्त्राने सर्वांना यज्ञ करायला सांगितले आहे, पण ते यज्ञकर्म करताना कोणत्याहि प्रकारच्या फलाची इच्छा असता कामा नये॥ ९७॥ आणि तसेच देहाला धरून, मी कर्ता आहे, असा कर्तृत्वाहंकार उत्पन्न होऊ देऊ नये. सारांश आपण वेदाज्ञेला केवळ आश्रय होऊन राहावे॥ ९८॥ अर्जुना! याप्रमाणे यज्ञ हा अज्ञानापासून जाणत्यापर्यंत सर्वांना विहित असून तो मोक्षमार्गाचा जाणता सोबती आहे॥ ९९॥

**गूढार्थदीपिका—**अशा रीतीने होणारे यज्ञकर्म रागद्वेषरहित शुद्ध चित्ताने व निष्काम होत असल्यामुळे परमेश्वरप्राप्तीला अचूक साधक होते, असा अर्थ.

**आतां चेंडुवें भूमी हाणिजे। हें नव्हे तो हाता आणिजे। कीं शेतीं बीं विखुरिजे। परी पिकीं लक्ष॥ १००॥**
**ना तरी ठेविलें देखावया। आदर कीजे दिविया। कां शाखा फळें यावया। सिंपिजे मूळ॥ १०१॥**
**हें बहु असो आरिसा। आपणपें देखावया जैसा। पुढतपुढती बहुवसा। उटिजे प्रीती॥ १०२॥**
**तैसा प्रतिपाद्य जो ईश्वरु। तो होआवयालागीं गोचरु। श्रुतीचा निरंतरु। अभ्यासु करणें॥ १०३॥**
**तें द्विजांसीच ब्रह्मसूत्र। येरां स्तोत्र कां नाममंत्र। आवर्तणें पवित्र। पावावया तत्त्व॥ १०४॥**

**अर्थ—**जसे भूमीवर चेंडूचे आपटणे तो हातात घेण्याकरिता असते किंवा पिकाकडे लक्ष देऊन शेतीत धान्य पेरले जाते॥ १००॥ किंवा आंधारात ठेवेलेले पाहण्याकरिताच आपण दिवा हाती घेतो अथवा झाडाच्या फांद्याना फळे यावी या आशेने मूळाला पाणी देतो॥ १०१॥ हा विस्तार असो. आपण आपल्याला पाहण्याकरिताच, ज्याप्रमाणे वारंवार आरसा प्रेमाने स्वच्छ उटतो॥ १०२॥ त्याप्रमाणे वेदांनी प्रतिपादिलेल्या ईश्वराचा साक्षात्कार होण्याकरिता श्रुतीचा नेहमी जो अभ्यास करावा लागतो, तो उपनिषदाचा व ब्रह्मसूत्राचा अभ्यास ब्राह्मणासच करण्याचा अधिकार

सांगितला आहे व इतर शूद्रादिकांना परतत्त्व प्राप्त होण्याकरिता भगवंताचे स्तोत्र किंवा नाममंत्र यांची आवर्तणे करणे हे विहित केले आहे॥१०३-१०४॥

**गूढार्थदीपिका—द्विजांसीच ब्रह्मसूत्र।** येथे ''द्विजांसीच ब्रह्मसूत्र'' या पदाने ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांनाच केवळ वैदिक ब्रह्मसूत्राचा विचार करण्याचा अधिकार आहे, एवढेच सांगितले आहे, स्तोत्रनाममंत्राचा अधिकार नाही, असे सांगितले नाही उलट.

**ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याः स्त्रियश्शूद्रांत्यजादयः। यत्रतत्रानुकुर्वन्ति विष्णोर्नामानुकीर्तनम्॥** (भविष्य पुराण)

''ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, स्त्रिया, शूद्र, अंत्यज हे सर्व जेथे कोठे भगवंताचे नामसंकीर्तन करतील'', असे भविष्यादि पुराणातून सांगितले असल्यामुळे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य या तीन वर्णानाहि भगवंताचे स्तोत्र, नामसंकीर्तन इत्यादिकांचे ठिकाणी अधिकार आहे, हे उघड आहे.

**येरां स्तोत्र कां नाममंत्र**—या पदाने शूद्रांना केवळ स्तोत्र व नाममंत्राचाच अधिकार आहे, असे जाणावे.

**पार्था गा स्वाध्यावो। बोलिजे तो हा म्हणे देवो। आतां तप शब्दाभिप्रावो। आईक सांगों॥ १०५॥**

**अर्थ**—अर्जुना! ज्याला स्वाध्याय म्हणतात, तो हा होय, असे देव म्हणतात. आता 'तप' शब्दाचा अभिप्राय सांगतो, ऐक॥ १०५॥

**तरी दानें सर्वस्व देणें। वेंचणें तें व्यर्थ करणें। जैसे फळोनि स्वयें सुकणें। औषधीचें जेवीं॥ १०६॥**
**नाना धूपाचा अग्निप्रवेशु। कनकीं तुकाचा नाशु। कां पितृपक्षु पोषितां ऱ्हासु। चंद्राचा जैसा॥ १०७॥**
**तैसा स्वरूपाचिया प्रसरा-। लागीं प्राणेंद्रियशरीरां। आटणी करणें जें वीरा। तेंचि तप॥ १०८॥**
**अथवा अनारिसें। तपाचें रूप जरी असे। तरी जाण जेवीं दुधीं हंसें। सूदली चांचू॥ १०९॥**
**तैसें देहजीवाचिये मिळणी। जो उदयजत सूये पाणी। तो विवेक अंतःकरणीं। जागवी जो॥ ११०॥**
**पाहतां आत्मयाकडे। परी बुद्धीचा पैस सांकडे। सनिद्र स्वप्न बुडे। जागणीं जैसें॥ १११॥**
**तैसा आत्मपर्यालोचु। प्रवर्ते जो साचु। तपाचा हा निर्वेचु। धनुर्धरा॥ ११२॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे औषधि मूळ, त्वचा, पाने, फूल इत्यादिकांनी समृद्ध होऊन परार्थच जगतात व शेवटी सुकतात, त्याप्रमाणे दानाने सर्वस्व देऊन टाकून स्वशरीर सुखार्थ खर्च करण्याकरिता काही शिल्लक न ठेवणे॥ १०६॥ किंवा ज्याप्रमाणे अग्नीत टाकलेला धूप नाश पावतो, सोने शुद्ध करण्यात त्याचे वजन कमी होते, कृष्णपक्ष वाढण्यात चंद्र कले-कलेने कमी होत जातो॥ १०७॥ त्याप्रमाणे अद्वैत परब्रह्माची प्राप्ती होण्याकरिता शरीर, इंद्रिये, प्राण यांचे शोषण करणे, याला, अर्जुन! तप म्हणतात॥ १०८॥ अथवा तपाचे निराळे लक्षण केले तरी ते हंसाने पाणीमिश्रित दुधात आपली चोच घालावी (तसे आहे)॥ १०९॥ त्याप्रमाणे देहजीवाचे ऐक्यात जो उत्पन्न होताच हात घालतो (वेगळे करतो) तो विवेक अंतःकरणात अखंड जागा ठेवतो॥ ११०॥ ज्याप्रमाणे जाग आल्याबरोबर झोपेसहित स्वप्न नाहीसे होते, त्याप्रमाणे आत्मसाक्षात्कार झाला की बुद्धीचा पसारा आटला जातो॥ १११॥ अर्जुना! असा जो खरा आत्मविचार प्रवृत्त होतो हाच 'तप' शब्दाच्या अर्थाचा निर्णय आहे॥ ११२॥

**आतां बाळाच्या हितीं स्तन्य। जैसें नानाभूतीं चैतन्य। तैसें प्राणिमात्रीं सौजन्य। आर्जव तें॥ ११३॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे आईच्या स्तनातील दूध बाळाच्या पोषणकरिताच असते किंवा भूतमात्रांच्या ठिकाणी चैतन्य असते, त्याप्रमाणे प्राणिमात्रांशी सरळ निष्कपट वागणे याला आर्जव म्हणतात॥ ११३॥

**अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शान्तिरपैशुनम्। दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ह्रीरचापलम्॥ २॥**

**अर्थ**—कोणालाहि काया-वाचा-मनाने दुःख न देणे, प्रिय व जसे पाहिले किंवा ऐकले असेल तसेच बोलणे, क्रोध न करणे, त्याग (वस्तुवरील ममता सोडणे), अंतःकरणात विकार न उठणे, कोणाचा द्रोह न करणे प्राणिमात्रांवर दया करणे, विषय सन्निध असता चित्त विकारी न होणे, अंतःकरणाचा कोमलपणा, निंद्यकर्माची लाज वाटणे व चित्ताची स्थिरता॥ २॥

**आणि जगाचिया सुखोद्देशें। शरीरें वाचा मानसें। राहाटणें तें अहिंसें। रूप जाण॥ ११४॥**

**अर्थ**—काया-वाचा-मनाने प्राणिमात्रांच्या सुखाकरिता व्यापार करणे ते अहिंसेचे स्वरूप होय, असे जाण॥ ११४॥

**आतां तीख होऊनि मवाळ। जैसें जातीचें मुकुळ। कां तेज परी शीतळ। शशांकाचें॥ ११५॥**
**शके दावितांचि रोगु फेडूं। आणि जिभे तरी नव्हे कडु। तें वोखदु नाहीं मा घडु। उपमा कैंची॥ ११६॥**
**तरी मऊपणें बुबुळें। झगडतांही परी नाडळे। एऱ्हवीं फोडी कोराळें। पाणी जैसें॥ ११७॥**
**तैसें तोडावया संदेह। तीख जैसें कां लोह। श्राव्यत्वें तरी माधुर्य। पायीं घाली॥ ११८॥**
**एकों ठाता कौतुकें। कानातेंचि निघती मुखें। जें साचारिवेचेनि बिकें। ब्रह्महीं भेदी॥ ११९॥**
**किंबहुना प्रियपणें। कोणातेंही झकवूं नेणें। यथार्थ तरी खुपणें। नाहीं कवणा॥ १२०॥**
**एऱ्हवीं गोरी कीर काना गोड। परी साचाचा पाखाळीं कीड। आगीचें करणें उघड। परी जळों तें साच॥ १२१॥**
**कानीं लागतां महुर। अर्थें विभांडी जिव्हार। तें वाचा नव्हे सुंदर। लांवचि पां॥ १२२॥**
**परी अहितीं कोपोनि सोप। लालनीं मऊ जैसें पुष्प। तिये मातेचें स्वरूप। जैसें कां होय॥ १२३॥**
**तैसें श्रवणसुख चतुर। परीणमोनि साचार। बोलणें जें अविकार। तें सत्य येथें॥ १२४॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे जाईच्या फुलाची कळी अणीदार असूनहि कोमल असते किंवा चंद्राचा प्रकाश तेजस्वी असूनहि थंड असतो॥ ११५॥ दाखविताक्षणीच रोग नाहीसा करू शकेल व तोंडाला कडू लागणार नाही असे औषधच नाही, तेव्हा त्याची उपमा कशी देता येईल?॥ ११६॥ तरी पाणी मऊपणामुळे डोळ्याच्या बुबुळास लागले तरी व्यथा करीत नाही. एऱ्हवी तेच पर्वताचे कडे फोडित असते॥ ११७॥ त्याप्रमाणे पाजविलेल्या तीक्ष्ण लोखंडाच्या शस्त्राप्रमाणे जे बोलणे संशयनिवृत्ति करते, पण ऐकण्यास अत्यंत गोड वाटते॥ ११८॥ जे बोलणे सहजासहजी ऐकण्यास मिळाले असता कानाला मुखे निघतात म्हणजे ऐकावेसे वाटते आणि परब्रह्माचा भेद करील इतके ते सत्याला धरून असते॥ ११९॥ फार काय सांगावे! ते बोलणे मधुरपणामुळे कोणालाहि फसवू जाणत नाही व सत्यत्वपणामुळे कोणाच्याहि वर्मी लागत नाही॥ १२०॥ एऱ्हवी व्याधाचे गाणे कानाला गोड लागते, पण त्या सत्याच्या शुद्धतेत हीणकटपणा असतो. नाश करणे हे अग्नीचे कार्य उघडच आहे, पण आग लागो अशा सत्याला॥ १२१॥ जे बोलणे कानाला गोड लागते, पण त्याचा अर्थ काळजाला छिद्र पाडते, हे बोलणे नव्हे. ती सुंदर दिसणारी जखीणच होय॥ १२२॥ अहित होऊ नये म्हणून लटकीच रागावते व लाड करण्यात जी फुलासारखी मऊ असते, असे मातेच्या स्वरूपाप्रमाणे ऐकताना सुख देण्यात चतुर, परिणामी सत्य होणारे व निर्विकार असे जे बोलणे त्याला सत्य म्हणावे॥ १२३-१२४॥

**आतां घालितांही पाणी। पाषाणी न निघे आणी। कां मथिलिया लोणी। कांजी नेदी॥ १२५॥**
**त्वचा पायें शिरीं। हालेयाही फडे न करी। वसंतींहीं अंबरीं। न होती फुले॥ १२६॥**
**नाना रंभेचेनिही रूपें। शुकीं नुठिजेचि कंदर्पे। कां भस्मीं वन्हि न उद्दीपे। घृतेंही जेवीं॥ १२७॥**
**तेवींचि कुमारु क्रोधें भरे। तैसिया मंत्राचीं बीजाक्षरें। तियें निमित्त तेही अपारें। मीनलिया॥ १२८॥**
**पैं धातयाही पायां पडतां। नुठी गतायु पांडुसुता। तैसी नुपजे उपजवितां। क्रोधोर्मी गा॥ १२९॥**
**अक्रोधत्व ऐसें। नांव तें ये दशे। जाण ऐसें श्रीनिवासें। म्हणितलें तया॥ १३०॥**

**अर्थ**—आता दगडावर कितीहि पाणी घातले तरी त्याला अंकुर फुटणार नाही किंवा कितीहि मंथन केले तरी कांजीतून लोणी निघत नाही॥ १२५॥ सर्पाने टाकलेल्या कातेवर पाय दिला तरी ती फणा उभारत नाही. वसंत-ऋतूतहि आकाशाला फुले येत नाहीत॥ १२६॥ किंवा रंभेसारखे सुंदर रूप पुढे आले तरी श्रीशुकाचार्यांच्या ठिकाणी काम उत्पन्न होत नाही किंवा राखेत तूप टाकूनहि अग्नि पेटायचा नाही॥ १२७॥ अर्जुना! ज्याप्रमणे आयुष्य सरले असता ब्रह्मदेवाच्या पाया पडूनहि मेलेला मनुष्य जिवंत होऊ शकत नाही, त्याप्रमाणे ज्या मंत्रबीजाक्षराच्या जपाने

लहान मुलाला देखील क्रोध उत्पन्न होईल अशी अनेक निमित्ते प्राप्त झाली तरी ज्याच्या अंत:करणात क्रोधाची उर्मी उठविली असताहि उठत नाही॥ १२८-१२९ ॥ या दशेला अक्रोधत्व असे नांव आहे, हे जाण, असे भगवान श्रीकृष्ण त्या अर्जुनाला म्हणाले॥ १३० ॥

**आतां मृत्तिकात्यागें घटु। तंतुत्यागें पटु। त्यजिजे जेवी वटु। बीजत्यागें॥ १३१॥**
**कां त्यजूनि भिंतिमात्र। त्यजिजे आघवेंचि चित्र। कां निद्रात्यागें विचित्र। स्वप्नजाळ॥ १३२॥**
**ना ना जळत्यागें तरंग। वर्षा त्यागें मेघ। त्यजिजती जैसे भोग। धनत्यागें॥ १३३॥**
**तेवीं बुद्धिमंतीं देहीं। अहंता सांडूनि पाहीं। सांडिजे अशेषही। संसारजात॥ १३४॥**
**तया नांव त्यागु। म्हणे तो यज्ञांगु। हें मानूनि सुभगु। पार्थु पुसे॥ १३५॥**

**अर्थ**—आता ज्याप्रमाणे मातीचा त्याग केल्याने घटाचा त्याग करावा किंवा कापसाच्या सुताचा त्याग केल्याने वस्त्राचा त्याग करावा किंवा बीजाचा त्याग केल्याने वटवृक्षाचा त्याग करावा॥ १३१ ॥ किंवा भिंतीचा त्याग केल्याने संपूर्ण चित्रलेखनाचा त्याग व्हावा. निद्रेचा त्याग केल्याने विचित्र अशा स्वप्नजालाचा त्याग व्हावा॥ १३२ ॥ किंवा पाण्याचा त्याग केल्याने तरंगाचा त्याग व्हावा. वर्षाऋतुच्या त्यागाने मेघांचा अनायासे त्याग व्हावा. संपत्तीचा त्याग केल्याने जसा भोग अनायासे सुटावा॥ १३३ ॥ त्याप्रमाणे बुद्धिमान मनुष्याने आपल्या देहाची अहंता सर्वस्वी सोडून देऊन नि:शेष संसाराचा त्याग करावा, असे जाण॥ १३४॥ यालाच त्याग म्हणतात, असे यज्ञात ज्याचे यजन केले जाते असे भगवान श्रीकृष्ण म्हणाले. हे मान्य करून दैववान अर्जुन विचारू लागला॥ १३५॥

**आतां शांतीचें जी लिंग। तें व्यक्त मज सांग। देवो म्हणती चांग। अवधान देईं॥ १३६॥**
**तरी गिळोनि ज्ञेयातें। ज्ञाता ज्ञानही माघौतें। हारपे निरुतें। ते शांति पैं गा॥ १३७॥**
**जैसा प्रळयांबूचा उभडु। बुडवुनि विश्वाचा पवाडु। होय आपणपें निबिडु। आपणचि॥ १३८॥**
**मग उमग ओघ सिंधु। हा नुरेचि व्यवहारभेदु। परी जलैक्याचा बोधु। तोही कवणा॥ १३९॥**
**तैसी ज्ञेया देतां मिठी। ज्ञातृत्वही पडे पोटीं। मग उरे तेंचि किरीटी। शांतीचें रूप॥ १४०॥**

**अर्थ**—आता भगवंता! शांतीचे काय स्वरूप आहे, हे मला स्पष्ट करून सांगा. देव म्हणाले, सांगतो, नीट ऐक॥ १३६ ॥ ज्ञेयाला गिळून नंतर ज्ञाता-म्हणजे ज्ञातृत्वाचा अभिमान-व ज्ञान-म्हणजे ज्ञातृत्वरूप जाणीव-हे नाहीसे झाल्यावर जी चित्ताची स्थिति ती खरी शांती होय॥ १३७॥ ज्याप्रमाणे प्रलयकाळच्या पाण्याचा लोंढा ब्रह्मांडरूप विश्वाचा संपूर्ण विस्तार बुडवून घनदाट एक आपणच राहतो॥ १३८॥ मग उगम, प्रवाह, समुद्र हा व्यावहारिक भेद काहीच राहत नाही आणि (सर्व एक पाणी झाले असता) जलैक्याची जाणीव तरी कोणाला राहणार?॥ १३९॥ त्याप्रमाणे ज्ञेयाशी ऐक्य झाले असता ज्ञातृत्वहि लय पावते, तेव्हा जे उरते, अर्जुना! ते शांतीचे रूप होय॥ १४०॥

**आतां कदर्थवित व्याधी। बळीकरणाचिया आधीं। आप पर न शोधी। सद्वैद्य जैसा॥ १४१॥**
**कां चिखलीं रुतली गाये। धड भाकड न पाहे। जो तियेचिया ग्लानी होये। कालाभुला॥ १४२॥**
**नाना बुडतयातें सकरुणु। न पुसे अंत्यजु कीं ब्राह्मणु। काढूनि राखे प्राणु। हेंचि जाणे॥ १४३॥**
**कीं महावनीं पापियें। उघडी केली विपायें। ते नेसविल्यावीण न पाहे। शिष्ट जैसा॥ १४४॥**
**तैसें अज्ञानप्रमादादिकीं। कां प्राक्तनींही सदोखीं। निंद्यत्वाच्या सर्वविखीं। खिळिले जे॥ १४५॥**
**तयां आंगीक आपुलें। देऊनियां भलें। विसरविजती सलें। सलतीं तियें॥ १४६॥**
**अगा पुढिलाचे दोषु। करूनि आपुलिये दिठी चोखु। मग घापे अवलोकु। तयावरी॥ १४७॥**
**जैसा पुजूनि देवो पाहिजे। पेरूनि शेता जाइजे। तोषौनि प्रसादु घेइजे। अतिथीचा॥ १४८॥**
**तैसें आपुलेनि गुणें। पुढीलाचें उणें। फेडूनियां पाहणें। तयाकडे॥ १४९॥**
**वांचूनि न विंधिजे वर्मीं। नातुडविजे अकर्मीं। न बोलविजे नामीं। सदोषीं तिहीं॥ १५०॥**
**वरी कोणे एकें उपायें। पडिलें तें उभें होये। तेंचि कीजे परी घाये। नेदावे वर्मीं॥ १५१॥**

**पैं उत्तमाचियासाठीं। नीच मानिजे किरीटी। हे वांचोनि दिठी। दोषु न घेपे॥ १५२॥**
**अगा अपैशून्याचें लक्षण। अर्जुना हें फुडें जाण। मोक्षमार्गींचें सुखासन। मुख्य हे गा॥ १५३॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे रोग पीडा देत आहे असे पाहून रोग्याला धट्टाकट्टा करण्याच्या चिंतेत लागलेला वैद्य, रोगी आपला की परका, असा विचार करीत नाही॥ १४१॥ किंवा चिखलात फसलेल्या दु:खींत गाईला पाहून व्याकुळ होणारा मनुष्य जसा ती दूध देणारी आहे की म्हातारी आहे याचा विचार करीत नाही॥ १४२॥ किंवा मनुष्याला बुडतांना पाहून कनवाळु मनुष्य तो महार आहे की ब्राह्मण आहे, याचा विचार करीत नाही. त्याला बाहेर काढून त्याच्या प्राणाचे रक्षण करावे, हेच तो जाणतो॥ १४३॥ किंवा एखाद्या दुष्टाने कुलस्त्रियेला नग्न केले असता जसा सज्जन पुरुष (लुगडे) नेसविल्याशिवाय तिला पाहत नाही॥ १४४॥ त्याप्रमाणे अज्ञान प्रमादादि किंवा प्रारब्धजन्य निंद्य अशा सर्व दोषांनी पछाडलेले जे॥ १४५॥ त्यांना आपल्या आंगचे उत्तम गुण देऊन त्यांच्या सलणाऱ्या दोषांचा विसर पाडतात॥ १४६॥ आपल्यासमोर असलेल्यांचे दोष आपल्या दृष्टीने दोषरहित करून मग त्याचेकडे पाहतात॥ १४७॥ ज्याप्रमाणे देवाची पूजा करूनच त्याला पाहावे. पेरल्यावर शेताकडे जावे. अतिथीला संतुष्ट करूनच त्यांचा आशीर्वाद घ्यावा॥ १४८॥ त्याप्रमाणे आपल्या गुणांनी दुसऱ्याचा उणेपणा नाहीसा करून त्यांचेकडे पाहावे॥ १४९॥ यावाचून, वर्मी लागेल असे बोलू नये, त्याला निंद्य कर्मात गुरफटू नये. दोषाला धरून नाव ठेवून बोलू नये॥ १५०॥ आणखी ज्या उपायाने, पडलेला मनुष्य उभा होईल तोच उपाय करावा, पण वर्मावर घाव घालू नये॥ १५१॥ सज्जनाच्या संगतीत असलेल्या नीचालाहि सज्जनासाठी मान द्यावा. यावाचून, दृष्टीने दोष पाहू नये॥ १५२॥ अर्जुना! असे अपैशुन्याचे स्पष्ट लक्षण आहे, ही मोक्षमार्गाने जाण्याकरिता मुख्य अशी पालखीच आहे॥ १५३॥

**गूढार्थदीपिका**—या अपैशुन्याने गुणदोष पाहण्याची दृष्टी नाहीशी होऊन समब्रह्मभाव बुद्धीत सहज ठसतो, म्हणून या अपैशुन्याला मोक्षमार्गाचे सुखासन म्हटले आहे.

**आतां दया ते ऐसी। पूर्णचंद्रिका जैसी। निवविता न कडसी। सानें थोर॥ १५४॥**
**तैसें दु:खिताचें शिणणें। हिरतां सकणवपणें। उत्तमाधम नेणे। विवंचूं गा॥ १५५॥**
**पैं जगीं जीवनासारिखें। वस्तु अंगवरी उपखे। परी जातें जीवित राखे। तृणाचेंही॥ १५६॥**
**तैसें पुढिलाचेनि तापें। कळवळलिये कृपे। सर्वस्वेंसीं दिधलेंही आपणपें। थोडेंचि गमे॥ १५७॥**
**निम्न भरलियाविणे। पाणी ढळोंचि नेणें। तेवीं श्रांता तोषौनि जाणें। सामोरे या॥ १५८॥**
**पैं पायीं कांटा नेहटे। तंव व्यथा जीवीं उमटे। तैसा पोळे संकटें। पुढिलांचेनि॥ १५९॥**
**कां पावो शीतळता लाहे। कीं ते डोळ्यांचिलागीं होये। तैसें परसुखें जाये। सुखावतुजो॥ १६०॥**
**किंबहुना तृषितालागीं। पाणी आरायिलें असे जगीं। तैसें दु:खितांचे सेलभागीं। जिणें जयाचें॥ १६१॥**
**तो पुरुष वीरराया। मूर्तिमंत जाण दया। मी उदयजतांचि तया। ऋणिया लाभें॥ १६२॥**

**अर्थ**—आता दया ती अशी आहे—ज्याप्रमाणे पूर्ण चंद्राचा प्रकाश शीतळता देताना लहान, थोर असा भेद करीत नाही॥ १५४॥ त्याप्रमाणे दु:खितांचे दु:ख कळवळ्याने नाहीसे करताना उत्तम, अधम असा भेद जो करीत नाही॥ १५५॥ जगामध्ये सर्वांचे जीवन असलेली पाण्यासारखी वस्तु आपला नाश करून घेऊन गवताच्या देखील नाहीसे होत असलेल्या जीवनाचे रक्षण करते॥ १५६॥ त्याप्रमाणे समोर असलेल्या माणसांचे दु:ख पाहून जो दयेने कळवळतो व त्याचे दु:ख निवारणार्थ त्याला आपले सर्वस्व देऊनहि ते थोडेच मानतो॥ १५७॥ समोर आलेली सखोल जागा भरल्यावाचून जसे पाणी तेथून पुढे हालत नाही त्याप्रमाणे दु:खिताला संतोष दिल्यानंतरच जो पुढे जातो॥ १५८॥ ज्याप्रमाणे काटा पायात बोचतो, पण त्याची व्यथा अंत:करणात होते, त्याप्रमाणे दुसऱ्याचे संकट पाहून जो दु:खी होतो॥ १५९॥ किंवा ज्याप्रमाणे थंड स्पर्श पायाला होतो, पण तो थंडावा डोळ्याला मिळतो त्याप्रमाणे दुसऱ्याच्या सुखाने जो सुखी होतो॥ १६०॥ फार काय सांगावे! ज्याप्रमाणे तान्हेल्याकरिता जगात पाणी निर्माण झाले

त्याप्रमाणे केवळ दुःखितांच्या दुःखाचे निवारण करण्याकरिताच जो जीवंत राहतो॥ १६१ ॥ हे वीरश्रेष्ठा अर्जुना! असा जो पुरुष, तो म्हणजे दयेची मूर्तिच होय. अशी दया उत्पन्न झाल्याबरोबरच मी त्याचा ऋणी होतो॥ १६२ ॥

**आतां सूर्यासि जीवें। अनुसरलिया राजीवें। परी तें तो न शिवे। सौरभ्य जैसें॥ १६३ ॥**
**कां वसंताचिया वाहाणी। आलिया वनश्रीच्या अक्षौहिणी। ते न करीतचि घेणी। निगाला तो॥ १६४ ॥**
**हें असो महासिद्धीसी। लक्ष्मीही आलिया पाशीं। परी महाविष्णु जैसी। न गणीच ते॥ १६५ ॥**
**तैसे ऐहिकींचे कां स्वर्गींचे। भोग पाइक जालिया इच्छेचे। परी भोगावे हें न रुचे। मनामाजीं॥ १६६ ॥**
**बहुवें काय कौतुकीं। जीव नोहे विषयाभिलाखी। अलोलुप्त्वदशा ठाउकी। जाण ते हे॥ १६७ ॥**

**अर्थ**—कमळाचे फूल सूर्याला जीवभावाने अनुसरले तरी सूर्य मात्र कमळाच्या सुगंधाला स्पर्श करीत नाही॥ १६३ ॥ वसंत ऋतु सुरू झाला असता हजारो वनशोभा प्रगट झाल्या तरी तो वसंतऋतु त्या वन शोभेच्या सौंदर्याचा अनुभव न घेता निघून जातो॥ १६४ ॥ हे असो. सर्व सिद्धीसह लक्ष्मी जवळ आली तरी महाविष्णु जसे तिच्या ठिकाणी आसक्त होत नाहीत, त्याप्रमाणे इहलोकातील व परलोकातील विषयभोग इच्छेच्या सर्वस्वी स्वाधीन झाले तरी ज्याला मनातून ते भोग भोगण्याची इच्छाच होत नाही॥ १६५-१६६ ॥ फार काय कौतुक सांगावे! ज्याचे मन विषय भोगण्याची इच्छाच करीत नाही, ती त्या मनाची प्रसिद्ध अलोलुप्त्व दशा होय, असे जाण॥ १६७ ॥

**आतां माशियां जैसें मोहळ। जळचरां जेवीं जळ। कां पक्षियां अंतराळ। मोकळें हें॥ १६८ ॥**
**नातरी बाळकोद्देशें। मातेचें स्नेह जैसें। कां वसंतींच्या स्पर्शें। मऊ मलयानिळ॥ १६९ ॥**
**डोळ्या प्रियाची भेटी। कां पिलियां कूर्मीची दिठी। तैसी भूतमात्रीं राहटी। मवाळ ते॥ १७० ॥**
**स्पर्शे अतिमृदु। मुखीं घेतां सुस्वादु। घ्राणासि सुगंधु। उजाळु आंगें॥ १७१ ॥**
**तो आवडे तेवढा घेतां। विरुद्ध जरी न होता। तरी उपमे येता। कापुर कीं॥ १७२ ॥**
**परी महाभूतें पोटीं वाहे। तेवींचि परमाणूमाजीं सामाये। या विश्वानुसार होये। गगन जैसें॥ १७३ ॥**
**काय सांगों ऐसें जिणें। जें जगाचेनि जीवें प्राणें। तयां नांव म्हणें। मार्दव मी॥ १७४ ॥**

**अर्थ**—आता माशांना जैसे मोहोळ, जलचराना जसे पाणी किंवा पक्ष्यांना जसे आकाश केव्हाहि मोकळे असते॥ १६८ ॥ किंवा मुलाविषयी आईचे जसे प्रेम असते किंवा वसंतऋतूच्या स्पर्शाने मलयपर्वतावरील वाहणारा वायु जसा मृदु होतो॥ १६९ ॥ किंवा प्रिय पुरुषाच्या दर्शनाने डोळ्याला जसा आनंद होतो, कासवीची आपल्या पिल्यावर जशी दृष्टी असते, त्याप्रमाणे ज्याचे भूतमात्रांशी प्रेमळ वागणे असते॥ १७० ॥ स्पर्श केला असता अत्यंत मऊ, मुखात घातला असता उत्तम स्वादिष्ट, वास घेतला असता सुगंधी, शरीराने निर्मळ, असा कापूर, विरुद्ध न होता म्हणजे अपाय न होता वाटेल तेवढा खाता आला असता तर त्या कापराची उपमा देता आली असती॥ १७१-१७२ ॥ जसे आकाश, महाभूते पोटात साठवून परमाणु-परमाणुमध्येहि राहून विश्वाकार होते॥ १७३ ॥ फार काय सांगू! याप्रमाणे जगाचा जीव-प्राण होऊन जे जीवन कंठणे, त्याला मी मार्दव म्हणतो॥ १७४ ॥

**आतां पराजयें राजा। जैसा कदर्थिजे लाजा। कां मानिया निस्तेजा। निकृष्टास्तव॥ १७५ ॥**
**नाना चांडाळमंदिराशीं। अवचटें आलियां संन्यासी। मग लाज होय जैसी। उत्तमा तया॥ १७६ ॥**
**क्षत्रिया रणीं पळोनि जाणें। तें कोण साहे लाजिरवाणें। कां वैधव्यें पाचारणें। महासतियेतें॥ १७७ ॥**
**रूपसा उदयलें कुष्ट। संभाविता कुटीचें बोट। तया लाजा प्राणसंकट। होय जैसें॥ १७८ ॥**
**तैसें औटहातपणें। जें शव होऊनि जिणें। उपजों उपजों मरणें। नावांनावां॥ १७९ ॥**
**तियें गर्भमेदमुसें। रक्तमूत्ररसें। वोंतीव होऊनि असे। तें लाजिरवाणें॥ १८० ॥**
**हें बहु असो देहपणें। नामरूपासि येणें। नाहीं गा लाजिरवाणें। तयाहूनि॥ १८१ ॥**
**ऐसैसिया अवकळा। घेपे शरीराचा कंटाळा। ते लाज पैं निर्मळा। निसुगा गोड॥ १८२ ॥**

**अर्थ**—आता ज्याप्रमाणे पराजय झाला असता राजा लाजेने दुःखी होतो किंवा मानी पुरुष निकृष्ट दशेत आला

असता निस्तेज होतो॥ १७५॥ किंवा संन्यासी न कळता चांडाळाच्या घरी आला व चांडाळाचे घर आहे असे कळल्याबरोबर त्याला पराकाष्ठेची लाज वाटते॥ १७६॥ क्षत्रियाला संग्रामातून पळून जाणे जसे अत्यंत लाजिरवाणे असल्यामुळे कोण क्षत्रिय ते सहन करतो? किंवा कोणती महापतिव्रता स्त्री 'गंगाभागिरथी' म्हणून हाक मारली असता ते सहन करील॥ १७७॥ रूपवानाला कोड फुटले किंवा संभाविताला निंदेचे लांछन लागले तर ज्याप्रमाणे त्याला मरणप्राय लाज उत्पन्न होते॥ १७८॥ त्याप्रमाणे साडेतीन हात प्रेतरूपी देह होऊन जगणे, वारंवार जन्ममरणपरंपरा भोगणे॥ १७९॥ तेथे गर्भरूपी मुशीत मेद, रक्त, मूत्र यांचे योगाने ओतले जाणे, याची ज्याला अत्यंत लाज वाटते॥ १८०॥ हा पाल्हाळ पुरे. मूळात सच्चिदानंदस्वरूप असताना जड-विनाशी देहाशी ऐक्य करून नामरूपास येणे याच्यापेक्षा लाजिरवाणे दुसरे नाही॥ १८१॥ निर्लज्ज पुरुषाला हे शरीर गोड वाटते; पण निर्मळ अंत:करणाच्या पुरुषाला, ही दुर्दशा आहे, असे जाणून शरीरादिकांचा कंटाळा येतो॥ १८२॥

**आतां सूत्रतंतु तुटलिया। चेष्टाचि ठाके सायखडिया। तैसी प्राणजयें कर्मेंद्रियां। खुंटे गती॥ १८३॥**
**कीं मावळलिया दिनकरु। सरे किरणांचा पसरु। तैसा मनोजयें प्रचारु। बुद्धींद्रियांचा॥ १८४॥**
**एवं मनपवननियमें। होती दाही इंद्रियें अक्षमें। तें अचापल्य वर्मे। येणें होय॥ १८५॥**

**अर्थ**—ज्या दोऱ्यांनी बाहुल्या नाचविल्या जातात ती दोरी तुटली की जसे बाहुल्याचे नाचणे बंद पडते त्याप्रमाणे प्राणायामाने प्राण स्वाधीन करून घेतला की कर्मेंद्रियांचे व्यापार बंद पडतात॥ १८३॥ किंवा सूर्य अस्तास गेला म्हणजे सूर्यकिरणांचा प्रसार नाहीसा होतो, त्याप्रमाणे मन जिंकले म्हणजे बुद्धि व इंद्रिये जिंकली जातात॥ १८४॥ सारांश मन व प्राण यांचे नियमन झाल्याने दहाहि इंद्रिये आपआपले कार्य करण्यास असमर्थ होतात, 'अचापल्य' म्हणतात ते अशा रीतीने सिद्ध होते॥ १८५॥

**तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानिता। भवन्ति सम्पदं दैवीमभिजातस्य भारत॥ ३॥**

**अर्थ**—हे अर्जुना! तेजस्वीपणा, अपराधाची क्षमा करणे, धैर्य, अंतर्बाह्य शुद्धि, द्वेष न करणे, अतिमानिता नसणे, असे हे गुण दैवीसंपत्तीला अनुलक्षून उत्पन्न झालेल्या पुरुषाचे असतात॥ ३॥

**आतां ईश्वरप्राप्तीलागीं। प्रवर्ततां ज्ञानयोगी। धिंवसेयाची आंगीं। उणीव नोहे॥ १८६॥**
**वोखटे मरणा ऐसें। तेंही आलें अग्निप्रवेशें। परी प्राणेश्वरोद्देशें। न गणीची सती॥ १८७॥**
**तैसें आत्मनाथाचिया आधी। लाऊनि विषयविषाची बाधी। धांवों आवडे पाणधी। शून्याचिये॥ १८८॥**
**न ठाके निषेध आड। न पडे विधीची भीड। नुपजेचि जीवीं कोड। महासिद्धीचें॥ १८९॥**
**ऐसें ईश्वराकडे निज। धांवे आपसया सहज। तया नांव तेज। आध्यात्मिक तें॥ १९०॥**

**अर्थ**—ईश्वराची प्राप्ति व्हावी म्हणून ज्ञान व योग यांच्या मार्गाने जात असताना धैर्याचे आंग कमी पडू देत नाही॥ १८६॥ अग्नीत प्रवेश करून मरणासारखा अत्यंत दुर्धर प्रसंग स्वत:वर ओढवला जात असताहि प्रिय पतीच्या प्रेमामुळे पतिव्रता स्त्रियेला त्याचे काहीच वाटत नाही॥ १८७॥ त्याप्रमाणे आत्मप्राप्तीच्या तळमळीने विषयरूपी विषाला बांध घालून नामरूपरहित शून्यमय अशा निर्गुण मार्गाने धावणे आवडते॥ १८८॥ ज्याच्या आड निषेध येत नाही किंवा विधिवचनाची भीडहि त्याला पडत नाही. वाटेत सिद्धी प्राप्त झाल्या तरी त्याचे त्याला कौतुक वाटत नाही॥ १८९॥ याप्रमाणे ईश्वराकडे मनाची आपोआप धाव असणे त्याला आध्यात्मिक तेज म्हणतात॥ १९०॥

**आतां सर्वही साहातिया गरिमा। गर्वा न ये तेचि क्षमा। जैसें देह वाहोनि रोमा। वाहणें नेणें॥ १९१॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे रोमांना शरीर धारण करते, पण त्यांची त्याला जाणीवहि नसते, त्याप्रमाणे सर्व सहन करीत असतांना देखील मोठेपणाचा गर्व उठत नाही. याला क्षमा म्हणतात॥ १९१॥

**आणि मातलिया इंद्रियांचे वेग। कां प्राचीनें खवळले रोग। अथवा योगवियोग। प्रियाप्रियांचे॥ १९२॥**
**यया आघवियांचाचि थोरु। एके वेळे आलिया पुरु। तरी अगस्त्य कां होऊनि धीरु। उभा ठाके॥ १९३॥**
**आकाशीं धूमाची रेखा। उठिली बहुवा आगळिका। ते गिळी येकी झुळुका। वारा जेवीं॥ १९४॥**

**तैसें अधिभूताधिदैवां। अध्यात्मादि उपद्रवां। पातलेया पांडवा। गिळूनि घाली॥ १९५॥**
**ऐसें चित्तक्षोभाच्या अवसरीं। उचलूनि धैर्या जें चांगावें करी। धृती म्हणिपे अवधारीं। तियेतें गा॥ १९६॥**

**अर्थ**—उन्मत्त झालेल्या इंद्रियांचे वेग किंवा प्रारब्धाने प्रगट झालेले दुर्धर रोग किंवा प्रिय-अप्रिय यांचे योग वियोग॥ १९२॥ या सर्वाचा समुदाय एकदमच प्राप्त झाला तरी अगस्ति ऋषिप्रमाणे धैर्यवान होऊन त्यांना तोंड देण्यास सज्ज होतो॥ १९३॥ आकाशामध्ये धुराची प्रचंड रांग उठली तरी वारा एका झुळकीने ती नाहीशी करतो॥ १९४॥ त्याप्रमाणे अर्जुना! आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक असे तिन्ही प्रकारचे उपद्रव प्राप्त झाले तरी ते सर्व निमूटपणे सहन करतो॥ १९५॥ याप्रमाणे चित्त क्षुब्ध झाले असता जे धैर्याला उचलून धरून अढळ करते; त्याला धृति म्हणतात॥ १९६॥

**आतां निर्वाळूनि कनकें। भरिला गांगें पीयूखें। तया कलशाचिया सारिखें। शौच असे॥ १९७॥**
**जे आंगीं निष्काम आचारु। जीवीं विवेकु साचारु। तो सबाह्य घडला आकारु। शुचित्वाचाचि॥ १९८॥**

**अर्थ**—शुद्ध सोन्याचा कलश अमृतरूपी गंगोदकाने भरावा त्याप्रमाणे शुद्धि आहे॥ १९७॥ अंत:करणात विवेक असून बाहेर शरीराकडून ज्याची सर्व कर्मे निष्काम होतात, तो म्हणजे संपूर्ण शुचित्वाची साकार मूर्तिच होय॥ १९८॥

**कां फेडित पाप ताप। पोखीत तीरींची पादप। समुद्रा जाय आप। गंगेचें जैसें॥ १९९॥**
**कां जगाचें आंध्य फेडितु। श्रियेची राउळें उघडितु। निघे जैसा भास्वतु। प्रदक्षिणे॥ २००॥**
**तैसीं बांधलीं सोडित। बुडालीं काढित। सांकडी फेडित। आर्तांचिया॥ २०१॥**
**किंबहुना दिवसराती। पुढिलांचें सुख उन्नति। आणित आणित स्वार्थी। प्रवेशिजे॥ २०२॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे जगाचे पाप व ताप नाहीसे करीत व काठावरील झाडे वाढवित गंगेचे पाणी समुद्रास जाऊन मिळते॥ १९९॥ किंवा ज्याप्रमाणे जगातील अंध:कार नाहीसा करीत व शोभेची मंदिरे जी कमले ती प्रफुल्लित करीत सूर्य पृथ्वीच्या प्रदक्षिणेला निघतो॥ २००॥ त्याप्रमाणे उपाधीने बांधलेल्यांना मुक्त करीत, संसारात बुडलेल्यांचा उद्धार करीत व दु:खितांचे संकट नाहीसे करीत॥ २०१॥ फार काय सांगावे! समोर दिसेल त्याला रात्रंदिवस सुख देत व त्याचा उत्कर्ष करीत जे स्वार्थ साधतात (म्हणजे जे आपल्या स्वार्थाबरोबर दुसऱ्याचाहि स्वार्थ साधतात किंवा आपल्या आत्महिताबरोबर दुसऱ्याचेहि आत्महित साधण्याचा प्रयत्न करतात)॥ २०२॥

**वांचूनि आपुलिया काजालागीं। प्राणिजातांच्या अहितभागीं। संकल्पाचीही आडवंगी। न करणें जें॥ २०३॥**
**पैं अद्रोहत्व ऐशिया गोष्टी। ऐकसी जिया किरीटी। तें सांगितलें हें दिठी। पाहों ये तैसें॥ २०४॥**

**अर्थ**—यावाचून आपल्या स्वार्थाकरीता इतर, प्राण्यांचे अहित होईल अशा संकल्पाचा देखील, अडथळा न करणे॥ २०३॥ हे अर्जुना! 'अद्रोह' या शब्दाने जे तू ऐकतोस, ते दृष्टीने प्रत्यक्ष पाहता येईल, असे तुला सांगितले॥ २०४॥

**आणि गंगा शंभूच्या माथां। पावोनि संकोचे जेवीं पार्था। तेवीं मान्यपणें सर्वथा। लाजणें जें॥ २०५॥**
**तें हें पुढत पुढती। अमानित्व जाण सुमती। मागां सांगितलेंसे किती। तेंचि तें बोलों॥ २०६॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे गंगा शंकराच्या माथ्याचा आश्रय करून तेथे संकोच पावली, त्याप्रमाणे योग्य मानसन्मानाची देखील ज्याला लाज वाटते॥ २०५॥ हे शुद्धबुद्धि अर्जुना! ते हे अमानित्व होय, हे वारंवार लक्षात घे. या अमानित्वाचे लक्षण मागे सांगितलेच आहे तेच ते किती सांगायचे!॥ २०६॥

**एवं इहीं सव्विसें। ब्रह्मसंपदा हे वसत असे। मोक्षचक्रवर्तीचें जैसें। अग्रहार होय॥ २०७॥**
**नाना हें संपत्ति दैवी। या गुणतीर्थांची नीच नवी। निर्विण्णसगरांच्या दैवी। गंगाचि आली॥ २०८॥**
**कीं गुणकुसुमांची माळा। हे घेऊनि मुक्तिबाळा। वैराग्यनिरपेक्षाचा गळा। गिंवसीत असे॥ २०९॥**
**कीं सव्विसगुणज्योती। इहीं उजळूनि आरती। गीता आत्मया निजपती। नीरांजना आली॥ २१०॥**
**उगळितीं निर्मळें। गुण इयेंचि मुक्ताफळें। दैवीशुक्तिकळें। गीतार्णवींची॥ २११॥**

**काय बहु वानूं ऐसी। अभिव्यक्ती ये अपैसी। केलें दैवी गुणराशी। संपत्ति रूप॥ २१२॥**

**अर्थ**—याप्रमाणे हे सव्विस गुणांच्या रूपाने दैवी संपत्ति वसत असते. ही संपत्ति म्हणजे मोक्षरूपी राज्याच्या सार्वभौमराजाचे जसे इनामच होय॥ २०७॥ किंवा या सव्वीस गुणरूपी तीर्थाची नित्य नवी अशी दैवी संपत्तिच विरक्तिरूप सगरपुत्राच्या दैवाने गंगारूपाने प्राप्त झाली॥ २०८॥ किंवा मुक्तिरूपबाला या गुणांची माळ हाती घेऊन, वैराग्याने निरपेक्ष झालेल्या पुरुषांच्या गळ्यांचा शोध करीत आहे॥ २०९॥ किंवा या सव्विस गुणांची आरती उजळून ही गीता आपल्या आत्मस्वरूप पतीला ओवाळण्याकरीता आली॥ २१०॥ हे सव्वीस गुण म्हणजे गीतारूपी समुद्रातील शिंपेतून बाहेर पडलेले पाणिदार व तेजस्वी मोतीच होत॥ २११॥ फार काय वर्णन करू! या सव्वीस गुणराशीच्या द्वारा दैवी संपत्तीचे स्वरूप आपोआप अभिव्यक्त होईल असे वर्णन केले आहे॥ २१२॥

**आतां दुःखाची आंतुवट वेली। दोषकाट्यांची जरी भरली। तरी निजाभिधानीं घालीं। आसुरी ते॥ २१३॥**
**पैं त्याज्य त्यजावयालागीं। जाणावी जरी अनुपयोगी। तरी ऐका ते चांगी। श्रोत्रशक्ती॥ २१४॥**
**तरी नरकव्यथा थोरी। आणावया दोषीं अघोरीं। मेळु केला ते आसुरी। संपत्ति हे॥ २१५॥**
**नाना विषवर्गु एकवटु। तया नांव जैसा बासटु। आसुरी संपत्ति हा खोटु। दोषांचा तैसा॥ २१६॥**

**अर्थ**—आता जी आत दुःखाने भरलेली वेलीच आहे, ती दोषकाट्यांनी जरी भरली असली तरी त्या आसुरी संपत्तीच्या निरूपणाकडे आपले लक्ष दे॥ २१३॥ ज्याप्रमाणे त्याज्य वस्तु जरी अनुपयोगी असली तरी तिचा त्याग करण्याकरिता ती समजून घ्यावी लागते, त्याप्रमाणे, आसुरी संपत्तीचा त्याग करण्याकरिता चांगल्या श्रवणशक्तीने ती ऐक॥ २१४॥ भयंकर अशा नरकदुःखात आणण्याकरीता जो घोर दोषांचा मेळावा, ती आसुरी संपत्ति होय॥ २१५॥ किंवा सर्व विषे एकत्र झाली असता त्याला जसे काळकूट नांव प्राप्त होते, त्याप्रमाणे आसुरी संपत्ति सर्व दोषांची लगडीच होय॥ २१६॥

**दम्भो दर्पोऽभिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च। अज्ञानं चाभिजातस्य पार्थ सम्पदमासुरीम्॥ ४॥**

**अर्थ**—अर्जुना! आसुरी संपत्तीला अनुलक्षून झालेल्या पुरुषाचे ठिकाणी दंभ (धार्मिकतेचा देखावा), दर्प (गर्व), अभिमान (अहंकार), क्रोध, पारुष्य (कठोरभाषण), अज्ञान ही आसुरी संपत्ति असते॥ ४॥

**तरी तयाचि आसुरां। दोषांमाजीं जया वीरा। वाडपणाचा डांगोरा। तो दंभ ऐसा॥ २१७॥**
**जैसी आपुली जननी। नग्न दाविलिया जनीं। ते तीर्थचि परी पतनीं। कारण होय॥ २१८॥**
**कां विद्या गुरूपदिष्टा। बोभाइलिया चोहटां। तरि इष्टदा परी अनिष्टा। हेतु होती॥ २१९॥**
**पैं आंगें बुडतां महापूरीं। जे वेगे काढी पैलतीरीं। ते नावचि बांधिलिया शिरीं। बुडवी जैसी॥ २२०॥**
**कारण जें जीविता। तें वानिलें जरी सेवितां। तरी अन्नचि पांडुसुता। होय विष॥ २२१॥**
**तैसा दृष्टादृष्टाचा सखा। धर्मु जाला तो फोकारिजे देखा। तरी तारिता तोचि दोखा-। लागीं होय॥ २२२॥**
**म्हणौनि वाचेचा चौबारा। घातलिया धर्माचा पसारा। धर्मुचि तो अधर्मु होय वीरा। तो दंभु जाणे॥ २२३॥**

**अर्थ**—हे वीर अर्जुना! त्या आसुरी संपत्तीतील दोषामध्ये ज्याच्याविषयी वडीलपणाचा डांगोरा आहे तो दंभ असा आहे॥ २१७॥ ज्याप्रमाणे आपले जन्मस्थान म्हणून तीर्थस्थान असले तरी आपल्या आईला लोकांना नग्न करून दाखविले असता ते आपल्या अधोगतीला कारण होते॥ २१८॥ किंवा गुरुने सांगितलेला मंत्र चौरस्त्यावर मोठ्याने ओरडून प्रगट केला असता तो कल्याणकारक असला तरी अकल्याणकारक होतो॥ २१९॥ किंवा महापुरात शरीरासह बुडत असताना जी नांव पाण्यातून आपल्याला बाहेर काढून वाचविते, तीच जर डोक्यावर घेतली तर ती जशी बुडविते॥ २२०॥ अर्जुना! जे अन्न जिवंत राहण्याला कारणीभूत होते तेच सेवन करीत असताना वाढणाऱ्याने त्याची प्रशंसा करून वाढले असता दृष्टिदोष होऊन विषरूप होते॥ २२१॥ त्याप्रमाणे इहलोकातील व परलोकातील मित्र असा जो धर्म तो जेवढा काही आपल्याकडून घडला त्याचा डांगोरा पिटला असता तोच तारण्याऐवजी दोषावह

होतो॥ २२२॥ म्हणून धर्माचा पसारा वाचेच्या चव्हाट्यावर मांडला असता जो धर्मच अधर्म होतो, हे अर्जुना! तो दंभ होय, असे जाण॥ २२३॥

**आतां मूर्खाचिये जिभे। अक्षराचा आंबुखा सुभे। आणि तो ब्रह्मसभे। न रिझे जैसा॥ २२४॥**
**कां मांदुरी लोकांचा घोडा। गजपतिही मानी थोडा। कां कांटियेवरिल्या सरडा। स्वर्गुही नीच॥ २२५॥**
**तृणाचेनि इंधनें। आगी धांवे गगनें। थिल्लरबळें मीनें। न गणिजे सिंधु॥ २२६॥**
**तैसा माजे स्त्रिया धनें। विद्या स्तुती बहुतें मानें। एके दिवसींचेनि परान्नें। अल्पकु जैसा॥ २२७॥**
**अभ्रछायेचिया जोडी। निदैवु घर मोडी। मृगांबु देखोनि फोडी। पाणियाडें मूर्ख॥ २२८॥**
**किंबहुना ऐसैंसें। उतणें जें संपत्तिमिसें। तो दर्पु गा अनारिसें। न बोलें घेईं॥ २२९॥**

**अर्थ**—मुर्खाच्या जिभेवर अक्षराचा शिंतोडा पडला असता मग तो गर्वाने इतका फुगून जातो व ब्रह्मदेवाच्या सभेतहि त्याचे समाधान होत नाही॥ २२४॥ किंवा चाबुकस्वाराचा घोडा इंद्राच्या ऐरावतालाहि तुच्छ मानतो अथवा कुंपणावरील सरडा स्वर्गालाहि नीच समजतो॥ २२५॥ गवतास लागलेला अग्नि आकाशाला टेकतो किंवा डबक्यांतील मासा समुद्रासहि जुमानित नाही॥ २२६॥ जसा दरिद्रि मनुष्य एक दिवस परान्न पोटभर मिळाले म्हणजे माजून जातो, त्याप्रमाणे स्त्री, धन, विद्या, स्तुति, मानमान्यता इत्यादि प्राप्त झालेले पाहून जो उन्मत्त होतो॥ २२७॥ अभ्राची छाया प्राप्त झालेली पाहून दुर्दैवी मनुष्य, असलेले घर मोडून टाकतो किंवा मृगजळ पाहून मूर्ख मनुष्य साठविलेल्या पाण्याचा बांध फोडून टाकतो॥ २२८॥ फार काय सांगावे! अशा अशा रीतीने संपत्तीच्या निमित्ताने उन्मत्त होणे, त्याला दर्प म्हणतात, हे न बोलता जाण॥ २२९॥

**आणि जगा वेदीं विश्वासु। आणि विश्वासीं पूज्य ईशु। जगीं एक तेजसु। सूर्यचि हा॥ २३०॥**
**जगस्पृहे आस्पद। एक सार्वभौम पद। न मरणें निर्विवाद। जगा पढियें॥ २३१॥**
**म्हणौनि जरी उत्साहें। यातें वानूं जाये। कीं तें आइकोनि मत्सरु वाहे। फुगों लागे॥ २३२॥**
**म्हणे ईश्वरातें खायें। तया वेदा विष सूयें। गौरवामाजीं त्राये। भंगीत असे॥ २३३॥**
**पतंगा नावडे ज्योती। खद्योता भानूची खंती। कां टिटिभेनें अपांपती। वैरी केला॥ २३४॥**
**तैसा अभिमानाचेनि मोहें। ईश्वराचें नामही न साहे। बापाते म्हणे मज हे। सवती जाली॥ २३५॥**
**ऐसा मान्यतेचा पुष्टगंडु। तो अभिमानी परमलंडु। रौरवाचा रूढु। मार्गचि तो हा॥ २३६॥**

**अर्थ**—जगाला वेदांच्या ठिकाणीच विश्वास वाटतो व त्या विश्वासामुळे वेदांनी प्रतिपादिलेल्या ईश्वराला जग पूज्य मानते. या जगात तेजस्वी एक सूर्यच आहे॥ २३०॥ जगाला एक पद प्राप्त व्हावे अशी महत्वाकांक्षा आहे व ते म्हणजे सार्वभौमपद होय. जगात कोणालाहि, मरू नये, हेच आवडते॥ २३१॥ म्हणून आनंदाने कोणी त्याची प्रशंसा केली तर ती ऐकून त्याच्याविषयी मत्सर दाखवून स्वत: अभिमानाने फुगू लागतो॥ २३२॥ आणि म्हणतो की मी ईश्वरास खाऊन टाकीन, त्या वेदाला विष देईन व मोठेपणाच्या अभिमानाने व्यवहाराला पायाखाली तुडवितो॥ २३३॥ पतंगाला दिवा आवडत नाही, काजव्याला सूर्याचे वाईट वाटते व टिटवी पक्ष्याने समुद्राशी वैर मानले॥ २३४॥ त्याप्रमाणे अभिमानाच्या मोहाने ईश्वराचे नावहि सहन होत नाही व आपल्या प्रत्यक्ष बापालाच मोठेपणाच्या आड येणारी सवत समजतो॥ २३५॥ मानमान्यतेने उन्मत्त झालेला व अभिमानाने कोणालाहि न जुमानणारा असा पुरुष म्हणजे रौरव नरकाला जाणारा रुळलेला मार्गच होय॥ २३६॥

**आणि पुढिलांचे सुख। देखणियाचें होय मिख। चढे क्रोधाग्निचे विख। मनोवृत्ती॥ २३७॥**
**शीतळाचिये भेटी। तातला तेलीं आगी उठी। चंद्रु देखोनि जळे पोटीं। कोल्हा जैसा॥ २३८॥**
**विश्वाचें आयुष्य जेणें उजळे। तो सूर्य उदैला देखोनि सवळे। पापिया फुटती डोळे। डुडुळाचे॥ २३९॥**
**जगाची सुखपहांट। चोरां मरणाहूनि निकृष्ट। दुधाचें काळकूट। होय व्यालीं॥ २४०॥**
**अगाधें समुद्रजळें। प्राशितां अधिकें जळे। वडवाग्नि न मिळे। शांति कहीं॥ २४१॥**

**तैसा विद्याविनोदविभवें। देखे पुढिलांचीं दैवें। तंव तंव रोषु दुणावे। क्रोधु तो जाण॥ २४२॥**

**अर्थ**—समोर आलेल्या पुरुषाचे सुख पाहण्याचे निमित्त होताच मनोवृत्तीत क्रोधाग्नीचे विष चढते॥ २३७॥ तापलेल्या तेलात थंड पाणी पडताच भडका उठतो किंवा चंद्र उगवला म्हणजे कोल्हा जसा मनात जळतो॥ २३८॥ ज्याच्या योगाने विश्वाचे व्यापार चालू होतात तो सूर्य सकाळी उगवलेला पाहून पापी घुबडाचे डोळे फुटतात॥ २३९॥ सर्व जगाला सुखरूप वाटणारी पाहाट चोराला मरणाहून दुःखद होते. सर्पाचे ठिकाणी दूधच विषरूपाने परिणाम पावते॥ २४०॥ वडवाग्नि समुद्राचे अगाध जळ पीत राहूनहि अधिकच पेटत राहतो व त्याला कधी शांति मिळत नाही॥ २४१॥ त्याप्रमाणे विद्या, विलास, ऐश्वर्य यांनी युक्त अशी इतरांची भाग्ये जसजशी पाहतो, तसतसा जो रोष वाढत जातो, त्याला क्रोध म्हणतात, असे जाण॥ २४२॥

**आणि मन सर्पाची कुटी। डोळे नाराचांची सुटी। बोलणें ते वृष्टी। इंगळांची॥ २४३॥**
**येर जें क्रियाजात। तें तिखयाचें कर्वत। ऐसें सबाह्य खसखसित। जयाचें गा॥ २४४॥**
**तो मनुष्यांत अधम जाण। पारुष्याचें अवतरण। आतां आइक खण। अज्ञानाची॥ २४५॥**

**अर्थ**—ज्याचे मन जणु काय सर्पाचे बीळच होय. ज्याचे डोळ्याने पाहणे म्हणजे जणु काय सोडलेले तीक्ष्ण बाण होत, ज्याचे बोलणे म्हणजे जळजळित निखाऱ्याचा वर्षावच होय॥ २४३॥ ज्याच्या बाकीच्या क्रिया पोलादी कर्वताप्रमाणे कापणाऱ्या असून ज्याचे अंतर्बाह्य वागणे सर्वथा खरपूसच असते॥ २४४॥ तो मनुष्यांमध्ये अत्यंत नीच व कठोरपणाची मूर्तिच समजावी. आता अज्ञानाचे लक्षण ऐक॥ २४५॥

**तरी शीतोष्णस्पर्शा। निवाडु नेणे पाषाणु जैसा। कां रात्रीं आणि दिवसा। जात्यंधु तो॥ २४६॥**
**आगी उठिला आरोगणें। जैसा खाद्याखाद्य न म्हणे। कां परिस पाडु नेणे। सोनया लोहा॥ २४७॥**
**नातरी ते नानारसीं। रिघोनि दर्वी जैसी। परी रसस्वादासी। चाखो नेणें॥ २४८॥**
**कां वारा जैसा पारखी। नव्हेचि गा मार्गामार्गाविखीं। तैसें कृत्याकृत्यविवेकीं। अंधपण जें॥ २४९॥**
**हें चोख हें मैळ। ऐसें नेणोनियां बाळ। देखे तें केवळ। मुखींचि घाली॥ २५०॥**
**तैसें पापपुण्याचें खिचटें। करोनि खातां बुद्धि चेष्टे। कडु मधुर न वाटे। ऐसी जे दशा॥ २५१॥**
**तिये नाम अज्ञान। या बोला नाहीं आन। एवं साही दोषांचें चिन्ह। सांगितलें॥ २५२॥**

**अर्थ**—जसे दगडाला हा शीत स्पर्श, हा उष्ण स्पर्श, असा किंवा जन्मांधाला ही रात्र, हा दिवस, असा निवाडा कळत नाही॥ २४६॥ ज्याप्रमाणे पेटलेला अग्नि खाण्याकरिता उठला असता खाण्याजोगे काय व न खाण्याजोगे काय हा विचार करीत नाही किंवा परिस हे सोने, हे लोखंड असा भेद करू जाणत नाही॥ २४७॥ किंवा ज्याप्रमाणे पळीला खारट, आंबट, तिखट इत्यादि सर्व रसांमध्ये फिरत असताहि त्या रसांचा स्वाद कळत नाही॥ २४८॥ किंवा ज्याप्रमाणे वाऱ्याला मार्ग, अमार्ग याची परीक्षा नसते, त्याप्रमाणे काय करावे, काय करू नये, हे ज्याला समजत नाहीत॥ २४९॥ लहान मूल हे घाणेरडे, की हे स्वच्छ हे न जाणता दिसेल ते केवळ तोंडातच घालते॥ २५०॥ त्याप्रमाणे पाप-पुण्यकर्माची खिचडी करून खाण्याचा व्यापार करीत असता तिला कडू-गोड, बरे-वाईट, असे काही वाटत नाही, अशी जी बुद्धीची दशा॥ २५१॥ त्या दशेला अज्ञान म्हणतात. हे बोलणे अन्यथा नाही. याप्रमाणे आसुरी संपत्तीच्या सहाहि दोषांची लक्षणे सांगितली॥ २५२॥

**इहींच साही दोषांगीं। हे आसुरी संपत्ति दाटुगी। जैसें थोर विषय सुभगे अंगी। अंग सानें॥ २५३॥**
**कां तिघां वन्हींच्या पांती। पाहतां थोडे ठाय गमती। परी विश्वही प्राणाहुती। करूं न पुरे॥ २५४॥**
**धातयाही गेलिया शरण। त्रिदोषीं न चुके मरण। तया तिहींची दुणी जाण। साही दोष हे॥ २५५॥**
**इहीं साही दोषीं संपूर्णी। जाली इयेचि उभारणी। म्हणौनि आसुरी उणी। संपदा नव्हे॥ २५६॥**
**परी क्रूरग्रहांची जैसी। मांदी मिळे एकेचि राशी। कां येती निंदकापासीं। अशेष पापें॥ २५७॥**
**मरणाराचें आंग। पडिघाती अघवेचि रोग। कां कुमुहूर्तीं दुर्योग। एकवटती॥ २५८॥**

**विश्वासला आतुडवीजे चोरा। शिणला सुइजे महापुरा। तैसें दोषी इहीं नरा। अनिष्ट कीजे॥ २५९॥**
**कां आयुष्य जातिये वेळे। शेळिये सात वेउळि मिळे। तैंसे साही दोष सगळे। जोडती तया॥ २६०॥**
**मोक्षमार्ग्याकडे। जैं जयांचा आंबुखा पडे। तैं न निघे म्हणौनि बुडे। संसारीं तो॥ २६१॥**
**अधमां योनींच्या पाउटीं। उतरत जो किरीटी। स्थावरांही तळवटीं। बैसणें घे॥ २६२॥**
**हें असो तयाच्या ठायीं। मिळोनि साही दोषीं इहीं। आसुरी संपत्ति पाहीं। वाढविजे॥ २६३॥**
**ऐसिया या दोनी। संपदा प्रसिद्धा जनीं। सांगितलिया चिन्हीं। वेगळाल्या॥ २६४॥**

**अर्थ—**ज्याप्रमाणे भुजंगाचे शरीर लहान असते. पण त्याचे विष भयंकर असते, त्याप्रमाणे आसुरी संपत्ति सहा दोषांनी युक्त असली तरी ती तेवढ्यानीच बलवान झाली आहे॥ २५३॥ ज्याप्रमाणे तिन्ही अग्नीच्या (आहवनीय, दक्षिण, गार्हपत्य) पंक्तीला पाहता जागा थोडी लागते, पण विश्वहि त्यांच्या घासाला पुरत नाही॥ २५४॥ त्रिदोष कुपित झाले असता ब्रह्मदेवाला शरण जाऊनहि मरण चुकविता येत नाही. मग हे तर तीन दोषांच्या दुप्पट सहा दोष आहेत॥ २५५॥ या संपूर्ण सहा दोषांनी आसुरी संपत्तीची घडण झाली असल्यामुळे ती कमी सामर्थ्यवान नाही॥ २५६॥ सर्व क्रूर ग्रह मिळून एकाच राशीला यावे किंवा निंदकाला सर्वच पापे घडतात॥ २५७॥ मरणाऱ्याच्या शरीराचे ठिकाणी सर्वच रोग येऊन राहतात किंवा कुमुहूर्तावर सर्व वाईट योग जमतात॥ २५८॥ विश्वास टेवणारा मनुष्य जसा चोराचे हाती लागावा, थकलेला मनुष्य महापुरात सापडावा, त्याप्रमाणे या सहाहि दोषांनी मनुष्याचे अकल्याणच होते॥ २५९॥ आयुष्य सरले असताच ज्याप्रमाणे शेळीशी हिंस्र पशूची गांठ पडते त्याप्रमाणे हे सर्व सहाहि दोष त्या आसुरी संपत्तीच्या पुरुषाला प्राप्त होतात॥ २६०॥ जेव्हा या सहा दोषांचा शिंतोडा पडतो तेव्हा मोक्षमार्गाने जाण्याकरिता निघणार नाही, असे म्हणून तो संसारातच बुडून राहतो॥ २६१॥ निकृष्ट योनीच्या पायऱ्यांनी खाली जात असता, अर्जुना! जो शेवटी वृक्षादि स्थावर योनीच्या तळी जातो॥ २६२॥ हे असो! या सहा दोषांनी त्याचे ठिकाणी एक आसुरी संपत्तिच वाढविली जाते, पाहा!॥ २६३॥ अशा रीतीने जगात प्रसिद्ध असलेल्या या दोन्ही संपत्ती वेगळाल्या चिन्हांनी सांगितल्या॥ २६४॥

**दैवी सम्पद्विमोक्षाय निबन्धायासुरी मता। मा शुचः सम्पदं दैवीमभिजातोऽसि पाण्डव॥ ५॥**

**अर्थ—**दैवी संपत्ति मुक्त करणारी असून आसुरी संपत्ति बंधन करणारी आहे, असे मानले जाते. हे अर्जुना! तू दैवी संपत्ति घेऊन जन्मास आला असल्यामुळे आसुरी संपत्तीची तू भीति बाळगू नकोस॥ ५॥

**इया दोन्हींमाजी पहिली। दैवी जे म्हणितली। ते मोक्षसूर्यें पाहली। उखाचि जाण॥ २६५॥**
**येरी जे दुसरी। संपत्ति कां आसुरी। ते मोहलोहाची खरी। सांखळी जीवां॥ २६६॥**

**अर्थ—**ह्या दोनपैकी पहिली जी दैवी संपत्ति म्हणून म्हटली जाते ती मोक्षसूर्याने उजाडलेली पाहाटच होय॥ २६५॥ बाकीची राहिलेली दुसरी जी आसुरी संपत्ति ती जीवाच्या पायात असलेली अविवेकपूर्वक आसक्तीची लोखंडी बेडीच होय॥ २६६॥

**गूढार्थदीपिका—**शास्त्रीय गुणाचे आचरण करणारे लोकच आजपर्यंत संसार तरून गेले व पुढेहि तरतील, पण अशास्त्रीय स्वैर वर्तन करणारे लोक मागे कोणी संसार तरून गेले नाहीत व पुढेहि तरून जाणार नाहीत, असे येथे गीता निश्चयाने सांगते.

**परि हे आइकोनि झणें। भय घेसी हो मनें। काय रात्रीचा दिनें। धाक धरिजे॥ २६७॥**
**हे आसुरी संपत्ति तया। बंधालागीं धनंजया। जो साही दोषां ययां। आश्रयो होये॥ २६८॥**
**तूं तंव पांडवा। सांगितलेया दैवा। गुणनिधी बरवा। जन्मलासी॥ २६९॥**
**म्हणौनि पार्था तूं या। दैवी संपत्ती स्वामिया। होऊनि यावें उवाया। कैवल्याचिया॥ २७०॥**

**अर्थ—**हे ऐकून, अर्जुना! तू कदाचित् मनात भय धरशील, पण दिवसाने रात्रीचा धाक धरावा काय?॥ २६७॥ हे अर्जुना! जो या सहाहि दोषांना आश्रय होतो त्यालाच ही आसुरी संपत्ति बंधनकारक म्हणून संसारात

पाडणारी होते॥ २६८॥ पण, अर्जुना! तू तर दैवी संपत्तीत सांगितलेल्या सद्‌गुणांचा समुद्र असा उत्तम जन्माला आला आहेस॥ २६९॥ म्हणून, हे पार्था! तू दैवी संपत्तीचा स्वामी होऊन कैवल्यासारख्या सर्वोत्कृष्ट उत्कर्षास प्राप्त हो॥ २७०॥

**द्वौ भूतसर्गौ लोकेऽस्मिन्दैव आसुर एव च। दैवो विस्तरशः प्रोक्त आसुरं पार्थ मे शृणु॥ ६॥**

**अर्थ**—अर्जुना! ह्या लोकात दैव व असुर अशी दोन प्रकारची भूतसृष्टी आहे. दैवसृष्टि आतापर्यंत विस्तारपूर्वक सांगितली. आता पुढे आसुरी भूतसृष्टि सांगतो, ऐक॥ ६॥

**आणि दैवां आसुरां। संपत्तिवंतां नरां। अनादिसिद्ध उजरा। राहाटीचा आहे॥ २७१॥**
**जैसें रात्रीच्या अवसरीं। व्यापारिजे निशाचरीं। दिवसा सुव्यवहारीं। मनुष्यादिकीं॥ २७२॥**
**तैसिया आपुलालिया रहाटीं। वर्तती दोनी सृष्टी। दैवी आणि किरीटी। आसुरी येथ॥ २७३॥**
**तेवींचि विस्तारूनि दैवी। ज्ञानकथनादि प्रस्तावीं। मागील ग्रंथीं बरवी। सांगितली॥ २७४॥**

**अर्थ**—दैवी संपत्ति व आसुरी संपत्ति घेऊन जन्मलेल्या पुरुषाची अशी दोन प्रकारची प्रसिद्ध अशी राहाटी अनादिसिद्धच आहे॥ २७१॥ ज्याप्रमाणे रात्रीच्या वेळी पिशाच्चांचा व्यवहार असतो व दिवसा मनुष्यादि सर्व नीट व्यवहार करतात॥ २७२॥ त्याप्रमाणे दैवी आणि आसुरी ह्या दोन्ही भूतसृष्टी, हे अर्जुना! येथे आपआपल्या राहटीप्रमाणे वागत असतात॥ २७३॥ तसेच मागे ज्ञानलक्षणाचे निरूपण करताना दैवी सृष्टीचे उत्तम रीतीने विस्तारपूर्वक वर्णन केले॥ २७४॥

**आतां आसुरी जे सृष्टि। तेथिंची उपलऊं गोठी। अवधानाची दिठी। दे पां निकी॥ २७५॥**
**तरी वाद्येंवीण नादु। नेदी कवणाही सादु। कां अपुष्पीं मकरंदु। न लभे जैसा॥ २७६॥**
**तैसी प्रकृति हे आसुर। एकली नोहे गोचर। जंव एकाधें शरीर। माल्हाती ना॥ २७७॥**
**मग आविष्करला लांकुडें। पावकु जैसा जोडे। तैसी प्राणिदेहीं सांपडे। आटोपली हे॥ २७८॥**
**ते वेळीं जे वाढी ऊंसा। तेचि आंतुला रसा। देहाकारु होय तैसा। प्राणियांचा॥ २७९॥**
**आतां तयांचि प्राणियां। रूप करूं धनंजया। घडले जे आसुरीया। दोषवृद्धी॥ २८०॥**

**अर्थ**—आता ज्याला आसुरी सृष्टि म्हणतात, तेथील आचरण कसे असते, विस्ताराने सांगतो. चांगले लक्ष देऊन ऐक॥ २७५॥ ज्याप्रमाणे वाद्यावाचून ध्वनि नाही व ध्वनीशिवाय प्रतिध्वनि उमटत नाही किंवा फुलावाचून मधु प्राप्त होत नाही॥ २७६॥ त्याप्रमाणे ही आसुरी प्रकृति जोपर्यंत एखाद्या शरीरात प्रगट होत नाही, तोपर्यंत ती केवळ एकटी दिसू शकत नाही॥ २७७॥ ज्याप्रमाणे अग्नि लाकडात प्रगट होतो, तेव्हाच तो दिसतो, त्याप्रमाणे ही प्राण्याच्या शरीरात प्रगट झाली असता स्पष्ट दिसते॥ २७८॥ उसाची जी वाढ होते ती त्याच्या आतील रसाचीच वाढ होय. त्याप्रमाणे आसुरी संपत्ति देहात प्रगट होते तेव्हा प्राण्यांचे देह तदाकार होतात॥ २७९॥ म्हणून अर्जुना! आता आसुरी संपत्तीच्या दोषांनी भरलेल्या पुरुषांच्या आचरणांचे स्वरूप सांगतो॥ २८०॥

**प्रवृत्तिं च निवृत्तिं च जना न विदुरासुराः। न शौचं नापि चाचारो न सत्यं तेषु विद्यते॥ ७॥**

**अर्थ**—आसुरी संपत्तीचे लोक प्रवृत्ति-म्हणजे शास्त्रांनी 'करावा' म्हणून सांगितलेला विधिआचार--व-निवृत्ति-म्हणजे करू नये म्हणून सांगितलेले असते ते-काहीच जाणत नाहीत. त्यांच्या आचरणात शुद्धि, विहित आचार व सत्य नसते॥ ७॥

**तरि पुण्यालागी प्रवृत्ती। कां पापविषयीं निवृत्ती। या जाणणेयाची राती। तयांचें मन॥ २८१॥**
**निगणेया आणि प्रवेशा। चित्त नेदीत आवेशा। कोशकिट जैसा। जाचिन्नला पैं॥ २८२॥**
**कां दिधलें मागुती येईल। कीं न ये हें पुढील। न पाहातां दे भांडवल। मूर्ख चोरां॥ २८३॥**
**तैसिया प्रवृत्ति निवृत्ति दोनी। नेणिजती आसुरीं जनीं। आणि शुचित्व स्वप्नीं। देखती ना ते॥ २८४॥**
**काळिमा सांडील कोळसा। वरी चोखी होईल वायसा। राक्षसही मांसा। विटों शके॥ २८५॥**

**परी आसुरां प्राणियां। शौच नाहीं धनंजया। पवित्रत्व जेवीं भांडिया। मद्याचिया॥ २८६॥**

अर्थ—पुण्यकर्माविषयी प्रवृत्ति असली पाहिजे किंवा पापकर्माविषयी निवृत्ति असली पाहिजे हे जाणण्याविषयी त्याच्या मनात आंधार असतो॥ २८१॥ ज्याप्रमाणे कोशातील कीडा कोश बांधण्याच्या आवेशात बाहेर निघण्यास किंवा प्रवेश करण्याकडे लक्ष न दिल्यामुळे जाचातच सापडतो॥ २८२॥ किंवा ज्याप्रमाणे दिलेला पैसा परत येईल किंवा नाही याचा विचार न करतां मूर्ख मनुष्य चोराला पैसे देतो॥ २८३॥ त्याप्रमाणे पुण्यकर्म करण्याकडे प्रवृत्ति किंवा पापकर्मापासून निवृत्ति हे दोन्ही आसुरी लोक जाणत नाहीत. शुद्धि तर त्यांना स्वप्नातहि दिसत नाही॥ २८४॥ कोळसा कदाचित् आपला काळेपणा टाकून देईल, कावळा पांढरा होईल, राक्षसालाहि एकदा मांसाचा कंटाळा येईल॥ २८५॥ पण मद्याच्यां भांड्याला ज्याप्रमाणे पावित्र्य नसते, त्याप्रमाणे आसुरी संपत्तीचा पुरुष शुद्धि जाणत नाही॥ २८६॥

**वाढविती विधीची आस। कां पाहाती वडिलांची वास। कर्मे आचारती हे भाष। नेणतीचि ते॥ २८७॥**
**जैसें चरणें शेळियेचें। कां धांवणें वारियाचें। जाळणें आगीचें। भलतेउतें॥ २८८॥**
**तैसें पुढां सूनि स्वैर। आचरती तेगा आसुर। सत्येंसि वैर। सदाचि तयां॥ २८९॥**
**जरी नांगिया आपुलिया। विंचू करी गुदगुलिया। तरी साचा बोलिया। बोलती ते॥ २९०॥**
**अपानाचेनि तोंडें। जरी सुगंधा येणें घडे। तरी सत्य तयां जोडे। आसुरांतें॥ २९१॥**
**ऐसें तें न करितां कांहीं। आंगेंचि वोखटें पाहीं। आतां बोलती ते नवाई। सांगिजेल॥ २९२॥**
**एऱ्हवीं करेयाच्या ठायीं चांग। तें तयासि कैंचें नीट आंग। तैसा असुरांचा प्रसंग। प्रसंगें परिस॥ २९३॥**
**उधवणीचें जेवीं तोंड। उगळी धुंवाचे उभड। हें जाणिजे तेवीं उघड। सांगों ते बोल॥ २९४॥**

**अर्थ**—शास्त्रानुसार वागण्याची इच्छा वाढवावी किंवा वाडवडिलांच्या आचारविचाराकडे पाहावे किंवा कर्माचे आचरण करावे ही गोष्ट त्यांना माहितच नसते॥ २८७॥ ज्याप्रमाणे शेळीचे चरणे किंवा वाऱ्याचे धावणे किंवा अग्नीचे जाळणे भरमसाट असते॥ २८८॥ त्याप्रमाणे आसुरी लोक दृष्टीसमोर स्वैरपणा ठेऊन आचरण करतात. खरेपणाशी त्यांचे नेहमीच वैर असते॥ २८९॥ जर विंचू आपल्या नांगीने गुदगुल्या करील तरच हे असुर खरे बोलतील॥ २९०॥ अधोद्वाराने सुगंध येईल तरच त्यांचा सत्य बोलण्याशी संबंध होईल॥ २९१॥ अशा रीतीने ते काही न करता सर्वांगाने वाईट असतात, पाहा. आता त्यांचे आश्चर्यकारक बोलणे सांगतो, पाहा॥ २९२॥ एऱ्हवी उंटाचे कोणते आंग, नीटनेटके चांगले असते? त्याप्रमाणे आसुरी लोकांच्या गोष्टी प्रसंगाने ऐक॥ २९३॥ ज्याप्रमाणे धुराळ्याचे तोंड धुरांचे लोटच सोडत असते, त्याप्रमाणे आसुरी लोकांचे बोलणे असते, असे जाण. तेच बोलणे उघड सांगतो, ऐक॥ २९४॥

**असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरम्। अपरस्परसम्भूतं किमन्यत्कामहैतुकम्॥ ८॥**

**अर्थ**—'हे जगत् अनादि आहे' इत्यादि जगताविषयीचे शास्त्राचे म्हणणे खोटे आहे. त्याची व्यवस्था पापपुण्यावर आधारलेली नाही. ईश्वर म्हणून कोणी त्याचा शास्ता नाही ते कामी स्त्रीपुरुषापासून झाले आहे. कामावाचून त्याच्या उत्पत्तीचा दुसरा हेतु काय? असे ते आसुरी लोक बोलतात॥ ८॥

**तरी विश्व हा अनादि ठावो। येथ नियंता ईश्वररावो। चावडिये न्यावो अन्यावो। निवडी वेदु॥ २९५॥**
**वेदीं अन्यायीं पडे। तो निरयभोगें दंडे। सन्यायी तो सुरवाडें। स्वर्गीं जिये॥ २९६॥**
**ऐसी हे विश्वव्यवस्था। अनादि जे पार्था। इयेतें म्हणती ते वृथा। अवघेंचि हें॥ २९७॥**
**यज्ञमूढ ठकिले यागीं। देवपिसे प्रतिमालिंगीं। नागविले भगवे योगी। समाधिभ्रमें॥ २९८॥**
**तेथ आपलेनि बळें। भोगिजे जें जें वेंटाळें। हें वांचोनि कें वेगळें। पुण्य आहे॥ २९९॥**
**ना अशक्तपणें आंगिकें। वेंगळ वेंटाळीं न टके। ऐसा गादिजे वीण विषयसुखें। तेंचि पाप॥ ३००॥**
**प्राण घेपती संपन्नांचे। तें पाप जरी साचें। तरी सर्वस्व हाता ये तयांचें। हे पुण्यफळ कीं॥ ३०१॥**
**बळी अबळातें खाय। हेंचि बाधित जरी होय। तरी मासयां कां न होय। निसंतान॥ ३०२॥**

**अर्थ**—तरी जगत् अनादि आहे, त्याचा शास्ता परमात्मा आहे. वेद हा आपल्या चावडीवर न्याय अन्यायांचा (पुण्यपापांचा) निवाडा करतो॥ २९५॥ वेदांनी ज्याला अन्यायी (पापी) ठरविले, त्याला नरकरूपी दुःखाचा दंड मिळतो आणि पुण्यकर्म करणारा स्वर्गात सुख भोगतो॥ २९६॥ अर्जुना! अशा प्रकारे जगाची जी अनादि व्यवस्था आहे ती सर्व खोटी आहे, असे ते (असुर लोक) म्हणतात॥ २९७॥ आणखी ते म्हणतात, यज्ञाच्या पाठीपागे लागणाऱ्या मूर्खांना यागानी ठकविले. देवाच्या मागे लागून वेडे झालेल्यांना देवाच्या प्रतिमा व लिंग यांनी नागविले. भगवे वस्त्र परिधान करणारे योगी समाधीच्या भ्रमात सापडले॥ २९८॥ या मनुष्यलोकात आपण आपल्या मनगटाच्या बळावर जे जे प्राप्त करून घेता येईल ते ते प्राप्त करून घेऊन भोगावे, हेच पुण्य होय. याच्या शिवाय दुसरे पुण्य कोणते?॥ २९९॥ तसेच आंगात बळ नसल्यामुळे निरनिराळे भोग प्राप्त करून घेता येत नाहीत; म्हणून जे दुःख भोगणे, तेच पाप होय॥ ३००॥ श्रीमंत लोकांचे प्राण घेणे, हे जर पाप असेल तर त्यांची सर्व संपत्ति हाती येते हे पुण्याचेच फळ होय ना!॥ ३०१॥ बलवंताने दुर्बलाला खाल्ले असता बाधक होते, असे असेल तर माशांचे निसंतान कां होत नाही॥ ३०२॥

**आणि कुळें शोधूनि दोन्ही। कुमारेंचि शुभलग्नीं। मेळविजती प्रजासाधनीं। हेतु जरी॥ ३०३॥**
**तरी पशुपक्ष्यादि जाती। जया मिती नाहीं संतती। तयां कोणें प्रतिपत्ती। विवाह केले॥ ३०४॥**
**चोरियेचे धन आलें। तरी तें कोणासि विष जालें। वालभें परद्वार केलें। कोढी कोणी होय॥ ३०५॥**
**म्हणोनि देव गोसावी। तो धर्माधर्मु भोगवी। आणि परत्राच्या गांवीं। करी तो भोगी॥ ३०६॥**
**परी परत्र ना देवो। न दिसे म्हणोनि तें वावो। आणि कर्ता निमे मा ठावो। भोग्यासि कवण॥ ३०७॥**

**अर्थ**—आणि दोन्ही कुळांचा विचार करून मुलामुलींचे सुमुहूर्तावर लग्न करणे हे जर संतति उत्पत्तीला कारण होते, असे म्हणावे॥ ३०३॥ तर ज्याच्या संततीला मर्यादा नाही अशा पशुपक्ष्यादि जातींचे लग्न कोणत्या शास्त्रीय विधीने होतात॥ ३०४॥ चोरीने आलेले धन कोणाला विषाप्रमाणे प्राणघातक होते? आणि आवडीने परद्वार करणारा कोण अचूक कुष्टी होतो?॥ ३०५॥ म्हणून परमेश्वर जगाचा स्वामी आहे, तो पुण्य-पापकर्माप्रमाणे भोग देतो आणि जीव मेल्यानंतर परलोकात फळ भोगतो. पण परलोक व देव दिसत नाहीत म्हणून ते नाहीत व कर्ता मेल्यानंतर भोग्य पदार्थाचे ठिकाण कोठे असणार?॥ ३०६-३०७॥

**येथ उर्वशिया इंद्र सुखी। जैसा कां स्वर्गलोकीं। तैसाचि कृमिही नरकीं। लोळत श्लाघे॥ ३०८॥**
**म्हणौनि नरक स्वर्गु। नव्हे पापपुण्यभागु। जे दोहीं ठायीं सुखभोगु। कामाचाचि तो॥ ३०९॥**
**याकारणें कामें। स्त्रीपुरुषयुग्में। मिळती तेथ जन्मे। आघवें जग॥ ३१०॥**
**आणि जें जें अभिलाषें। स्वार्थालागीं पोषे। पाठीं परस्परें द्वेषें। कामचि नाशी॥ ३११॥**
**एवं कामावांचूनि कांहीं। जगा मूळचि आन नाहीं। ऐसें बोलती पाहीं। आसुर गा ते॥ ३१२॥**
**आतां असो हें किडाळ। बोली न करूं पघळ। सांगतांचि सफोल। होतसे वाचा॥ ३१३॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे स्वर्गात उर्वशीच्या समागमाने इंद्र सुखी होतो. तसेच नरकातील किडेहि नरकात सुख मानतात॥ ३०८॥ म्हणून नरक, स्वर्ग पापपुण्याचे फळ नव्हे. कारण दोन्ही ठिकाणी विषयाचाच सुखभोग आहे॥ ३०९॥ म्हणूनच कामवासनेने स्त्रीपुरुष एके ठिकाणी मिळाले असता हे सर्व जगत् उत्पन्न होते॥ ३१०॥ आणि ज्याची ज्याची इच्छा करतो ते ते स्वार्थाकरिता जतन करतो व नंतर परस्पराच्या द्वेषाने कामच त्यांचा नाश करतो॥ ३११॥ अशा रीतीने कामवासनेवाचून जगाचे दुसरे कारण नाही, असे असुर लोक मानीत असतात॥ ३१२॥ आता हे निंद्य वर्णन फार करीत बसत नाही, हे वर्णन करण्यात वाचेला व्यर्थ शीणच होतो॥ ३१३॥

**एतां दृष्टिमवष्टभ्य नष्टात्मानोऽल्पबुद्धयः। प्रभवन्त्युग्रकर्माणः क्षयाय जगतोऽहिताः॥ ९॥**

**अर्थ**—या दृष्टीचा आश्रय करून आत्मस्वरूपाला सर्वस्वी विसरलेले मंदबुद्धीचे असुर लोक, जगाचे शत्रु, जगाचा सर्वस्वी नाश करण्याकरिता घोर कर्म करणारे असे उत्पन्न होतात॥ ९॥

**आणि ईश्वराचिया खंती। नुसधियाचि करिती चांथी। हेंही नाहीं चित्तीं। निश्चयो एकु॥ ३१४॥**
**किंबहुना उघड। आंगीं लाऊनियां पाखांड। नास्तिकपणाचें हाड। रोंविलें जीवीं॥ ३१५॥**
**ते वेळीं स्वर्गालागीं आदरु। कां नरकाचा अडदरु। या वासनांचा अंकुरु। जळोनि गेला॥ ३१६॥**
**मग केवळ ये देहखोडां। अमेध्योदकाचा बुडबुडा। विषयपंकीं सुहाडा। बुडाले गा॥ ३१७॥**
**जैं आटावें होती जळचर। तैं डोहीं मिळती ढीवर। कां पडावें होय शरीर। तैं रोगा उदयो॥ ३१८॥**
**उदैजणें केतूचें जैसे। विश्वा अनिष्टोद्देशें। जन्मती ते तैंसे। लोकां आटूं॥ ३१९॥**
**विरूढलिया अशुभ। फुटती तैं ते कोंभ। पापाचे कीर्तिस्तंभ। चालते ते॥ ३२०॥**
**आणि मागांपुढां जाळणें। वांचूनि आगी कांहीं नेणे। तैसें विरुद्धचि एक करणें। भलतेयां॥ ३२१॥**
**परी तेंचि गा करणें। आदरिती संभ्रमें जेणें। तो आइक पार्था म्हणे। श्रीनिवासु॥ ३२२॥**

**अर्थ**—आणि अंत:करणात ईश्वराविषयी तिरस्कार असल्यामुळे व्यर्थ बडबड करतात. वास्तविक त्यांच्या चित्तात कोणताहि एक निश्चय नसतो॥ ३१४॥ किंबहुना उघड पाखंडमत स्वीकारून अंत:करणात नास्तिकपणाचे हाड रोवून घेतात॥ ३१५॥ तेव्हा पुण्यकर्माने स्वर्ग मिळवावा या आदररूप किंवा पापकर्माने नरक प्राप्त होईल या भीतीरूप वासनाचा अंकुर त्याच्या मनातून जळून गेलेला असतो॥ ३१६॥ मग रसरक्ताच्या अपवित्र अशा पाण्याचा जणु काय बुडबुडा, अशा देहरूपी खोड्यात पडून, हे अर्जुना! ते विषयरूपी चिखलात बुडाले॥ ३१७॥ डोहातील जलचराचा निसंतान होण्याचा काल आला असता ढीवर डोहात शिरतात किंवा शरीर पडते वेळी सर्व रोग उद्भवतात॥ ३१८॥ ज्याप्रमाणे केतूचा उदय जगाचे अनिष्ट होण्याकरिता होत असतो, त्याप्रमाणे ते असुर लोक लोकांचा नाश करण्याकरिताच जन्माला येतात॥ ३१९॥ ते असुर लोक म्हणजे वाढलेल्या पापकर्माचे कोंब आहेत व पापकर्माच्या कीर्तीला आधार देणारे चालते-बोलते स्तंभ आहेत॥ ३२०॥ जसा अग्नि मागील-पुढील जाळण्यावाचून काही जाणत नाही, त्याप्रमाणे असुर लोक वाटेल त्याचे वाईट करणे हेच एक जाणतात॥ ३२१॥ भगवान श्रीकृष्ण म्हणाले, हे अर्जुना! ते वाईट करणेहि ज्या उत्साहाने ते करतात तो (उत्साह) सांगतो, ऐक॥ ३२२॥

**काममाश्रित्य दुष्पूरं दम्भमानमदान्विता:। मोहाद्गृहीत्वासद्ग्राहान्प्रवर्तन्तेऽशुचिव्रता:॥ १०॥**

**अर्थ**—कधी तृप्त होणार नाही असा काम वाढवून, दंभ, मान, मद यांनी युक्त होऊन व अविवेकामुळे अशुभ निश्चय करून अमंगल व्रते करण्यास ते प्रवृत्त होतात॥ १०॥

**तरी जाळ पाणियें न भरे। आगी इंधन न पुरे। तयां दुर्भरांचिये धुरे। भुकाळु जो॥ ३२३॥**
**तया कामाचा वोलावा। जीवीं धरूनि पांडवा। दंभमानाचा मेळावा। मेळविती॥ ३२४॥**
**मातलिया कुंजरा। आगळी जाली मदिरा। तैसा मदाचा ताठा तंव जरा। चढतां आंगीं॥ ३२५॥**
**आणि आग्रहा तोचि ठावो। वरि मौढ्याऐसा सावावो। मग काय वानूं निर्वाहो। निश्चयाचा॥ ३२६॥**
**जिहीं परोपतापु घडे। परावा जीवु रगडे। तिहीं कर्मीं होऊनि गाढे। जन्मवृत्ती॥ ३२७॥**
**मग आपुलें केलें फोकारिती। आणि जगातें धिक्कारिती। दाहीं दिशीं पसरिती। स्पृहाजाळ॥ ३२८॥**
**ऐसेनि गा आटोपें। थोरिये आणती पापें। धर्मधेनू खुरपें। सुटलें जैसें॥ ३२९॥**

**अर्थ**—जाळे पाण्याने भरले राहू शकत नाही; विस्तवात कितीहि लाकडे टाकली तरी पुरेशी होत नाहीत, अशा कधीहि तृप्त न होणाऱ्या पदार्थांमध्ये जो अग्रसर आहे॥ ३२३॥ अंत:करणात त्या कामाचे मूळ धरून, अर्जुना! दंभमानादि विकारांचा समुदाय गोळा करतात॥ ३२४॥ ज्याप्रमाणे मदोन्मत्त हत्तीला दारू विशेषच मदोन्तमत्त करते, त्याप्रमाणे आसुरी पुरुष वयोवृद्ध होऊ लागला की अधिकच उन्मत्त होतो॥ ३२५॥ दुराग्रहाचे तोच ठिकाण होतो. आणखी वर त्याच्या जोडीला मूर्खपणा असतो. मग अशा स्थितीत निश्चय टिकण्याचे काय वर्णन करावे?॥ ३२६॥ ज्याच्या योगाने दुसऱ्याला दु:ख होईल, दुसऱ्याचा नाश होईल, असेच जन्मभर करण्याचा ते दृढ निश्चय करतात॥ ३२७॥ मग आपण केलेल्या कर्माची बढाई मारतात व दुसऱ्याचा धिक्कार करतात. अशा रीतीने आपल्या

वासनेचे जाळे जिकडे तिकडे पसरवितात॥ ३२८॥ ज्याप्रमाणे देवाला सोडलेली गाय, हेच कोणी खुरपे, ती सुटली असता सर्व शेताचा फडशा पाडते, त्याप्रमाणे अशा प्रकारच्या आवेशाने ते आसुरी लोक पापांना थोर करून सोडतात॥ ३२९॥

**चिन्तामपरिमेयां च प्रलयान्तामुपाश्रिताः। कामोपभोगपरमा एतावदिति निश्चिताः॥ ११॥**

**अर्थ**—प्रलयापर्यंतच्या काळाची अमर्याद चिंता वागवून व विषयभोगच सर्वस्व आहे, असा निश्चय करून ते (आसुरी लोक) केवळ विषयपरायणच होतात॥ ११॥

**याचि येका आयती। तयाचिया कर्मप्रवृत्ती। आणि जिणियाही परौती। वाहती चिंता॥ ३३०॥**
**पाताळाहूनि निम्न। जियेचिये उंचिये सानें गगन। जें पाहतां त्रिभुवन। अणुही नोहे॥ ३३१॥**
**ते योगपटाची मवणी। जीवीं अनियम चिंतवणी। जे सांडूं नेणे मरणीं। वल्लभा जैसी॥ ३३२॥**
**तैसी चिंता अपार। वाढविती निरंतर। जीवीं सूनि असार। विषयादिक॥ ३३३॥**
**स्त्रिया गाइलें आइकावें। स्त्रीरूप डोळां देखावें। सर्वेंद्रियीं आलिंगावें। स्त्रियेतेंचि॥ ३३४॥**
**कुरवंडी कीजे अमृतें। ऐसें सुख स्त्रियेपरौतें। नाहींचि म्हणौनि चित्तें। निश्चयो केला॥ ३३५॥**
**मग तयाचि स्त्रीभोगा-। लागीं पाताळ स्वर्गा। धांवती दिग्विभागा-। परौतेही॥ ३३६॥**

**अर्थ**—याच एका सिद्धीसाठी ते सर्व कर्म करण्याला प्रवृत्त होतात व जिवंत राहण्यापलीकडची चिंता वाहतात॥ ३३०॥ जी पाताळापेक्षाहि खोल, आकाशाहूनहि उंच आहे व पाहू गेले असता जिच्यापुढे त्रिभुवन अणुहि ठरत नाही॥ ३३१॥ ज्याप्रमाणे पतिव्रता स्त्री आपल्या पतीला मरण आले तरी त्याला सोडून राहू इच्छित नाही किंवा संन्याशाला नवीन संन्यास घेतल्यावर अंत:करणात पाळावयाच्या नियमांची जशी सारखी घोकणी लागते॥ ३३२॥ अशी अमर्याद चिंता नाशिवंत विषयांविषयी रात्रंदिवस ते वाढवित असतात॥ ३३३॥ स्त्रियांचे गायन ऐकावे, स्त्रियांचे रूप डोळ्यांनी पाहावे व सर्वेद्रियांनी स्त्रियांनाच आलिंगन द्यावे॥ ३३४॥ ज्या सुखावरून अमृतहि ओवाळून टाकावे असे सुख स्त्रीवाचून दुसरे ठिकाणी नाही, असाच ज्यांच्या चित्ताने निश्चय केला॥ ३३५॥ मग ते स्त्रीसुख भोगण्याकरिता दिशांच्या पलीकडे असणाऱ्या पाताळ-स्वर्गलोकांकडे धाव घेतात॥ ३३६॥

**आशापाशशतैर्बद्धाः कामक्रोधपरायणाः। ईहन्ते कामभोगार्थमन्यायेनार्थसञ्चयान्॥ १२॥**

**अर्थ**—शेकडो आशांपाशांनी बद्ध होऊन व कामक्रोधयुक्त होत्साते विषयवासना भोगण्यास अन्यायाने विपुल संपत्तीचा साठा मिळविण्याची इच्छा करतात॥ १२॥

**आमिषकवळु थोरी आशा। न विचारितां गिळी मासा। तैसें कीजे विषयाशा। तयांसि गा॥ ३३७॥**
**वांछित तंव न पवती। मग कोरडियेचि आशेची संतती। वाढऊं वाढऊं होती। कोशकिडे॥ ३३८॥**
**आणि पसरिला अभिलाषु। अपूर्णु होय तोचि द्वेषु। एवं कामक्रोधांहूनि अधिकु। पुरुषार्थु नाहीं॥ ३३९॥**
**दिहा खोलणें रात्रीं जागोवा। ठाणांतरियां जैसा पांडवा। अहोरात्रींही विसांवा। भेटेचिना॥ ३४०॥**
**तैसें उंचौनि लोटिलें कामें। नेहटती क्रोधाचिये ढिमे। तरी रागद्वेषें प्रेमें। न माती केंही॥ ३४१॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे मासा, परिणामाचा विचार न करता, गळाला लावलेल्या मासाचा तुकडा गिळतो व त्यात अडकला जातो, त्याप्रमाणे त्याची विषयाची आशा, त्यानाहि तसेच करते॥ ३३७॥ इच्छिलेला विषय प्राप्त न होता कोरडी आशा सारखी वाढवित वाढवित कोशकीड्याप्रमाणे ते आशेतच गुरफटून राहतात॥ ३३८॥ वाढविलेला मनोरथ अपूर्ण राहिल्यास तोच द्वेषात परिणाम पावतो. याप्रमाणे कामक्रोधाहून दुसरा पुरुषार्थच त्यांना वाटत नाही॥ ३३९॥ ज्याप्रमाणे, अर्जुना! देवडीवाल्याला दिवसा मालकाची स्वारी निघाली असता समोर धावावे लागते व रात्री गस्त द्यावी लागते, म्हणून अहोरात्र त्याला विश्रांति मिळत नाही॥ ३४०॥ किंवा कामाने उंचावरून लोटले गेलेले क्रोधाच्या खडकावर आदळतात, तरी विषयांवरील प्रेमामुळे त्यांचा रागद्वेष इतका वाढला असतो की तो कोठे मावत नाही॥ ३४१॥

**तेविंचि जीवींचिया हांवा। विषयवासनांचा मेळावा। केला परी तो भोगावा। अर्थे कीं ना॥ ३४२॥**
**म्हणोनि भोगावयाजोगा। पुरता अर्थु पैं गा। आणावया जगा। झोंबती सैरा॥ ३४३॥**
**एकातें साधूनि मारिती। एकाचि सर्वस्वें हरिती। एकालागीं उभारिती। अपाययंत्रें॥ ३४४॥**
**पाशिकें पोतीं वागुरा। सुणीं ससाणे चिकाटी खोंचरा। घेऊनि निघती डोंगरा। पारधी जैसे॥ ३४५॥**
**ते पोसावया पोट। मारूनि प्राणियांचे संघाट। आणिती ऐसें निकृष्ट। तेंही करिती॥ ३४६॥**
**परप्राणघातें। मेळविती वित्तें। मिळाल्या चित्तें। तोषणें कैसें॥ ३४७॥**

**अर्थ**—तसेच अंत:करणातील हावेप्रमाणे नाना प्रकारच्या विषयवासना वाढविल्या तरी जवळ धन असेल तरच वासनेप्रमाणे भोग भोगता येतील ना!॥ ३४२॥ म्हणून भोग भोगण्यास लागणारे धन आणण्याकरिता वाटेल तसे जगाला पकडतात॥ ३४३॥ कोणाला फसवून ठार मारतात तर कोणाचे सर्वस्व लुटतात व कोणावर जारण-मारणाचे प्रयोग करतात॥ ३४४॥ ज्याप्रमाणे पारधी, पाश, पोती, जाळे, शिकारी कुत्रे, ससाणा पक्षी, चिकटण्या, भाले घेऊन डोंगरावर जातात व आपले पोट भरण्यासाठी प्राण्यांचे समूह मारून आणतात, त्याप्रमाणे आसुरी लोकहि असे कृष्णकर्म करतात॥ ३४५-३४६॥ दुसऱ्याचे प्राण घेऊन संपत्ति मिळवितात व मिळालेली संपत्ति पाहून कसे संतुष्ट होतात (तेहि ऐक)॥ ३४७॥

**इदमद्य मया लब्धमिमं प्राप्स्ये मनोरथम्। इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम्॥ १३॥**

**अर्थ**—आज हे धन मी मिळविले आहे. ते अगदी मनाजोगे झाले. हे मी उद्या मिळवीन, पुन: तेहि माझे होणार आहे॥ १३॥

**म्हणे आजि मियां। संपत्ति बहुतेकांचिया। आपुल्या हातीं केलिया। धन्यु ना मी॥ ३४८॥**
**ऐसा श्लाघों जंव जाये। तंव मन आणीकही वाहे। सवेंचि म्हणे पाहे। आणिकांचेंही आणूं॥ ३४९॥**
**हें जेतुलें असे जोडिलें। तयाचेनि भांडवलें। लाभा घेईन उरलें। चराचर हें॥ ३५०॥**
**ऐसेनि धना विश्वाचिया। मीचि होईन स्वामिया। मग दिठी पडे तया। उरों नेदी॥ ३५१॥**

**अर्थ**—आणि म्हणतो की मी आज पुष्कळांच्या संपत्ती हस्तगत केल्या, तेव्हा मी धन्य आहे की नाही?॥ ३४८॥ अशी आपली स्तुति करून घेतो, तोच मनात आणखी मिळावे अशी इच्छा उत्पन्न होते व लगेच म्हणतो पाहा! दुसऱ्याचेहि धन आणू॥ ३४९॥ हे जितके काही मिळविले त्या मुद्दलावर उरलेल्या चराचरांतील धनाचा लाभ प्राप्त करून घेईन॥ ३५०॥ अशा रीतीने संपूर्ण जगातील संपत्तीचा मालक होईन व मग दृष्टीस पडेल त्याला जिवंत राहू देणार नाही॥ ३५१॥

**असौ मया हत: शत्रुर्हनिष्ये चापरानपि। ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहं बलवान्सुखी॥ १४॥**

**अर्थ**—या शत्रूला मी मारले, दुसऱ्यांनाहि पुढे मारीन, मीच ईश्वर आहे, मी भोक्ता आहे, मीच सिद्ध, मीच समर्थ, मीच सुखी आहे॥ १४॥

**हे मारिले ते वैरी थोडे। आणीकही साधीन गाढे। मग नांदेन पवाडें। येकलाचि मी॥ ३५२॥**
**मग माझीं होतील कामारीं। तियेंवांचूनि येरें मारीं। किंबहुना चराचरीं। ईश्वरु तो मी॥ ३५३॥**
**मी भोगभूमिचा रावो। आजि सर्वसुखासी ठावो। म्हणोनि इंद्रुही वावो। मातें पाहूनि॥ ३५४॥**
**मी मनें वाचा देहें। करीं तें कैसें नोहे। कें मजवांचूनि आहे। आज्ञासिद्ध आन॥ ३५५॥**
**तंवचि बळिया काळु। जंव न दिसें मी अतुर्बळु। सुखाचा कीर निखळु। रासिवा मीचि॥ ३५६॥**

**अर्थ**—हे थोडे शत्रु मारले आणखी आपल्यापेक्षा बलवान असतील अशा दुसऱ्या शत्रूंनाहि मारीन. मग सर्वत्र कीर्ति पावलेला असा मीच एकटा नांदेन॥ ३५२॥ मग सर्व माझे सेवक होतील. त्यांच्यावाचून जे कोणी राहतील त्यांचा संहार करीन फार काय सांगावे! चराचराचा ईश्वर काय तो एक मीच होईन॥ ३५३॥ भोगभूमि अशा पृथ्वीचा मी राजा होईन. सर्व सुखाला आश्रय स्थान आज मीच होईन. म्हणून मला पाहून इंद्रहि व्यर्थ ठरेल॥ ३५४॥ मी

काया-वाचा-मनाने करतो असे म्हटल्यानंतर ते कसे होणार नाहीं? ज्याची आज्ञा पाळलीच पाहिजे, असा समर्थ माझ्यावाचून दुसरा कोण आहे ॥ ३५५ ॥ जोपर्यंत महाबलवान मी दृष्टीस पडत नाही, तोपर्यंतच काल बलवान म्हटला जातो मी निश्चयाने केवळ सुखाची राशी आहे ॥ ३५६ ॥

**आढ्योऽभिजनवानस्मि कोऽन्योऽस्ति सदृशो मया। यक्ष्ये दास्यामि मोदिष्य इत्यज्ञानविमोहिता: ॥ १५ ॥**

**अर्थ**—मी धनसंपन्न आहे, मी कुलवान आहे, माझ्यासारखा दुसरा कोण आहे? मी यज्ञ करीन, दान देईन आनंदित होईन, असे अज्ञानाने मोहित होऊन बरळतात ॥ १५ ॥

**कुबेरु आथिला होये। परी तो नेणे माझी सोये। संपत्ती मजसम नव्हे। श्रीनाथांही ॥ ३५७ ॥**
**माझिया कुळाचा उजाळू। कां जातिगोतांचा मेळू। पाहतां ब्रह्माही हळू। उणाचि दिसे ॥ ३५८ ॥**
**म्हणोनि मिरविती नांवें। वायां ईश्वरादि आघवे। नाहीं मजसीं सरी पावे। ऐसे कोण्ही ॥ ३५९ ॥**
**आतां लोपला अभिचारु। त्याचा करीन मी जीर्णोद्धारु। प्रतिष्ठीन परमारु। यागवरी ॥ ३६० ॥**
**मातें गाती वानिती। नटनाचें रिझविती। तयां देईन मागती। ते ते वस्तु ॥ ३६१ ॥**
**माजिरा अन्नपानीं। प्रमदांच्या आलिंगनीं। मी होईन त्रिभुवनीं। आनंदाकारु ॥ ३६२ ॥**
**काय बहु सांगों ऐसे। ते आसुरीप्रकृतीपिसें। तुरंबिती असोसें। गगनौळें तियें ॥ ३६३ ॥**

**अर्थ**—कुबेर संपन्न खरा, पण मला झालेला धनलाभ त्याला माहित नाही. माझ्यासारखी संपत्ति लक्ष्मीपति विष्णूचीहि नाही ॥ ३५७ ॥ माझ्या कुळाचा नावलौकिक किंवा माझ्या जातीच्या व गोताचा समुदाय पाहता ब्रह्मदेवहि थोडा कमीच वाटतो ॥ ३५८ ॥ म्हणून ईश्वरादि सर्व व्यर्थच नावे धारण करतात, पण माझी बरोबरी करू शकेल असा कोणी नाही ॥ ३५९ ॥ लोपलेल्या जारणमारण प्रकारचा मी जीर्णोद्धार करीन व लोकांना मारक असे याग सुरू करीन ॥ ३६० ॥ जे कोणी माझे गायन करतील, स्तुति करतील, नाचतमाशाने माझे मनोरंजन करतील त्यांना, ते जे जे मागतील ते ते देईन ॥ ३६१ ॥ मादक अन्न व पेय सेवन करून व स्त्रियांना आलिंगन देऊन या त्रिभुवनात मीच एक सुखाचा पुतळा होईन ॥ ३६२ ॥ फार काय सांगावे! असे आसुरी प्रकृतीने पिसे झालेले लोक अतिशय महत्वाकांक्षेने आकाशपुष्पाचा सुगंध घेऊ पाहतात ॥ ३६३ ॥

**अनेकचित्तविभ्रान्ता मोहजालसमावृता: । प्रसक्ता: कामभोगेषु पतन्ति नरकेऽशुचौ ॥ १६ ॥**

**अर्थ**—अनेक प्रकारच्या चित्तभ्रांतीने युक्त होऊन, जाळ्यात सापडले जाऊन व अनेक विषयभोगांचे ठिकाणी आसक्त होऊन मरणानंतर ते अपवित्र अशा नरकात पडतात ॥ १६ ॥

**ज्वराचेनि आटोपें। रोगी भलतैसें जल्पे। चावळती संकल्पें। जाण ते तैसे ॥ ३६४ ॥**
**अज्ञान आतले धुळी। म्हणौनि आशा वाहटुळी। भोवंडीजती अंतराळीं। मनोरथांच्या ॥ ३६५ ॥**
**अनियम आषाढ मेघ। कां समुद्रोर्मी अभंग। तैसे कामिती अनेग। अखंड काम ॥ ३६६ ॥**
**मग पैं कामनाचि तया। जिवीं जाल्या वेलरिया। वोरपिलीं कांटिया। कमळें जैसीं ॥ ३६७ ॥**
**कां पाषाणाचिया माथां। हांडी फुटली पार्था। जीवीं तैसे सर्वथा। कुटके जाले ॥ ३६८ ॥**
**तेव्हां चढतिये रजनी। तमाची होय पुरवणी। तैसा मोहो अंत:करणीं। वाढोंचि लागे ॥ ३६९ ॥**
**आणि वाढे जंव जंव मोहो। तंव तंव विषयीं रोहो। विषय तेथ ठावो। पातकांसी ॥ ३७० ॥**
**पापें आपलेनि थांवें। जंव करिती मेळावे। तंव जितांचि आघवे। येती नरका ॥ ३७१ ॥**

**अर्थ**—ज्वराचा वेग वाढला म्हणजे रोगी जसा वाटेल तसे बडबडतो, त्याप्रमाणे हे लोक नाना प्रकारचे संकल्प बडबडतात, असे समज ॥ ३६४ ॥ अज्ञानरूपी धुळीत सापडल्यामुळे आशारूपी वाहटुळीने मनोरथरूपी आकाशात ते गिरक्या घालतात ॥ ३६५ ॥ आषाढातील मेघ अनियमित असतात किंवा समुद्रावर तरंग सारखे उठत असतात त्याप्रमाणे त्यांचे ठिकाणी कामवासना सदासर्वदा उठत असतात ॥ ३६६ ॥ ज्याप्रमाणे काट्यांनी कमळाची दळे चिरली जातात, त्याप्रमाणे मग त्या कामनाच त्यांच्या अंत:करणात वेलींच्या जाळ्या होतात ॥ ३६७ ॥ किंवा दगडावर मातीचे

भांडे पडले असता त्याचे तुकडे तुकडे होतात, तसे त्यांच्या जीवाचे कामनेमुळे तुकडे तुकडे होतात॥ ३६८॥ ज्याप्रमाणे जसजशी रात्र होते, तसतसा अंध:काराचाच पुरवठा होत जातो, त्याप्रमाणे अंत:करणात अविवेक उत्तरोत्तर वाढत जातो॥ ३६९॥ आणि जसजसा अविवेक वाढतो तसतशी विषयासक्ति वाढते व जेथे विषय आलेत तेथेच पातकेहि आलीच॥ ३७०॥ पातकाचे बळ वाढून जेव्हा ती एकत्र होतात, तेव्हा जीवंतपणीच सर्व नरकांची प्राप्ति होते॥ ३७१॥

**म्हणौनि गा सुमती। जे कुमनोरथां पाळिती। ते असुर येती वस्ती। तया ठाया॥ ३७२॥**
**जेथ असिपत्र तरुवर। खदिरांगाराचे डोंगर। तातलां तेलीं सागर। उतताती॥ ३७३॥**
**जेथ यातनांची श्रेणी। हे नित्य नवी यमजाचणी। पडती तिये दारुणीं। नरकलोकीं॥ ३७४॥**

**अर्थ**—म्हणून, हे शुद्धमति अर्जुना! जे दुष्ट मनोरथ अंत:करणात बाळगतात, ते असुर लोक या नरकलोकात वस्ति करण्याकरिता येतात॥ ३७२॥ जेथे तलवारीच्या धारेसारखी तीक्ष्ण पाते असलेले वृक्ष आहेत, खैराच्या निखाऱ्यांचे डोंगर आहेत व तापलेल्या उकळत असलेल्या तेलाचे समुद्र आहेत॥ ३७३॥ जेथे यातनांच्या वाढत्या रांगाच आहेत अशी जी नित्य नवी यमजाचणी होय, त्या घोर नरकात ते आसुरी लोक जाऊन पडतात॥ ३७४॥

**आत्मसम्भाविता: स्तब्धा धनमानमदान्विता:। यजन्ते नामयज्ञैस्ते दम्भेनाविधिपूर्वकम्॥ १७॥**

**अर्थ**—आपण आपली संभावना करून घेणारे, ताठर वृत्तीचे व धन व मान यांनी उन्मत्त झालेले ते असुर लोक दंभपूर्वक शास्त्रविधि सोडून नाममात्र यज्ञ करतात॥ १७॥

**ऐसे नरकाचिये सेले। भागीन जे जे जन्मले। तेही देखों भुलले। यजिती यागीं॥ ३७५॥**
**एऱ्हवीं यागादिक क्रिया। लाहणें तेंचि धनंजया। परी विफळती आचरोनियां। नाटकी जैसे॥ ३७६॥**
**वल्लभाचिया उजरिया। आपणया पति कुस्त्रिया। जोडोनि तोषिया जैसिया। अहेवपणें॥ ३७७॥**
**तैसें आपणयां आपण। मानिता महंतपण। फुगती असाधारण। गर्वें तेणें॥ ३७८॥**
**मग लवों नेणती कैसे। आटिवा लोहाचे खांब जैसे। कां उधवले आकाशे। शिळाराशी॥ ३७९॥**
**तैसे आपुलिये बरवे। आपणचि रिझतां जीवें। तृणाहीहूनि आघवें। मानिती नीच॥ ३८०॥**
**वरी धनाचिया मदिरा। माजूनि धनुर्धरा। कृत्याकृत्यविचारा। सवतें केलें॥ ३८१॥**
**जया आंगीं आयती ऐसी। तेथ यज्ञाची गोठी कायसी। तरी काय काय पिसीं। न करिती गा॥ ३८२॥**

**अर्थ**—अशा घोर नरकाच्या यातना भोगण्यास योग्य असलेले लोकहि मोहाने भुलून जाऊन यज्ञयागाच्या नादी लागलेले दिसतात॥ ३७५॥ हे अर्जुना! खरे पाहिले असता, यज्ञायागादि क्रिया आचारणयोग्यच आहेत, पण आसुरी लोक नाटक्याप्रमाणे त्याचे आचरण करून या निष्फळ करतात॥ ३७६॥ ज्याप्रमाणे वाईट चालीच्या स्त्रिया आपल्याला दुसरे पति जोडून घेतात व पतीच्या आश्रयाने सौभाग्यपण मिरविण्यात संतोष मानतात॥ ३७७॥ तसेच आपणच आपल्याला महंत म्हणवून घेऊन ते असुर लोक अतिशय गर्वाने फुगतात॥ ३७८॥ मग ओतीव लोखंडाच्या खांबाप्रमाणे किंवा आकाशात उंच वाढलेल्या दगडाच्या राशीप्रमाणे कसे म्हणून वाकणे-म्हणजे नम्र होणे-ते जाणत नाहीत॥ ३७९॥ त्याप्रमाणे आपणच आपली स्तुति करून समाधान मानतात व दुसऱ्या सर्वांना गवताहून तुच्छ समजतात॥ ३८०॥ अर्जुना! वर आणखी संपत्तीरूप दारूने मत्त होतात व काय करावे, काय करू नये ह्या सांगितलेल्या विधिनिषेधरूप विचाराचा मत्सर करतात॥ ३८१॥ ज्याचे ठिकाणी अशी स्थिति आहे, तेथे विधिपूर्वक यज्ञानुष्ठानाची गोष्ट कशी निघणार? पण भ्रमिष्ट माणसे काय काय करणार नाहीत॥ ३८२॥

**म्हणौनि कोणे एके वेळे। मौढ्यमद्याचेनि बळें। यागाचींही टवाळें। आदरिती॥ ३८३॥**
**ना कुंड मंडप वेदी। ना उचित साधनसमृद्धी। आणि तयांसी तंव विधी। द्वंद्वचि सदा॥ ३८४॥**
**देवां ब्राह्मणांचेनि नांवें। आड वारेनहि नोहावें। ऐसें आथी तेथ यावें। लागे कवणा॥ ३८५॥**
**पैं वासरुवाचा भोकसा। गाईपुढें ठेवूनि जैसा। उगाणा घेती क्षीररसा। बुद्धिवंत॥ ३८६॥**

**तैसें यागाचेनि नांवें। जग वाऊनि हांवे। नागविती आघवें। अहेरावरीं॥ ३८७॥**
**ऐशा कांहीं आपुलिया। होमिती जे उजरिया। तेणें कामिती प्राणियां। सर्वनाशु॥ ३८८॥**

**अर्थ**—म्हणून मूर्खपणा व मद्य यांच्या प्रभावामुळे एखादे वेळी यज्ञयागाची नक्कल करतात॥ ३८३॥ त्यांना यज्ञाकरिता कुंड, मंडप, वेदी नको; योग्य साधनसमृद्धि नको; शास्त्रात सांगितलेल्या विधीशी त्यांचा सर्वदा विरोधच असतो॥ ३८४॥ देव, ब्राह्मण यांच्या नावाचा वाराहि त्यांना सहन होत नाही. असे जेथे आहे, तेथे कोणाला यावे लागणार?॥ ३८५॥ ज्याप्रमाणे बुद्धिमान लोक गायीपुढे कृत्रिम वासरू ठेऊन तिला पान्हावून दूध घेतात॥ ३८६॥ त्याप्रमाणे यज्ञयागाच्या निमित्ताने लोकांना लोभाने पाचारण करून अहेराच्या द्वारा त्या सर्वांना नागवितात॥ ३८७॥ आपल्या उत्कर्षासाठी असे जे काही उघडपणे होमहवन करतात, ते लोकांच्या सर्वनाशाची इच्छा धरूनच करतात॥ ३८८॥

**अहङ्कारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः । मामात्मपरदेहेषु प्रद्विषन्तोऽभ्यसूयकाः॥ १८॥**

**अर्थ**—अहंकार, बल, दर्प, काम व क्रोध इत्यादि विकारांचा आश्रय करून आपल्या देहाचे ठिकाणी व परदेहाचे ठिकाणी असलेल्या माझा द्वेष करणारे व मत्सर करणारेच होत॥ १८॥

**मग पुढां भेरी निशाण। लाउनी ते दीक्षितपण। जगीं फोकारिती आपण। वावो वावो॥ ३८९॥**
**तेव्हां महत्त्वें तेणें अधमां। गर्वा चढे महिमा। जैसे लेवे दिधले तमा। काजळाचे॥ ३९०॥**
**तैसें मौढ्य घणावे। औद्धत्य उंचावे। अहंकारु दुणावे। अविवेकुही॥ ३९१॥**
**मग दुजयाची भाष। नुरवावया निःशेष। बळीयेपणा अधिक। होय बळ॥ ३९२॥**
**ऐसा अहंकार बळा। जालिया एकवळा। दर्पसागरु मर्याद वेळा। सांडूनि उते॥ ३९३॥**
**मग वोसंडिलेनि दर्पें। कामाही पित्त कुरुपे। तया धर्गीं सैंघ पळिपे। क्रोधाग्नि तो॥ ३९४॥**
**तेथ उन्हाळा आगी खरमरा। तेलातुपाचिया कोठारा। लागला आणि वारा। सुटला जैसा॥ ३९५॥**
**तैसा अहंकारु बळा आला। दर्पु कामक्रोधीं गूढला। या दोहींचा मेळु जाला। जयांच्या ठायीं॥ ३९६॥**
**ते आपुलिया सवेशा। मग कोणी कोणी हिंसा। या प्राणियांतें वीरेशा। न साधिती गा॥ ३९७॥**

**अर्थ**—मग भेरी, निशाण लावून आपल्या दीक्षितपणाचा जगात उगीच व्यर्थ बडेजाव माजवितात॥ ३८९॥ ज्याप्रमाणे अंधःकाराला काजळाचा लेप द्यावा, त्याप्रमाणे अधम पुरुषाचे ठिकाणी तो बडेजाव आणखी गर्व वाढविण्यास कारण होतो॥ ३९०॥ तसेच त्यांचा मूर्खपणा अधिकच वाढतो, उद्धटपणा बळावतो, अहंकार व अविवेकहि दुप्पट वाढतात॥ ३९१॥ मग दुसऱ्याचे नावहि उरू द्यावयाचे नाही, असा प्रयत्न करण्याकरिता त्यांचे बळहि अधिक बळावते॥ ३९२॥ अशा रीतीने अहंकार एकदा बलवान झाला म्हणजे गर्वसमुद्र मर्यादा सोडून उतू येतो॥ ३९३॥ मग त्या मर्यादा सोडून वाहू लागलेल्या गर्वाने कामाचा प्रकोप होतो व त्याच्या उष्णतेने क्रोधाग्नि एकदम भडकतो॥ ३९४॥ तेव्हा, ज्याप्रमाणे खरखरित उन्हाळ्यात तेलातूपाच्या कोठाराला आग लागून त्याला वाऱ्याचे साहाय्य व्हावे॥ ३९५॥ त्याप्रमाणे बळावलेल्या अहंकाराचा व कामक्रोध यांनी व्यापिलेल्या गर्वाचा ज्यांचे ठिकाणी मेळ झाला॥ ३९६॥ वीर अर्जुना! ते लोक आपल्या इच्छेप्रमाणे कोणकोणत्या प्रकारच्या हिंसेने प्राण्यांना मारणार नाहीत!॥ ३९७॥

**पहिलें तंव धनुर्धरा। आपुलिया मांसरुधिरा। वेंचु करिती अभिचारा-। लागोनियां॥ ३९८॥**
**तेथ जाळिती जियें देहें। यामाजीं जो मी आहे। तया आत्मया मज घाये। वाजती ते॥ ३९९॥**
**आणि अभिचारकीं तिहीं। उपद्रविजे जेतुलें कांहीं। तेथ चैतन्य मी पाहीं। शीण पावे॥ ४००॥**

**अर्थ**—अर्जुना! हे लोक प्रथम जारणमारणादि अभिचारकर्माकरिता आपल्याच रक्तमांसाचा उपयोग करतात॥ ३९८॥ असे करताना ज्या देहाला ते जाळतात त्या देहात असलेल्या मलाच घाव घालतात॥ ३९९॥ आणि त्या अभिचारकर्माने ज्यांना उपद्रव होतो तेथे चैतन्यरूपाने असलेल्या मलाच दुःख होते॥ ४००॥

**गूढार्थदीपिका**—जीव जरी आपल्याहून परमात्म्याला निराळा मानित असला तरी परमेश्वर, जीवाला आपल्याहून निराळा समजत नाही व जीव चैतन्य आणि ईश्वरचैतन्य एकच असल्यामुळे जीवाला होणारे दु:ख मलाच होते, असे येथे औपचारिकरीत्या भगवंतांनी म्हटले आहे.

**आणि अभिचारावेगळें। विपायें जें अवगळे। तया टाकिती इटाळें। पैशुन्याचीं॥ ४०१ ॥**
**सती आणि सत्पुरुख। दानशीळ याज्ञिक। तपस्वी अलौकिक। संन्यासी जे॥ ४०२ ॥**
**कां भक्त हन महात्मे। इयें माझीं निजाचीं धामें। निर्वाळलीं होमधर्में। श्रौतादिकीं॥ ४०३ ॥**
**तया द्वेषाचेनि काळकूटें। बासटोनि तिखटें। कुबोलांची सदटें। सूति कांडें॥ ४०४ ॥**

**अर्थ**—आणि अभिचारकर्मापासून चुकून जे गळले गेले त्यांना निंद्यकर्माचा दोष लावतात॥ ४०१ ॥ पतिव्रता, सत्पुरुष, दानशूर, निष्काम यज्ञादिकर्म करणारे तपस्वी, अलौकिक पुरुष, संन्यासी किंवा भक्त माहात्मे, जी, श्रौतादि होमधर्माने शुद्ध सात्विक झालेली ही माझी राहण्याची ठिकाणे आहेत, त्यांना द्वेषरूपी काळकूटविषाने माखलेले अत्यंत मर्मभेदी, तिखट व जोरदार वाग्बाण ते मारतात॥ ४०२-४०४ ॥

**तानहं द्विषतः क्रूरान्संसारेषु नराधमान्। क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु॥ १९ ॥**

**अर्थ**—अशा त्या द्वेष करणाऱ्या क्रूर नराधमांना मी संसारातील सतत पापरूप आसुरी योनीतच जन्माला घालतो॥ १९ ॥

**ऐसे आघवांची परी। प्रवर्तले माझ्या वैरीं। तरी तयां पापियां जें मी करीं। ते आइक पां॥ ४०५ ॥**
**तरी मनुष्यदेहाचा तागा। घेऊनि रुसती जे जगा। ते पदवी हिरोनि पैं गा। ऐसें ठेवीं॥ ४०६ ॥**
**जे क्लेशगांवींचा उकरडा। भवपुरींचा पानवडा। ते तमोयोनि तयां मूढां। वृत्तीचि दें॥ ४०७ ॥**
**मग आहाराचेनि नांवें। तृणही जेथ नुगवे। ते व्याघ्र वृश्चिक आडवे। तैसिये करीं॥ ४०८ ॥**
**तेथ क्षुधा-दु:खें बहुतें। तोडूनि खाती आपणयातें। मरमरों मागुतें। होतचि असती॥ ४०९ ॥**
**कां आपला गरळजाळीं। जळतया आंगाची पेंदळी। ते सर्पचि करीं बिळीं। निरुंधला॥ ४१० ॥**
**परी घेतला श्वासु घापे। येतुलेनही मापें। विसांवा तयां नाटोपे। दुर्जनांसी॥ ४११ ॥**
**ऐसेनि कल्पांचिया कोडी। गणितांही संख्या थोडी। तेतुला वेळु न काढीं। क्लेशौनि तयां॥ ४१२ ॥**
**तरी तयांसी जेथ जाणें। तेथिंचें हें पहिलें पेणें। तें पावोनि येरें दारुणें। न होती दु:खें॥ ४१३ ॥**

**अर्थ**—अशा रीतीने सर्वच प्रकारे माझे वैर करण्यास जे प्रवृत्त होतात, त्या पापी लोकांना जे मी फळ देतो ते सांगतो, ऐक॥ ४०५ ॥ मनुष्यदेहाचा संबंध प्राप्त असताहि जे जगाचा नाश करण्यास प्रवृत्त होतात ती त्यांची मनुष्यपणांची पदवी हिसकावून घेऊन त्यांना मी कसे करून ठेवतो॥ ४०६ ॥ अशा त्या मूढ लोकांना मी जो संपूर्ण दु:खरूपी गावाचा उकरडा होय, जो संसार नरकाचा पाणवठाच होय, अशा त्या तमोगुणी योनीचा वतनदार करून ठेवतो-म्हणजे सतत अशा तमोगुणी योनीतच त्यांना जन्माला घालतो॥ ४०७ ॥ मग आहाराकरिता गवतहि जेथे मिळणार नाही, अशा जंगलात वाघ, विंचू इत्यादि जन्मात घालतो॥ ४०८ ॥ मग तेथे भुकेच्या अत्यंत दु:खाने आपणालाच तोडून खाऊन मरत जातात व जन्माला येत जातात॥ ४०९ ॥ किंवा आपल्या विषाच्या अग्नीने आपल्या आंगाची त्वचा जाळून कात टाकणारा सर्प करून त्यांना बिळात कोंडून ठेवतो॥ ४१० ॥ घेतलेला श्वास टाकण्यास जितका वेळ लागतो तितका वेळ देखील विश्रांति त्या दुर्जनांना मिळू देत नाही॥ ४११ ॥ कल्पांच्या अनेक चळथी लोटण्याचा काळ ज्याच्या गणतीच्या दृष्टीने कमी भरेल इतका काळ लोटला तरी त्या दुर्जनांना मी त्या दु:खातून बाहेर काढत नाही॥ ४१२ ॥ तरी त्यांना पुढे जेथे जावयाचे त्याचा हा पहिला मुक्कामच होय. ती प्राप्ति झाली असता इतर दु:खे त्याच्यापुढे कांहीच भयंकर वाटणार नाहीत॥ ४१३ ॥

**आसुरीं योनिमापन्ना मूढा जन्मनि जन्मनि। मामप्राप्यैव कौन्तेय ततो यान्त्यधमां गतिम्॥ २० ॥**

**अर्थ**—हे अर्जुना! मग ते तमोगुणी मूर्ख लोक जन्मोजन्मी आसुरीयोनीतच जन्म पावून मला प्राप्त न होता त्यापेक्षाहि नीच गतीला प्राप्त होतात॥ २० ॥

**हा ठायवरी घोरी। संपत्ति ते आसुरी। अधोगती अवधारीं। जोडिली तिहीं॥ ४१४॥**
**पाठीं व्याघ्रादि तामसा। योनी तो अळुमाळु ऐसा। देहाधाराचा उसासा। आथी जोही॥ ४१५॥**
**तोही मी वोल्हावा हिरें। मग तमचि होती एकसरें। जेथ गेलें आंधारें। काळवंडैजे॥ ४१६॥**
**जयाची पापा चिळसी। नरक घेती विवसी। शीण जाय मूर्च्छी। शिणें जेणें॥ ४१७॥**
**मळ जेणें मैळे। ताप जेणें पोळे। जयाचेनि नांवें सळे। महाभय॥ ४१८॥**
**पापा जयाचा कंटाळा। उपजे अमंगळ अमंगळा। विटाळुही विटाळा। बिहे जया॥ ४१९॥**
**ऐसें विश्वाचेया वोखटेया। अधम जे धनंजया। तें ते होती भोगूनियां। तामसा योनि॥ ४२०॥**

**अर्थ**—ते मूढ लोक येथपर्यंत आसुरी संपत्तीच्या योगाने घोर अधोगति प्राप्त करून घेतात, पाहा!॥ ४१४॥ नंतर व्याघ्रादि तामसीयोनीतील देहाच्या आधाराचा जो थोडासा विसावा घेतला जातो॥ ४१५॥ तोहि ओलावा मी हिरावून घेऊन जेथे प्राप्त झाले असता आंधारालाहि काळेपणाची पुटे चढतील असे ते केवळ एक तमरूपच होऊन राहतात॥ ४१६॥ पापांनाहि ज्यांची किळस येईल, नरकालाहि भीती वाटेल व ज्यांचे दुःखभोग पाहून दुखालाहि मूर्च्छा येईल॥ ४१७॥ ज्याच्या योगाने मळालाहि मळ लागेल, ताप होरपळेल, महाभयालाहि ज्याचे नांव ऐकताच थरकांप सुटेल॥ ४१८॥ पापालाहि ज्याचा कंटाळा येईल व अमंगळालाहि ज्याला पाहता अमंगळ वाटेल, विटाळालाहि ज्याचा विटाळ होईल म्हणून भीती वाटते॥ ४१९॥ अर्जुना! व्याघ्रादि तमोयोनी भोगून जगामध्ये जे अधमातीलहि अधम असेल ते ते होऊन राहतात॥ ४२०॥

**अहा सांगतां वाचा रडे। आठवितां मन खिरडे। कटारें मूर्खीं केवढे। जोडिले निरय॥ ४२१॥**
**कायिसया ते असुर। संपत्ति पोषिती वाउर। जिया दिधलें घोर। पतन ऐसें॥ ४२२॥**
**म्हणौनि तुवां धनुर्धरा। नोहावें गा तिया मोहरा। जेउता वासु आसुरा। संपत्तिवंता॥ ४२३॥**
**आणि दंभादि दोष साही। हे संपूर्ण जयांच्या ठायीं। ते त्यजावे हें काई। म्हणों कीर॥ ४२४॥**

**अर्थ**—अरेरे! हे सांगताच आमच्या वाणीला रडूं येते. त्यांच्या नुसत्या आठवणीने आमचे मन मागे फिरते. हाय हाय! या मूर्खांनी केवढे घोरतम नरक प्राप्त करून घेतले॥ ४२१॥ जिच्या योगाने असे हे भयंकर अधःपतन होते, त्या आसुरी संपत्तीचे, ते मूढ लोक, व्यर्थ पोषण कशाला करतात बरे!॥ ४२२॥ म्हणून हे अर्जुना! आसुरी संपत्तीच्या लोकांचा जेथे जेथे रहिवास आहे तेथे तेथे तू जाऊ नकोस॥ ४२३॥ आणि वर सांगितलेले आसुरी संपत्तीतील दंभादि सहाहि दोष ज्यांच्या ठिकाणी असतील त्यांचा संग सर्वदा वर्ज्य करावा, हे खरोखर काय सांगायला पाहिजे॥ ४२४॥

**त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः। कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत्॥ २१॥**

**अर्थ**—काम, क्रोध, लोभ, असे ते तीन आपला नाश करणारे—म्हणजे सर्व पुरुषार्थाचा नाश करणारे-असून नरकाची द्वारे आहेत, म्हणून या तिघांचा सर्वथा त्याग करावा॥ २१॥

**परी काम क्रोध लोभ। या तिहींचेचि थोंब। थांवे तेथें अशुभ। पिकलें जाण॥ ४२५॥**
**सर्व दुःखीं आपुलिया। दर्शना धनंजया। पाढाऊ हे भलतया। दिधले आहाती॥ ४२६॥**
**कां पापियां नरकभोगीं। सुवावयालागीं जगीं। पातकांची दाटुगी। सभाचि हे॥ ४२७॥**
**ते रौरव गा तंवचिवरी। आइकिजती पटांतरीं। जंव हे तिन्ही अंतरीं। उठती ना॥ ४२८॥**
**अपाय इहीं असलग। यातना इहीं सवंग। हाणी हाणी नोहे हे तिघ। हेचि हाणी॥ ४२९॥**
**काय बहु बोलो सुभटा। सांगितलिया निकृष्टा। नरकाचा दारवंटा। त्रिशंकु हा॥ ४३०॥**
**या कामक्रोधलोभां-। माजीं जीवें जो होय उभा। तो निरयपुरीची सभा। येथ पावे॥ ४३१॥**
**म्हणौनि पुढतपुढतीं किरीटी। हे कामादिदोषत्रिपुटी। त्यजावीचि गा वोखटी। आघवां विषयीं॥ ४३२॥**

**अर्थ**—काम, क्रोध, लोभ या तिघांचा समुदाय जेथे होतो, तेथेच पापकर्म पिकते, असे जाण॥ ४२५॥ अर्जुना!

कोणालाहि आपल्या संपूर्ण दु:खस्वरूपाचे दर्शन करून देण्याकरिता यांना वाटाडे नेमले आहे ॥ ४२६ ॥ काम, क्रोध, लोभ हे तिघे म्हणजे जगामध्ये पापी लोकांना त्यांच्या पापकर्मांचा भोग म्हणून नरकात घालणारी पातकांची एक समर्थ सभाच होय ॥ ४२७ ॥ काम, क्रोध, लोभ हे जोपर्यंत अंत:करणात उत्पन्न होत नाहीत तोपर्यंत रौरवादि नरक हे शाब्दिक असे परोक्षच राहतात ॥ ४२८ ॥ या तिघांच्या योगाने अपाय सोपे झाले आहेत व दु:ख स्वस्त झाले आहे, म्हणून मार! मार! नाही! ह्या तिघांनाच मार ॥ ४२९ ॥ हे उत्तम योद्ध्या अर्जुना! काय सांगू! वर सांगितलेल्या निकृष्ट नरकांचा, हा त्रिशंकू, दारवठाच आहे ॥ ४३० ॥ जो कोणी काम, क्रोध, या तिघांमध्ये जीवभावाने उभा राहतो-म्हणजे जो सर्वस्वी त्यांच्या स्वाधीन होऊन राहतो-तो यमपुरीची सभा येथे जिवंतपणीच पाहतो ॥ ४३१ ॥ म्हणून, हे अर्जुना! काम, क्रोध, लोभ ही दोषरूपी त्रिपुटी अत्यंत अपायकारकच असल्यामुळे सर्व बाबतीत तिचा त्याग करावा, हेच वारंवार सांगणे आहे ॥ ४३२ ॥

**एतैर्विमुक्त: कौन्तेय तमोद्वारैस्त्रिभिर्नर: । आचरत्यात्मन: श्रेयस्ततो याति परां गतिम् ॥ २२ ॥**

**अर्थ—**अर्जुना! जो पुरुष तमोरूपी अधोगतीचे द्वार असलेल्या या तिघांपासून मुक्त होतो, तो आपणच आपले कल्याण करून घेतो, व मग परमगतीला प्राप्त होतो ॥ २२ ॥

**धर्मादिकां चौंही आंतु। पुरुषार्थांची तैंचि मातु। करावी जैं संघातु। सांडील हा ॥ ४३३ ॥**
**हे तिन्ही जीवीं जंव जागती। तंववरी निकियाची प्राप्ती। हे माझे कान नाइकती। देवोही म्हणे ॥ ४३४ ॥**
**जया आपणपें पढिये। आत्मनाशा जो बिहे। तेणें न धरावी हे सोये। सावधा होइजे ॥ ४३५ ॥**
**पोटीं बांधोनि पाषाण। समुद्रीं बाहीं आंगवण। कां जियावया जेवण। काळकूटाचें ॥ ४३६ ॥**
**इहीं कामक्रोधलोभेंसीं। कार्यसिद्धि जाण तैसी। म्हणौनि ठावोचि पुसीं। ययांचा गा ॥ ४३७ ॥**

**अर्थ—**जेव्हा मनुष्य काम, क्रोध, लोभ या तिघांचा समुदाय नि:शेष सोडील तेव्हाच धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चार पुरुषार्थापैकी कोणत्याहि पुरुषार्थाच्या प्राप्तीची गोष्ट त्याला करता येईल ॥ ४३३ ॥ हे तिन्ही दोष जोपर्यंत अंत:करणात जागृत असतात तोपर्यंत कल्याण झाल्याची वार्ता माझे कान ऐकत नाहीत, असे देवहि म्हणतात ॥ ४३४ ॥ ज्याला आत्मस्वरूपाचे प्रेम आहे व आत्मविस्मृति होऊ नये म्हणून जो भितो, त्याने यांचा आश्रय करू नये. यांच्यापासून नेहमी सावध राहावे ॥ ४३५ ॥ ज्याप्रमाणे पोटाला दगड बांधून हाताच्या सामर्थ्यावर समुद्रात पोहावे किंवा जिवंत राहण्याकरिता काळकूट विष सेवन करावे ॥ ४३६ ॥ त्याप्रमाणे काम, क्रोध, लोभ यांच्या संगतीने पुरुषार्थसिद्धीचा प्रयास करणे होय, असे जाण म्हणून यांचा ठावठिकाण देखील राहू देऊ नकोस ॥ ४३७ ॥

**जैं कहीं अवचटें। हे तिकडी सांखळ तुटे। तैं सुखें आपुलिये वाटे। चालों लाभे ॥ ४३८ ॥**
**त्रिदोषीं सांडिलें शरीर। त्रिकुटीं फिटलिया नगर। त्रिदाह निमालिया अंतर। जैसें होय ॥ ४३९ ॥**
**तैसा कामादिकीं तिघीं। सांडिला सुख पावोनि जगीं। संगु लाहे मोक्षमार्गीं। सज्जनांचा ॥ ४४० ॥**
**मग सत्संगें प्रबळें। सच्छास्त्राचेनि बळें। जन्ममृत्यूचीं निमाळें। निस्तरें रानें ॥ ४४१ ॥**
**ते वेळीं आत्मानंदे आघवें। जें सदा वसतें बरवें। ते तैसेंचि पाटण पावे। गुरुकृपेचें ॥ ४४२ ॥**
**तेथ प्रियाची परमसीमा। तो भेटे माउली आत्मा। तये खेंवीं आटे डिंडिमा। सांसारिक हे ॥ ४४३ ॥**
**ऐसा जो कामक्रोधलोभां। झाडी करूनि ठाके उभा। तो येवढिया लाभा। गोसावी होय ॥ ४४४ ॥**

**अर्थ—**यदाकदाचित् ही तीन कड्यांची साखळी तुटली तरच आपल्याला आपल्या इष्ट मार्गाने चालू लागता येईल ॥ ४३८ ॥ त्रिदोषांचा प्रकोप शांत झाला असता जसे शरीर, चोरी, चाहाडी, शिंदळकी हे तीन नाहीसे झाले असता जसे नगर व आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक हे तिन्ही ताप नाहीसे झाले असता जसे अंत:करण शांत होते ॥ ४३९ ॥ त्याप्रमाणे काम, क्रोध, लोभ या तिघांपासून मुक्त झालेला पुरुष जगात परम समाधान पावून मोक्षमार्गात जात असताना त्याला सज्जनांचा संग लाभतो ॥ ४४० ॥

(टीप-मोक्षमार्गाची पहिली पायरी म्हणजे संतसंगाचा लाभ होय.)

मग प्रबळ संतसंग व सच्छास्त्राचे बळ यांच्या योगाने तो जन्ममृत्युरूपी बरड अरण्यातून पार पडतो॥ ४४१ ॥ तेव्हा त्याला सदा संपूर्ण आत्मानंदाने भरले असलेले गुरुकृपारूपी शहर प्राप्त होते॥ ४४२ ॥

(टीप-गुरुकृपा फलद्रूप होण्याकरिता शिष्यहि अधिकारीच पाहिजे.)

जेथे, जो प्रेमाची परमसीमा होय त्या मायबाप आत्म्याची भेट होते व त्या आत्मस्वरूपाला आलिंगन दिले असता संसाराचा नगारा बंद पडतो॥ ४४३ ॥ अशा या काम-क्रोध-लोभांना जो नि:शेष झाडून टाकून एकटा राहील तोच या परम लाभाचा स्वामी होतो॥ ४४४ ॥

**यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः । न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम्॥ २३ ॥**

**अर्थ**—जो शास्त्रविधीचे उल्लंघन करून कामवासनेप्रमाणे स्वैर वर्तन करतो तो शुद्धचित्त होऊन परमार्थाचा योग्य अधिकारी होत नाही. त्याला सुखहि प्राप्त होत नाही, मग परमेश्वरप्राप्तिरूप परम गति प्राप्त होत नाही, हे काय सांगायचे ?॥ २३ ॥

**ना हें नावडोनि कांहीं। कामादिकांच्याचि ठायीं। दाटिली जेणें डोई। आत्मचोरें॥ ४४५ ॥**
**जो जगीं समान सकृपु। हिताहित दाविता दीपु। तो अमान्य केला बापु। वेद जेणें॥ ४४६ ॥**
**न धरीचि विधीची भीड। न करीचि आपली चाड। वाढवीत गेला कोड। इंद्रियांचें॥ ४४७ ॥**
**कामक्रोधलोभांची कास। न सोडीच पाळिली भाष। स्वैराचाराचें असोस। वळघला रान॥ ४४८ ॥**
**तो सुटकेचिया वाहणीं। मग पिवों न लाहे पाणी। स्वप्नींही ते सुख काहाणी। दुरीचि तया॥ ४४९ ॥**
**आणि परत्र तंव जाये। हें कीर तया आहे। परी ऐहिकही न लाहे। भोग भोगूं॥ ४५० ॥**
**तरी माशालागीं भुलला। ब्राह्मण पाणबुडां रिघाला। कीं तेथही पावला। नास्तिकवादु॥ ४५१ ॥**

**अर्थ**—किंवा हे शास्त्रांनी सांगितलेले काही न आवडून जो आत्मघातकी आपले डोके कामादिकांच्या ठिकाणीच खुपसून राहतो॥ ४४५ ॥ जो जगामध्ये सर्वांवर सारखीच कृपा करणारा आहे, हित कोणते, अहित कोणते, हे दाखविणारा जो दीप होय, तो मायबाप वेद ज्याने झुगारून दिला॥ ४४६ ॥ जो वेदाने सांगितलेल्या विधीची पर्वा करीत नाही, जो आपल्या कल्याणाचीहि चिंता करीत नाही, केवळ इंद्रियाचेच लाड पुरवित जातो॥ ४४७ ॥ जो काम-क्रोध-लोभांची कास सोडत नाही व त्यांचा शब्द मोडत नाही व स्वैराचाररूपी अफाट रानात भटकतो॥ ४४८ ॥ तो जन्ममरणातून होणाऱ्या सुटकारूपी प्रवाहातील पाणी पिऊ शकत नाही. एवढेच नाही तर स्वप्नात देखील सुखाची कहाणी त्याला दूरच राहते॥ ४४९ ॥ आणि त्याचा परलोक अंतरतो हे निश्चित आहे, पण ऐहिक भोगहि तो सुखाने भोगू शकत नाही॥ ४५० ॥ ज्याप्रमाणे ब्राह्मण कुसंगतीने मत्स्याहाराच्या मोहात पडून कोळ्याच्या धंद्यात शिरला व शेवटी नास्तिक झाला॥ ४५१ ॥

**तैसें विषयांचेनि कोडें। जेणें परत्रा केलें उबडें। तंव तोचि आणिकीकडे। मरणें नेला॥ ४५२ ॥**
**एवं परत्र ना स्वर्गु। ना ऐहिकही विषयभोगु। तेथ केउता प्रसंगु। मोक्षाचा तो॥ ४५३ ॥**
**म्हणौनि कामाचेनि बळें। जो विषय सेऊं पाहे सळें। तया विषयो ना स्वर्गु मिळे। ना उद्धरे तो॥ ४५४ ॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे ज्याने विषयाच्या प्रेमाने परलोक घालविला व पुढे मरणानंतर भलतीचकडे गेला॥ ४५२ ॥ अशा रीतीने संसाराच्या पैलतीरास पोहोचला नाही, स्वर्ग मिळवला नाही व ऐहिक विषयभोगहि भोगले नाहीत, तेव्हा मग मोक्षप्राप्ति कोठून आली ?॥ ४५३ ॥ म्हणून कामवासनेला बळी पडून हट्टाने विषयसेवनच जो करू लागतो, त्याला इच्छेप्रमाणे विषयसुख मिळत नाही, स्वर्गसुख मिळत नाही किंवा त्याला मोक्षप्राप्ति होत नाही॥ ४५४ ॥

**तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ। ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि॥ २४॥**

**ॐतत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे दैवासुरसम्पद्विभागयोगो नाम षोडशोऽध्यायः॥ १६ ॥**

**अर्थ**—काय केले पाहिजे व काय करता कामा नये यांचा निश्चय करण्याकरिता तुला शास्त्रच प्रमाण मानले पाहिजे; म्हणून शास्त्रांनी सांगितलेले विधान जाणून घेऊन तसे कर्म करण्यास तू योग्य आहेस॥ २४॥

**गूढार्थदीपिका**—येथे कर्तव्य कोणते व अकर्तव्य कोणते हे शास्त्रांना प्रमाण मानूनच जाणता येते, असे भगवंतांनी अर्जुनाला सांगितले असल्यामुळे व गीतेत या कर्तव्याकर्तव्याचा उलगडा केला नसून निष्कामचित्ताने कर्मानुष्ठान केले असता तेच चित्तशुद्धीद्वारा भगवंताला प्राप्त करून देणारे कसे होते, एवढेच सांगितले असल्यामुळे 'शास्त्र' हा शब्द गीतेला उद्देशून ग्रंथकाराने योजिला नसून ज्या वेदभागात श्रुति-पुराण इत्यादि ग्रंथातून कर्तव्याकर्तव्याचा ऊहापोह केलेला आहे, त्या ग्रंथांना उद्देशूनच योजिला गेला आहे, हे स्पष्ट होते.

**याकारणें पैं बापा। जया आथी आपली कृपा। तेणें वेदांचिया निरोपा। आन न कीजे॥ ४५५॥**

**अर्थ**—म्हणून हे बापा अर्जुना! ज्याला स्वत:ची दया येते त्याने वेदाची आज्ञा कधी मोडू नये॥ ४५५॥

**गूढार्थदीपिका**—वेद-शास्त्रे ही ईश्वरप्रणीत आहेत. त्यांनी सर्व आपल्या हिताचेच सांगितले आहे, असे ती अपेक्षारहित हित करणारी असल्यामुळे त्यांच्याविषयी शंका घेण्याला जागा नाही, असा भाव.

**पतीचिया मता। अनुसरोनि पतिव्रता। अनायासें आत्महिता। भेटेचि ते॥ ४५६॥**
**नातरी श्रीगुरुवचना। दिठी देतु जतना। शिष्य आत्मभुवना-। माजीं पैसे॥ ४५७॥**
**हें असो आपुला ठेवा। हाता आथी जरी यावा। तरी आदरें जेवीं दिवा। पुढां कीजे॥ ४५८॥**
**तैसा अशेषांही पुरुषार्था। जो गोसावी हो म्हणे पार्था। तेणें श्रुतिस्मृति माथां। बैसणें घापे॥ ४५९॥**
**शास्त्र म्हणेल जें सांडावें। तें राज्यही तृण मानावें। जें घेववी तें न म्हणावें। विषही विरू॥ ४६०॥**
**ऐसिया वेदैकनिष्ठा। जालिया जरी सुभटा। तरी कें आहे अनिष्टा। भेटणें गा॥ ४६१॥**
**पैं अहितापासूनि काढिती। हित देउनी वाढविती। नाहीं श्रुतीपरौती। माउली जगा॥ ४६२॥**

**अर्थ**—पतिव्रता स्त्री आपल्या पतीच्या मनोगताप्रमाणे वागून अनायासे ज्याप्रमाणे आपले आत्महित साधून घेते॥ ४५६॥ किंवा शिष्य आपला गुरूची आज्ञा पाळण्याकडे दृष्टि देईल तर तो जसा आत्मरूपी मंदिरात प्रवेश करतो॥ ४५७॥ हे असो. आपण ठेवलेले धन सापडावे अशी इच्छा असल्यास ज्याप्रमाणे अगत्याने दिवा पुढे केला पाहिजे॥ ४५८॥ त्याप्रमाणे अर्जुना! संपूर्ण पुरुषार्थ प्राप्त व्हावे अशी इच्छा करणाऱ्याने श्रुतिस्मृति ह्या शिरसावंद्य मानल्या पाहिजेत॥ ४५९॥ शास्त्रांनी जे टाकावे म्हणून म्हटले असेल ते आवडते राज्य असले तरी तृणाप्रमाणे तुच्छ समजून त्याचा त्याग करावा आणि ज्याचा स्वीकार करावा असे म्हटले असेल ते विष असले तरी, ते अहितकारक होईल, असे मनातहि आणू नये॥ ४६०॥ अशा रीतीने वेद-शास्त्रे यांना जो एकनिष्ठ होतो, अर्जुना! त्याचे अकल्याण कधीच होत नाही॥ ४६१॥ अकल्याणापासून मागे वळविणारी, कल्याण करून पोषण करणारी, अशी श्रुतीशिवाय जगाला दुसरी माता नाही॥ ४६२॥

**म्हणौनि ब्रह्मेंसीं मेळवी। तंव हे कोणें न संडावी। अगा तुवांही ऐसीचि भजावी। विशेषेंसी॥ ४६३॥**

**अर्थ**—आपले परब्रह्माशी ऐक्य होईपर्यंत तिचा कोणी त्याग करू नये आणि अर्जुना! तुवाहि विशेषेकरून तिचा असा आदर केला पाहिजे॥ ४६३॥

**गूढार्थदीपिका**—परब्रह्माशी ऐक्य होईपर्यंत श्रुतिस्मृतीचा त्याग केल्यास मनुष्य सर्वस्वी स्वैरवर्ती होऊन त्याचे ठिकाणी रजतम वाढतात आणि परब्रह्माशी ऐक्य झाल्यावर बळेच श्रुतिस्मृतीचा त्याग करील तर, ज्ञानाहंकार वाढून तो देहाहंकारापर्यंत येतो. म्हणून ब्रह्मैक्यापूर्वी श्रुतिस्मृतींची आज्ञा पाळावी व ब्रह्मैक्यानंतर पूर्व अभ्यासानुसार इंद्रियांना शास्त्रानुरूप वागू द्यावे. असे केले असताच जीवन्मुक्त स्थिति आंगी वागते.

**जे आजि अर्जुना तूं येथें। करावया सत्य शास्त्रें सार्थें। जन्मलासि बळार्थें। धर्माचेनि॥ ४६४॥**
**आणि धर्मानुज हें ऐसें। ओघेंचि आलें आपैसें। म्हणौनि अनारिसे। करूं नये॥ ४६५॥**

**कार्याकार्यविवेकीं। शास्त्रेंचि करावीं पारखीं। अकृत्य कुडें तें लोकीं। वाळावें गा॥ ४६६॥**
**मग कृत्यपणें खरें निगे। तें तुवां आपलेनि आंगें। आचरौनि आदरें चांगें। सारावें गा॥ ४६७॥**
**जे विश्वप्रामाण्याची मुदी। आजि तुझ्या हातीं असे सुबुद्धी। लोकसंग्रहासी त्रिशुद्धी। योग्य होसी॥ ४६८॥**

**अर्थ**—कारण अर्जुना! तू या लोकात धर्माचरणाच्या बळावर शास्त्रे सार्थ व सत्य करून दाखविण्याकरिता जन्मला आहेस॥ ४६४॥ आणि ओघानेच तुला धर्माचा धाकटा भाऊ आहे असे नाव प्राप्त झाले आहे; म्हणून तू धर्मशास्त्र सोडून वागणे योग्य नव्हे॥ ४६५॥ काय करावे, काय करू नये यांचा निवाडा शास्त्रावरूनच करावा आणि जगात, करू नये म्हणून सांगितले असेल, अशा निंद्य कर्माचा त्याग करावा॥ ४६६॥ मग करावे म्हणून जे यथार्थ ठरेल त्याचे तू स्वतः श्रद्धायुक्त अंतःकरणाने आचरण करून ते पुरे करावे॥ ४६७॥ कारण, हे शुद्धबुद्धि अर्जुना! लोकसंग्रह करण्यास-म्हणजे लोकांना धर्मशास्त्रानुसार लावण्यास-तू योग्य असल्यामुळे आज सर्व जगाला शास्त्राचे प्रामाण्य पटवून देण्याचा अधिकार तुझ्या हाती आहे॥ ४६८॥

**गूढार्थदीपिका**—शास्त्रैकनिष्ठ वर्तनाने चित्तात रागद्वेषादिक विकारांना उत्पन्न होण्यास अवसर राहत नाही व हे उत्पन्न झाले नाहीत म्हणजे चित्ताची शुद्धि झाली असे म्हटले जाते. याप्रमाणे आपले चित्त शुद्ध झाले असता कर्माने चित्तशुद्धि कशी होते व शास्त्रे प्रमाण कशी आहेत हे लोकांना पटवून देता येते.

**एवं आसुरवर्गु आघवा। सांगोनि तेथिंचा निगावा। तोही देवें पांडवा। निरूपिला॥ ४६९॥**
**इयावरी तो पांडूचा। कुमरु सद्भावो जीवीचा। पुसेल तो चैतन्याचां। कानीं ऐका॥ ४७०॥**
**संजयें व्यासाचिया निरोपा। तो वेळु फेडिला तया नृपा। तैसा मीही निवृत्तिकृपा। सांगेन तुम्हां॥ ४७१॥**
**तुम्ही संत माझिया कडा। दिठीचा कराल बहुडा। तरी तुम्हां माने येवढा। होईन मी॥ ४७२॥**
**म्हणोनि निज अवधान। मज वोळगे पसायदान। दीजो जी सनाथ होईन। ज्ञानदेवो म्हणे॥ ४७३॥**

**इति श्रीज्ञानदेवविरचिता भावार्थदीपिकायां षोडशोऽध्यायः॥ १६॥**

**अर्थ**—याप्रमाणे संपूर्ण आसुरी संपत्तीच्या लोकांचे वर्णन केले गेले व त्यातून निघण्याचा मार्गहि देवांनी पांडवाला सांगितला॥ ४६९॥ असे भगवंतांनी निरूपण केले असता पांडूचा कुमार जो अर्जुन तो, आपल्या अंतःकरणातील सद्भाव भगवंताला विचारील. तो संवाद पुढे पूर्ण जागृत राहून ऐका॥ ४७०॥ जसा व्यासांच्या आज्ञेप्रमाणे संजयांनी राजा धृतराष्ट्राला प्रसंग निरूपण करण्यात वेळ घालविला त्याप्रमाणे श्रीनिवृत्तिनाथांच्या कृपेने मीहि तुम्हाला सांगेन॥ ४७१॥ तुम्ही संतजन माझ्याकडे आपली पूर्ण कृपादृष्टि कराल तर, मीहि तुमच्या सारखा थोर होईन॥ ४७२॥ म्हणून श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात, की तुमचे सर्व लक्ष एका माझ्या निरूपणाकडेच राहील असा कृपाप्रसाद करा, म्हणजे मी धन्य होईन॥ ४७३॥

**श्रीसद्गुरुकृपेने श्रीज्ञानेश्वरीच्या सोळाव्या अध्यायाचा मराठी अनुवाद गूढार्थदीपिकेसह पूर्ण झाला, तो त्यांचे चरणी समर्पण असो.**



## समारोप

मागील पंधराव्या अध्यायात भगवंतांनी वृक्षाच्या रूपक परिभाषेने संपूर्ण उपाधीचे वर्णन करून मायेला आधार होणाऱ्या चैतन्यालाहि मर्यादा आहे, असे दाखविले नंतर उत्तमपुरुष हे नाव देऊन निरुपाधिक आत्मस्वरूपाचे वर्णन केले व आत्मप्राप्तीला अंतरंग साधन ज्ञान आहे, हेहि सांगितले.

आता त्या ज्ञानाला पोषक अशी दैवी संपत्ति व त्याच्या विरुद्ध जी आसुरी संपत्ति त्यांचे भगवान, या सोळाव्या आध्यायात निरूपण करतात.

भगवान म्हणतात, अर्जुना! देवाच्या ठिकाणी असणाऱ्या एका सत्वगुणाचाच आश्रय धरून राहणारी म्हणून जिला दैवी संपत्ति म्हणतात, ती सांगतो, ऐक.

भीती सोडणे, चित्तशुद्धि, ज्ञान व योग यांचे ठिकाणी तत्परता, दान, इंद्रियनिग्रह, यज्ञयागादि, वेद-शास्त्रादिकांचे अध्ययन, तप, मनाचा सरळपणा, कोणालाहि काया-वाचा-मनाने दुःख न देणे, क्रोध न करणे, वस्तुवरील ममता सोडणे, प्राणिमात्रांवर दया करणे, विषय सन्निध असता चित्त विकारी न होणे, अंतःकरणाचा कोमलपणा, निंद्यकर्माची लाज वाटणे, चित्ताची स्थिरता, तेजस्वीपणा, अपराधाची क्षमा करणे, व अतिमानिता नसणे, इत्यादि असे हे सव्विस गुण दैवी संपत्तीच्या पुरुषाचे ठिकाणी असतात. आता आसुरी संपत्तीच्या पुरुषाची लक्षणे सांगतो ऐक.

धार्मिकतेची दिखाई, गर्व, अहंकार, क्रोध, कठोर भाषण आणि अज्ञान अशी ही सहा लक्षणे आसुरी संपत्तीच्या पुरुषाचे ठिकाणी असतात.

दैवी संपत्ति मुक्त करणारी असून आसुरी संपत्ति बंधन करणारी आहे. या लोकात दैवी संपत्ति व आसुरी संपत्ति घेऊन जन्मलेल्या पुरुषांची राहाटी अनादिसिद्धच आहे. दैवी संपत्ति असलेल्या पुरुषाची राहाटी मागे तेराव्या अध्यायात अमानित्वादि लक्षणाने सविस्तर वर्णन केली. आता आसुरी संपत्ति असणाऱ्या पुरुषाची राहाटी भगवान सविस्तर सांगतात.

अर्जुना! हे आसुरी लोक शास्त्रात सांगितलेला विधि-आचार काहीच जाणत नाहीत. शुद्धि, सत्यता हे त्यांना माहित नसते. पाप-पुण्य-ईश्वर हे ते काही मानीत नाहीत. जगाच्या उत्पत्तीला स्त्री-पुरुष कामवासनेवाचून दुसरा हेतु नाही, असे ते म्हणतात. कधी तृप्त होणार नाही, असा काम वाढवून, दंभ, मान व मद यांनी युक्त होऊन व अशुभ निश्चय करून अमंगल व्रते करण्यास ते प्रवृत्त होतात. अपार चिंता वाढवून ते विषयभोगच सर्वस्व मानतात. शेकडो आशापाशांनी ते बद्ध असतात. अन्यायाने विपुल संपत्तीचा साठा मिळविण्याचा ते प्रयत्न करतात. आज हे धन मिळाले, उद्या आणखी मिळवावे अशा प्रयत्नात ते असतात. अनेक विषयभोगाचे ठिकाणी ते आसक्त होतात. शास्त्रविधि सोडून नाममात्र ते यज्ञ करतात. पतिव्रता, सत्पुरुष, दानशूर, निष्काम यज्ञयागादि कर्म करणारे तपस्वी वगैरे लोकांचा ते द्वेष करतात. अशा त्या द्वेष करणाऱ्यांना, भगवान म्हणतात, मी आसुरी योनीतच जन्माला घालतो.

या सर्व आसुरी संपत्तीत काम, क्रोध व लोभ हे तीन मुख्य असून हीच नरकाची द्वारे होत. म्हणून या तिघांचा अर्जुना! तू नाश कर. जो या तिघांपासून मुक्त होतो, तोच आपले कल्याण करून घेतो.

शास्त्रविधीला सोडून विषयसुखाच्या वासनेप्रमाणे जे स्वैर वर्तन करतात, त्यांना इह-परसुख तर मिळत नाहीच मग परमेश्वरप्राप्ति कोठून होणार! म्हणून भगवान म्हणतात, अर्जुना! कर्तव्य कोणते व अकर्तव्य कोणते हे श्रुति-स्मृति-पुराणादि शास्त्रांवरून जाणून घेऊन तसे तू वर्तन कर. स्वैर वर्तन करू नकोस.

**॥ श्रीमद्सद्गुरु श्रीज्ञानेश्वर महाराजार्पणमस्तु ॥**



॥ श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ॥

# अध्याय-सतरावा

**विश्वविकासित मुद्रा। जया सोडवी तुझी योगनिद्रा। तया नमो जी गणेंद्रा। श्रीगुरुराया॥ १ ॥**

**अर्थ**—हे श्रीगुरु गणराया! ज्या तुझ्या नामरूपात्मक विश्वास विकास करणाऱ्या मुद्रेच्या योगाने तुझी योगनिद्रा सोडविली जाते त्या तुला नमस्कार असो॥ १ ॥

**गूढार्थदीपिका**—येथे परब्रह्माशी पूर्ण ऐक्य ठेऊन श्रीगुरुचे स्तवन केले आहे.

"विश्वविकासितमुद्रा" या चरणाने श्रीगुरुपरब्रह्माच्या साकार विद्याप्रपंचरूप लीलेचा उल्लेख केला असून "योगनिद्रा" या शब्दाने श्रीगुरुच्या ज्ञान-अज्ञानरहित निराकार अशा निर्विकल्प समाधिस्थितीचा उल्लेख केला आहे.

(**टीप-विद्याप्रपंच**-म्हणजे नामरूपात्मक प्रपंचाचा सच्चिदानंदरूपाने प्रत्यय येणे.)

"तस्मात् परब्रह्मण: परमार्थत: साकारनिराकारौ स्वभावसिद्धौ" परब्रह्म श्रीगुरुच्या साकार, निराकार अशा दोन्ही प्रकारच्या लीला स्वयंसिद्ध आहेत व त्या डोळ्याच्या उघड-झापीप्रमाणे पाठोपाठ होत असतात, असे त्रिपादमहानारायणोपनिषदात सांगितले आहे व तेच येथे माउलींनी सूचित केले आहे.

**गणेंद्रा**-सर्व विघ्नांच्या समुदायाचा स्वामी किंवा प्रकृति एक, महत्-अहंकार व पंचतन्मात्रा हे सात आणि सोळा कार्यरूपतत्वे या गणांचा नियंता-स्वामी.

**त्रिगुणत्रिपुरीं वेढिला। जीवत्वदुर्गीं आडिला। तो आत्मशंभूने सोडविला। तुझिया स्मृती॥ २॥**

**अर्थ**—जो आत्मशंभू त्रिगुणरूप त्रिपुरासुराने वेढला गेल्यामुळे जीवत्वरूपी किल्ल्यात अडकला गेला, त्याला तू त्याच्या मूळच्या स्वरूपाची स्मृति करून देऊन मुक्त केलेस॥ २॥

**म्हणौनि शिवेंसीं कांटाळा। गुरुत्वें तूंचि आगळा। तऱ्ही हळु मायाजळा-। माजीं तारूनि॥ ३॥**

**अर्थ**—म्हणून शिवाशी तुझी तुलना करून पाहिली असता गुरुरूपाने तूच विशेष ठरतोस, तरीपण मायाजळातून तारत असल्यामुळे तू हलकाच आहेस॥ ३॥

**जे तुझ्याविखीं मूढ। तयांलागीं तूं वक्रतुंड। ज्ञानियांसि तरी अखंड। उजूचि आहासि॥ ४॥**

**अर्थ**—जे तुला जाणत नाहीत व तुझे भजन करीत नाहीत अशा अज्ञान्यांना तू तोंड वाकडे केलेला म्हणजे आपल्याकडे पाहत नाही, असा वाटतोस व तुझ्या स्वरूपाला जाणणाऱ्या ज्ञान्याला तू सरळ आहेस-म्हणजे तूच सर्वतोपरि सांभाळ करणारा आहेस, असा वाटतोस॥ ४॥

**गूढार्थदीपिका**—अज्ञान्याला परमात्मा दु:खदाता वाटतो तर सज्ञान्याला सुखदाता वाटतो असा अर्थ, "प्रपंचोऽपि द्विविध:। विद्याप्रपंचश्चाविद्याप्रपंचश्चेति। विद्याप्रपंचस्य नित्यत्वं सिद्धमेव नित्यानंदचिद्विलासात्मकत्वात्"

विद्याप्रपंच व अविद्याप्रपंच असा दोन प्रकारचा प्रपंच आहे. विद्याप्रपंच हा अखंड आनंदरूप व चिद्‌विलासरूप असल्यामुळे नित्य आहे. या प्रपंचाचा अनुभव ज्ञानीभक्ताला येतो. भगवान याच प्रपंचरूपाने नटतात. अज्ञानी पुरुषांना हाच प्रपंच त्यांच्या अज्ञानामुळे जड विनाशी-दु:खदायक म्हणून अविद्यात्मक असा विपरीत अनुभवाला येतो.

**दैविकी दिठी पाहतां सानी। तऱ्ही मीलनोन्मीलनीं। उत्पत्ति प्रळयो दोन्ही। लीलाचि करिसी॥ ५॥**

**अर्थ**—हे श्रीगुरो गणराया! तुज देवाची दृष्टि दिसायला लहान दिसते, तरीपण तिच्या उघडझापीमध्ये जगाची उत्पत्ति व लय लीलेनेच होतात॥ ५॥

**गूढार्थदीपिका—मीलनोन्मीलन**-''प्रत्यग्दृष्ट्या स्वस्वरूपचिंतनमेव निमेषः। परागदृष्ट्या स्वस्वरूपचिंतनमेवोन्मेषः'' अंतर्मुख दृष्टीने केवळ आत्मचिंतन करणे याला निमेष म्हणतात व बहिर्भूत दृष्टीने स्वस्वरूप चिंतन करणे याला उन्मेष म्हणतात.

निमेष व उन्मेष या दोन्ही वेळी भगवंताचे स्वात्मचिंतनच असते.

''कदाचिदात्मारामस्याखिलपरिपूर्णस्यादिनारायणस्य स्वेच्छानुसारेणोन्मेषो जायते तथाविधस्याद्वैतपरमानंद-लक्षणस्यादिनारायणस्योन्मेषनिमेषाभ्यां मूलाविद्योदयस्थितिलया जायन्ते''

परिपूर्ण अद्वैतानंदरूप आदिनारायणाचा उन्मेष झाला असता त्याच्या ठिकाणी लीन असलेले अनादिमायामोहित जीव, माया व सर्व प्रपंच यांच्या, उदयस्थितीचा व कल्पाचा, माया भ्रांतीमुळे अनुभव घेतात व निमेष झाला असता जीवाला प्रलयाचा अनुभव येतो.

**प्रवृत्तिकर्णाच्या चाळीं। उठिला मदगंधानिळीं। पूजीजसी नीलोत्पळीं। जीवभृंगाच्या॥ ६॥**

**अर्थ**—तुम्ही आपला प्रवृत्तिरूपी कान चाळविला असता त्याच्या योगाने गंडस्थळातून वाहणाऱ्या मदाच्या सुगंधाने युक्त असा जो वारा सुटतो त्याने आकृष्ट होऊन तुझ्या गंडस्थलावर जमलेल्या जीवभृंगाने वाहिलेल्या नीलकमलांनी तू पूजिला जातोस॥ ६॥

**गूढार्थदीपिका**—भगवंतांनी प्रगट केलेल्या प्रवृत्तिमार्गातील विषयसुखाला भुलून जीव भगवंताचे कामनिक पूजन करतात.

**पाठीं निवृत्तिकर्णताळें। आहाळी ते पूजा विघुळे। तेव्हां मिरविसी मोकळें। आंगाचें लेणें॥ ७॥**

**अर्थ**—नंतर दुसऱ्या निवृत्तिरूप कर्णाच्या हालचालीने, बांधलेली पूजा विसकटली जाऊन तू आपले शुद्ध स्वरूप प्रकट करतोस॥ ७॥

**गूढार्थदीपिका**—निवृत्तिरूप निष्कामकर्माने शुद्ध परमेश्वराचा साक्षात्कार होतो, असा अर्थ.

**वामांगीचा लास्यविलासु। जो हा जगद्रूप आभासु। तो तांडवमिसें कळासु। दाविसी तूं॥ ८॥**

**अर्थ**—जो हा जगद्रूप आभास चैतन्यशक्तिरूप भार्येचे नृत्यच होय, तो तू तांडवनृत्याच्या मिषाने नाना प्रकारच्या नृत्यांच्या कला दाखवितोस॥ ८॥

**गूढार्थदीपिका**—**''स्त्रीनृत्यं लास्यमुच्यते''** स्त्रियांच्या नृत्याला लास्य म्हणतात.

**हें असो विस्मय दातारा। तूं होसी जयाचा सोयरा। सोइरिकेचिया व्यवहारा। मुकेचि तो॥ ९॥**

**अर्थ**—हे असो. हे मायबापा श्रीगुरो! हे आश्चर्य आहे की तू ज्याचा सोयरा होतोस तो सर्व सोयरिकेच्या संबंधाला मुकतो॥ ९॥

**गूढार्थदीपिका**—अद्वैतप्रत्ययामुळे व्यावहारिक सोयरिक संबंधच राहत नाहीत नाही, असा अर्थ.

**फेडितां बंधनाचा ठावो। तूं जगद्वंधु ऐसा भावो। धरूं वोळगे उवावो। तुझाचि आंगीं॥ १०॥**

**अर्थ**—तू भवबंधनाचे नावहि नाहीसे केले असता ''तू जगद्बंधू आहेस'' असा भाव तुझ्याच ठिकाणी खरा उत्कर्षाला पावतो॥ १०॥

**गूढार्थदीपिका**—आत्मज्ञान झाल्यावर, सर्व दुःखाचे स्थान, अशा जगताचा नाश करणारे श्रीगुरुच खरे जगद्बंधु-म्हणजे जीवाचे खरे हितकर्ते-होत, असा जीवाला अनुभव येतो.

**दुजयाचेनि नांवें तया। देहही नुरेचि पैं देवराया। जेणें तूं आपणपयां। केलासी दुजा॥ ११॥**

**अर्थ**—हे देवराया श्रीगुरो! ज्या देहाचे ठिकाणी मी पणा स्थापन करून तुला आपल्याहून निराळे मानले गेले त्या द्वैताचे नाव घेता येईल इतक्यापुरताहि देह उरत नाही॥ ११॥

**गूढार्थदीपिका**—ज्याप्रमाणे आत्मज्ञानाने देहादि द्वैतपदार्थाचा निरास होऊन ज्ञानवृत्तीने अद्वैत साधले जाते त्याप्रमाणे अद्वैतानंतरहि जी आत्मप्रेमवृत्ति राहते, त्यावृत्तीने आत्मा तोच परमात्मा असे समजून प्रेमरूप भक्ति होऊ शकते.

**तूंतें करूनि पुढें। जे उपायें घेती दवडे। तयां ठासी बहुवें पाडें। मागांचि तूं॥ १२॥**

**अर्थ**—तुला समोर करून तुझ्या प्राप्तीकरिता जो नाना प्रकारचे उपाय करतो, त्याच्या तू फार मागे राहतोस॥ १२॥

**गूढार्थदीपिका**—परमेश्वराला समोर करून परमेश्वरप्राप्तीचे उपाय केले तरी सर्व उपाय अहंकारानेच होत असल्यामुळे व परमात्मा अहंकाराचा साक्षी असल्यामुळे, तो उपायाने सापडेल, असा कधीच समोर होऊ शकत नाही. तो सदासर्वदा साक्षी राहून मागेच राहतो, असा भाव.

**जो ध्यानें सूये मानसीं। तयालागीं नाहीं तूं त्याचें देशीं। ध्यानही विसरे तेणेंसीं। वालभ तुज॥ १३॥**

**अर्थ**—जो तुझे जाणिवेसहित ध्यान करून तुला अंत:करणात साठवू पाहतो, त्याला तू प्राप्त होत नाहीस; पण जो प्रेमाने ध्यानाची जाणीवहि विसरतो तो तुला आवडतो॥ १३॥

**गूढार्थदीपिका**—जाणिवेचा अहंकार देखील सगुणाच्या प्राप्तीला प्रतिबंध करतो, असा अर्थ.

**तूंतें सिद्धचि जो नेणे। तो नांदे सर्वज्ञपणें। वेदांही येवढें बोलणें। नेघसी कानीं॥ १४॥**

**अर्थ**—तू अखंड मायारहित शुद्धच आहेस, असे जो वेद जाणत नाही, तो सर्वज्ञ आहे, असे मानले जाते. पण त्या सर्वज्ञ वेदाचेहि एवढे मोठे बोलणे तू कानावर घेत नाहीस॥ १४॥

**गूढार्थदीपिका**—अधिष्ठानभूत परमशेवराचे वेदाने वर्णन केले आहे; पण त्याच्या मायारहित व आनंदविवर्त अशा सगुणस्वरूपाचे तो वर्णन करू शकला नाही, असा अर्थ.

**मौन गा तुझें राशिनांव। आतां स्तोत्रीं कें बांधों हाव। दिससी तेतुली माव। भजों कांई॥ १५॥**

**अर्थ**—तुझे राशीनाव मौन आहे-म्हणजे बोलताच येत नाही. तेव्हा तुझी स्तुति करण्याची हाव मी कशी धरू आणि जेवढे दिसते तेवढा सर्व खोटा मायिक पसारा असल्यामुळे मी भजन तरी काय करू॥ १५॥

**गूढार्थदीपिका—मौन गा तुझे राशीनांव**—नक्षत्रावर जन्मणाऱ्याचे राशीनाव निघत असते; पण परमात्मा जन्म नाशरहित व शब्दाच्या पलीकडे असल्यामुळे त्याला राशी नाही व राशीनावहि नाही, हेच माउलीने "मौन गा तुझे राशीनांव" या पदाने सुचविले आहे.

**दैविकें सेवकु हों पाहों। तरी भेदितां द्रोहचि लाहों। म्हणोनि आतां कांहीं नोहों। तुजलागीं जी॥ १६॥**
**जैं सर्वथा सर्वही नोहिजे। तैं अद्वया तूतें लाहिजे। हें जाणें मी वर्म तुझें। आराध्यलिंगा॥ १७॥**
**तरी नुरोनि वेगळेंपण। रसी भजिन्नलें लवण। तैसें नमन माझें जाण। बहु काय बोलों॥ १८॥**

**अर्थ**—तुज देवाचा सेवक म्हणून राहावे, असे म्हटले तर तुला आपल्याहून भिन्न समजून राहावे लागत असल्यामुळे तो तुझा द्रोहच होईल; म्हणून महाराज! तुमच्याशी कोणताहि संबंध न मानणेच उत्तम॥ १६॥ आराधना करण्यास योग्य हेच ज्याचे चिन्ह आहे, अशा श्रीगुरो! सर्वथा कोणत्याहि प्रकारे तुझ्याशी संबंध जोडला गेला नाही, तरच तुज अफुट अद्वैतस्वरूपाची प्राप्ति होऊ शकते. ही तुझ्या प्राप्तीची खूण मी पूर्णपणे जाणत आहे॥ १७॥ फार काय बोलू! ज्याप्रमाणे मीठ यत्किंचितहि वेगळेपणाने न राहता पाण्याशी ऐक्याच्या जाणिवेवाचून एकरूप होऊन राहते, त्याप्रमाणे माझे हे नमन आहे, असे जाण॥ १८॥

**गूढार्थदीपिका—तैसे नमन माझे जाण**-येथे माऊलीने "नमन" या शब्दाने नुसत्या क्रियेमुळे उत्पन्न होणारे द्वैत किंवा ज्ञानाने उत्पन्न होणारी ऐक्याची जाणीव याचाच निषेध केला आहे. नि:सीम गुरुप्रेमाने होणारी स्वाभाविक गुरुचरणनिष्ठ अखंड नम्रवृत्ति या भक्तीचा निषेध केला नाही.

**आतां रिता कुंभ समुद्रीं रिगे। तो उचंबळत भरोनि निगे। कां दशी दीपसंगें। दीपुचि होय॥ १९॥**
**तैसा तुझिया प्रणती। मी पूर्णु जाहलों श्रीनिवृत्ति। आतां आणीन व्यक्ती। गीतार्थु तो॥ २०॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे रिकामा मातीचा घडा समुद्रात टाकून उचलला असता तो जळाने तुडुंब भरूनच निघतो किंवा दिव्याचा संबंध होताच वातहि दिवा होऊन जाते॥ १९॥ त्याप्रमाणे, हे श्रीगुरो श्रीनिवृत्तिनाथ! तुम्हाला प्रेमपूर्वक स्वाभाविक नमन केल्याने मीहि पूर्ण झालो. आता गीतेचा अर्थ प्रगट करीन॥ २०॥

**तरी षोडशाध्यायशेखीं। तिये समाप्तीच्या श्लोकीं। जो ऐसा निर्णयो निष्टंकीं। ठेविला देवें॥ २१॥**
**जे कृत्याकृत्यव्यस्था। अनुष्ठावया पार्था। शास्त्रचि एक सर्वथा। प्रमाण तुज॥ २२॥**
**तेथ अर्जुन मानसें। म्हणे हें ऐसे कैसें। जे शास्त्रेंवीण नसे। सुटिका कर्मा॥ २३॥**

**अर्थ**—तरी सोळाव्या अध्यायाच्या अखेरीस त्या शेवटच्या श्लोकात भगवंताने असा निर्णय केला की॥ २१॥ हे अर्जुना! काय करावे, काय करू नये हे जाणून घेऊन त्याचे अनुष्ठान करण्याकरिता एक शास्त्रच तुला प्रमाण मानिले पाहिजे-म्हणजे शास्त्रावरूनच ते जाणून घेतले पाहिजे॥ २२॥ तेव्हा अर्जुन मनात म्हणतो की कार्याकार्य समजून घेण्याकरिता शास्त्रावाचून दुसरा मार्गच नाही, हे असे कसे?॥ २३॥

**गूढार्थदीपिका**—हे कर्म करणीय आहे, अशी ज्याची श्रद्धा, ते त्याचे कार्य व हे करणीय नाही अशी ज्याची श्रद्धा ते त्याचे अकार्य अशी कार्याकार्याची व्यवस्था नुसत्या श्रद्धेने ठरविता येणार नाही काय, असा अर्जुनाच्या प्रश्नाचा अभिप्राय.

**तरी तक्षकाची फडे। ठाकोनि कैं तो मणि काढे। कैं नाकींचा केशु जोडे। सिंहाचिये॥ २४॥**
**मग तेणें तो वोंविजे। तरीच लेणें पाविजे। एऱ्हवीं काय असिजे। रिक्तकंठीं॥ २५॥**
**तैसी शास्त्रांची मोकळी। यां कैं कोण वेंटाळीं। एकवाक्यतेच्या फळीं। पैसिजे कैं॥ २६॥**
**जालयाही एकवाक्यता। कां लाभे वेळ अनुष्ठितां। कैंचा पैसारु जीविता। येतुलालिया॥ २७॥**
**आणि शास्त्रें अर्थे देशें काळें। या चहूंही जें एक फळें। तो उपावे के मिळे। आघवयांसी॥ २८॥**
**म्हणौनि शास्त्राचें घडतें। नोहे प्रकारें बहुतें। तरी मूर्खा मुमुक्षां येथें। काय गति पां॥ २९॥**
**हा पुसावया अभिप्रावो। जो अर्जुन करी प्रस्तावो। तो सतरावेया ठावो। अध्याया येथ॥ ३०॥**

**अर्थ**—तक्षकाच्या फणीपाशी येऊन त्यातील मणी केव्हा काढणार? सिंहाच्या नाकातील केस केव्हा प्राप्त होणार?॥ २४॥ मग त्या केसात तो मणी ओवून तो दागिना प्राप्त व्हावा व कंठात बांधावा, नाही तर भोंड्या गळ्यानेच असायचे काय?॥ २५॥ तसेच शास्त्रांची निरनिराळी मते कोण, केव्हा एकत्र करील व त्यांच्या एका वाक्यतेची प्राप्ति केव्हा होणार?॥ २६॥ आणि काही काळाने एकवाक्यता झाली तरी पुढे आचरण करण्याकरिता वेळ कसा सापडणार? व तसे दीर्घ आयुष्य कोठून लाभणार?॥ २७॥ आणि शास्त्र, अर्थ, देश, काल या चौघांनी फलद्रूप होणारा उपाय सर्वासच कसा मिळणार?॥ २८॥ म्हणून बहुत करून शास्त्राप्रमाणे तंतोतंत घडून येणे शक्य दिसत नाही. अशा स्थितीत अज्ञानी मूर्ख मुमुक्षूची काय गति होणार?॥ २९॥ ही शंका भगवंताला विचारण्याचा प्रस्ताव अर्जुनाने केला, तोच हा सतरावा अध्याय होय॥ ३०॥

**तरी सर्वविषयीं वितृष्णु। जो सकळकळीं प्रवीणु। कृष्णाही नवल कृष्णु। अर्जुनत्वें जो॥ ३१॥**
**शौर्या जोडला आधारु। जो सोमवंशाचा शृंगारु। सुखादि उपकारु। जयाची लीला॥ ३२॥**
**जो प्रज्ञेचा प्रियोत्तमु। ब्रह्मविद्येचा विश्रामु। सहचरु मनोधर्मु। देवाचा जो॥ ३३॥**

**अर्थ**—तरी जो संपूर्ण विषयवासनारहित आहे, जो संपूर्ण कलेत निपुण आहे व जो अर्जुनरूपाने श्रीकृष्णाच्या मनाला वेध लावणारा कृष्णच होय॥ ३१॥ जो शौर्यगुणाला मिळालेला आधारच होय, जो सोमवंशाचे भूषण आहे व सुखादि देऊन उपकार करणे हीच ज्याची लीला आहे॥ ३२॥ जो जाणणाऱ्या बुद्धीचा प्रिय पति आहे, ब्रह्मविद्या ज्याचे ठिकाणी विश्रांति घेते व जो नेहमी देवाबरोबर राहणारा देवाचा मनोधर्मच होय॥ ३३॥

*अर्जुन उवाच*

**ये शास्त्रविधिमुत्सृज्य यजन्ते श्रद्धयान्विताः। तेषां निष्ठा तु का कृष्ण सत्त्वमाहो रजस्तमः॥ १॥**

**अर्थ**—अर्जुन म्हणतो, शास्त्रविधीला सोडून जे केवळ श्रद्धेने यजन करतात, भगवंता! त्यांची निष्ठा काय सात्विक राजस की तामस असते, हे सांग॥ १॥

**तो अर्जुन म्हणे गा तमालश्यामा। इंद्रियां फावलिया ब्रह्मा। तुझा बोलु आम्हां। साकांक्ष पैं जी॥ ३४॥**

**जें शास्त्रेंवांचूनि आणिकें। प्राणिया स्वमोक्षु न देखे। ऐसें कां कैं पखें। बोलिलासी॥ ३५॥**
**तरी न मिळेचि तो देशु। नव्हेचि काळा अवकाशु। जो करवी शास्त्राभ्यासु। तोही दुरी॥ ३६॥**
**आणि अभ्यासीं विरजिया। होती जिया सामग्रिया। त्याही नाहीं आपैतिया। तिये वेळीं॥ ३७॥**
**उजू नोहेचि प्राचीन। नेदिचि प्रज्ञा संवाहन। ऐसें ठेलें आपादन। शास्त्रांचें जयां॥ ३८॥**
**किंबहुना शास्त्रविखीं। एकही न लाहातीचि नखी। म्हणूनि उखिविखी। सांडिली जिहीं॥ ३९॥**

**अर्थ**—तो अर्जुन म्हणाला, हे इंद्रियगोचर झालेल्या परब्रह्मा, तमालश्यामा श्रीकृष्णा! तुझे बोलणे आम्हाला संशयित वाटते॥ ३४॥ शास्त्रावाचून दुसऱ्या कोणत्याहि रीतीने जीवाला आपल्या मोक्षाचा मार्ग स्वतंत्रपणे शोधून काढता येत नाही, असा पक्ष घेऊन काहीं तू बोललास॥ ३५॥ शास्त्राने कर्मानुष्ठानाकरिता सांगितलेला शुद्ध देश मिळाला नाही, तसेच शास्त्रांनी सांगितलेला काळाचा अवकाश प्राप्त झाला नाही, शास्त्रांचा अभ्यास करविणारा गुरु, हा तर, दूरच राहिला॥ ३६॥ आणि शास्त्राभ्यासाला साह्यभूत होणारी सामुग्रीहि त्यावेळी प्राप्त झाली नाही॥ ३७॥ प्राक्तन कर्म अनुकूल नसल्यामुळे त्या कर्मानुसार उत्पन्न झालेली बुद्धि शास्त्रार्थ ग्रहण करण्यास समर्थ नाही, म्हणून शास्त्राचे अध्ययन होऊ शकले नाही॥ ३८॥ फार काय सांगावे! शास्त्राविषयीचा एकहि निश्चय अवगत होत नाही, असे पाहून ज्याने शास्त्राध्ययनाचा विचार सोडून दिला॥ ३९॥

**परी निर्धारूनि शास्त्रें। अर्थानुष्ठानें पवित्रें। नांदताती परत्रें। साचारें जे॥ ४०॥**
**तयांऐसें आम्हीं होआवें। ऐसी चाड बांधोनि जीवें। घेती तयांचे मागावे। आचरावया॥ ४१॥**
**घड्याचियां आखरां। तळीं बाळ लिहे दातारा। कां पुढांसूनि पडिकरा। अक्षमु चाले॥ ४२॥**
**तैसें सर्वशास्त्रनिपुण। तयांचें जें आचरण। तेंचि करिती प्रमाण। आपलिये श्रद्धे॥ ४३॥**
**मग शिवादिकें पूजनें। भूम्यादिकें महादानें। अग्निहोत्रादि यजनें। करिती जे श्रद्धा॥ ४४॥**
**तयां सत्त्वरजतमां-। माजीं कोण पुरुषोत्तमा। गति होय ते आम्हां। सांगिजो जी॥ ४५॥**

**अर्थ**—पण शास्त्राच्या अर्थाचा निश्चय करून त्याप्रमाणे शुद्ध अनुष्ठान करून जे परलोकात सुखाने नांदत आहेत॥ ४०॥ त्यांच्या सारखेच आपण व्हावे, अशी अंत:करणात इच्छा धरून आचरणाकरिता त्यांच्या पावलावर पाऊल ठऊन जे चालतात॥ ४१॥ महाराज! जसे मूल पुस्तकाच्या धड्यातील अक्षराखाली अक्षराप्रमाणे अक्षर काढते किंवा आंधळा जसा डोळसाला पुढे करूनच चालतो॥ ४२॥ त्याप्रमाणे सर्व शास्त्रात निपुण असणाऱ्याचे जे आचरण असते, तेच श्रद्धेने प्रमाण मानून जे तसेच आचरण करतात॥ ४३॥ मग त्या श्रद्धेने शिवविष्ण्वादिकांचे पूजन, भूमिदानासारखे महादान, अग्निहोत्रासारखे यज्ञादि कर्मे जे करतात॥ ४४॥ हे पुरुषोत्तमा! अशा लोकांना सात्विक, राजस, तामस यांपैकी कोणती गति प्राप्त होते ते आम्हाला सांगा॥ ४५॥

**गूढार्थदीपिका**—अर्जुन हा वैदिक धर्माभिमानी असल्यामुळे शास्त्र न पाहता, शास्त्रानुसार वागणाऱ्यांच्या पावलावर पाऊल ठेवून वागणाऱ्यांची श्रद्धा सात्विक, राजस की तामस, असा त्याने प्रश्न केला.

*श्रीभगवानुवाच*

**त्रिविधा भवति श्रद्धा देहिनां सा स्वभावजा। सात्त्विकी राजसी चैव तामसी चेति तां शृणु॥२॥**

**अर्थ**—भगवान म्हणतात, अर्जुना! शास्त्रविहीन लोकांची स्वाभाविक श्रद्धा सात्विक, राजस, तामस अशी तीन प्रकारची असते, सांगतो, ऐक॥ २॥

**गूढार्थदीपिका**—स्वाभाविक श्रद्धा सात्विक, राजस, तामस अशी तीन प्रकारची आहे. जरी बुद्धि ही, सत्वगुणाचे कार्य असल्यामुळे कर्माचे परिणामजन्य कार्य नव्हे, तरी ज्याप्रमाणे व्यसनी माणसाची बुद्धि व्यसनानुसारच वागते, त्याप्रमाणे वेद, श्रुति, पुराण इत्यादि शास्त्रानुसार ज्याच्या बुद्धीचा विवेक झाला नाही, त्याची बुद्धि कर्माने मिळणाऱ्या फलानुसार होत असते; म्हणूनच अशा शास्त्रविवेकहीन मनुष्याची स्वाभाविक बुद्धि तीन प्रकारची असते, असे येथे सांगितले आहे.

प्रथम मदिरा ठेवलेल्या भांड्यात मदिरा ओतून घेतल्यावर गंगाजळ घातले तरी त्या गंगाजळाला मद्याचा दुर्गंध सहजच लागतो, त्याप्रमाणे बुद्धी ही मूळात सात्विक असली तरी तिला शास्त्रीय विवेक झाला नसला तर तिच्यात पूर्वकर्मानुसार सात्विक, राजस, तामस गुणांचा उत्कर्ष दिसू लागतो व ती सत्वगुणाच्या आधिक्याने स्वाभाविक सात्विक, रजोगुणाच्या आधिक्याने स्वाभाविक राजस व तमोगुणाच्या आधिक्याने स्वाभाविक तामस म्हटली जाते, म्हणून शास्त्रविवेकहीन पुरुषांच्या बुद्धीला यथार्थ ज्ञान होणे दुरापास्त असल्यामुळे तशा पुरुषांच्या बुद्धिवादाचा अभिमान व्यर्थ दुराग्रहच ठरतो.

**तंव वैकुंठपिठींचें लिंग। जो निगमपद्माचा पराग। जिये जयाचेनि हें जग। अंगच्छाया॥ ४६॥**
**काळ सावियाचि वाडु। लोकोत्तर प्रौढु। अद्वितीय गूढु। आनंदघन॥ ४७॥**
**इयें श्लाघिजती जेणें बिकें। तें जयाचें आंगीं असिकें। तो श्रीकृष्ण स्वमुखें। बोलत असे॥ ४८॥**

**अर्थ—**तेव्हा वैकुंठाचे जे आराध्य दैवत आहे, वेदरूपी कमलातील जो पराग होय, ज्याच्या सत्तेवर कल्पनेने आंगच्या छायेप्रमाणे भासमात्र जग भासते॥ ४६॥ काल स्वभावत:च अमर्याद, विस्तीर्ण आहे, अलौकिक वयाचा आहे, तो अद्वैतस्वरूप असून गूढ व आनंदघन आहे॥ ४७॥ ज्याच्या आंगी हे सर्व गुण असल्यामुळे अशी ज्यांची वाखाणणी ज्याच्या आंगभूत सामर्थ्याला धरूनच केली जाते, तो भगवान श्रीकृष्ण स्वमुखाने म्हणतो॥ ४८॥

**म्हणे पार्था तुझा अतिसो। घेईं गा आम्ही जाणतसों। शास्त्राभ्यासाचा आडसो। मानितोसि कीं॥ ४९॥**
**नुसधियाची श्रद्धा। झोंबों पाहसी परमपदा। तरी तैसें हें प्रबुद्धा। सोहोपें नोहे॥ ५०॥**

**अर्थ—**अर्जुना! तुझ्या बोलण्याचा भर कशावर आहे, हे आम्ही पूर्ण जाणतो. तुला शास्त्राच्या अभ्यासाचा अडथळा वाटतो ना!॥ ४९॥ शास्त्रशुद्ध विवेकावाचून केवळ श्रद्धेने परम पदाची प्राप्ति तू करून घेऊ पाहतोस, पण हे ज्ञात्या अर्जुना! परम पदाची प्राप्ति तशी सोपी नाही॥ ५०॥

**गूढार्थदीपिका—**परब्रह्म प्राप्ती करिता श्रुति-शास्त्र-पुराण यांनी सांगितलेल्या विचारावरच श्रद्धा ठेवली पाहिजे, असा अर्थ.

**श्रद्धा म्हणितलियासाठीं। पातेजों नये किरीटी। काय द्विजु अंत्यजघृष्टीं। अंत्यजु नोहे॥ ५१॥**
**गंगोदक जरी जालें। तरी मद्यभांडां आलें। तें घेवों नये कांहीं केलें। विचारीं पां॥ ५२॥**
**चंदनु होय शीतळू। परी अग्नीसी पावे मेळू। तैं हातीं धरितां जाळूं। न शके काई॥ ५३॥**
**कां किडाचिये आटतिये पुटीं। पडिलें सोळें किरीटी। घेतलें चोखटासाठीं। नागवीना॥ ५४॥**
**तैसें श्रद्धेचें दळवाडें। आंगें कीर चोखडें। परी प्राणियांच्या पडे। विभागीं जैं॥ ५५॥**
**तैं प्राणिये तंव स्वभावें। अनादिमाया प्रभावें। त्रिगुणाचेचि आघवे। वळिले आहाती॥ ५६॥**
**तेथही दोन गुण खांचती। मग एक धरी उन्नती। तैं तैसियाचि होती वृत्ती। जीवांचिया॥ ५७॥**

**अर्थ—**अर्जुना आमची श्रद्धा आहे, असे म्हणून शास्त्राचा त्याग करू नये. हे अंत्यजाशी ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य जर सदासर्वदा सहवास करतील तर तेहि अंत्यज होणार नाहीत काय?॥ ५१॥ अर्जुना! गंगोदक झाले तरी, प्रथम मदिरा ज्या भांड्यात होती, त्या भांड्यात ओतले असता, ते काही केले तरी सेवनीय होत नाही, याचा विचार कर॥ ५२॥ चंदनाचे लाकूड थंड खरे, पण त्याचा अग्नीशी संबंध झाल्यावर ते हातात धरले असता जाळणार नाही काय?॥ ५३॥ अर्जुना! हीणकट सोने आटवित असता त्या मुशीत शुद्ध सोने पडले व ते सर्व सोने शुद्ध आहे, असे समजून विकत घेतले तर ते आपल्याला नागवित नाही काय?॥ ५४॥ त्याप्रमाणे श्रद्धा मूळात संपूर्ण चांगली असली तरी जेव्हा ती निरनिराळ्या प्राण्यांच्या ठिकाणी विभागली जाते॥ ५५॥ तेव्हा प्राणी हे अनादि मायेच्या प्रभावाने त्रिगुणात्मक झाले असल्यामुळे दोन गुण कमी होऊन, मग एक गुण वाढतो व त्या वाढलेल्या गुणाप्रमाणेच जीवांच्या मनाच्या श्रद्धावृत्ती प्रगट होतात॥ ५६-५७॥

**वृत्तीऐसें मन धरिती। मना ऐसी क्रिया करिती। केलिया ऐसी वरिती। मरोनि देहें॥ ५८॥**

**बीज मोडे झाड होये। झाड मोडे बीजीं सामाये। ऐसेनि कल्पकोडी जाये। परी जाति न नशे॥ ५९॥**
**तियापरी यियें अपारें। होतां जातां जन्मांतरें। परी त्रिगुणत्व न व्यभिचरे। प्राणियांचें॥ ६०॥**
**म्हणूनि प्राणियांच्या पैकीं। पडिली श्रद्धा अवलोकीं। ते होय गुणांसारिखी। तिहीं ययां॥ ६१॥**
**विपायें वाढे सत्त्व शुद्ध। तेव्हां ज्ञानासी करी साध्य। परी एका दोघे वोखद। येर आहाती॥ ६२॥**

**अर्थ**—वृत्ति स्फुरते तेव्हा ते प्राण्याचे मनच वृत्तिरूप होते. मन ज्या प्रकारचे वृत्तिरूप होते त्याप्रमाणे प्राण्याकडून क्रिया घडते आणि मेल्यानंतर त्या कर्माप्रमाणे त्याला देह प्राप्त होतो॥ ५८॥ बीज नाहीसे होऊन झाड उत्पन्न होते व झाड नाहीसे होऊन ते बीजदशेत येते. अशा रीतीने कोटीकल्प होत राहिले तरी जाति नाहीशी होत नाही॥ ५९॥ त्याप्रमाणे प्राण्यांची अनंत जन्मांतरे होत गेली तरी त्याचे त्रिगुणात्मकत्व नाहीसे होत नाही॥ ६०॥ म्हणून प्राण्यांच्या वाटेला आलेली श्रद्धा या तीन गुणांसारखी होते, पाहा!॥ ६१॥ कदाचित् शुद्ध सत्व वाढले तर ते ज्ञानाला साध्य करून देते; पण बाकीचे दोघे रज, तम हे गुण या एकालाच औषध आहे-म्हणजे ते वाढू देत नाहीत॥ ६२॥

**गूढार्थदीपिका—"अन्योन्याभिभवाश्रयजननमिथुनवृत्तयश्चगुणाः"** (सां० का० १२) सत्व, रज, तम हे तीन गुण परस्परांना दाबणारे व परस्परातून उत्पन्न होणारे आहेत, असे सांख्यकारिकेत सांगितले आहे.

**सत्त्वाचेनि आंगलगें। ते श्रद्धा मोक्षफळा रिगे। तंव रज तम उगे। कां पां राहाती॥ ६३॥**
**मोडोनि सत्त्वाची त्राये। रजोगुण आकाशें जाये। तेव्हां तेचि श्रद्धा होये। कर्मकेरसुणी॥ ६४॥**
**मग तमाची उठी आगी। तेव्हां तेचि श्रद्धा भंगी। हों लागे भोगालागीं। भलतेया॥ ६५॥**

**अर्थ**—सत्वाच्या आश्रयाने उत्पन्न झालेली श्रद्धा जर आत्मज्ञानद्वारा मोक्षफळाला झोंबते-म्हणजे मोक्ष प्राप्त करून देते-तर रज, तम गुण हे का स्वस्थ बसतील॥ ६३॥ सत्वाच्या वाढीचे सामर्थ्य नाहीसे करून जेव्हा रजोगुण आकाशात जातो-म्हणजे अति वाढतो-तेव्हा अखंड कर्म करण्याविषयीच श्रद्धा जोरावते॥ ६४॥ तसेच जेव्हा तमोगुणाच्या आगीचा उबाळा उठतो तेव्हा वाटेल त्या रीतीने भोग भोगावा, अशा प्रकारची श्रद्धा होते॥ ६५॥

**सत्त्वानुरूपा सर्वस्य श्रद्धा भवति भारत। श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः॥ ३॥**

**अर्थ**—हे अर्जुना! सर्व मनुष्यांच्या ठिकाणी पूर्वकर्माप्रमाणे त्याच्या विशिष्ट संस्कारयुक्त अंतःकरणानुसार श्रद्धा असते. हा पुरुष श्रद्धामयच आहे. जो पुरुष ज्या श्रद्धेने युक्त असतो तो तशा श्रद्धेचाच समजला जातो॥ ३॥

**एवं सत्त्वरजतमा-। वेगळी श्रद्धा सुवर्मा। नाहीं गा जीवग्रामा-। माजीं यया॥ ६६॥**
**म्हणोनि श्रद्धा स्वाभाविक। असे पैं त्रिगुणात्मक। रजतमसात्त्विक। भेदीं इहीं॥ ६७॥**
**जैसें जीवनचि उदक। परी विषीं होय मारक। कां मिरयामाजीं तीख। ऊंसीं गोड॥ ६८॥**
**तैसा बहुवसें तमें। जो सदाचि होय निमे। तेथ श्रद्धा परिणमे। तेंचि होऊनि॥ ६९॥**
**मग काजळा आणि मसी। न दिसे विवंचना जैसी। तेवीं श्रद्धा तामसी। सिनी नाहीं॥ ७०॥**
**तैसीच राजसीं जीवीं। रजोमय जाणावी। सात्त्विकीं आघवी। सत्त्वाचीच॥ ७१॥**
**ऐसेनि हा सकळु। जगडंबरु निखिळु। श्रद्धेचाचि केवळु। वोतला असे॥ ७२॥**

**अर्थ**—हे अर्जुना! या जीवलोकामध्ये सात्विक, राजस, तामस या त्रिगुणात्मक श्रद्धेवेगळी श्रद्धा नाही॥ ६६॥ म्हणून सर्व पुरुषांचे ठिकाणी जी स्वाभाविक श्रद्धा असते ती सात्विक, राजस, तामस अशा भेदाने त्रिगुणात्मकच असते॥ ६७॥ ज्याप्रमाणे पाणी हे प्राणिमात्राला जगविणारे आहे, हे खरे; पण ते विषामध्ये त्याच्या मारकपणाला, मिऱ्यामध्ये त्याच्या तिखटपणाला व उसामध्ये त्याच्या गोडपणाला पोषक होते॥ ६८॥ त्याप्रमाणे तमोगुणाच्या वृद्धीत जो सदासर्वदा "जायस्व म्रियस्व" या श्रुतीत सांगितल्याप्रमाणे जन्मतो व मरतो त्याची श्रद्धा तमोरूपानेच परिणाम पावते॥ ६९॥ मग ज्याप्रमाणे काजळ व काजळाची शाई यांच्या काळेपणात भेद नसतो, त्याप्रमाणे तामसी श्रद्धा व तमोगुण हे निराळे नसतात॥ ७०॥ त्याप्रमाणेच राजस श्रद्धा रजोगुणरूपच असून सात्विक श्रद्धा संपूर्ण सत्वगुणरूपच

असते॥ ७१ ॥ याप्रमाणे हा संपूर्ण ब्रह्मांडगोल केवळ श्रद्धेचाच बनला आहे॥ ७२ ॥

**गूढार्थदीपिका—**"**कामः, संकल्पः, विचिकित्सा, श्रद्धा, अश्रद्धा, धृतिः, अधृतिः,ऱ्हीः, धीः, भीरित्येत् सर्व मन एव**" (बृ० उ० १-५-३) काम म्हणजे स्त्रीसंबंधीची अभिलाषादि, संकल्प-म्हणजे प्राप्त झालेल्या विषयाची शुक्लनीलादि भेदाने विशेष कल्पना, विचिकित्सा-म्हणजे संशयज्ञान, श्रद्धा-म्हणजे ज्याचे फल अदृष्ट आहे त्या कर्म व देवता यांच्या ठिकाणी आस्तिकतेचा भाव ठेवणे; अश्रद्धा म्हणजे कर्म व देवतादिकांचे ठिकाणी आस्तिकतेचा भाव नसणे, धृति म्हणजे धारण; अर्थात् देहादिक शिथिल झाले असता त्यांना सांभाळून ठेवणे, अधृति-म्हणजे धृतीच्या विपरीत होणे, ऱ्ही म्हणजे लज्जा, धी-म्हणजे बुद्धि, व भी-म्हणजे भय, हे सर्व मनच आहे-म्हणजे हे सर्व मनाच्याच वृत्ती किंवा व्यापार आहेत. असे हे स्वाभाविक अनेक व्यापारयुक्त मन, लिंगशरीर अंतर्भूत असल्यामुळे, प्रत्येक प्राण्याच्या ठिकाणी असतेच; मग तो सज्ञानी वा अज्ञानी कोणीहि असो; म्हणून मनुष्याचा कोणताहि व्यापार, कर्म, ज्ञान इत्यादि स्वतंत्रपणे बुद्धिमूलकच असण्यापेक्षा स्वाभाविक श्रद्धामूलकच असणे साहजिकच आहे; पण बुद्धिवादाचा पुरस्कार करणाऱ्यांना हे कळत नाही व व्यर्थच ते श्रद्धेची निंदा करतात.

येथे रजोगुणी, तमोगुणी शास्त्रविवेकहीन श्रद्धेची निंदा केली असली तरी स्वाभाविक सात्विक श्रद्धा, आचरणानुसार अचूक ध्येयप्राप्ति करून देणारी असल्यामुळे तिची निंदा केली नाही, हे लक्षात ठेवले पाहिजे.

**परी गुणत्रयवशें। त्रिविधपणाचें लासें। श्रद्धे जें उठिलें असे। तें वोळख तूं॥ ७३ ॥**
**तरी जाणिजे झाड फुलें। कां मानस जाणिजे बोलें। भोगें जाणिजे केलें। पूर्वजन्मींचें॥ ७४ ॥**
**तैसीं जिहीं जिहीं चिन्हीं। श्रद्धेचीं रूपें तीन्ही। देखिजती ते वानी। अवधारीं पां॥ ७५ ॥**

**अर्थ—**पण सत्व, रज, तम या तीन गुणांच्या योगाने श्रद्धेच्या ठिकाणी जे त्रिविधपणाचे डाग उठले आहेत, त्यांची आता ओळख करून घे॥ ७३ ॥ ज्याप्रमाणे फुलावरून झाड ओळखावे किंवा बोलण्यावरून मन ओळखावे सुखदुःखभोगांवरून पूर्वजन्मींचे पुण्य-पाप ओळखावे॥ ७४॥ त्याप्रमाणे ज्या ज्या लक्षणांवरून श्रद्धेची तीन रूपे ओळखता येतील, ते प्रकार सांगतो, ऐक॥ ७५ ॥

**यजन्ते सात्त्विका देवान्यक्षरक्षांसि राजसाः। प्रेतान्भूतगणांश्चान्ये यजन्ते तामसा जनाः॥ ४॥**

**अर्थ—**सात्विक श्रद्धेचे पुरुष श्रुति-स्मृति-पुराण यात सांगितलेल्या वैदिक देवतांचे पूजन करतात. राजस श्रद्धेचे पुरुष यक्ष व राक्षस यांचे पूजन करतात व दुसरे तामस श्रद्धेचे पुरुष भूतप्रेतादिकांचे पूजन करतात॥ ४॥

**तरी सात्त्विक श्रद्धा। जयांचा होय बांधा। तयां बहुतकरूनि मेधा। स्वर्गीं आथी॥ ७६ ॥**
**ते विद्याजात पढती। यज्ञक्रिये निवडती। किंबहुना पडती। देवलोकीं॥ ७७ ॥**
**आणि श्रद्धा राजसा। घडले जे वीरेशा। ते भजती राक्षसां। खेचरां हन॥ ७८ ॥**
**श्रद्धा जे कां तामसी। ते मी सांगेन तुजपाशीं। जे कां केवळ पापराशी। अतिकर्कशी निर्दयत्वें॥ ७९ ॥**
**जीववधें साधूनि बळी। भूतप्रेतकुळें मैळीं। स्मशानीं संध्याकाळीं। पूजिती ते॥ ८० ॥**
**ते तमोगुणाचें सार। काढूनि निर्मिले नर। जाण तामसियेचें घर। श्रद्धेचें तें॥ ८१ ॥**

**अर्थ—**ज्यांचा पिंड स्वाभाविक सात्विक श्रद्धेचा बनला आहे, त्या लोकांना बहुतेक स्वर्गप्राप्तीची आवड असते॥ ७६ ॥ चौदा विद्यांचे अध्ययन व यज्ञादि कर्मे करण्याचे ठिकाणी त्यांची श्रद्धा असते. फार काय सांगावे! ते देवलोकात जातात॥ ७७ ॥ आणि ज्याचे अंतःकरणात स्वाभाविक राजस श्रद्धा आहे, ते, अर्जुना! यक्षराक्षसादिकांचेच पूजन करतात॥ ७८ ॥ आणि स्वाभाविक तामसी श्रद्धा, जी निर्दयपणामुळे अति कठोर म्हणून केवळ पापराशीच होय, ती आता सांगतो, ऐक॥ ७९ ॥ जीवांच्या वधाने बळी सिद्ध करून त्याच्या योगाने संध्यासमयी अमंगल अशा स्मशानामध्ये भूतप्रेतादि कुळांचे ते पूजन करतात॥ ८० ॥ असे स्वाभाविक तामस श्रद्धेचे पुरुष म्हणजे तमोगुणाचा सार काढून त्याचा केलेला पिंड होय. असे पुरुष तामस श्रद्धेचे घरच होय, असे जाण॥ ८१ ॥

**ऐसी इहीं तिहीं लिंगीं। त्रिविध श्रद्धा जगीं। पैं हें ययालागीं। सांगत असें॥ ८२ ॥**

**जे हे सात्त्विक श्रद्धा। जतन करावी प्रबुद्धा। येरी दोनी विरुद्धा। सांडाविया॥ ८३॥**
**हे सात्त्विक मति जया। निर्वाहती होय धनंजया। बागुल नोहे तया। कैवल्य तें॥ ८४॥**
**तो न पढो कां ब्रह्मसूत्र। न लोढो सर्व शास्त्र। सिद्धांत न होत स्वतंत्र। तयाच्या हातीं॥ ८५॥**
**परी श्रुतिस्मृतींचे अर्थ। जे आपण होऊनि मूर्त। अनुष्ठानें जगा देत। वडील जे हे॥ ८६॥**
**तयांचीं आचरतीं पाउलें। पाऊनि सात्त्विकी श्रद्धा चाले। तो तेंचि फळ ठेविलें। ऐसें लाहे॥ ८७॥**

**अर्थ**—याप्रमाणे तीन लक्षणांनी त्रिगुणात्मक श्रद्धेचे स्वरूप येवढ्याकरिताच सांगितले आहे की॥ ८२॥ अर्जुना! या तीन श्रद्धेपैकी रजोगुणी व तमोगुणी या दोन श्रद्धा विरुद्ध असल्यामुळे (अध:पतनाला कारणीभूत असल्यामुळे) नि:शेष टाकून देऊन सात्विक श्रद्धा मात्र जतन करावी॥ ८३॥ अर्जुना! ही सात्विक बुद्धि ज्याचे ठिकाणी टिकते त्याला मोक्षाची भीति वाटत नाही॥ ८४॥ स्वाभाविक सात्विक पुरुष ब्रह्मसूत्राचे किंवा कोण्याहि शास्त्राचे अध्ययन न करो अथवा त्याला शास्त्रातील सिद्धान्त अवगत न होवोत॥ ८५॥ पण जे हे आपले वाडवडिल श्रुतिस्मृतीत सांगितल्याप्रमाणे तंतोतंत आचरण करून श्रुतिस्मृतीतील प्रत्यक्ष अर्थच होऊन बसले॥ ८६॥ त्यांच्या आचाररूप पावलावर पाऊल ठेवूनच स्वाभाविक सात्विक श्रद्धेचा पुरुष चालत असतो; म्हणून त्यालाहि त्यांच्याचप्रमाणे फळ प्राप्त होते॥ ८७॥

**पैं एक दीप लावी सायासें। आणिक एक तेथें उगला बैसे। तरी तो काय प्रकाशें। वंचिजे गा॥ ८८॥**
**कां येकें मोल अपार। वेंचोनि केलें धवळार। तो सुरवाड वस्तीकर। न भोगी काई॥ ८९॥**
**हें असो जो तळें करी। ते तयाचीच तृषा हरी। कीं सुआरासीचि अन्न घरीं। येरां नोहे॥ ९०॥**
**बहुत काय बोलों पैं गा। येका गौतमासीचि गंगा। येरां समस्तां काय जगा। वोहोळ जाली॥ ९१॥**
**म्हणोनि आपुलियापरी। शास्त्र अनुष्ठिती कुसरी। जाणे तयातें श्रद्धाळु जो वरी। तो मूर्खुही तरे॥ ९२॥**

**अर्थ**—एक मनुष्य प्रयत्नाने दिवा लावित आहे म्हणून त्याला प्रकाश मिळाला आणि दुसरा मनुष्य तेथे उगाच बसला आहे म्हणून त्याला प्रकाश मिळत नाही काय?॥ ८८॥ किंवा एखाद्या श्रीमंत पुरुषाने पुष्कळ पैसे खर्च करून जर मोठा वाडा बांधला आणि एखादा प्रवासी येऊन तेथे उतरला तर तो वाड्यातील सुखसोयी भोगित नाही काय?॥ ८९॥ हे असो जो तळे करतो (खणतो) त्याचीच ते तळे तहान भागविते काय? किंवा घरी शिजविलेले अन्न आचाऱ्याचीच भूक शमविते, दुसऱ्याची शमवित नाही काय?॥ ९०॥ अर्जुना! फार काय सांगावे! एका गौतमाला गंगा झाली आणि बाकीच्या इतर जगाला ती ओढा झाली काय?॥ ९१॥ म्हणून आपल्या सामर्थ्यानुसार जो शास्त्राप्रमाणे आचरण करण्याचे शाहाणपण बाळगतो, त्याच्या आचरणानुसार शास्त्र न पाहता केवळ श्रद्धेने आचरण करू पाहणारा मूर्खहि तरतो.॥ ९२॥

**गूढार्थदीपिका**—सात्विक अंधश्रद्धाळू व डोळस श्रद्धाळु या दोघांचेहि एक वैदिकच आचरण असल्यामुळे दोघेहि सारखेच तरतात.

**अशास्त्रविहितं घोरं तप्यन्ते ये तपो जना:। दम्भाहङ्कारसंयुक्ता: कामरागबलान्विता:॥ ५॥**
**कर्षयन्त: शरीरस्थं भूतग्राममचेतस:। मां चैवान्त:शरीरस्थं तान्विद्ध्यासुरनिश्चयान्॥ ६॥**

**अर्थ**—जे मूढ लोक विषयाभिलाष व विषयासक्ति या विकाराच्या बळाला बळी पडल्यामुळे दंभ व अहंकार यांनी युक्त होऊन श्रुति, स्मृति, पुराण यातून न सांगितलेली व शरीरातील इंद्रियसमुदायांचे व त्यांच्या साक्षिभूत अशा माझे कर्षण करणारी व दुसऱ्याला पीडा देणारी घोर तपे करतात, अर्जुना! ते लोक आसुर होत, असे जाण॥ ५-६॥

**ना शास्त्राचेनि कीर नांवें। खाकरोंही नेणती जीवें। परी शास्त्रज्ञांही शिवे। टेंकों नेदिती॥ ९३॥**
**वडिलांचिया क्रिया। देखोनि वाती वांकुलिया। पंडितां डाकुलिया। वाजविती॥ ९४॥**

**अर्थ**—जे खरोखर शास्त्राचे नावाने खाकरू इच्छित नाहीत-म्हणजे त्यांना शास्त्रे अगदी तुच्छ वाटतात. शास्त्र

जाणणाऱ्याला तर आपल्या घराच्या सीमेलाहि शिवू देत नाहीत॥ ९३ ॥ वाडवडिलांच्या शास्त्रानुसार होणाऱ्या क्रिया पाहून त्यांना वाकुल्या दाखवितात व पंडित लोक पाहून त्यांच्यापुढे चुटक्या वाजवून त्यांचा उपहास करतात॥ ९४॥

**आपुलेनीचि आटोपें। धनित्वाचेनि दर्पें। साचचि पाखंडाचीं तपें। आदरिती॥ ९५॥**
**आपुलिया पुढिलांचिया। आंगीं घालूनि कातिया। रक्तमांसा प्रणीतया। भरभरों॥ ९६॥**
**रिचविती जळतकुंडीं। लाविती चेड्याच्या तोंडीं। नवसियां देती उंडी। बाळकांची॥ ९७॥**
**आग्रहाचिया उजरिया। क्षुद्र देवतां वरिया। अन्नत्यागें सातरिया। ठाकती एक॥ ९८॥**

**अर्थ**—आपल्या शहाणपणाच्या अभिमानाने व श्रीमंतीच्या गर्वाने खरोखर अवैदिक रुद्रयामलादि तंत्राच्या योग व मोक्षवर्जित भागात सांगितलेल्या तपांचे आचरण करतात. आपल्या व दुसऱ्याच्या आंगात कोयतारूपी शस्त्रे खुपसून व रक्तमासांनी यज्ञपात्रे भरून पेटलेल्या कुंडात आहुत्या देतात व चेटुकाच्या तोंडी लावतात व नवस करून बालकांचे बळी देतात॥ ९५-९७॥ कोणी सात सात दिवस अन्नाचा त्याग करून (कुबेर-यक्षादि) क्षुद्रदेवतांच्या श्रेष्ठत्वाचा उघड आग्रह धरतात व त्यांची उपासना करतात॥ ९८॥

**अगा आत्मपरपीडा। बीज तमक्षेत्रीं सुहाडा। पेरिती मग पुढां। तेंचि पिके॥ ९९ ॥**
**बाहू नाहीं आपलिया। आणि नावेतेंहि धनंजया। न धरी होय तया। समुद्रीं जैसें॥ १००॥**
**कां वैद्यातें करी सळा। रसु सांडी पायखोळां। तो रोगिया जेवीं विव्हळा-। सवता होय॥ १०१॥**
**नाना पडिकराचेनि सळें। काढी आपलेचि डोळे। तें वानवसां आंधळें। जैसें ठाके॥ १०२॥**
**तैसें तया असुरां होये। जे निंदूनि शास्त्रांची सोये। सैंघ धांवताती मोहें। आडवीं जे कां॥ १०३॥**
**काम करवी तें करिती। क्रोध मारवी तें मारिती। किंबहुना मातें पुरिती। दुःखाचा गुंडां॥ १०४॥**
**आपुलां परावां देहीं। दुःख देती जें जें कांहीं। मज आत्मया तेतुलाही। होय सीण॥ १०५॥**

**अर्थ**—हे सूज्ञ अर्जुना! जे कोणी तामस श्रद्धारूपी अंतःकरणक्षेत्रात केवळ आपल्याला व परक्याला पीडा देण्याचेच बीज पेरतात, तेथे तेच पीक येते॥ ९९॥ अर्जुना! बाहू नाही व नावेचाहि आश्रय घेत नाही, अशा पुरुषाची समुद्रामध्ये जशी स्थिति होते॥ १००॥ किंवा ज्याप्रमाणे सवत आपल्या दुःखात भर टाकणारी होते. त्याप्रमाणे, जो पुरुष वैद्याचा द्वेष करतो व औषध पायदळी फेकून देतो तो आपणच आपल्या दुःखात भर टाकणारा होतो॥ १०१॥ किंवा सुंदर डोळस माणसाच्या द्वेषाने त्याला पाहू नये म्हणून जो आपले डोळे फोडून घेतो, तो आंधळा होऊन जसा माजघरात पडून राहतो॥ १०२॥ त्याप्रमाणे, श्रुति, स्मृति, पुराणे इत्यादि शास्त्रांनी सांगितलेल्या मार्गांची निंदा करून अविवेकाने वाटेल तशा स्वैर वर्तनाच्या अरण्यात जे धावतात, त्या आसुरी लोकांची अशी स्थिति होते॥ १०३॥ कामवासना जे करवील ते करतात, क्रोध मारवील त्याला मारतात. फार काय सांगावे! मलाहि दुःखाच्या दगडाखाली पुरतात॥ १०४॥ आपल्या अथवा दुसऱ्याच्या देहाच्या ठिकाणी जे जे ते दुःख देतात, तो तो सर्व दुःखरूप शीण मज आत्मस्वरूपालाच होतो॥ १०५॥

**गूढार्थदीपिका—मज आत्मया तेतुलाही। होय सीण-**

(अध्याय सोळावा ओवी ४०० वरील गूढार्थदीपिका पाहा.)

**पैं वाचेनिही पालवें। पापियां तया नातळावें। परी पडिलें सांगावें। त्यजावया॥ १०६॥**
**प्रेत बाहिरें घालिजे। कां अंत्यज संभाषणीं त्यजिजे। हें असो हातें क्षाळिजे। कश्मलातें॥ १०७॥**
**तेथ शुद्धीचिया आशा। तो लेप न मनवे जैसा। तयांतें सांडावया तैसा। अनुवादु हा॥ १०८॥**
**तरी अर्जुना तूं तयांतें। देखसी तैं स्मर हो मातें। जे आन प्रायश्चित्त येथें। मानेल ना॥ १०९॥**
**म्हणौनि श्रद्धा जे सात्त्विकी। पुढती तेचि पैं येकी। जतन करावी निकी। सर्वापरी॥ ११०॥**

**अर्थ**—वाचेच्या पदराने त्या पाप्यांना स्पर्श देखील करू नये म्हणजे त्यांचे नाव देखील उच्चारू नये, पण रजोगुणी-तमोगुणी श्रद्धेचा त्याग करावा, हे सांगण्याकरीता त्याचे वर्णन करणे भाग पडले॥ १०६॥ ज्याप्रमाणे प्रेत

बाहेर काढण्याकरीताच त्याला स्पर्श करावा लागतो किंवा अंत्यजाशी न बोलण्याकरिताच त्याला "चालता हो" असे बोलावे लागते. हे असो मल नाहीसा करण्याकरिताच तो हातांनी धुवून काढावा लागतो॥ १०७॥ या सर्व ठिकाणी शुद्धि करताच जसे स्पर्श करणे वाईट मानले जात नाही, त्याप्रमाणेच रजोगुणी-तमोगुणी श्रद्धेचा त्याग करावा, हे सांगण्याकरिताच त्याचा अनुवाद केला आहे॥ १०८॥ तरी अर्जुना! रजोगुणी-तमोगुणी श्रद्धेचा पुरुष दृष्टीस पडताच माझे स्मरण कर. कारण त्यांच्या दर्शनाने होणाऱ्या पापाच्या निवृत्तिकरिता या वाचून दुसरे प्रायश्चित्त उपयोगी पडणार नाही॥ १०९॥ म्हणून पुन: सांगणे इतकेच की सर्व रीतीने एक सात्विक श्रद्धाच जतन करावी॥ ११०॥

**तरी धरावा तैसा संगु। जेणें पोखे सात्त्विक लागु। सत्त्ववृद्धीचा भागु। आहारु घेपे॥ १११॥**
**एऱ्हवीं तरी पाहीं। स्वभाववृद्धीच्या ठाई। आहारावांचूनि नाहीं। बळी हेतु॥ ११२॥**
**प्रत्यक्ष पाहें पां वीरा। जो सावध घे मदिरा। तो होऊनि ठाके माजिरा। तियेचि क्षणीं॥ ११३॥**
**कां जो साविया अन्नरसु सेवी। तो व्यापिजे वातश्लेष्मस्वभावीं। काय ज्वरु जालिया निववी। पयादिक॥ ११४॥**
**नातरी अमृत जयापरी। घेतलिया मरण वारी। कां आपुलियांऐसें करी। जैसें विष॥ ११५॥**
**तेवीं जैसा घेपे आहारु। धातु तैसाचि होय आकारु। आणि धातु ऐसा अंतरु। भावो पोखे॥ ११६॥**

**अर्थ**—ज्याच्या योगाने चित्तावर सत्वगुणाची पकड दृढ होईल, अशी संगति धरावी व ज्यात सत्वगुण अधिक आहे, असा आहार घ्यावा॥ १११॥ अर्जुना! साधारणत: पाहता स्वाभाविक गुणांच्या वृद्धीला आहारावाचून दुसरे बलवान कारण नाही॥ ११२॥ अर्जुना! प्रत्यक्षच पाहा बरे! सावध असलेला मनुष्य मद्य प्याल्याबरोबर त्याच क्षणी उन्मत्त होऊन जातो॥ ११३॥ किंवा मनुष्य जो अन्नरस सेवन करतो तो वात व कफ यांच्या स्वभावाने व्यापिला जातो. ज्वर प्राप्त झाला असता दुग्धादि पदार्थ त्याला शांत करतात काय?॥ ११४॥ किंवा अमृत प्राशन केले असता ते मृत्यु निवारण करते अथवा विष ज्या पदार्थात मिसळावे त्या पदार्थाला आपल्यासारखे विषारी, ज्याप्रमाणे करते॥ ११५॥ त्याप्रमाणे जसा आहार घ्यावा तसे रसरक्तादि धातु व शरीर बनते आणि धातुप्रमाणे अंत:करणातील भाव उत्पन्न होतात॥ ११६॥

**गूढार्थदीपिका**—**''अन्नं पुंसाशितं त्रेधा जायते जठराग्निना। मल: स्थविष्ठो भाग: स्यान्मध्यमो मांसतां व्रजेत्'॥ मन: कनिष्ठो भाग: स्यात् तस्मादन्नमयं मन:॥' ( शिवगीता अ० ९ )**

मनुष्य जे अन्न खातो त्याचे जठराग्नीच्या योगाने स्थूल, मध्यम व सूक्ष्म असे तीन भाग होतात. स्थूल भाग मळरूप होतो. मध्यम भाग रसरक्तादि धातुरूप होतो व सूक्ष्मभाग मनरूप होतो; म्हणून खाल्लेल्या सात्त्विक, राजस, तामस अन्नाप्रमाणे मन सात्विक, राजस, तामस होते, हे सिद्ध आहे. वैद्यशास्त्राचे असेच म्हणणे आहे आणि येथे माउलीने वैद्यशास्त्राला अनुसरूनच ही ओवी दिली आहे.

**जैसें भांडियाचेनि तापें। आंतुलें उदकही तापे। तैसी धातुवशें आटोपे। चित्तवृत्ती॥ ११७॥**
**म्हणोनि सात्त्विकु रसु सेविजे। तैं सत्त्वाची वाढी पाविजे। राजसा तामसा होइजे। येरीं रसीं॥ ११८॥**
**तरी सात्त्विक कोण आहारु। राजसा तामसा कायी आकारु। हें सांगों करीं आदरु। आकर्णनीं॥ ११९॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे भांडे तापले असता त्या भांड्यातील पाणीहि ऊन होते, त्याप्रमाणे शरीरातील धातू जसे सात्विक, राजस, तामस, असतील, त्याप्रमाणे चित्ताच्या वृत्तीहि बनतात॥ ११७॥ म्हणूनच सात्विक रसाचे सेवन केले असता सत्त्वाची वृद्धि होते आणि दुसरे राजस-तामस रस सेवन केले असता राजस-तामस गुणांचीच वृद्धि होते॥ ११८॥ याकरिताच सात्विक आहार कोणता व राजस-तामस आहाराचे स्वरूप काय, हे आता सांगतो, लक्षपूर्वक ऐक॥ ११९॥

**आहारस्त्वपि सर्वस्य त्रिविधो भवति प्रिय:। यज्ञस्तपस्तथा दानं तेषां भेदमिमं शृणु॥ ७॥**

**अर्थ**—सर्व मनुष्यांना प्रिय असलेला आहार तीन प्रकाराचा आहे. त्याचप्रमाणे यज्ञ, तप, दान हेहि त्रिविध आहेत. त्यांचे भेद सांगतो, ऐक॥ ७॥

**आणि एकसरें आहारा। कैसेनि तिनी मोहरा। जालिया तेही वीरा। रोकडें दाऊं॥ १२०॥**
**तरी जेवणाराचिया रुची। निष्पत्ति कीं बोनियाची। आणि जेविता तंव गुणांची। दासी येथ॥ १२१॥**
**जे जीव कर्ता भोक्ता। तो गुणास्तव स्वभावता। पावोनियां त्रिविधता। चेष्टे त्रिधा॥ १२२॥**
**म्हणौनि त्रिविधु आहारु। यज्ञुही त्रिप्रकारु। तप दान हन व्यापारु। त्रिविधचि ते॥ १२३॥**
**पैं आहारलक्षण पहिलें। सांगों जें म्हणितलें। तें आईक गा भलें। रूप करूं॥ १२४॥**

**अर्थ**—आणि सामान्यपणे एकच आहार असताना त्याचे तीन भेद कसे झाले, हे आता अर्जुना! स्पष्ट सांगतो॥ १२०॥ तरी ज्याप्रमाणे जेवणाऱ्याच्या रुचीप्रमाणे अन्न तयार केले जाते आणि जेवणारा हा गुणाच्या स्वाधीन असतो॥ १२१॥ जो जीव कर्ता भोक्ता आहे, तो सत्वादि गुणांच्या स्वाधीन झाल्यामुळे तीन प्रकारचा होऊन गुणानुसार तीन प्रकारचे व्यापार करतो॥ १२२॥ म्हणून त्याच्याकडून गुणानुसार धेतला जाणारा आहार व केले जाणारे यज्ञ, तप, दान हे सर्व तीन प्रकारचे होतात॥ १२३॥ प्रथम आहाराचे लक्षण सांगतो, असे जे म्हटले ते सांगतो नीट लक्ष देऊन ऐक॥ १२४॥

**आयुःसत्त्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनाः । रस्याः स्निग्धाः स्थिरा हृद्या आहाराः सात्त्विकप्रियाः॥ ८॥**

**अर्थ**—आयुष्य, चित्तातील स्थैर्यादि सात्विक गुण, शक्ति, आरोग्य, सुख व अभिरुचि वाढविणारे, स्वतः रसभरित, सुरस, स्निग्ध, शरीरात बराच वेळ टिकणारे व इंद्रियांना समाधान देणारे, असे सात्विक पुरुषांना प्रिय असणारे सात्विक आहार असतात॥ ८॥

**तरी सत्त्वगुणाकडे। जैं दैवें भोक्ता पडे। तैं मधुरीं रसीं वाढे। मेचु तया॥ १२५॥**
**आंगेंचि द्रव्यें सुरसें। जे आंगेंचि पदार्थ गोडसे। आंगेंचि स्नेहें बहुवसें। सुपक्कें जियें॥ १२६॥**
**आकारें नव्हती डगळें। स्पर्शें अति मवाळें। जिभेलागीं स्नेहाळें। स्वादें जियें॥ १२७॥**
**रसें गाढीं वरी ढिलीं। द्रवभावें आथिलीं। ठायेंठावो सांडिलीं। अग्नितापें॥ १२८॥**
**आंगें सानें परिणामें थोरु। जैसें गुरुमुखींचें अक्षरु। तैशी अल्पीं जिहीं अपारु। तृप्ति राहे॥ १२९॥**
**आणि मुखीं जैसीं गोडें। तैसीचि हितें आंतुलेहीकडे। तिये अन्नीं प्रीति वाढे। सात्त्विकांसी॥ १३०॥**

**अर्थ**—जेव्हा भोक्त्या मनुष्याची प्रारब्धानुसार सत्वगुणाकडे प्रवृत्ति होते, तेव्हा त्याला मधुर रसच आवडतो॥ १२५॥ जे पदार्थ स्वतः मूळातच सुरस, स्वभावतः गोड, आंगचेच चांगले पक्व व स्नेहयुक्त झालेले आहेत॥ १२६॥ आकाराने अति मोठे नाहीत, स्पर्शाने अति मऊ, स्वादाने जिभेला स्नेहयुक्त लागतील॥ १२७॥ जे पदार्थ रसाने परिपूर्ण भरलेले असूनहि वरून मऊ आहेत, जे ओलेपणाने संपन्न असून ठिकाणच्या ठिकाणी अग्नीची उष्णता न लागता परिपक्व होतात॥ १२८॥ ज्याप्रमाणे गुरुमुखातून निघणारे अक्षर स्वरूपतः थोडे असले तरी त्याचा परिणाम फार मोठा होतो, त्याप्रमाणे जे पदार्थ थोडे भक्षिले तरी तृप्ति मात्र फार वेळ राहते॥ १२९॥ त्याचप्रमाणे जे तोंडात घातले असताच गोड लागतात, जे पोटात गेल्यावरही सुखकारकच होतात, असेच अन्न सात्विक पुरुषाला अधिक आवडते॥ १३०॥

**एवं गुणलक्षण। सात्त्विक भोज्य जाण। आयुष्याचें त्राण। नीच नवें हें॥ १३१॥**
**येणें सात्त्विक रसें। जंव देहीं मेहो वरिषे। तंव आयुष्यनदी उससे। दिहाचि दिहा॥ १३२॥**
**सत्त्वाचिये कीर पाळती। कारण हाचि सुमती। दिवसाचिये उन्नती। भानु जैसा॥ १३३॥**
**आणि शरीरा हन मानसा। बळाचा पैं कुवासा। हा आहारु तरी दशा। कैंची रोगां॥ १३४॥**
**हा सात्त्विकु होय भोग्यु। तैंचि भोगावया आरोग्यु। शरीरासी भाग्यु। उदयलें जाणों॥ १३५॥**
**आणि सुखाचें घेणे देणें। निकें उवाया ये येणें। हें असो वाढे साजणें। आनंदेसीं॥ १३६॥**
**ऐसा सात्त्विक आहारु। परिणमला थोरु। करी हा उपकारु। सबाह्यासी॥ १३७॥**
**आतां राजसासि प्रीती। जिहीं रसीं आथी। करूं तयाही व्यक्ती। प्रसंगें गा॥ १३८॥**

**अर्थ**--अशा गुणलक्षणाचे अन्नाला सात्विक आहार म्हणतात, असे जाण आणि हे अन्न म्हणजे आयुष्याचे नित्यनवे रक्षणच होय, असे समज॥ १३१ ॥ जेव्हा अशा या सात्विक आहाराचा रसरूपी मेघ शरीरावर वर्षाव करू लागतो, तेव्हा आयुष्यनदी दिवसेंदिवस वाढू लागते॥ १३२ ॥ ज्याप्रमाणे दिवसाची वाढ होण्याला सूर्य कारण आहे, त्याप्रमाणे, हे शुद्धबुद्धि अर्जुना! हा सात्विक आहार खरोखर सत्वगुणाचे रक्षण करण्याला कारणीभूत आहे॥ १३३ ॥ आणि हा सात्विक आहार म्हणजे शरीर, मन यांच्या बळाला आश्रय असणारा आहे. हा असल्यावर रोगाला ठावठिकाण कोठून असणार ?॥ १३४ ॥ हा सात्विक आहार भोग्य झाला असता आरोग्य भोगण्यास शरीराचे भाग्यच उदयास आले, असे समजावे॥ १३५ ॥ या आहारामुळे देण्याघेण्याचा व्यवहार चांगला सुखाने होतो, असे स्पष्ट दिसून येईल. एवढेच नाही, तर त्यांचे आनंदाशीहि सख्य वाढते॥ १३६ ॥ असा हा सात्विक आहार अंतर्बाह्य थोर उपकार करणारा असा परिणाम पावतो॥ १३७॥ आता राजस पुरुषाला ज्या आहाराचे ठिकाणी गोडी वाटते, प्रसंगाने तोहि स्पष्ट करून सांगतो॥ १३८ ॥

**कट्वम्ललवणात्युष्ण तीक्ष्णरूक्षविदाहिनः। आहारा राजसस्येष्टा दुःखशोकामयप्रदाः॥ ९ ॥**

**अर्थ**—जो आहार अति कडू, अति आंबट, अति खारट, अति उष्ण, अति तीक्ष्ण, अति रुक्ष व शरीराचा अति दाह करणारा आहे व म्हणून जो दु:ख, शोक व रोग यांना उत्पन्न करणारा होतो, तो आहार रजोगुणी पुरुषांना प्रिय वाटतो॥ ९ ॥

**तरी मारें उणें काळकूट। तेणें मानें जें कडुवट। कां चुनियाहूनि दासट। आम्लीं हन॥ १३९ ॥**
**कणिकीतें जैसें पाणी। तैसेंचि मीठ बांधया आणी। तेतुलीच मेळवणी। रसांतरांची॥ १४० ॥**
**ऐसें खारट अपाडें। राजसा तया आवडे। उन्हाचेनि मिषें तोंडें। आगीचि गिळी॥ १४१ ॥**
**वाफेचिया सिगे। वातीही लाविल्या लागे। तैसें उन्ह मागे। राजसु तो॥ १४२ ॥**
**वावदळ पाडुनि ठाये। साबळु डाहारला आहे। तैसें तीख तो खाये। जें घायेंवीण रूपे॥ १४३ ॥**
**आणि राखेहुनि कोरडें। आंत बाहेरी येकें पाडें। तो जिव्हादंशु आवडे। बहु तया॥ १४४ ॥**
**परस्परें दांतां। आदळु होय खातां। तो गा तोंडीं घेतां। तोषों लागे॥ १४५ ॥**
**आधींच द्रव्यें चुरमुरीं। वरि परवडजती मोहरी। जियें घेतां होती धुवारी। नाकतोंडा॥ १४६ ॥**
**हें असो उगें आगीतें। म्हणे तैसें राइतें। पढियें प्राणापरतें। राजसासि गा॥ १४७ ॥**
**ऐसा न पुरोनि तोंडा। जिभा केला वेडा। अन्नमिषें अग्नि भडभडा। पोटीं भरी॥ १४८ ॥**

**अर्थ**—जो आहार, प्राण हरण करण्याचा गुण नसलेल्या काळकूट विषाप्रमाणे अति कडू असतो किंवा चुन्याहून दाहक असा अति आंबट असतो॥ १३९ ॥ कणकीचा गोळा करण्याकरिता जितके पाणी तितके या आहारात मीठ घातले जाते व तितकेच इतर रसहि घातले जातात॥ १४० ॥ असा अत्यंत खारट आहार त्या राजस पुरुषाला आवडतो. तो ऊन ऊन खाण्याच्या मिषाने अग्निच गिळतो॥ १४१ ॥ तो रजोगुणी पुरुष इतके ऊन पदार्थ खायला लागतो की त्या खाण्याच्या पदार्थाच्या शिगेवरील वाफेने दिव्याची ज्योत देखील लावता येईल॥ १४२ ॥ वाहटुळीने एका ठिकाणी पाडले व तेथे पडली असलेली सब्बल आंगाला लागली तर जसा घाव न पडता तीक्ष्ण दु:ख होते तसे तो राजस पुरुष तीक्ष्ण तिखट खातो॥ १४३ ॥ आतून व बाहेरून एकसारखे राखेपेक्षाहि कोरडे, स्नेहहीन व जिभेला बोचणारे पदार्थ त्याला फार आवडतात॥ १४४ ॥ ज्या पदार्थाच्या रुक्षपणामुळे खाताना परस्पर दातावर दात आदळतील असे पदार्थ खायला मिळाले असता त्याला आनंद होतो॥ १४५ ॥ पदार्थ आधीच चुरचुरीत असले तरी जेणेकरून नाकातोंडात आगीचा फणका एकदम उठेल अशी आणखी वाटलेली मोहरी त्याला लावतो॥ १४६ ॥ हे असो. अग्नीलाहि क्षणभर थांब म्हणेल, असे तिखट रायते त्या राजस पुरुषाला प्राणाहून प्रिय वाटते॥ १४७ ॥ अशा प्रकारे ज्याच्या तोंडाला कधी पुरेसे वाटत नाही व जो सर्वस्वी जिव्हालोलुप झाला आहे, तो पुरुष अन्नाच्या निमित्ताने पोटात पेटलेला अग्निच भरतो॥ १४८ ॥

**तैसाचि लवंघा सुटे। मग भुई ना सेजे सांटे। पाणियाचें न सुटे। तोंडोनि पात्र॥ १४९ ॥**
**ते आहार नव्हती घेतले। व्याधिव्याळ जे सुतले। ते चेववावया घातलें। माजवण पोटीं॥ १५० ॥**
**तैसें एकमेकां सळें। रोग उठती एके वेळे। ऐसा राजसु आहारु फळे। केवळ दुःखें॥ १५१ ॥**
**एवं राजसा आहारा। रूप केलें धनुर्धरा। परिणामाचाही विसुरा। सांगितला॥ १५२ ॥**
**आतां तया तामसा। आवडे आहारु जैसा। तेंही सांगों चिळसा। झणें तुम्ही॥ १५३ ॥**

**अर्थ**—त्याबरोबर अंगाचा दाह सुरू होतो. मग तो जमिनीवर किंवा आंथरुणावर स्वस्थ पडून राहू शकत नाही व तोंडचे पाण्याचे भांडे सुटत नाही॥ १४९ ॥ असा घेतलेला आहार नव्हे, तर सुप्त असलेल्या व्याधिरूप सर्पांना जागे करण्याकरिता पोटात घातलेले मादक पदार्थ होत॥ १५० ॥ मग एकमेकांशी स्पर्धा करीत एकाच काळी सर्व रोग उत्पन्न होतात. याप्रमाणे राजस आहार केवळ दुःखाच्या रूपानेच फलद्रूप होतो॥ १५१ ॥ याप्रमाणे अर्जुना! राजस आहाराचे स्वरूप सांगून त्याच्या परिणामाचाहि विस्तार सांगितला॥ १५२ ॥ आता तामसी पुरुषांना जो आहार आवडतो तो सांगतो, ऐक. तो ऐकताना तुम्हाला कदाचित् किळस येईल॥ १५३ ॥

**यातयामं गतरसं पूति पर्युषितं च यत्। उच्छिष्टमपि चामेध्यं भोजनं तामसप्रियम्॥ १० ॥**

**अर्थ**—शिजल्यावर एक प्रहर लोटल्यामुळे थंड झालेले, नीरस, दुर्गंधयुक्त, शिळे, उष्टे व अपवित्र असे भोजन तामसी पुरुषांना आवडते॥ १० ॥

**तरी कुहिलें उष्टें खातां। न मनिजे तेणें अनहिता। जैसें कां उपहिता। म्हैसी खाय॥ १५४ ॥**
**निपजलें अन्न तैसें। दुपाहरीं कां येरें दिवसें। अतिकरें तैं तामसें। घेईजे तें॥ १५५ ॥**
**नातरी अर्ध उकडिलें। का निपट करपोनि गेलें। तैसेंही खाय चुकलें। रसा जें येवों॥ १५६ ॥**
**जया का आथि पूर्ण निष्पत्ती। जेथ रसु धरी व्यक्ती। तें अन्न ऐसी प्रतीती। तामसा नाहीं॥ १५७ ॥**
**ऐसेनि कहीं विपायें। सदन्ना वरपडा होये। तरी घाणी सुटे तंव राहे। व्याघ्रु जैसा॥ १५८ ॥**
**का बहुवे दिवशीं वोलांडिलें। स्वादपणें सांडिलें। शुष्क अथवा सडलें। गाभिणेंही हो॥ १५९ ॥**
**तेंही बाळाचे हातवरी। चिवडलें जैसी राडी करी। कां सवें बैसोनि नारी। गोतांबील करी॥ १६० ॥**
**ऐसेनि कश्मळें जें खाय। तें तया सुखभोजन ऐसें होय। परी येणेंही न धाय। पापिया तो॥ १६१ ॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे म्हैस जवळ ठेवलेले कोणतेहि अन्न खाते, त्याप्रमाणे तामसी लोक नासके, उष्टे, हे माझ्या हिताचे नाही, असा काहीच विचार करीत नाहीत॥ १५४ ॥ त्याप्रमाणेच तमोगुणी पुरुष सकाळी शिजविलेले अन्न त्यावरून बराच काळ लोटून गेल्यावर दुपारी किंवा दुसऱ्या दिवशी खातो॥ १५५ ॥ किंवा अर्धकच्चे शिजविलेले अथवा निःशेष करपलेले व रसहीन बनलेले असेहि अन्न तामसी पुरुष खात असतो॥ १५६ ॥ पूर्ण शिजलेले रुचीस आलेले, अशा अन्नाला तो तामसी पुरुष अन्न म्हणत नाही॥ १५७ ॥ इतकेहि करून जर यदाकदाचित् तमोगुणी पुरुषापुढे पूर्ण शिजविलेले व स्वादिष्ट अन्न आलेच तर तो ते न खाता व्याघ्राप्रमाणे ते अन्न नासून त्याची घाण सुटेपर्यंत वाट पाहतो॥ १५८ ॥ किंवा ज्याच्यावरून पुष्कळ दिवस लोटले गेले, स्वादरहित, सुकलेले किंवा सडून, गाभीण अशा किड्यांनी भरलेले आणि तेहि ज्याप्रमाणे चिखल करावा किंवा परिवारासह बसून गीतांबील करावी, त्याप्रमाणे मुलांच्या हातांनी चिवडले गेलेले, असे घाणेरडे अन्न जेव्हा तो तमोगुणी पुरुष खातो, तेव्हा त्याला भोजन केल्याचे समाधान वाटते, इतक्यानेहि तो पापी तृप्ति मानित नाही॥ १५९-१६१ ॥

**मग चमत्कारु देखा। निषेधाचा आंबुखा। जया का सदोखा। कुद्रव्यासी॥ १६२ ॥**
**तया अपेयांच्या पानीं। अखाद्यांच्या भोजनीं। वाढविजे उतान्ही। तामसें तेणें॥ १६३ ॥**
**एवं तामस जेवणारा। ऐसैसी मेचु हे वीरा। तयाचें फल दुसरां। क्षणीं नाहीं॥ १६४ ॥**
**जे जेव्हांचि हें अपवित्र। शिवे तयाचें वक्त्र। तेव्हांचि पापा पात्र। जाला तो कीं॥ १६५ ॥**
**यावरतें जें जेवीं। ते जेविति वोज न म्हणावी। पोटभरती जाणावी। यातना ते॥ १६६ ॥**

**शिरच्छेदें काय होये। का आगीं रिघतां कैसें आहे। हें जाणावें काई पाहें। परी साहातचि असे॥ १६७॥**
**म्हणोनि तामसा अन्ना। परिणाम गा सिनाना। न सांगोंचि गा अर्जुना। देवो म्हणे॥ १६८॥**
**आतां ययावरी। आहाराचिया परी। यज्ञुही अवधारीं। त्रिधा असे॥ १६९॥**
**परी तिहींमाजीं प्रथम। सात्त्विक यज्ञाचें वर्म। आईक पां सुमहिम। शिरोमणी॥ १७०॥**

**अर्थ**—मग आश्चर्य असे पाहा की ते तामसी पुरुष, शास्त्रांनी निषिद्धपणाचा शिंतोडा टाकलेले सदोष व वाईट असे अपेय-मदिरादि पिण्याची व अभक्ष्य-मांसादि पदार्थ भक्षण करण्याची इच्छा वाढवितात॥ १६२-१६३ ॥ हे अर्जुना! याप्रमाणे तामस आहार करणाऱ्याला अशी अशी आवड होत असते तशा आहाराचे फळ त्या क्षणीच मिळते, दुसरा क्षण लागत नाही॥ १६४॥ कारण, ज्या क्षणी हे अपवित्र पदार्थ त्याच्या तोंडाला लागतात, त्या क्षणीच तो पापाला पात्र झाला॥ १६५ ॥ यानंतर, त्याच्या पदार्थसेवनाला जेवणाची तऱ्हा म्हणू नये तर ती पोट भरणारी यातनाच समजावी॥ १६६ ॥ शिरच्छेद केला असता काय होते? अग्नीत शिरले असता कसे वाटते, हे तसे करून पाहून जाणायचे असते काय? पण पाहा! तमोगुणी पुरुष हे सर्व सहन करीत असतात॥ १६७॥ म्हणून हे अर्जुना! तामस आहाराचा वेगळा परिणाम सांगत नाही, असे देव म्हणतात॥ १६८ ॥ आता यानंतर आहाराप्रमाणे यज्ञहि तीन प्रकारचा आहे, ऐक॥ १६९ ॥ उत्तम कीर्ति असलेल्यामध्ये श्रेष्ठ अशा अर्जुना! तरी तिन्ही प्रकारांमध्ये प्रथम सात्विक यज्ञाचे लक्षण (सांगतो) ऐक॥ १७०॥

**अफलाकाङ्क्षिभिर्यज्ञो विधिदृष्टो य इज्यते। यष्टव्यमेवेति मनः समाधाय स सात्त्विकः॥ ११॥**

**अर्थ**—यज्ञाच्या फलाची यत्किंचित् इच्छा न करणाऱ्याकडून शास्त्रविधीला धरून व यज्ञ करणे हे माझे कर्तव्य आहे, असे समजून मनाच्या समाधानाने जो यज्ञ केला जातो, त्याला सात्विक यज्ञ म्हणतात॥ ११ ॥

**तरी एकु प्रियोत्तमु-। वांचोनि वाढों नेदी कामु। जैसा का मनोधर्मु। पतिव्रतेचा॥ १७१॥**
**नाना सिंधूतें ठाकोनि गंगा। पुढारां न करीचि रिगा। कां आत्मा देखोनि उगा। वेदु ठेला॥ १७२॥**
**तैसे जे आपुल्या स्वहितीं। वेंचूनियां चित्तवृत्ती। नुरवितीची अहंकृती। फळालागीं॥ १७३॥**
**पातलेया झाडाचें मूळ। मागुतें सरों नेणेचि जळ। जिरालें कां केवळ। तयाच्याचि आंगीं॥ १७४॥**
**तैसें मनें देहें दोहीं। यजननिश्चयाच्या ठाईं। हारपोनि जे कांहीं। वांछिती ना॥ १७५॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे पतिव्रता स्त्री एका आपल्या प्रियोत्तम पतीच्या प्रेमावाचून दुसरी कोणतीहि कामना मनात उत्पन्न होऊ देत नाही॥ १७१ ॥ किंवा ज्याप्रमाणे गंगा समुद्रास मिळाल्यानंतर पुढे जातच नाही किंवा आत्म्याचे स्वरूप पाहिल्याबरोबर वेद मौन धारण करतो॥ १७२॥ त्याप्रमाणे जे कोणी आत्मप्राप्तिरूप स्वहित साधण्याकडेच संपूर्ण चित्तवृत्ति लावून विषयसुखाच्या प्राप्तीची इच्छा करण्याकरिता अहंकार उरू देत नाहीत॥ १७३॥ अथवा झाडाच्या मूळाशी प्राप्त झालेले पाणी तेथल्या तेथेच झाडाच्या आंगात जिरून जाते, मागे परत येत नाही॥ १७४॥ त्याप्रमाणे जे कोणी मनाने व देहाने यजन करायचे या निश्चयाचे ठिकाणी तल्लीन होऊन गेल्यामुळे दुसऱ्या कशाचीच इच्छा करीत नाहीत॥ १७५॥

**तिहीं फळवांछात्यागीं। स्वधर्मावांचूनि विरागीं। कीजे जो यज्ञु सर्वांगीं। अळंकृतु॥ १७६॥**
**परी आरिसां आपणपें। डोळां जैसें घेपें। कां तळहातींचें दीपें। रत्न पाहिजे॥ १७७॥**
**नाना उदिते दिवाकरें। गमावा मार्गु दिठी भरे। तैसा वेद निर्धारें। देखोनियां॥ १७८॥**
**तियें कुंडें मंडप वेदी। आणीकही संभारसमृद्धीं। ते मेळवणी जैसी विधी। आपण पां केली॥ १७९॥**
**सकळावयव उचितें। लेणीं पातलीं जैसी आंगातें। तैसे पदार्थ जेथिंचें तेथें। विनियोगुनी॥ १८०॥**
**काय वानूं बहुती बोली। जैसी सर्वाभरणीं भरलीं। ते यज्ञविद्याचि रूपा आली। यजनमिषें॥ १८१॥**
**तैसा सांगोपांगु। निपजे जो यागु। नुठऊनियां लागु। महत्त्वाचा॥ १८२॥**
**प्रतिपाळु तरी पाटाचा। झाडीं कीजे तुळसीचा। परि फळा फुला छायेचा। आश्रयो नाहीं॥ १८३॥**

**किंबहुना फळाशेवीण। ऐसेया निगुती यज्ञ निर्माण। होय तो यागु जाण। सात्त्विकु गा॥ १८४॥**

**अर्थ**—स्वधर्माव्यतिरिक्त सर्वांविषयी वैराग्य धारण करून व विषयसुखाच्या फळाची इच्छा सोडून तंतोतंत विधीने सांगितल्याप्रमाणे जो यज्ञ करावा॥ १७६॥ ज्याप्रमाणे आरशाच्या योगाने आपण आपल्याला डोळ्यांनी पाहावे किंवा तळहातावरील रत्न दिव्याने पाहावे॥ १७७॥ किंवा सूर्योदय झाल्यावर प्रवासाला जाण्याचा मार्ग दृष्टीस पडावा, त्याप्रमाणे, जणु काय शास्त्रात सांगितलेल्या प्रत्यक्ष विधीनेच जमवाजमव केली, अशा प्रकारे वेदविधि पाहून कुंडे, मंडप, वेदी आणखी इतर यज्ञसमृद्धि मिळवून व ज्याप्रमाणे आंगावरील अवयवांवर त्या त्या अवयवांना योग्य असे अलंकार घालावेत, त्याप्रमाणे शास्त्रांनी सांगितल्याप्रमाणे यज्ञीय पदार्थांचा जेथल्या तेथे विनियोग करून॥ १७८-१८०॥ शब्दाने फार काय प्रशंसा करावी! यजनक्रियेच्या मिषाने साक्षात् यज्ञविद्याच सर्व अलंकाराने अलंकृत होऊन जणु, प्रगट झाली॥ १८१॥ त्याप्रमाणे प्रतिष्ठा वाढविण्याच्या निमित्ताचा स्पर्श न होऊ देता अंगउपांगासहित जो यज्ञ निष्पन्न होतो॥ १८२॥ तुळशीचे झाड फळ, फूल, छाया याला आश्रय होत नसेल तरी त्याचा जसा उत्तम प्रतिपाळ केला जातो॥ १८३॥ तसा, फार काय बोलावे! मनात यत्किंचितहि फळाची इच्छा नसून जो यथार्थ यज्ञ केला जातो तो सात्विक यज्ञ होय, असे जाण॥ १८४॥

**अभिसन्धाय तु फलं दम्भार्थमपि चैव यत्। इज्यते भरतश्रेष्ठ तं यज्ञं विद्धि राजसम्॥ १२॥**

**अर्थ**—हे भरतश्रेष्ठ अर्जुना! फळाकडे लक्ष ठेऊन व लोकात प्रतिष्ठा मिरविण्याकरिता जो यज्ञ केला जातो तो राजसयज्ञ होय, असे जाण॥ १२॥

**आतां यज्ञु कीर वीरेशा। करी पैं याचि ऐसा। परी श्राद्धालागीं जैसा। अवंतिला रावो॥ १८५॥**
**जरी राजा घरासि ये। तरी बहुत उपेगा जाये। आणि कीर्तीही होये। जगामाजी॥ १८६॥**
**तैसा धरूनि आवांका। म्हणे स्वर्गु जोडेल असिका। दीक्षितु होईन मान्यु लोकां। घडेल यागु॥ १८७॥**
**ऐसी केवळ फळालागीं। महत्त्व फोकारावया जगीं। पार्था निष्पत्ति जे यागीं। राजस पैं ते॥ १८८॥**

**अर्थ**—सर्व वीर पुरुषात श्रेष्ठ अशा अर्जुना! ज्याप्रमाणे राजाला श्राद्धाकरिता जेवावयास बोलवावे, त्याप्रमाणेच खरोखर राजस यज्ञ केला जात असतो॥ १८५॥ कारण राजा जर घरी आला तर त्याच्या येण्याचा पुष्कळ उपयोग होतो आणि जगात कीर्तिहि होते॥ १८६॥ त्याप्रमाणे तो मनात अशी कल्पना करतो की आपण यज्ञ केला असता सर्व स्वर्गाचे राज्य हाती येईल, लोक मला दीक्षित म्हणून मान देतील व अनायासे यागहि घडेल॥ १८७॥ अर्जुना! अशा रीतीने फळाची आशा धरून व आपली प्रतिष्ठा मिरविण्याकरिता जी यज्ञक्रिया केली जाते ती राजस होय॥ १८८॥

**विधिहीनमसृष्टान्नं मन्त्रहीनमदक्षिणम्। श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते॥ १३॥**

**अर्थ**—शास्त्रविधि, यथोक्त अनन्दान, वैदिक मंत्र, शास्त्रोक्त दक्षिणा व श्रद्धा यांवाचून जो यज्ञ केला जातो, त्याला तामस यज्ञ म्हणतात॥ १३॥

**आणि पशुपक्षिविवाहीं। जोशी कामापरौता नाहीं। तैसा तामसा यज्ञा पाहीं। आग्रहचि मूळ॥ १८९॥**
**वारया वाट न वाहे। कीं मरण मुहूर्त पाहे। निषिद्धांसी बिहे। आगी जरी॥ १९०॥**
**तरी तामसाचिया आचारा। विधीचा आथी वोढावारा। म्हणूनि तो धनुर्धरा। उत्सृंखळु॥ १९१॥**
**नाहीं विधीची तेथ चाड। नये मंत्रादिक तयाकड। अन्नजाता न सुये तोंड। मासिये जेवीं॥ १९२॥**
**वैराचा बोधु ब्राह्मणा। तेथ कें रिगेल दक्षिणा। अग्नि जाला वाउधाणा। वरपडा जैसा॥ १९३॥**
**तैसें वायांचि सर्वही वेंचे। मुख न देखतां श्रद्धेचें। नागविलें निपुत्रिकाचें। जैसें घर॥ १९४॥**
**ऐसा जो यज्ञाभासु। तया नाम यागु तामसु। आइकें म्हणे निवासु। श्रियेचा तो॥ १९५॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे पशुपक्ष्यांच्या विवाहात कामवासनेवाचून दुसरा जोशी नसतो, त्याप्रमाणे तामसयज्ञाचे मूळ कारण आग्रह असतो॥ १८९॥ वाऱ्याकडून एखादी वाट वाहविली जाणार नाही किंवा मरण मुहूर्ताची वाट पाहील

अथवा अग्नि निषिद्ध पदार्थांना जाळण्याला कदाचित भिईल; पण तमोगुणी पुरुषाच्या आचाराला शास्त्रीय विधीचा धरबंधच नसतो; म्हणून हे अर्जुना! त्याचा आचार उच्छृंखल म्हटला जातो॥ १९०-१९१॥ ज्याप्रमाणे अमुक प्राण्यांच्या अन्नाला तोंड लावावे असा माशांना निर्बंध नसतो म्हणून त्या कोणत्याहि प्राण्यांच्या अन्नाना तोंड लावल्यावांचून राहत नाहीत. त्याप्रमाणे तामसयज्ञात वैदिकविधीचा निर्बंध नसतो. वैदिक मंत्रादिक त्यांच्याकडे येत नाहीत॥ १९२॥ जेथे ब्राह्मणाविषयी शत्रुत्वाची भावना आहे, तेथे दक्षिणेचा विचार काय होणार? किंवा ज्याप्रमाणे वाहटुळीला अग्नीची जोड मिळावी किंवा ज्याला संतान नाही त्याचे घर (घराची संपत्ति) व्यर्थच वाटेल त्याच्याकडून लुटली जावी, त्याप्रमाणे श्रद्धेचे तोंडहि न पाहता केल्या जाणाऱ्या तामसयज्ञात व्यर्थच संपूर्ण संपत्ति खर्ची पडते॥ १९३-१९४॥ अशा केवळ आभासरूप यज्ञास तामसयज्ञ म्हणतात, ऐक, असे लक्ष्मीचे राहण्याचे स्थान भगवान श्रीकृष्ण म्हणाले॥ १९५॥

**आतां गंगेचें एक पाणी। परी नेलें आनानीं वाहणीं। एक मळी एक आणी। शुद्धत्व जैसें॥ १९६॥**
**तैसें तिहीं गुणीं तप। येथ जाहालें आहे त्रिरूप। तें एक केलें दे पाप। उद्धरी एक॥ १९७॥**
**तरी तेंचि तिहीं भेदीं। कैसेनि पां म्हणौनि सुबुद्धी। जाणों पाहासी तरी आधीं। तपचि जाण॥ १९८॥**
**येथ तप म्हणिजे काई। तें स्वरूप दाऊं पाहीं। मग भेदिलें गुणीं तिहीं। तें पाठीं बोलों॥ १९९॥**
**तरी तप जें कां सम्यक्। तेंही त्रिविध आइक। शारीर मानसिक। शाब्द गा॥ २००॥**

**अर्थ**—आता गंगेचे पाणी एकच पण निरनिराळ्या वाहीतून नेले असता ते शुद्ध वाहीतून शुद्ध करणारे व अशुद्ध वाहीतून अशुद्ध करणारे होते॥ १९६॥ त्याप्रमाणे तपहि सत्वादि तीन गुणांमुळे सात्विक, राजस, तामस असे तीन प्रकारचे झाले आहे. त्यात राजस-तामस तप केले असता पापरूप होते व सात्विक तप केले असता ते शुद्ध करणारे होते॥ १९७॥ हे सुबुद्धि अर्जुना! ते तप तीन प्रकारचे कशाने झाले हे जाणण्याची इच्छा असेल तर तेच आधी ऐकून घे॥ १९८॥ तेथे तप म्हणजे काय ते कळण्याकरिता प्रथम त्याचे स्वरूप सांगतो, पाहा! मग तीन गुणांमुळे ते तीन प्रकारचे कसे होंते, हे नंतर सांगतो॥ १९९॥ तरी यथार्थ जे तप ते शारीरिक, मानसिक आणि शाब्द किंवा वाचिक असे तीन प्रकारचे आहे, ऐक॥ २००॥

**देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जवम्। ब्रह्मचर्यमहिंसा च शारीरं तप उच्यते॥ १४॥**

**अर्थ**—देव, ब्राह्मण, गुरु व ज्ञानी यांचे पूजन, शरीरशुद्धि, सरळपणा, ब्रह्मचर्य व प्राण्यांची हिंसा न करणे या आचाराला शरीराने होणारे तप म्हणतात॥ १४॥

**आतां या तिहिं माझारीं। शारीर तंव अवधारीं। तरी शंभू कां श्रीहरी। पढियंता होय॥ २०१॥**
**तया प्रिया देवतालया। यात्रादिकें करावया। आठही पाहार जैसें पायां। उळिग घापे॥ २०२॥**
**देवांगण मिरवणियां। आंगोपचार पुरवणियां। करावया म्हणियां। शोभती हात॥ २०३॥**
**लिंग का प्रतिमा दिठीं। देखतखेंवों अंगेष्टी। लोटिजे कां काठी। पडली जैसी॥ २०४॥**
**आणि विधिविनयादिकीं। गुणीं वडील जे लोकीं। तया ब्राह्मणांची निकी। पाइकी कीजे॥ २०५॥**
**अथवा प्रवासें का पीडा। का शिणले जे सांकडां। ते जीव सुरवाडा। आणिजती॥ २०६॥**
**सकल तीर्थांचिये धुरे। जियें कां मातापितरें। तयां सेवेसि कीर शरीरें। लोण कीजे॥ २०७॥**
**आणि संसारा ऐसा दारुणु। जो भेटलाचि हरी शीणु। तो ज्ञानदानीं सकरुणु। भजिजे गुरु॥ २०८॥**

**अर्थ**—आता तिघांमधील शारीरिक तप ऐक. तरी शिव किंवा श्रीहरी यांपैकी ज्याचे प्रेम असेल त्या प्रिय देवतेच्या मंदिराला यात्रा करण्यासाठी पायाला जणु काय आठहि प्रहर सारखा भोवरा लावावा॥ २०१-२०२॥ देवाचे आंगण सडासंमार्जनाने व रंगमाळादिकांनी सुशोभित करण्याकरिता व त्याच्या मूर्तीच्या आंगाला षोडश उपचार पुरवून पूजनादि करण्याकरिताच हात शोभत आहेत, (असे समजावे)॥ २०३॥ शिवाचे लिंग किंवा विष्णुमूर्ति दृष्टीस पडताच, हातातील काठी पडावी, त्याप्रमाणे नमस्काराकरिता एकदम शरीरकाठी लोटली जावी॥ २०४॥ लोकात जे

कोणी गुणवान व वडील असे ब्राह्मण असतील त्यांची शास्त्रात सांगितलेल्या सत्कार विधीने व विनयादिकाने सेवा करावी ॥ २०५ ॥ किंवा प्रवासाने, रोगादि पीडेने अथवा संकटात सापडल्याने जे कष्टी झाले असतील त्या जीवांना सुखी करून सोडावे ॥ २०६ ॥ संपूर्ण तीर्थापेक्षा श्रेष्ठ असे जे मातापिता त्यांच्या सेवेवरून शरीर ओवाळून टाकावे-म्हणजे त्यांच्या सेवेपुढे ते तुच्छ मानावे ॥ २०७ ॥ आणि ज्याची भेट झाली असता आत्मज्ञान प्राप्त होऊन संसारासारखे अत्यंत दारुण दुःखहि नाहिसे होते त्या करुणासंपन्न अशा श्रीगुरुची सर्वेतोपरि सेवा करावी ॥ २०८ ॥

**आणि स्वधर्माचा आगिठां। देह जाड्याचिया किटा। आवृत्तिपुटीं सुभटा। झाडीं कीजे॥ २०९ ॥**

**अर्थ**—हे उत्तम योद्ध्या अर्जुना! स्वधर्मरूपी अग्नीत शास्त्रोक्त दैनंदिन आचरणाच्या आवृत्तीची पुटे देऊन देहाचे ठिकाणी असलेला जाड्यरूपी मळ जाळून टाकावा ॥ २०९ ॥

**गूढार्थदीपिका**—'**मृद्रूपो हि यथा कुंभो तद्वद्देहोऽपि चिन्मयः**' मातीपासून झालेला घट जसा मातीरूपच असतो, तसा चिन्मयस्वरूपाचे ठिकाणी भासलेला विवर्तरूप देहहि चिन्मयच आहे, असे आचार्य म्हणतात.

**अर्थ**—पण अनादि अज्ञानामुळे व दुर्धर पापाचरणजन्य तमोगुणामुळे जीवाला हा चिन्मय देहच जड दिसतो. यथोक्त धर्माचरणाच्या दैनंदिन आवृत्तिमुळे तमोगुणाला कारण होणारे मागील पाप जसे जसे क्षीण होत जाते तसा तसा तमोगुण क्षीण होत जाऊन सत्वगुण वाढत जातो. व शेवटी रजस्तमोगुण अत्यंत क्षीण झाले असता वाढलेल्या सत्वगुणाने श्रीगुरुकृपा होऊन अधिष्ठानरूप सच्चिदानंद परब्रह्माचा साक्षात्कार होतो व त्याचा विवर्तरूप असा देहहि चिन्मयच आहे, असा अनुभव येतो. असा या ओवीतील भाव आहे.

**वस्तु भूतमात्रीं नमिजे। परोपकारीं भजिजे। स्त्रीविषयीं नियमिजे। नांवेंनांवें॥ २१० ॥**
**जन्मतेंनि प्रसंगें। स्त्रीदेह शिवणें आंगें। तेथूनि जन्म आघवें। सोंवळें कीजे॥ २११ ॥**
**भूतमात्राचेनि नांवें। तृणही नासुडावें। किंबहुना सांडावें। छेद भेद॥ २१२ ॥**
**ऐसैसी जैं शरीरीं। रहाटीची पडे उजरी। तै शारीर तप घुमरी। आलें जाण॥ २१३ ॥**
**पार्था समस्तही हें करणें। देहाचेनि प्रधानपणें। म्हणौनि ययातें मी म्हणें। शारीर तप॥ २१४ ॥**
**एवं शारीर जें तप। तयाचें दाविलें रूप। आतां आईक निष्पाप। वाङ्मय तें॥ २१५ ॥**

**अर्थ**—परब्रह्म परमात्मा अणुरेणूत व्यापक आहे, असे समजून जीव दृष्टीस पडताच परमात्म्याकडे लक्ष देऊन नमस्कार करावा, परोपकाराने परमेश्वराचे सेवन करीत असावे आणि स्त्रीसंभोगाची इच्छा समूळ नाहीशी होईल, अशा रीतीने स्त्रीसंभोगाचे नियमन करावे-म्हणजे स्त्रीसंभोगाचा कालावधी वाढवित जावा ॥ २१० ॥ जन्म झाला तेव्हाच स्त्रीदेहाचा स्पर्श झाला असेल तो झाला, त्यानंतर संपूर्ण जन्म स्त्रीदेहस्पर्शावाचून ठेवावा ॥ २११ ॥ पदार्थमात्र जीव आहे असे समजून गवतालाहि हिसका लागू देऊ नये. एवढेच नाही तर, त्याला तोडणे, कापणे हे देखील करू नये ॥ २१२ ॥ अशा अशा प्रकारे जेव्हा शरीराची राहाटी उत्कर्षास पोहोचते तेव्हा शारीरिक तप पूर्ण झाले, असे जाण ॥ २१३ ॥ अर्जुना! हे सर्व शरीराच्याच आश्रयाने होत असल्यामुळे याला मी शारीर तप म्हणतो ॥ २१४ ॥ याप्रमाणे शारीरिक जे तप त्याचे स्वरूप सांगितले. आता पापरहित असे वाचिक तप सांगतो, ऐक ॥ २१५ ॥

**अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् । स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते ॥ १५ ॥**

**अर्थ**—ऐकल्याबरोबर खिन्नता उत्पन्न न करणारे, सत्य, प्रिय व हितकारक असे बोलणे, आपल्याला दररोज पठण करण्यास योग्य म्हणून स्वीकारलेली स्तोत्रे व ग्रंथ यांचा अभ्यास करणे, याला वाचिक तप म्हणतात ॥ १५ ॥

**तरी लोहाचें आंग तुक। न तोडितांचि कनक। केलें जैसें देख। परिसें तेणें॥ २१६ ॥**
**तैसें न दुखवितां सेजे। जावळिया सुख निपजे। ऐसें साधुत्व का देखिजे। बोलणां जिये॥ २१७ ॥**
**पाणी मुदल झाडा जाये। तृण तें प्रसंगेंचि जिये। तैसें एका बोलिलें होये। सर्वांहि हित॥ २१८ ॥**
**जोडे अमृताची सुरसरी। तैं प्राणांतें अमर करी। स्नानें पाप ताप वारी। गोडीही दे॥ २१९ ॥**
**तैसा अविवेकुही फिटे। आपुलें अनादित्व भेटे। आइकतां रुचि न विटे। पीयूषीं जैसी॥ २२० ॥**

**जरी कोणी करी पुसणें। तरी होआवें ऐसें बोलणें। नातरी आवर्तणें। निगमु का नाम॥ २२१॥**
**ऋग्वेदादि तिन्ही। प्रतिष्ठिजती वाग्भुवनीं। केली जैसी वदनीं। ब्रह्मशाळा॥ २२२॥**
**नातरी एकादें नांव। तेंचि शैव कां वैष्णव। वाचे वसे तें वाग्भव। तप जाणावें॥ २२३॥**
**आतां तप जे मानसिक। तेंहीं सांगों आइक। म्हणे लोकनाथनायक-। नायकचि तो॥ २२४॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे लोखंडाचा तुकडा न तोडता किंवा वजन कमी न करता परिस लोखंडाचे सोने करतो॥ २१६॥ त्याप्रमाणे कोणाचेहि चित्त न दुखविता सहजच जवळच्या माणसाला सुख समाधान वाटेल असा ज्या बोलण्यात सज्जनपणा असतो॥ २१७॥ ज्याप्रमाणे पाणी मुख्यत: झाडाला दिले जाते, पण हाच प्रसंग गवताला वाढण्यास कारणीभूत होतो; त्याप्रमाणे ज्या एकाला बोलण्याने सर्वानाच सुख समाधान वाटते॥ २१८॥ अमृताची गंगा प्राप्त झाली तर ती प्राशन केली असता प्राणाला अमर करते, गोडीहि देते व तिच्यात स्नान केले असता ती पाप-ताप नाहीसे करते॥ २१९॥ त्याप्रमाणे, जे बोलणे ऐकले असता अविवेक नाहीसा होऊन आपल्या अनादि स्वरूपस्थितीचे ज्ञान होते व अमृताचा जसा वीट येत नाही, तसे ऐकताना त्याचा वीटहि येत नाही॥ २२०॥ कोणी विचारल्यास असे बोलणे असावे, नाही तर वेदाची किंवा हरिनामाची आवर्तने करीत बसावे॥ २२१॥ मुखाला जणु काय वेदशाळाच बनविली अशा रीतीने ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद या तिन्ही वेदांची मुखमंदिरात स्थापना करावी-म्हणजे तिन्ही वेद मुखोद्‍गत करावे॥ २२२॥ किंवा शिव, विष्णु यांच्यापैकी कोणाचेहि नाव वाणीवर राहावे, याला वाणीचे तप म्हणतात॥ २२३॥ आता ज्याला मानसिक तप म्हणतात. तेहि सांगतो, ऐक, असे लोकनाथ-म्हणजे लोकपाल त्यांचा नायक म्हणजे ब्रह्मदेव व त्यांचा नायक म्हणजे भगवान श्रीकृष्ण म्हणाले॥ २२४॥

**मन: प्रसाद: सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रह:। भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते॥ १६॥**

**अर्थ**—रागद्वेषरहित मन होणे, मनात सर्व लोकांच्या हिताची इच्छा असणे, न बोलणे, इंद्रिये व त्याचे विषय यांकडे मनाने न जाणे व निष्कपट बुद्धि याला मानसिक तप म्हणतात॥ १६॥

**तरी सरोवर तरंगीं। सांडिलें आकाश मेघीं। कां चंदनाचें उरगीं। उद्यान जैसें॥ २२५॥**
**नाना कळावैषम्यें चंद्रु। कां सांडिला आधीं नरेंद्रु। नातरी क्षीरसमुद्रु। मंदराचळें॥ २२६॥**
**तैसीं नाना विकल्पजाळें। सांडूनि गेलिया सकळें। मन राहे कां केवळें। स्वरूपें जें॥ २२७॥**
**तपनेंवीण प्रकाशु। जाड्येंवीण रस। पोकळीवीण अवकाशु। होय जैसा॥ २२८॥**
**तैसी आपली सोय देखे। आणि आपलिया स्वभावा मुके। हिंवलीं जैसी आंगिकें। हिवों नेदी॥ २२९॥**
**मग न चलतें कळंकेवीण। शशिबिंब जैसें परिपूर्ण। तैसें चोखी शृंगारपण। मनाचें जें॥ २३०॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे तरंगानी सरोवराला किंवा मेघानी आकाशाला अथवा सर्पांनी चंदनाचे उद्यानाला सोडले॥ २२५॥ किंवा कळावैषम्याने चंद्राला किंवा चिंतेनी राजाला किंवा क्षीर समुद्राला मंदार पर्वताने सोडले॥ २२६॥ त्याप्रमाणे संपूर्ण विकल्पजाळ मनाला सोडून गेले असता मन जे केवळ स्वरूपभूत होऊन राहते॥ २२७॥ ज्याप्रमाणे उष्णतेवाचून प्रकाश असावा किंवा जडपणावाचून रस असावा किंवा पोकळीवाचून अवकाश असावा॥ २२८॥ जशी थंडी आपल्या आंगच्या थंडीने थरथर कापत नाही, त्याप्रमाणे मन आपल्याच खऱ्या ब्रह्मरूप आश्रयाला जाणून जेव्हा आपला संकल्पविकल्परूप स्वभावाचा त्याग करते॥ २२९॥ तेव्हा कलंकापासून मुक्त होऊन न चालणारे चंद्रबिंब जसे नित्य व परिपूर्ण होते, तसे मन शुद्ध ब्रह्मभावामुळे जे शृंगारित होते॥ २३०॥

**बुजाली वैराग्याची वोरप। जिराली मनाची धांप कांप। तेथ केवळ जाली वाफ। निजबोधाची॥ २३१॥**
**म्हणौनि विचारावया शास्त्र। राहाटवावें जें वक्त्र। तें वाचेचेंही सूत्र। हातीं न धरीं॥ २३२॥**
**तें स्वलाभ लाभलेपणें। मन मनपणाही धरूं नेणे। शिवतलें जैसें लवणें। आपुलें निज॥ २३३॥**
**तेथ कें उठिती ते भाव। जिहीं इंद्रियमार्गीं धांव। घेऊनि ठाकावे गांव। विषयांचे ते॥ २३४॥**
**म्हणौनि तियें मानसीं। भावशुद्धीचि असे आपैसी। रोमशुचि जैसी। तळहाताची॥ २३५॥**

**काय बहु बोलों अर्जुना। जैं हे दशा ये मना। तै मनस्तपोभिधाना। पात्र होय ती॥ २३६॥**
**परी तें असो हें जाण। मानस तपाचें लक्षण। देवो म्हणे संपूर्ण। सांगितलें॥ २३७॥**
**एवं देहवाचाचित्तें। जें पातलें त्रिविधत्वातें। तें सामान्य तप तूतें। परिसविलें गा॥ २३८॥**
**आतां गुणत्रयसंगें। हेंचि विशेषीं त्रिविधीं रिगें। तेंही आइक चांगें। प्रज्ञाबळें॥ २३९॥**

**अर्थ**—वैराग्याचा वोरखाडा बुजून जातो, मनाची धाव व अस्वस्थता नाहीशी होते व मन केवळ एक ब्रह्मबोधाची भूमिकाच होऊन राहते॥ २३१॥ म्हणून शास्त्राचा विचार करण्याकरिता ज्या वाणीचा व्यापार करावा लागतो, त्या वाणीरूप सूत्राला तो हाती धरत नाही (म्हणजे मौन धरून राहतो)॥ २३२॥ मिठाने आपल्या मूळ पाणीरूप स्वरूपास स्पर्श केला असता, जसे ते पाणीरूप होऊन जाते, त्याप्रमाणे आपल्या अधिष्ठानभूत मूळ स्वरूपाचा लाभ झाला असता ते मन पूर्वीप्रमाणे आपले संकल्प-विकल्प धरणे विसरून जाते॥ २३३॥ अशा स्थितीत ज्या भावामुळे इंद्रियमार्गाने धावत जाऊन विषयाचे गावाला मन जाते ते भाव उठण्याला अवसर कोठून असणार?॥ २३४॥ म्हणून ज्याप्रमाणे तळहाताचे ठिकाणी केस स्वभावत:च नसतात, त्याप्रमाणे अशा मनाचे ठिकाणी साहजिकच भावशुद्धि म्हणजे विकल्परहित स्थिति असते॥ २३५॥ अर्जुना! फार काय सांगू! जेव्हा मनाला अशी दशा प्राप्त होते तेव्हा ते मनच मानसिक तप या नावाला पात्र होते॥ २३६॥ पण ते असो. मानसतपाचे संपूर्ण लक्षण तुला सांगितले, हे लक्षात ठेव, असे देव म्हणाले॥ २३७॥ याप्रमाणे जे एक सामान्य तप काया-वाचा-मनामुळे या तीन प्रकाराला प्राप्त झाले, ते तुला ऐकविले॥ २३८॥ आता सत्वादि तीन गुणांमुळे ते विशेष तीन प्रकारचे कसे होते तेहि सांगतो. चांगले लक्ष देऊन ऐक॥ २३९॥

**श्रद्धया परया तप्तं तपस्तत्त्रिविधं नरैः। अफलाकाङ्क्षिभिर्युक्तैः सात्त्विकं परिचक्षते॥ १७॥**

**अर्थ**—कायिक, वाचिक, मानसिक हे तीन प्रकारचे तप अत्यंत श्रद्धेने व फळाची-म्हणजे विषयसुखाची-यत्किंचितहि इच्छा न करणाऱ्या व निश्चल चित्त झालेल्या पुरुषाने केले असता सात्विक म्हटले जाते॥ १७॥

**तरी हेंचि तप त्रिविधा। जें दाविलें तुज प्रबुद्धा। तेंचि करीं पूर्णश्रद्धा। सांडूनि फळ॥ २४०॥**
**जैं पुरतिया सत्त्वशुद्धी। आचरिजे आस्तिक्यबुद्धी। तैं तयातेंचि गा प्रबुद्धीं। सात्त्विक म्हणिपे॥ २४१॥**

**अर्थ**—हे शाहाण्या अर्जुना! तुला कायिक, वाचिक, मानसिक असे जे तीन प्रकारचे तप सांगितले ते फलाशा सोडून अत्यंत श्रद्धेने कर॥ २४०॥ जेव्हा नि:शेष विकल्परहित पूर्ण आस्तिक्यबुद्धीने हे तप करावे, तेव्हा सूज्ञ लोक त्याला सात्विक तप म्हणतात॥ २४१॥

**सत्कारमानपूजार्थं तपो दम्भेन चैव यत्। क्रियते तदिह प्रोक्तं राजसं चलमध्रुवम्॥ १८॥**

**अर्थ**—आपला सत्कार-मान-पूजा करून घेण्याकरिता म्हणून जे तप दंभाने केले जाते त्याचे फळ अनियमित व अस्थिर असल्यामुळे त्याला राजस तप म्हटले आहे॥ १८॥

**नातरी तपस्थापनेलागीं। दुजेपण मांडूनि जगीं। महत्त्वाद्रीच्या शृंगीं। बैसावया॥ २४२॥**
**त्रिभुवनींचिया सन्माना। न वचावें ठाया आना। धुरेचिया आसना। भोजनालागीं॥ २४३॥**
**विश्वाचिया स्तोत्रा। आपण होआवया पात्रा। विश्वें आपलिया यात्रा। कराविया यावें॥ २४४॥**
**लोकांचिया विविधा पूजा। आश्रयो न धरावया दुजा। भोग भोगावें वोजां। महत्त्वाचिये॥ २४५॥**
**आंगा बोल माखूनि तपें। विकावया आपणपें। अंगहीन पडपे। जियापरी॥ २४६॥**
**हें असो धनमानीं आस। वाढउनी तप कीजे सायास। तैं तेंचि तप राजस। बोलिजे गा॥ २४७॥**

**अर्थ**—किंवा तपाची प्रतिष्ठा करण्याकरिता जगात द्वैत भावाचे प्रतिपादन करून श्रेष्ठपणाच्या पर्वतशिखरावर बसण्याकरिता, त्रिभुवनात असलेल्या श्रेष्ठत्वाच्या मानाने माझ्यावाचून दुसरीकडे जाऊ नये व आसन भोजन इत्यादि वेळेचा पहिला मान मिळावा म्हणून, सर्व जगात आपलीच स्तुति गायिली जावी व आपल्या दर्शनाकरिता लोकांनी यात्रा कराव्या म्हणून, लोकांच्या नाना प्रकारच्या पूजेने माझ्यावाचून दुसरा आश्रय धरू नये व मोठेपणाच्या रीतीने-

म्हणजे महंत होऊन-भोग भोगावे म्हणून, ज्याप्रमाणे एखादे आंग नसलेला पुरुष आपल्याला भूषविणाऱ्या अशा वस्त्रादिकांनी सन्मान मिळवितो, त्याप्रमाणे स्तुतिस्तोत्रादिकांनी व मानसन्मानद्वारा आपल्याला विकण्याकरिता आपले मोठेपण दिसेल असे शब्द तपाचे द्वारा लोकांकडून माखून घेतो-म्हणजे लावून घेतो॥ २४२-२४६ ॥ हे असो. धन-मान मिळविण्याची आशा वाढवून ते मिळविण्याकरिता जे कष्टप्रद तपकरावे, त्या तपाला राजस-तप म्हणतात. ॥ २४७ ॥

**परी पहुरणीं जें दुहिलें। तैं तें गुरूं न दुभेचि व्यालें। का उभें शेत चारिलें। पिकावया नुरे॥ २४८॥**
**तैसें फोकारितां तप। कीजे जें साक्षेप। तें फळीं तंव सोप। नि:शेष जाय॥ २४९॥**
**ऐसें निर्फळ देखोनि करितां। माझारीं सांडी पांडुसुता। म्हणौनि नाहीं स्थिरता। तपा तया॥ २५०॥**
**एऱ्हवीं तरी आकाश मांडी। जो गर्जोनि ब्रह्मांड फोडी। तो अवकाळु मेघ काय घडी। राहात आहे॥ २५१॥**
**तैसें राजस तप जें होये। तें फळीं कीर वांझ जाये। परी आचरणींही नोहे। निर्वाहतें गा॥ २५२॥**
**आतां तेंचि तप पुढती। तामसाचिये रीती। पैं परत्रा आणि कीर्ती। मुकोनि कीजे॥ २५३॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे पहुरणी नावाच्या कीड्याने झालेल्या ओटीच्या रोगात दूध काढून घेतले असता गाय किंवा म्हैस व्याली तरी दूध देत नाही किंवा चांगले उगवलेले शेत चारले गेले असता हाती पीक येण्यास काही उरत नाही॥ २४८॥ त्याप्रमाणे हट्टाने केले जाते व ज्याचा लोकात बडेजाव माजविला जातो ते तप अगदी निष्फळ होते॥ २४९॥ असे हे तप निष्फळ होते हे जाणून मध्येच ते टाकून दिले जाते, म्हणून या तपाला, अर्जुना! स्थिरता नसते॥ २५०॥ नाही तरी, जो अकाळ मेघ आकाशात भरून गर्जनेने ब्रह्मांड भेदरून सोडतो तो घटकाभर तरी राहतो काय?॥ २५१॥ त्याप्रमाणे राजस तप जे आहे, ते फळाच्या दृष्टीने खरोखर वांझ होते व त्याचे आचरणहि टिकणारे नसते॥ २५२॥ आता तेच तप तमोगुणी पुरुषाकडून परलोकप्राप्तीची व कीर्तीची पर्वा न करता या प्रकारे केले जाते॥ २५३॥

**मूढग्राहेणात्मनो यत्पीडया क्रियते तपः। परस्योत्सादनार्थं वा तत्तामसमुदाहृतम्॥ १९॥**

**अर्थ**—देह म्हणजेच आत्मा अशा दृढ अविवेकी अंत:करणाने आपल्या देहाला अत्यंत पीडा देऊन किंवा दुसऱ्याचा नाश करण्याकरिता जे तप केले जाते, त्याला तामस तप म्हटले आहे॥ १९॥

**केवळ मूर्खपणाचा वारा। जीवीं घेऊनि धनुर्धरा। नाम ठेविजे शरीरा। वैरियाचें॥ २५४॥**
**पंचाग्नीची दडगी। खोलवीजती शरीरालागीं। कां इंधन कीजे हें आगी-। आंतु लावी॥ २५५॥**
**माथां जाळिजती गुगुळु। पाठीं घालिजती गळु। आंग जाळिती इंगळु। जळतभीतां॥ २५६॥**
**दवडोनि श्वासोश्वास। कीजती वायांचि उपवास। कां घेपती धूमाचे घांस। अधोमुखें॥ २५७॥**
**हिमोदकें आकंठें। खडकें सेविजती तटें। जितया मांसाचे चिमुटे। तोडती जेथ॥ २५८॥**
**ऐसी नानापरी हे काया। घाय सूतां पैं धनंजया। तप कीजे नाशावया। पुढिलातें॥ २५९॥**

**अर्थ**—अर्जुना! केवळ अविचारी अंत:करणाने देहाला शत्रु समजून त्याला अत्यंत पीडा देत, देह तापविण्याकरिता पंचाग्नीची ज्वाळा लावतात किंवा शरीराला अग्नीत लावण्याचे इंधनच समजतात॥ २५४-२५५॥ माथ्यावर गुग्गुल जाळतात, पाठीला गळ घालतात, जळत असता ज्याला लोक भितात, अशा प्रखर निखाऱ्याने आंग जाळतात॥ २५६॥ श्वासोच्छ्वास घालवून व्यर्थ उपवास करतात किंवा खाली डोके वर पाय असे अधोमुख होऊन पंचाग्नि साधन करीत धूमाचे घास घेतात॥ २५७॥ ज्या तपात अत्यंत थंडीच्या दिवसात आकंठ पाण्यात बुडून किंवा नदीचे तीरावर किंवा खडकावर राहतात. जिवंतपणी आपल्या आंगच्या मांसाचे लचके तोडतात॥ २५८॥ अर्जुना! याप्रमाणे नाना प्रकारे या शरीरावर घाव घालून किंवा दुसऱ्याचा नाश करण्याकरिता जे तप केले जाते॥ २५९॥

**आंगभारें सुटला धोंडा। आपण फुटोनि होय खंडखंडा। कां आड जालियातें रगडा। करी जैसा॥ २६०॥**
**तेवीं आपलिया आटणिया। सुखें असतया प्राणिया। जियावया शिराणिया। कीजती गा॥ २६१॥**
**किंबहुना हे वोखटी। घेऊनि क्लेशाची हातवटी। तप निफजे तें किरीटी। तामस होय॥ २६२॥**

**एवं सत्त्वादिकांच्या आंगीं। पडिलें तप तिही भागीं। जालें तेंही तुज चांगी। दाविलें व्यक्ती॥ २६३ ॥**
**आतां बोलतां प्रसंगा। आलें म्हणोनि पैं गा। करूं रूप दानलिंगा। त्रिविधा तया॥ २६४॥**
**येथ गुणाचेनि बोलें। दानही त्रिविध असे जालें। तेंचि आइक पहिलें। सात्त्विक ऐसें॥ २६५॥**

**अर्थ**—उंचावरून आंगभाराने घसरलेल्या दगडाचे ज्याप्रमाणे तुकडे तुकडे होतात व त्याच्या आड येणाऱ्या वस्तूंचाहि तो चुराडा करतो॥ २६०॥ त्याप्रमाणे शरीराला अत्यंत दुःख देऊन सुखी असलेल्या प्राण्यांचा नाश करण्याची आपली इच्छा पुरी करून घेतात॥ २६१॥ फार काय सांगावे! अर्जुना! अशी ही आपल्याला दुःख देण्याची दुष्ट पद्धत स्वीकारून जे तप निष्पन्न होते, त्याला तामस तप म्हणतात॥ २६२॥ याप्रमाणे सत्व, रज, तम या तीन गुणांमुळे त्रिविध झालेल्या तपाचे उत्तम रीतीने वर्णन करून सांगितले॥ २६३॥ आता बोलताना प्रसंगाने आले म्हणून दान जे तीन प्रकारचे आहे, त्यांच्या चिन्हाचे स्वरूप वर्णन करतो॥ २६४॥ येथे गुणांच्या योगाने दानहि तीन प्रकारचे झाले आहे. प्रथम जे सात्विक दान, ते सांगतो, ऐक॥ २६५॥

**दातव्यमिति यद्दानं दीयतेऽनुपकारिणे। देशे काले च पात्रे च तद्दानं सात्त्विकं स्मृतम्॥ २०॥**

**अर्थ**—कुरुक्षेत्रादि पुण्यक्षेत्रात, संक्रात्यादि पुण्यकाली व उपकार फेडण्यास असमर्थ अशा वेदपारंगत ब्राह्मणास केवळ द्यायचे म्हणून जे दान दिले जाते ते सात्विक दान होय॥ २०॥

**तरी स्वधर्माआंतौतें। जें जें मिळे आपणयातें। तें तें दीजे बहुतें। सन्मानयोगें॥ २६६॥**
**जालया सुबीजप्रसंगु। पडे क्षेत्रवाफेचा पांगु। तैसाचि दानाचा हा लागु। देखतसें॥ २६७॥**
**अनर्घ्य रत्न हाता चढे। तैं भांगाराची वोढी पडे। दोनीं जालीं तरी न जोडे। लेतें आंग॥ २६८॥**
**परी सण सुहृद संपत्ती। हे तिन्ही येकीं मिळती। जैं भाग्य धरी उन्नती। आपुल्याविषीं॥ २६९॥**
**तैसें निफजवावया दान। जैं सत्त्वासि ये संवाहन। तैं देश काळ भाजन। द्रव्यही मिळे॥ २७०॥**
**तरी आधीं तंव प्रयत्नेंसीं। होआवें कुरुक्षेत्र कां काशी। नातरी तुके जो इहींसीं। तो देशही हो॥ २७१॥**
**तेथ रविचंद्राहुमेळु। होतां पाहे पुण्यकाळु। कां तयासारिखा निर्मळु। आनुही जाला॥ २७२॥**
**तैशा काळीं तिये देशीं। होआवी पात्रसंपत्ती ऐसी। मूर्ति आहे धरीली जैसी। शुचित्वेंचि कां॥ २७३॥**
**आचाराचें मूळपीठ। वेदांची उतारपेठ। तैसें द्विजरत्न चोखट। पावोनियां॥ २७४॥**
**मग तयाचे ठाईं वित्ता। निवर्तवावी स्वसत्ता। परी प्रियापुढें कांता। रिगे जैसेनि॥ २७५॥**

**अर्थ**—स्वधर्माने वागत असताना जे जे आपल्याला मिळेल ते ते अत्यंत सन्मान करून द्यावे॥ २६६॥ ज्याप्रमाणे प्रसंगाने उत्तम बीज सापडले तरी उत्तम वाही केलेल्या जमिनीच्या वाफ्याची उणीव असते, तशीच या सात्विक दानाची स्थिति दिसून येते॥ २६७॥ एखादे वेळी बहूमोल रत्न हाती आले तरी त्याला कोंदण करण्याकरिता सोन्याची टंचाई भासते व रत्न आणि सोने दोन्ही प्राप्त झाली तरी ज्या शरीरावर ते लेणे शोभून दिसेल असे सुंदर शरीर सापडत नाही॥ २६८॥ आपल्या भाग्याचा उत्कर्ष झाला असताच दीपावळीसारखे सण, इष्टमित्र व द्रव्यसंपत्ति या तिहींचा एके ठिकाणी मेळ होतो॥ २६९॥ त्याप्रमाणे उत्कृष्ट प्रकारचे दान घडवून आणण्याकरिता जेव्हा सत्वगुण साह्यभूत होतो, तेव्हा योग्य देश, काळ, पात्र-ब्राह्मण व द्रव्य या सर्वांचा मेळ घडून येतो॥ २७०॥ म्हणून प्रथम कुरुक्षेत्र किंवा काशी त्याच्या बरोबरीचा दुसरा असा देश प्रयत्नाने मिळवावा॥ २७१॥ मग तेथे राहूचा चंद्रसूर्याशी मेळ म्हणजे सूर्यचंद्रादि ग्रहणासारखा किंवा त्याच्या बरोबरीचा दुसरा शुद्ध पुण्यकाल प्राप्त व्हावा॥ २७२॥ तसेच त्या पुण्य देशात त्या पुण्यकाळी दानाला सत्पात्र जणु काय शुचित्वाची मूर्तिच घडविली, असा ब्राह्मण असावा॥ २७३॥ जो धर्माचरणाचे मुख्य पीठ व सर्व वेदांची उतरण्याची जागा आहे असे म्हणता येईल, असा रत्नभूत ब्राह्मण प्राप्त करून घेऊन॥ २७४॥ मग ज्याप्रमाणे पतिव्रता स्त्री आपली यत्किंचितहि स्वतंत्र सत्ता न वागविता दासी समजून आपल्या प्रिय पतिपुढे जाते, त्याप्रमाणे आपली काही एक सत्ता न ठेवता त्या ब्राह्मणाला दान द्यावे॥ २७५॥

**कां जयाचें ठेविलें तया। देऊनि होइजे उतराइया। नाना हडपें विडा राया। दिधला जैसा॥ २७६॥**

**तैसेनि निष्कामें जीवें। भूम्यादिक अर्पावे। किंबहुना हांवे। नेदावें उठों॥ २७७॥**
**आणि दान जया द्यावें। तयातें ऐसेया पाहावें। जया घेतलें नुमचवे। कायसेंनही॥ २७८॥**
**साद घातलिया आकाशा। नेदी प्रतिशब्दु जैसा। कां पाहिला आरसा। येरीकडे॥ २७९॥**
**नातरी उदकाचिये भूमिके। आफळिलेनि कंदुकें। उधळौनि कवतिकें। न येइजे हाता॥ २८०॥**
**नाना वसो घातला चारू। माथां तुरंबिला बुरू। न करी प्रत्युपकारू। जियापरी॥ २८१॥**
**तैसें दिधलें दातयाचें। जो कोणेही आंगें नुमचे। अर्पिलया साम्य तयाचें। कीजे पैं गा॥ २८२॥**
**ऐसिया जें सामग्रिया। दान निफजे वीरराया। तें सात्त्विक दान वरिया। सर्वांही जाण॥ २८३॥**

**अर्थ**—किंवा जसे ज्याचे ठेवलेले धन त्याला परत देऊन उतराई व्हावे किंवा ज्याप्रमाणे विडा देणारा राजाचा सेवक राजाचाच विडा राजाला देतो॥ २७६॥ त्याप्रमाणे कशाचीहि यत्किंचित हाव न धरता निष्काम चित्ताने भूम्यादिक पदार्थाचे दान करावे॥ २७७॥ आणि ज्याला दान द्यावयाचे तो असा पाहावा की ज्याच्याने कोणत्याहि रीतीने दानाची फेड करवणार नाही॥ २७८॥ ज्याप्रमाणे आकाशाला हाक मारली असता ते प्रत्युत्तर देत नाही किंवा आरसा पाठीमागून पाहिला असता त्यात प्रतिबिंब पडत नाही॥ २७९॥ अथवा पाण्याच्या पृष्ठभागावर चेंडू आपटला असता तो उसळत नाही म्हणून हाती घेता येत नाही॥ २८०॥ किंवा ज्याप्रमाणे पोळाला चारा घातला असता अथवा कृतघ्नाला डोक्यावर घेतले तरी तो प्रत्युपकार करीत नाही॥ २८१॥ त्याप्रमाणे जो पुरुष दात्याने दिलेल्या दानाची कोणत्याहि आंगाने परतफेड करू शकणार नाही, अशा पुरुषाला दान दिल्यानंतर त्या दानाचे त्याच्याशी साम्य करावे- म्हणजे मी काही दान केले अशी जाणीव उरू न देता त्याचेच त्याला दिले असा भाव धरावा॥ २८२॥ असा सामग्रीने जे दान केले जाते, हे वीरामध्ये श्रेष्ठ असलेल्या अर्जुना! ते सर्व दानापेक्षा श्रेष्ठ असे सात्विक दान होय, असे जाण॥ २८३॥

**यत्तु प्रत्युपकारार्थं फलमुद्दिश्य वा पुनः। दीयते च परिक्लिष्टं तद्दानं राजसं स्मृतम्॥ २१॥**

**अर्थ**—जे दान आपल्यावर परत उपकार व्हावा या इच्छेने अथवा फळाच्या इच्छेने व कष्टी अंतःकरणाने दिले जाते ते राजस दान होय, असे सांगितले आहे॥ २१॥

**आणि तोचि देशु काळु। घडे तैसाचि पात्रमेळु। दानभागुही निर्मळु। न्यायगतु॥ २८४॥**
**परी मनीं धरूनि दुभतें। चारिजे जेवीं गाईतें। का पेंव करूनि आइतें। पेरूं जाइजे॥ २८५॥**
**नाना दिठी घालूनि आहेरा। अवंतु जाइजे सोयिरा। का वाण धाडिजे घरा। वोवसीयाचे॥ २८६॥**
**पैं कळांतर गांठीं बांधिजे। मग पुढिलांचें काज कीजें। पूजा घेऊनि रसु दीजे। पीडितांसी॥ २८७॥**
**ऐसें जया जें दान देणें। तो तेणेंचि गा जीवनें। पुढती भुंजावा भावे येणें। दीजे जें का॥ २८८॥**
**अथवा कोणी वाटे जातां। घेतलें उमचों न शकता। मिळे जैं पांडुसुता। द्विजोत्तम॥ २८९॥**
**तरी कवड्या एकासाठीं। अशेषां गोत्रांचींच किरीटी। सर्व प्रायश्चित्तें सुये मुठी। तयाचिये॥ २९०॥**
**तेवींचि पारलौकिकें। फळें वांछिजती अनेकें। आणि दीजे तरी भुके। येकाही नोहे॥ २९१॥**
**तेंही ब्राह्मण नेवों सरे। कीं हाणिचेनि शिणें झांसुरे। सर्वस्व जैसें चोरें। नागऊनि नेलें॥ २९२॥**
**काय बहु सांगों सुमती। जें दीजे या मनोवृत्ती। तें दान गा त्रिजगतीं। राजस पैं॥ २९३॥**

**अर्थ**—आणि सात्विक दानाप्रमाणे, देश, काल, पात्र यांचा मेळ मिळून दानाचे द्रव्यहि स्वधर्मानेच मिळविलेले शुद्ध असले॥ २८४॥ तरी ज्याप्रमाणे दुधाची आशा करून गायीला चारा घालावा किंवा पेवात धान्य साठविले गेले पाहिजे या इच्छेने पेव खोदून तयार करून मग शेतात धान्य पेरायला जावे॥ २८५॥ किंवा अहेराकडे दृष्टि ठेवून सोयऱ्यांना आमंत्रण द्यावे किंवा वायन परत यावे या इच्छेने व्रतस्थ असलेल्या स्त्रियेच्या घरीच वायन पाठवावे॥ २८६॥ आधी व्याज कनवटीस लावून, मग पैसा मागायला आलेल्या पुरुषाचे काम भागवावयाचे, दुःखी रोगी असला तरी आधी आपला सन्मान करून घेऊन-म्हणजे पैसे घेऊन मग त्याला औषधि द्यावयाची॥ २८७॥

त्याप्रमाणे ज्याचे दान देणे त्याच्या जीवनाचे एक साधनच असते. आपण दान दिल्यानंतर दान घेणाऱ्यांनी आपल्यावर पुन: उपकार केला पाहिजे, अशी इच्छा ठेऊनच जे दान दिले जाते ॥ २८८ ॥ अथवा, अर्जुना! जो घेतलेल्या दानाची परतफेड करण्यास असमर्थ आहे, असा ब्राह्मण वाटेने जाताना आढळल्यास ॥ २८९ ॥ अर्जुना! एक कवडी दान देऊन आपल्या व आपल्या संपूर्ण गोत्रजांच्या पापांच्या प्रायश्चित्ताचे पाणी त्याच्या हातावर सोडतो ॥ २९० ॥ त्याप्रमाणेच जे थोडकेसे दान देतो तेवढ्यानेच मेल्यानंतर अनेक प्रकारची फळे प्राप्त व्हावी, अशी आशा करतो आणि दिलेले दान, एकदा तरी भूक शमेल, इतक्यापुरतेहि नसते ॥ २९१ ॥ ते अल्पसे दान ब्राह्मण घेऊन जाऊ लागला असता जणु काय चोरांनी घर लुटून नागविले असा कष्टी होऊन तो झुरतो ॥ २९२ ॥ हे शुद्धबुद्धि अर्जुना! फार काय सांगू! अशा मनोवृत्तीने जे दान दिले जाते ते दान त्रैलोक्यात राजस म्हटले जाते ॥ २९३ ॥

**अदेशकाले यद्दानमपात्रेभ्यश्च दीयते। असत्कृतमवज्ञातं तत्तामसमुदाहृतम् ॥ २२ ॥**

**अर्थ**—अपवित्र देशकालाचे ठिकाणी, अपवित्र पात्राला, काही पूजादि सत्कार न करता उलट त्याची अवहेलना करून जे दान दिले जाते ते दान तामस म्हटले आहे ॥ २२ ॥

**मग म्लेंच्छांचे वसौटे। दांगाणें हन कैकटे। कां शिबिरें चोहटे। नगरींचे ते ॥ २९४ ॥**
**तेही तेंही ठाईं मिळणी। समयो सांजवेळ कां रजनी। तेव्हां उदार होणें धनीं। चोरियेच्या ॥ २९५ ॥**
**पात्रें भाट नागारी। सामान्य स्त्रिया का जुवारी। जियें मूर्तिमंतें भुररीं। भुले तयां ॥ २९६ ॥**
**रूपानृत्याची पुरवणी। ते पुढां डोळेभारणी। गीत भाटींव तो श्रवणीं। कर्णजप ॥ २९७ ॥**
**तयाहीवरी आळुमाळु। जैं घे फुलागंधाचा गुगुळु। तंव भ्रमाचा तो वेताळु। अवतरे तैसा ॥ २९८ ॥**
**तेथ विभांडुनियां जग। आणिले पदार्थ अनेग। तेणे घालूं लागे मातंग-। गवादीसी ॥ २९९ ॥**
**एवं ऐसेनि जें जे देणें। तें तामसदान मी म्हणें। आणि घडे दैवगुणें। आणिकही एक ॥ ३०० ॥**

**अर्थ**—मग अपवित्र अशा म्लेछांनी वसविलेली स्थाने, अरण्ये, धर्मकृत्यास अयोग्य ठरलेले देश किंवा शहरातील छावण्या व चौरस्ते ॥ २९४ ॥ अशा ठिकाणी, संध्यासमयी किंवा रात्री, चोरी अपकार इत्यादि द्वारा मिळविलेल्या धनाचे, भाट, गारुडी, वेश्या, जुगारी अशा भ्रमात पाडणाऱ्या मूर्तिमंत भुलीचे ठिकाणी भुलून जाऊन, दान देण्यास उदार होणे. त्यातहि त्यांच्या रूपाची व नाचण्याची भर म्हणजे डोळ्याला पाडणारी भुरळ असून त्यांचे गायन व स्तुति हे तर कानात गुणगुणणारे जपच होत ॥ २९५-२९७ ॥ त्यातहि फुल, गंध, गुग्गुळाचा धूप यांचा संयोग झाला असता भ्रमाचा तो वेताळ जसा प्रगट होतो ॥ २९८ ॥ मग जगाला नागवून आणलेले जे अनेक पदार्थ त्यांच्या योगाने माहार, मांग यांच्याकरिता अन्नछत्र घालतो ॥ २९९ ॥ अशा रीतीने द्रव्याचा विनियोग करणे, याला मी तामस दान म्हणतो. किंवा दैवयोगाने असेहि घडून येते, ते सांगतो, ऐक ॥ ३०० ॥

**विपायें घुणाक्षर पडे। टाळिये काउळा सांपडे। तैसें तापसां पर्व जोडे। पुण्यदेशीं ॥ ३०१ ॥**
**तेथ देखोनि तो आथिला। योग्यु मागोंही आला। तोही दर्पा चढला। भांबावे जरी ॥ ३०२ ॥**
**तरी श्रद्धा न धरी जीवीं। तया माथाही न खालवी। स्वयें न करी ना करवी। अर्घ्यादिक ॥ ३०३ ॥**
**आलिया न घाली बैसों। तेथ गंधाक्षतांचा काय अतिसो। हा अप्रसंग कीर असो। तामसीं नरीं ॥ ३०४ ॥**
**पैं बोळविजे रिणाइतु। तैसा झकवी तयाचा हातु। तूं करणें याचा बहुतु। प्रयोगु तेथ ॥ ३०५ ॥**
**आणि जया जें दे किरीटी। तयातें उमाणी तयासाठीं। मग कुबोलें कां लोटी। अवज्ञाचि ॥ ३०६ ॥**
**हें बहु असो यापरी। मोल वेंचणें जें अवधारीं। तया नांव चराचरीं। तामस दान ॥ ३०७ ॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे किड्याचे लाकडात कोरणे अकस्मात अक्षरासारखे होते किंवा दोन हातांनी टाळी वाजविली असता अकस्मात त्यात कावळा सापडतो, त्याप्रमाणे तामस दान करणाऱ्यांना दानप्रसंगी अकस्मात पुण्यदेशकालाचाहि सुयोग घडून येतो ॥ ३०१ ॥ तेव्हा दानदाता संपन्न आहे, असे पाहून धर्माचरणसंपन्न व दानाची फेड करण्यास असमर्थ असा योग्य दानपात्र ब्राह्मण दान मागण्यास आला असता तो तामसदानकर्ता गर्वाने फुगून जाऊन जरी गडबडून

जातो॥ ३०२॥ तरी अंत:करणात श्रद्धा धरीत नाही; त्याला नमस्कार करीत नाही व स्वत: किंवा दुसऱ्या कोणाकडून तरी अर्घ्यदानादिकांनी त्याची पूजा करित नाही॥ ३०३॥ असा ब्राह्मण आलेला पाहून जेथे त्याला बसायला आसन घातले जात नाही तेथे गंधाक्षतेचा विशेष सत्कार कोठून असणार? खरोखर तमोगुणी पुरुषाची अशी अयोग्य वागणूक असते॥ ३०४॥ ज्याप्रमाणे कर्जदार असलेला मनुष्य कर्ज मागायला आला असता जसे त्याला झिटकारावे, त्याप्रमाणे तमोगुणी पुरुषहि दान घेणाऱ्याला झिटकारतो. त्याच्याशी बोलण्यात एकवचनी अपमानकारक 'तू' या शब्दाचा फार प्रयोग करतो॥ ३०५॥ आणि अर्जुना! तो ज्याला जे देतो तीच त्याची किंमत आहे असे म्हणतो व नंतर अपमानकारक असे वाईट शब्द बोलून त्याला घराबाहेर घालवितो॥ ३०६॥ हे पुष्कळ बोलणे आता असो. याप्रमाणे जे द्रव्य खर्च केले जाते त्याला जगतात तामस दान म्हणतात, हे लक्षात ठेव॥ ३०७॥

**ऐसे आपुलाल्या चिन्हीं। अळंकृतें तिन्हीं। दानें दाविलीं अवधानीं। राजतनया॥ ३०८॥**
**तेथ मी जाणत असें। विपायें तूं गा ऐसें। कल्पिसील मानसें। विचक्षणा॥ ३०९॥**
**जे भवबंधमोचक। येकलें कर्म सात्त्विक। तरी कां वेखासी सदोख। येर बोलावीं॥ ३१०॥**
**परी नोसंतितां विवसी। भेटी नाहीं निधीसी। कां धूं न साहतां जैसी। वाती न लगे॥ ३११॥**
**तैसें शुद्धसत्त्वाआड। आहे रजतमाचें कवाड। तें भेदणेंयातें कीड। म्हणावें का॥ ३१२॥**
**आम्हीं श्रद्धादि दानांत। जें समस्तही क्रियाजात। सांगितलें का व्याप्त। तिहीं गुणीं॥ ३१३॥**
**तेथ भरंवसेनि तिन्ही। न सांगोंचि ऐसें मानीं। परी सत्त्व दावावया दोन्ही। बोलिलों येरें॥ ३१४॥**
**जें दोहींमाजीं तिजें असे। तें दोन्हीं सांडितांचि दिसे। अहोरात्रत्यागें जैसें। संध्यारूप॥ ३१५॥**
**तैसें रजतमविनाशें। तिजें जें उत्तम दिसे। तें सत्त्व हें आपैसें। फावासि ये॥ ३१६॥**
**एवं दावावया सत्त्व तुज। निरूपिलें तम रज। तें सांडूनि सत्त्वें काज। साधीं आपलें॥ ३१७॥**

**अर्थ**—याप्रमाणे, हे राजपुत्रा अर्जुना! त्यांच्या त्यांच्या अलंकृत असलेल्या लक्षणांनी युक्त अशी तीन प्रकारची दाने त्यांच्या निरनिराळ्या नावासह तुला सांगितली॥ ३०८॥ हे शाहाण्या अर्जुना! येथे मी असे जाणतो की कदाचित तू आपल्या मनात अशी कल्पना करशील॥ ३०९॥ की जर एकटे सात्विक कर्म संसारबंधनाचा नाश करणारे आहे तर, मग त्या व्यतिरिक्त दोषयुक्त म्हणून वाईट अशी इतर कर्मे कां सांगितली जावी॥ ३१०॥ ज्याप्रमाणे पुरुन ठेवलेल्या द्रव्यावर बसविलेले पिशाच्च दूर केल्यावाचून त्या द्रव्याला हात लावता येत नाही. किंवा धूर सहन केल्यावाचून वात उजळली जाऊ शकत नाही॥ ३११॥ त्याप्रमाणे शुद्ध सत्वाच्या आड त्याला प्रतिबंधक होणारे जे रजोतमोगुणाचे कवाड आहे, त्याची मोडतोड करण्याला वाईट कां म्हणावे?॥ ३१२॥ आम्ही ज्या ज्या सत्व-रज-तम या गुणांनी व्यापून असलेल्या श्रद्धेपासून दानापर्यंतच्या सर्व क्रिया सांगितल्या॥ ३१३॥ त्या सर्व क्रिया, खरोखर करण्याकरिता म्हणून सांगितल्या नाहीत, हे पक्के समज. पण त्यात सात्विक क्रियांचे स्वरूप स्पष्ट करण्याकरिताच बाकीच्या दोन राजस, तामस क्रियाहि सांगितल्या आहेत॥ ३१४॥ ज्याप्रमाणे दिवस व रात्र यांचा त्याग केला असता संध्याकाळ सापडते, त्याप्रमाणे रजोगुण-तमोगुण यांच्यामध्ये असलेला सत्वगुण, त्या दोघांचा त्याग केल्याबरोबर, अनायासे स्पष्ट होतो॥ ३१५॥ तसेच रज-तमाचा नाश झाला असता उरलेला जो तिसरा गुण चांगला आहे, असे दिसते. तो सत्वगुण होय हे स्पष्ट कळून येते॥ ३१६॥ याप्रमाणे सत्वगुण स्पष्ट करून दाखविण्याकरिताच रज-तमोगुणांचे निरूपण केले आहे; म्हणून, अर्जुना! रज-तमगुण नाहीसे करून सत्वगुणाच्या योगाने आपले मोक्षरूपी कार्य साधून घे॥ ३१७॥

**सत्त्वेंचि येणें चोखाळें। करीं यज्ञादिकें सकळे। पावसी तैं करतळें। आपलें निज॥ ३१८॥**
**सूर्यें दाविले सांतें। काय एक न दिसे तेथें। तेवीं सत्त्वें केलें फळातें। काय नेदी॥ ३१९॥**
**हे कीर आवडतांविखीं। शक्ति सत्त्वीं आथी निकी। परी मोक्षेंसी एकी। मिसळणें जें॥ ३२०॥**
**तें एक आनचि आहे। तयाचा मोक्ष सावावो जैं लाहे। तैं मोक्षाचाही होये। गांवीं सरतें॥ ३२१॥**

**पैं भांगार जऱ्ही पंधरें। तऱ्ही राजावळीचीं अक्षरें। लाहें तैंचि सरे। जियापरी॥ ३२२॥**
**स्वच्छें शीतळें सुगंधें। जळें होतीं सुखप्रदें। परी पवित्रत्व संबंधें। तीर्थाचेनि॥ ३२३॥**
**नदी हो कां भलतैसी थोरी। परी गंगा जैं अंगीकारी। तैंचि तिये सागरीं। प्रवेशु गा॥ ३२४॥**

**अर्थ**—या शुद्धसत्वाच्या योगाने तू आपली संपूर्ण यज्ञादिक कर्मे कर म्हणजे तुझे मूळचे स्वरूप तुझ्या तळहातावर प्राप्त होईल॥ ३१८॥ सूर्याने आपल्या प्रकाशाने दाखविले असता कोणती एक वस्तु दिसणार नाही? त्याप्रमाणे सत्वगुणयुक्त होऊन कर्म केले असता ते काय फळ देणार नाही॥ ३१९॥ इच्छित प्राप्त करून घेण्याकरिता सात्विक कर्माचे ठिकाणी निश्चित शक्ति आहे; पण ज्या एका मोक्षामध्ये परमात्म्याशीं ऐक्य पावणे जे आहे॥ ३२०॥ तो प्रकार एक निराळाच आहे. त्याचे जेव्हा साह्य मिळते, तेव्हा जीव मोक्षाच्या गावीहि प्राप्त होतो॥ ३२१॥ ज्याप्रमाणे पंधरा रुपये किंमतीच्या सोन्याचे ठिकाणी राजाच्या नावाचा शिक्का बसतो तेव्हाच त्याला किंमत येते॥ ३२२॥ किंवा स्वच्छ, शीतळ व सुगंध असे पाणी सुखप्रद होते, परंतु त्याच्या ठिकाणी पवित्रत्व मात्र तीर्थाचा संबंध आला असताच येत असते॥ ३२३॥ नदी कितीहि मोठी असली तरी गंगेने तिचा अंगीकार केला असताच तिचा समुद्रात प्रवेश होईल॥ ३२४॥

**गूढार्थदीपिका**—माउलीच्या या म्हणण्याचे स्पष्टीकरण ज्ञानेश्वरी गूढार्थदीपिका खंड ४-अध्याय १३-ओवी ३७२ मध्ये केले आहे.

**तैसें सात्त्विका कर्मा किरीटी। येतां मोक्षाचिये भेटी। न पडे आडकाठी। तें वेगळें आहे॥ ३२५॥**
**हा बोलु आइकतखेवीं। अर्जुना आधि न माये जीवीं। म्हणे देवें कृपा करावी। सांगावें तें॥ ३२६॥**
**तेथ कृपाळु चक्रवर्ती। म्हणे आईक तयाची व्यक्ती। जेणें सात्त्विक तें मुक्ती-। रत्न देखें॥ ३२७॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे, अर्जुना! सात्विक कर्माच्यायोगाने प्रतिबंध न होता मोक्षप्राप्ति होईल तो प्रकार वेगळा आहे॥ ३२५॥ असे देवाचे बोलणे ऐकताच अर्जुनाच्या अंत:करणात आतुरता मावेनाशी झाली व देवाने कृपा करून मला तो प्रकार सांगावा, असे तो म्हणू लागला॥ ३२६॥ तेव्हा कृपाळु सर्व ब्रह्मांडाचा राजा भगवान् श्रीकृष्ण म्हणाले, अर्जुना! ज्याच्या योगाने सात्विक कर्म मुक्तिरूप रत्न पाहू शकेल तो प्रकार सांगतो, ऐक॥ ३२७॥

**ॐतत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः। ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा॥ २३॥**

**अर्थ**—परब्रह्माचा ॐ, तत, सत् असा तीन प्रकारचा नामनिर्देश केला आहे. या त्रिविध नामनिर्देशद्वाराच ब्राह्मण, वेद व यज्ञ हे तिघे पूर्वी निर्माण केले गेले॥ २३॥

**तरी अनादि परब्रह्म। जें जगदादिविश्रामधाम। तयाचें एक नाम। त्रिधा पैं असे॥ ३२८॥**

**अर्थ**—जगताच्या उत्पत्तीचे व विश्रांतीचे स्थान असे जे अनादि परब्रह्म, त्याचे एकच नाव तीन प्रकारचे आहे॥ ३२८॥

**गूढार्थदीपिका**—''अनादि'' या शब्दाने परब्रह्म उत्पत्तिरहित स्वत:सिद्ध आहे, हे दाखविले आहे.

**जगदादिविश्रामधाम**—सच्चिदानंद, निरवयव, अविकारी अशा परब्रह्माचा भिन्न वस्तुत्वाने व जड-विनाशी अशा भिन्न धर्माने भासणाऱ्या जगताशी जो कारणत्वाने वेदान्तात भ्रान्त संबंध मानला गेला आहे, तो अज्ञानी जीवाच्या भ्रमाला धरूनच मानला गेला आहे व त्याच दृष्टीने परब्रह्माला येथे ''जगदादिविश्रामधाम'' हे विशेषण लावले आहे. वस्तुत: परब्रह्मापासून त्याहून विरूद्ध धर्माचे कार्यच उत्पन्न होणे शक्य नाही.

**तें कीर अनाम अजाती। परी अविद्यावर्गाचिये राती-। माजीं वोळखावया श्रुती। खूण केली ते॥ ३२९॥**

**अर्थ**—ते परब्रह्म खरोखरच शब्दाच्या पलीकडे असल्यामुळे नामावाचून व त्याच्यासारखी दुसरी वस्तु नसल्यामुळे जातिवाचून आहे. परंतु त्या परब्रह्माच्या आधाराने जीवाला भासत असलेल्या अविद्या, अस्मिता, राग, द्वेष अभिनिवेश या ब्रह्मपदाचा विसर पाडणाऱ्या गाढ अंध:कारात न दिसणारे परब्रह्म जीवाला ओळखता यावे म्हणून श्रुतीने परब्रह्माच्या ठिकाणी ही खूण केली आहे॥ ३२९॥

**गूढार्थदीपिका**—वेदान्तात कोठेहि कशाचाहि प्रथम आरंभ मानला नाही. सर्वत्र पूर्व पूर्व संस्कारानुसार उत्तरोत्तर कार्याभिव्यक्ति मानली आहे. येथे नामरूपरहित परमेश्वराला प्रथम केव्हा तरी नाम ठेवले गेले असे समजायचे नसून परमेश्वराचा व नामरूपाचा संबंध अनादि आहे, असेच समजले पाहिजे. फरक एवढाच की अज्ञानी जीवाला जेवढे काही त्याच्या भ्रांतीमुळे नामरूपात्मक जगत् दिसते ते सर्व अनादि, पण आत्मज्ञानाने नाश पावणारे आहे आणि ज्ञानी भक्तांच्या अनुभवास येणारा परमेश्वर, त्याचे नामरूप व त्याची प्रेमवर्धक लीला, यांचा संबंध अनादि व अविनाशी आहे.

**उपजलिया बाळकासी। नांव नाहीं तयापासीं। ठेविलेनि नांवेंसीं। ओ देत उठी॥ ३३०॥**
**कष्टले संसारशिणें। जे देवों येती गाऱ्हाणें। तयां ओ दे नांवे जेणें। तो संकेतु हा॥ ३३१॥**
**ब्रह्माचा अबोला फिटावा। अद्वैतत्त्वें तो भेटावा। ऐसा मंत्रु देखिला कणवा। वेदें बापें॥ ३३२॥**
**मग दाविलेनि जेणें एकें। ब्रह्म आळविलें कवतिकें। मागां असत ठाके। पुढां उभें॥ ३३३॥**
**परी निगमाचळशिखरीं। उपनिषदार्थनगरी। आहाति जे ब्रह्माच्या येकाहारीं। तयांसीच कळे॥ ३३४॥**
**हेंही असो प्रजापती। शक्ति जे सृष्टि करिती। ते जया एका आवृत्ती। नामाचिये॥ ३३५॥**
**पैं सृष्टीचिया उपक्रमा-। पूर्वीं गा वीरोत्तमा। वेडा ऐसा ब्रह्मा। एकला होता॥ ३३६॥**
**मज ईश्वरातें नोळखें। ना सृष्टिही करूं न शके। तो थोरु केला एकें। नामें जेणें॥ ३३७॥**

**अर्थ**—जन्मास आलेल्या बालकास प्रथम नाम नसते, पण ते, ठेवलेल्या नामाने हाक मारली असता, हे आपले नाव आहे, असे समजून ते ''ओ'' देत असते॥ ३३०॥ संसारात अहोरात्र शीण करता करता श्रमलेले जीव जेव्हा आपल्या दु:खाचे निवारण करण्याकरिता परमेश्वराचा धावा करतात, तेव्हा ज्या नावाने मला हाक मारली असता मी धावून येतो, असे भगवंताने आपल्या वेदवाणीने ठरविले किंवा संकेत केला, ते संकेतरूप नाव हेच होय॥ ३३१॥ परब्रह्म अखंड, अफुट, अविकारी असे एकमेव सद्रूप आहे, त्यात यत्किंचितहि बिघाड न होता, त्याची अबोल स्थिति बोलकी होईल व तेच परब्रह्म जीवाशी अद्वैत एकरूप राहून सद्रूपाने जीवाला गोचर होईल असा हा मंत्र कृपाळु बाप वेदाने शोधून काढला आहे॥ ३३२॥ मग वेदाने दाखविलेल्या ज्या एका नाममंत्राने परब्रह्माला आळविले असता दृष्टिआड असलेले परब्रह्मच दृष्टिगोचर होते॥ ३३३॥ परंतु निगमरूपी पर्वताच्या शिखरावरील उपनिषदार्थरूप नगरात राहणाऱ्या परब्रह्माच्या पंक्तीला जे बसले-म्हणजे परब्रह्मस्वरूप झाले. त्यांनाच ते कळून येते॥ ३३४॥ हे असो. प्रजापतीच्या ठिकाणी सृष्टि निर्माण करण्याची जी शक्ति आहे ती त्या एका नामाच्या आवर्तनामुळेच आली आहे॥ ३३५॥ हे वीरश्रेष्ठा अर्जुना! सृष्टि उत्पत्तिपूर्वी सृष्टिउत्पत्तीचे काही एक ज्ञान नसलेला असा ब्रह्मदेव एकटाच होता॥ ३३६॥ तो मज ईश्वराला जाणत नव्हता व सृष्टिहि करू शकत नव्हता, पण या एका नामाने त्याला (मला जाणणारा व सृष्टि निर्माण करणारा असा) थोर केले॥ ३३७॥

**गूढार्थदीपिका**—सूक्ष्म समष्टि लिंगशरीराची अभिमानी देवता जो हिरण्यगर्भ तोच समष्टि स्थूल ब्रह्मांडाची अभिमानी देवता होऊन स्थूल ब्रह्मांड निर्माण करतो अशी पौराणिक सृष्टिउत्पत्तीची प्रक्रिया माउलीला मान्य आहे. प्रलय झाला असता प्रकृतीत लीन झालेल्या ह्या देवता आधिकारिक असल्यामुळे उत्तर सृष्टीत पुन: उत्पन्न होऊन परमेश्वरकृपेने त्यांना पूर्वीच्या कल्पातील सृष्टिसर्जनसामर्थ्य प्राप्त होते, असे आचार्यांनी ब्रह्मसूत्र १-३-३० वरील भाष्यात म्हटले आहे. त्याच सिद्धान्ताचा माउलीने येथे उल्लेख केला आहे.

**जयाचा अर्थु जीवीं ध्यातां। जें वर्णत्रयचि जपतां। विश्वसृजनयोग्यता। आली तया॥ ३३८॥**
**तेधवां रचिले ब्रह्मजन। तयां वेद दिधलें शासन। यज्ञाऐसें वर्तन। जीविकें केलें॥ ३३९॥**
**पाठीं नेणों किती येर। स्त्रजिले लोक अपार। जाले ब्रह्मदत्त अग्रहार। तिन्हीं भुवनें॥ ३४०॥**

**अर्थ**—ॐ, तत्, सत् ज्या तीन वर्णांच्या जपाने व ज्याच्या अर्थरूप परब्रह्माच्या ध्यानाने त्याच्या आंगी सृष्टि उत्पन्न करण्याची योग्यता आली॥ ३३८॥ तेव्हा ब्राह्मणप्रजा निर्माण केली व त्यांना वेदात सांगितल्याप्रमाणे

वागण्याकरिता वेद दिले आणि यज्ञासारखे कर्म त्यांच्या उपजीविकेचे साधन म्हणून नेमून दिले॥ ३३९ ॥ मागाहून किती लोक निर्माण झाले याची गणतीच नाही व तीन लोक ब्रह्मदेवाने त्यांना इनाम करून दिले॥ ३४० ॥

**गूढार्थदीपिका—"जाले ब्रह्मदत्त अग्रहार। तिन्ही भुवने"** तिन्ही भुवनात यज्ञयागादि द्वारा उपजीविका करण्याचा अधिकार दिला.

**ऐसें नाममंत्रें जेणें। धातया अढळचि करणें। तयाचें स्वरूप आइक म्हणे। श्रीकांतु तो॥ ३४१ ॥**

**अर्थ—**ज्या या मंत्राच्या योगाने ब्रह्मदेवाचे स्थान सर्वापेक्षा अढळ केले, त्या मंत्राचे स्वरूप सांगतो, ऐक, असे लक्ष्मीचा पति भगवान श्रीकृष्ण म्हणाला॥ ३४१ ॥

**तरी सर्व मंत्रांचा राजा। तो प्रणवो आदिवर्णु बुझा। आणि तत्कारु जो दुजा। तिजा सत्कार ॥ ३४२ ॥**
**एवं ॐतत्सदाकारु। ब्रह्मनाम हें त्रिप्रकारु। हे फूल तुरंबी सुंदरु। उपनिषदाचे॥ ३४३ ॥**

**अर्थ—**सर्व मंत्रात श्रेष्ठ असा जो प्रणव तो त्या मंत्राचा प्रथम वर्ण असून तत्कार हा दुसरा वर्ण आहे आणि तिसरा वर्ण सत्कार आहे, असे जाण॥ ३४२ ॥ अर्जुना! याप्रमाणे ॐ, तत्, सत् असे परब्रह्माचे तीन प्रकारचे नाम आहे या उपनिषदरूप सुंदर फुलाचा तू वास घे॥ ३४३ ॥

**गूढार्थदीपिका—उपनिषद ते**-उपनिषदात ब्रह्मप्राप्ति करून देणारी ब्रह्मविद्या सांगितली आहे या ब्रह्मनामानेहि ब्रह्मप्राप्तिच होत असल्यामुळे या ब्रह्मनामाला माउलीने येथे "उपनिषद" म्हटले आहे.

**येणेंसीं गा होऊनि एक। जैं चाले कर्म सात्त्विक। तैं कैवल्यातें पाइक। घरींचें करी॥ ३४४ ॥**

**अर्थ—**या तीन वर्णात्मक मंत्राशी एकरूप होऊन सात्विक कर्म होऊ लागले असता ते मोक्षाला घरचा चाकर करते-म्हणजे मोक्ष चाकराप्रमाणे घरी राबतो॥ ३४४ ॥

**परी कापुराचें थळींव। आणूनि देईल दैव। लेवों जाणणेंचि आडव। तेथ असे बापा॥ ३४५ ॥**
**तैसें आदरिजेल सत्कर्म। उच्चारिजेल ब्रह्मनाम। परी नेणिजेल जरी वर्म। विनियोगाचें॥ ३४६ ॥**
**तरी महंताचिया कोडी। घरा आलिया वोढी। मानूं नेणतां परवडी। मुदल तुटे॥ ३४७ ॥**
**कां ल्यावया चोखट। टीक भांगार एकवट। घालूनि बांधली मोट। गळा जेवीं॥ ३४८ ॥**
**तैसें तोंडीं ब्रह्मनाम। हातीं तें सात्त्विक कर्म। विनियोगेंवीण काम। विफळ होय॥ ३४९ ॥**
**अगा अन्न आणि भूक। पासीं असे परी देख। जेऊं नेणतां बाळक। लंघनचि कीं॥ ३५० ॥**
**कां स्नेहासूत्र वैश्वानरा। जालियाही संसारा। हातवटी नेणतां वीरा। प्रकाश नोहे॥ ३५१ ॥**
**तैसें वेळे कृत्य पावे। तेथिंचा मंत्रही आठवे। परी व्यर्थ तें आघवें। विनियोगेंवीण॥ ३५२ ॥**
**म्हणोनि वर्णत्रयात्मक। जें हें परब्रह्मनाम एक। विनियोग तूं आइक। याचा आतां॥ ३५३ ॥**

**अर्थ—**ज्याप्रमाणे दैव, कापराचे अलंकार प्राप्त करून देईल, पण, बा अर्जुना! ते कसे घालावे, हे ठाऊक असण्याचीच तेथे अडचण असते॥ ३४५ ॥ त्याप्रमाणे सात्विक कर्माचे आचरण होईल व या ब्रह्मनामाचाहि उच्चार होईल, पण विनियोगाचे वर्म जर माहीत नसेल॥ ३४६ ॥ तर ज्याप्रमाणे साधुसंतांच्या पंक्ती (समुदाय) आपला लळा वागवून घरी आल्या असता त्यांचा सत्कार करण्याची रीत माहित नसली तर आपल्या साठविलेल्या पुण्याचा क्षय होतो॥ ३४७ ॥ किंवा कोणता अलंकार कोठे घालावा हे माहीत नसताना आंगावर संपूर्ण अलंकार चांगले घालावे म्हणून जडावाचे व सोन्याचे अलंकार गाठोडीत एकत्र करून ती गाठोडी गळ्यात बांधली॥ ३४८ ॥ त्याप्रमाणे तोंडामध्ये परब्रह्माचे नाम आहे आणि हाताने सात्विक कर्म करीत आहे, पण त्या मंत्रांचा विनियोग कसा करायचा, हे माहित नसेल तर ते सर्व निष्फळ होते॥ ३४९ ॥ अर्जुना पोटात भूक लागली आहे व अन्नहि जवळच आहे, पण मुलाला कसे जेवावे हे माहित नसेल तर ते उपाशीच राहील ना!॥ ३५० ॥ किंवा तेल, वात व अग्नि या तिहींचा एकत्र मेळ झाला तरी दिवा उजाळण्याची युक्ति माहित नसली तर, अर्जुना! प्रकाश मिळत नाही॥ ३५१ ॥ त्याप्रमाणे योग्य वेळी कर्म घडत आहे व त्याचा मंत्रहि आठवत आहे, पण ते विनियोगावाचून केले गेले तर सर्व व्यर्थ होते॥ ३५२ ॥ म्हणून ॐ, तत्, सत् हे जे तीन वर्णात्मक परब्रह्माचे नाम आहे त्याचा, आता विनियोग ऐक॥ ३५३ ॥

**तस्मादोमित्युदाहृत्य यज्ञदानतपः क्रियाः। प्रवर्तन्ते विधानोक्ताः सततं ब्रह्मवादिनाम्॥ २४॥**

**अर्थ**—म्हणून वेदवादी ब्राह्मणांच्या यज्ञ, दान, तप इत्यादि शास्त्रात सांगितलेल्या सर्व क्रिया प्रथम ॐकाराचा उच्चार करून नेहमी होत असतात॥ २४॥

**तरी या नामींचीं अक्षरें तिन्हीं। कर्मा आदिमध्यनिदानीं। प्रयोजावीं पैं स्थानीं। इहीं तिन्हीं॥ ३५४॥**

**अर्थ**—तरी परब्रह्माच्या ॐ, तत्, सत् या मंत्राच्या तीन अक्षरांची अनुक्रमे कर्माच्या प्रारंभी, मध्ये व शेवटी अशा तीन स्थानी निश्चित योजना करावी॥ ३५४॥

**गूढार्थदीपिका**—विनियोग-म्हणजे कर्म करताना त्या कर्मात मंत्राचा उपयोग करणे.

**हेचि एकी हातवटी। घेउनी हन किरीटी। आले ब्रह्मविद भेटी। ब्रह्माचिये॥ ३५५॥**
**ब्रह्मेंसीं होआवया एकी। ते न वंचती यज्ञादिकीं। जें चावळलें वोळखी। शास्त्रांचिया॥ ३५६॥**
**तो आदि तंव ओंकारु। ध्यानें करिती गोचरु। पाठीं आणिती उच्चारु। वाचेही तो॥ ३५७॥**
**तेणें ध्यानें प्रकटें। प्रणवोच्चारें स्पष्टें। लागती मग वाटे। क्रियांचिये॥ ३५८॥**
**आंधारीं अभंगु दिवा। आडवीं समर्थु बोळावा। तैसा प्रणवो जाणावा। कर्मारंभी॥ ३५९॥**
**उचितदेवोद्देशें। द्रव्यें धर्म्यें आणि बहुवसें। द्विजद्वारा हन हुताशें। यजिती पैं ते॥ ३६०॥**
**आहवनीयादि वन्ही। निक्षेपरूपीं हवनीं। यजिती पैं विधानीं। फुडे होउनि॥ ३६१॥**
**किंबहुना नाना याग। निष्पत्तीचें घेउनी अंग। करिती नावडतेया त्याग। उपाधींचे॥ ३६२॥**

**अर्थ**—हीच विनियोगाची रीती जाणून घेऊन, अर्जुना! वेदवेत्ते ऋषी कर्मे करीतच परब्रह्माचे भेटीस आले॥ ३५५॥ ज्यांनी निरनिराळ्या शास्त्रांच्या सिद्धांताची ओळख करून घेतली ते परब्रह्माशी ऐक्य होण्यापासून यज्ञादिक कर्मानी आचवले जात नाहीत॥ ३५६॥ प्रथम ध्यानाने ॐकार या अक्षराला प्रत्यक्ष पाहतात व मागाहून वाणीनेहि त्याचा उच्चार करतात॥ ३५७॥ याप्रमाणे ॐकाराचे ध्यान व त्याचा वाणीने स्पष्ट उच्चार झाल्यावर मग क्रिया करायला सांगतात॥ ३५८॥ त्याप्रमाणे आंधारामध्ये केव्हाहि न विझणारा दिवा असावा किंवा आडमार्गाने जाताना जाणता सोबती असावा, त्याप्रमाणे कर्माची प्रारंभी प्रणव आहे असे, समजावे॥ ३५९॥ धर्मानुसार मिळविलेल्या पुष्कळशा द्रव्यांनी, यजनाला योग्य अशा परमात्म्याचे, ब्राह्मण व अग्नि यांचे द्वारा ते यजन करतात॥ ३६०॥ शास्त्रीय विधानात निष्णात होऊन आहवनीयादि अग्नीत टाकल्या जाणाऱ्या आहुतीच्या योगाने ते यजन करतात॥ ३६१॥ फार काय सांगावे! नाना प्रकारचे यज्ञ निष्पन्न करून आत्मप्राप्तीला प्रतिबंधक म्हणून न आवडणाऱ्या उपाधीचा ते त्याग करतात॥ ३६२॥

**का न्याये जोडला पवित्रीं। भूम्यादिकीं स्वतंत्रीं। देशकाळ शुद्धपात्रीं। देती दानें॥ ३६३॥**
**अथवा एकांतरा कृच्छ्रीं। चांद्रायणें मासोपवासीं। शोषोनि गा धातुराशी। करिती तपें॥ ३६४॥**

**अर्थ**—किंवा धर्मानुसार मिळविलेल्या पवित्र अशा स्वतंत्र भूम्यादिकांचे पवित्र अशा काशी इत्यादि क्षेत्रात, संक्रांति इत्यादि पवित्र काली व वेदमूर्ति अशा पवित्र ब्राह्मणाला दान देतात॥ ३६३॥ अथवा एकांतर, कृच्छ्र, चांद्रायण एक महिना उपवास अशी व्रतरूप तपे करतात व शरीरातील धातूचे शोषण करतात॥ ३६४॥

**गूढार्थदीपिका—एकान्तर**-म्हणजे एकदिवसाआड भोजन करणे.

**कृच्छ्र**—पहिले दिवशी दूध, दुसरे दिवशी तूप, तिसरे दिवशी तापलेले, पाणी व चवथे दिवशी उपवास करणे याला कृच्छ्र म्हणतात.

**चांद्रायण**—जसजशी तिथी वाढत जाईल तसतसे मोराच्या अंड्याएवढा ग्रास वाढवित खाणे, असे प्रतिपदेपासून पौर्णिमेपर्यंत करावयाचे व पुन: अमावस्येपर्यंत एक एक ग्रास कमी कमी करीत खाणे, याला चांद्रायण व्रत म्हणतात.

**एवं यज्ञदानतपें। जियें गाजती बंधरूपें। तिहींच होय सोपें। मोक्षाचें तयां॥ ३६५॥**
**स्थळीं नावा जिया दाटिजे। जळीं तियाचि जेवीं तरिजे। तेवीं बंधकीं कर्मीं सुटिजे। नामें येणें॥ ३६६॥**

**परी हें असो ऐसिया। या यज्ञदानादि क्रिया। ओंकारें सावायिलिया। प्रवर्तती॥ ३६७॥**

**अर्थ**—याप्रमाणे जी यज्ञ, दान, तपे बंधनकारक म्हणून प्रसिद्ध झाली आहेत त्यांच्याच योगाने मोक्षप्राप्ति सोपी होते॥ ३६५॥ ज्याप्रमाणे जमिनीवर ज्या नावा अडखळतात त्यांच्याच योगाने जलाशय तरून जाता येतो, त्याप्रमाणे कर्मे बंधनकारक असली तरी या नामाच्या योगाने ती बंधनापासून सुटका करणारी होतात॥ ३६६॥ पण हे असो. अशा या यज्ञदानादि क्रिया ॐकाराचे साह्य घेऊन केल्या जातात॥ ३६७॥

**गूढार्थदीपिका**—प्रथम ॐकारापासूनच उत्पन्न झालेल्या वैदिक क्रिया ॐकाराच्या ध्यानपूर्वक उच्चाराने केल्या असता त्या ॐकारमय होऊन जातात.

**तिया मोटकिया जेथ फळीं। रिगो पाहाती निहाळीं। प्रयोजिती तिये काळीं। तच्छब्दु तो॥ ३६८॥**

**अर्थ**—त्या अल्प अशा यज्ञ-दान-तपादि क्रिया ज्या फळाचे रूपाने फलद्रूप व्हावयाच्या त्या ठिकाणी वेदवेत्ते ब्राह्मण त्या 'तत्' शब्दाचा विनियोग करतात किंवा 'तत्' शब्द लावतात, पाहा!॥ ३६८॥

**तदित्यनभिसन्धाय फलं यज्ञतपः क्रियाः । दानक्रियाश्च विविधाः क्रियन्ते मोक्षकाङ्क्षिभिः ॥ २५ ॥**

**अर्थ**—परमेश्वरप्राप्तिरूप मोक्षाची इच्छा करणारे त्या कर्मांने प्राप्त होणाऱ्या स्वर्गसुखादि कर्मफळाची इच्छा न करता 'तत्' या ब्रह्मवाचक पदाकडे-ईश्वराकडे लक्ष्य देऊन नाना प्रकारची यज्ञतपदानादि क्रिया करतात॥ २५॥

**जे सर्वांही जगापरौतें। जें एक सर्वही देखतें। जें तच्छब्दें बोलिजेतें। पैल वस्तु॥ ३६९॥**
**तें सर्वादिकत्वें चित्तीं। तद्रूप ध्यावूनियां सुमती। उच्चारेंही व्यक्ती। आणिती पुढती॥ ३७०॥**
**म्हणती तद्रूपा ब्रह्मा तया। फळेंसीं क्रिया इयां। तेचि होतु आम्हां भोगावया। कांहींचि नुरो॥ ३७१॥**
**ऐसेनि तदात्मकें ब्रह्में। तेथ उगाणूनि कर्में। आंग झाडिती न ममें। येणें बोलें॥ ३७२॥**
**आतां ओंकारें आदरिलें। तत्कारें समर्पिलें। इया रिती जया आलें। ब्रह्मत्व कर्मा॥ ३७३॥**
**तें कर्म कीर ब्रह्माकारें। जालें तेणेंही न सरे। जे करी तेणेंसी दुसरें। आहे म्हणौनि॥ ३७४॥**
**मीठ आंगें जळीं विरे। परी क्षारता वेगळी उरे। तैसें कर्म ब्रह्माकारें। गमे तें द्वैत॥ ३७५॥**
**आणि दुजें जंव जंव घडे। तंव तंव संसारभय जोडे। हे देवो आपुलेनि तोंडें। बोलती वेदें॥ ३७६॥**
**म्हणोनि परत्वें ब्रह्म असे। तें आत्मत्वें परियवसे। सच्छब्द या रिणादोषें। ठेविला देवें॥ ३७७॥**

**अर्थ**—जी संपूर्ण कार्यकारणरूप जगाच्या पलीकडे आहे, जी सर्वांना जाणते, जी एक अद्वैतस्वरूप असून 'तत्' शब्दाने बोलली जाते, जिला सर्वांच्या पलीकडील वस्तु म्हणतात—म्हणजे जिच्या पलीकडे काही नाही॥ ३६९॥ हे शुद्धबुद्धि अर्जुना! जी सर्वांचे मूळ कारण असल्यामुळे चित्तात 'तत्' रूपाचे ध्यान करून तोंडानेहि त्याचा व्यक्त उच्चार करतात॥ ३७०॥ आणि म्हणतात की फळासह त्या संपूर्ण क्रिया तद्रूप ब्रह्मासच प्राप्त होवोत! आम्हाला भोग भोगण्याकरिता काहीच शिल्लक न राहो!॥ ३७१॥ अशा प्रकारे 'तत्' स्वरूप परब्रह्माचे ठिकाणी सर्व कर्मे समर्पण करून आपण "न मम" असे म्हणून आपले आंग झाडून टाकतात-म्हणजे कर्मावेगळे होतात॥ ३७२॥ ॐकाराने कर्माचा आरंभ करून ते 'तत्' पदाच्या उच्चाराने परब्रह्माचे ठिकाणी समर्पण केले व अशा रीतीने ज्या कर्माला परब्रह्मस्वरूप प्राप्त झाले॥ ३७३॥ ते कर्म निश्चित ब्रह्माकार झाले खरे! पण एवढ्यानेच होत नाही. कारण (कर्म ब्रह्माकार झाले असे म्हणण्याचा, कर्म असून ते ब्रह्माकार झाले, असा अर्थ होत असल्यामुळे) ते कर्म ब्रह्माहून भिन्न राहून द्वैत कायम राहते॥ ३७४॥ मिठाचा खडा अंगाने पाण्यात विरला तरी ज्याप्रमाणे त्याचा खारटपणा निराळा भासतो, त्याप्रमाणे कर्माचे ब्रह्माकार भासणे, हे द्वैतच होय॥ ३७५॥ आणि जोपर्यंत द्वैत भासते तोपर्यंत संसाराचे भय आहे, हे भगवंतांनीच आपल्या वेदरूपीमुखाने सांगून ठेविले आहे॥ ३७६॥ सर्वांच्या पलीकडे जे ब्रह्म आहे, ते आत्मस्वरूपातच पर्यवसान पावते-म्हणजे आत्मस्वरूपाने अनुभवाला येते; म्हणून निराळेपणाची किंवा द्वैतरूपाची उणीव नाहीशी करण्याच्या उद्देशाने भगवंताने 'सत्' शब्द ठेविला आहे॥ ३७७॥

**गूढार्थदीपिका**—परब्रह्म सच्चिदानंदस्वरूप आहे, असे सांगितले असले तरी परब्रह्माच्या सत्, चित्, आनंद

या तिन्ही धर्मांचा आपल्या आत्मस्वरूपाचे ठिकाणीच अनुभव घ्यावा लागतो व म्हणूनच परब्रह्माचे व आत्मस्वरूपाचे ऐक्य किंवा आत्मा परब्रह्मस्वरूप आहे, असे श्रुतीत सांगितले आहे. आपल्या सदात्मस्वरूपाशी ऐक्य झाले असताच द्वैत नाहीसे होते; म्हणूनच येथे ब्रह्माकार झालेल्या कर्मामुळे भासणारे द्वैत नाहीसे करण्याकरिता त्याचे आत्मस्वरूपाशी 'सत्' शब्दाने ऐक्य सांगितले आहे.

नाम-रूप-कर्मे ही आत्मस्वरूपाहून भिन्न मानली असता मिथ्या ठरतात व त्यांचे सदात्मस्वरूपाशी ऐक्य केले तर ती सर्व सत्य होतात, असे आचार्यांनीहि छांदोग्योपनिषदात म्हटले आहे (छां० उ० भा० ६-३-२).

सारांश या 'सत्' शब्दाच्या विनियोगाने कर्म पूर्ण ब्रह्मस्वरूपच होऊन जाते, असा अर्थ.

**तरी ॐकार तत् कारीं। कर्म केलें जें ब्रह्म शरीरीं। जें प्रशस्तादि बोलवरी। वाखाणिलें॥ ३७८॥**
**प्रशस्तकर्मीं तिये। सच्छब्दा विनियोगु आहे। तोचि आइका होये। तैसा सांगों॥ ३७९॥**

**अर्थ**—ब्राह्मणशरीराचे ठिकाणी ओंकारतत्कारपूर्वक जे कर्म ब्रह्मरूप केले गेले ते 'प्रशस्त' या शब्दाने वाखाणिले जाते॥ ३७८॥ त्या प्रशस्त कर्माचे ठिकाणी 'सत्' शब्द जो लावला जातो, तोच कसा लावला जातो, हे सांगतो ऐका॥ ३७९॥

**सद्भावे साधुभावे च सदित्येतत्प्रयुज्यते। प्रशस्ते कर्मणि तथा सच्छब्दः पार्थ युज्यते॥ २६॥**

**अर्थ**—अर्जुना! अविनाशी भावाचे ठिकाणी, सद्वर्तनाचे ठिकाणी व तसेच चांगल्या मंगल कार्याचे ठिकाणी हा 'सत्' शब्द लावला जातो॥ २६॥

**तरी सच्छब्दें येणें। आटूनि असताचें नाणें। दाविजे अव्यंगवाणें। सत्तेचें रूप॥ ३८०॥**
**जें सतचि काळेंदेशें। होऊं नेणेचि अनारिसें। आपणपां आपण असे। अखंडित॥ ३८१॥**

**अर्थ**—या 'सत्' शब्दाच्या योगाने विनाशीपणाचे नाणे आटले जाऊन (नाहीसे होऊन) अविनाशी भावरूप सत्तेचे निर्दोषस्वरूप दाखविले जाते॥ ३८०॥ ते 'सत्' स्वरूप कोणत्याहि काळात व कोणत्याहि देशात 'असत्' होऊ शकत नाही. ते आपण आपल्या ठिकाणी अखंड, अविनाशी, अविकारी आहे॥ ३८१॥

**गूढार्थदीपिका**—माउलीने या ओवीत सत्स्वरूपाची व्याख्याच दिली आहे.

**हें दिसतें जेतुलें आहे। तें असत्पणें जें नोहे। देखतां रूपीं सोये। लाभे जयाची॥ ३८२॥**

**अर्थ**—असतपणाने जेवढे काही दिसते तेवढे ते नव्हे, असा विचार करून पाहिले असता ज्याचा आश्रय रूपाचे ठिकाणीहि लाभलेला दिसतो॥ ३८२॥

**गूढार्थदीपिका**—याचा अर्थ असा की रूपालाहि सत्स्वरूपाचाच आधार आहे. सत्स्वरूपाला सोडून रूपाला स्वतंत्र अस्तित्व नाही, म्हणून ते 'असत्' नाही.

"**दृश्य कीर दृष्टि असे। परि साच की दृष्टा असे**" (अमृ० प्र० ७-२०४) दृश्य, जड, असत् जगद्रूप नसून तेहि अविनाशी सद्रूप ब्रह्मच आहे असे माउलींनी अमृतानुभवातहि सांगितले आहे. अर्थात् सत्स्वरूपाचा विचार केला असता रूपहि सत्स्वरूपच ठरते.

**तेणेंसीं प्रशस्त तें कर्म। जें जालें सर्वात्मक ब्रह्म। देखिजे करूनि सम। ऐक्यबोधें॥ ३८३॥**
**तरी ॐकार तत्कारें। जें कर्म दाविलें ब्रह्माकारें। तें गिळुनि होइजे एकसरें। सन्मात्रचि॥ ३८४॥**
**ऐसा हा अंतरंगु। सच्छब्दाचा विनियोगु। जाण म्हणे श्रीरंगु। मी ना म्हणें हो॥ ३८५॥**
**ना मीचि जरी हो म्हणें। तरी श्रीरंगीं दुजें हेंचि उणें। म्हणौनि हें बोलणें। देवाचेंचि॥ ३८६॥**

**अर्थ**—जे प्रशस्त कर्म सत्स्वरूपासह सर्वात्मक ब्रह्मस्वरूप झाले त्याचे आपल्याशी ऐक्य आहे या ज्ञानबोधाने ते समस्वरूप पाहावे॥ ३८३॥ जे ओंकार-तत्कारपूर्वक केलेले कर्म ब्रह्माकार होते, असे जे मागे सांगितले ते सर्व द्वैत मनातून काढून टाकून केवळ सन्मात्रस्वरूप होऊन राहावे॥ ३८४॥ असा हा 'सत्' शब्दाचा अंतरंगविनियोग आहे, असे जाण, असे भगवान श्रीकृष्ण म्हणतात; मी म्हणत नाही, हो!॥ ३८५॥ आणि, मी म्हणतो,

असे जरी म्हटले तरी भगवंताहून मी अलग राहणे हे सर्वव्यापक भगवंताचे ठिकाणी उणेपण आहे. याहि दृष्टीने पाहता, हे म्हणणे भगवंताचेच आहे ॥ ३८६ ॥

**आतां आणिकीही परी। सच्छब्द हा अवधारीं। सात्त्विका कर्मा करी। उपकार जो॥ ३८७॥**
**तरी सत्कर्मे चांगें। चालिलीं अधिकारबगें। परी एकाधें का आंगें। हिणावती जैं॥ ३८८॥**
**तैं उणें एकें अवयवें। शरीर ठाके आघवें। का अंगहीन भांडावे। रथाची गती॥ ३८९॥**
**तैसें एकेंचि गुणेंवीण। सतचि परी असतपण। कर्म धरी गा जाण। जिये वेळे॥ ३९०॥**
**तेव्हां ओंकार तत्कारीं। सावायिला हा चांगी परी। सच्छब्दु कर्मा करी। जीर्णोद्धार॥ ३९१॥**
**तें असतपण फेडी। आणी सद्भावाचिये रूढी। निजसत्त्वाचिये प्रौढी। सच्छब्द हा॥ ३९२॥**

**अर्थ**—आणखी दुसरे असे की या 'सत्' शब्दाने सात्विक कर्मावर जो उपकार केला जातो, तो सांगतो, ऐक॥ ३८७॥ सात्विक कर्म अधिकारानुसार चांगले अनुष्ठिले जात असताना जर त्यात एखाद्या अंगाने वैगुण्य प्राप्त झाले तर॥ ३८८॥ ज्याप्रमाणे एखादे अंग किंवा अवयव नसले म्हणजे संपूर्ण शरीर त्या अवयवाचून राहते किंवा चाक वगैरे एखाद्या अंगाने हीन असलेल्या रथाची गति बंद पडते॥ ३८९॥ त्याप्रमाणे जेव्हा एका गुणाच्या उणेपणामुळे सत्कर्माला 'असत्' पण येते॥ ३९०॥ तेव्हा ओंकार-सत्कार यांचे साह्य असलेला हा 'सत्' शब्द त्या कर्माचा चांगला जीर्णोद्धार करतो-म्हणजे उणीव भरून काढतो व कर्म पूर्ण करतो॥ ३९१॥ हा 'सत्' शब्द आपल्या सद्भावाच्या भारदस्तपणामुळे कर्माचे 'असत्' पण नाहीसे करून त्याचे ठिकाणी 'सत्' पणा रूढ करतो॥ ३९२॥

**दिव्यौषध जैसें रोगिया। कां सावावो ये भंगलिया। सच्छब्द कर्मा व्यंगलिया। तैसा जाण॥ ३९३॥**
**अथवा कांहीं प्रमादें। कर्म आपुलिये मर्यादे। चुकोनि पडे निषिद्धे। वाटे हन॥ ३९४॥**
**चालतयाही मार्गु सांडे। पारखिया अखरें पडे। राहाटीमाजीं न घडे। काई काई॥ ३९५॥**
**म्हणौनि तैसी कर्मा। राभस्यें सांडे सीमा। असाधुत्वाचिया दुर्नामा। येवों पाहे जै॥ ३९६॥**
**तेथ गा हा सच्छब्दु। येरां दोहींपरीस प्रबुद्धु। प्रयोजिला करी साधु। कर्मातें यया॥ ३९७॥**
**लोहा परिसाची घृष्टी। वोहळा गंगेची भेटी। कां मृता जैसी वृष्टी। पीयूषाची॥ ३९८॥**
**पैं असाधु कर्मा तैसा। सच्छब्दप्रयोग वीरेशा। हें असो गौरवचि ऐसा। नामाचा यया॥ ३९९॥**

**अर्थ**—जसे दिव्य औषध रोग्याला किंवा साहाय्य मिळणे आशाभंग झालेल्यास, उत्साहजनक होते, त्याप्रमाणे कोण्याहि रीतीने व्यंग झालेल्या कर्माला 'सत्' शब्द हा पूर्ण करतो, असे जाण॥ ३९३॥ अथवा कोणत्या एखाद्या चुकीमुळे कर्म आपली विहित मर्यादा सोडून निषिद्ध कोटीत गेले तर॥ ३९४॥ चालणाऱ्याचीच वाट चुकते, परीक्षकच एखादे वेळी फसतो, व्यवहारामध्ये काय काय घडत नाही॥ ३९५॥ त्याप्रमाणे अविवेकाने एखादे वेळी कर्माची विहित मर्यादा ओलांडली जाऊन त्या कर्माला असाधु असे जे वाईट नाव प्राप्त होते॥ ३९६॥ असे झाले असता 'सत्' शब्द हा ॐकार व तत्कार या दोघांपेक्षा इतक्या पूर्ण अवस्थेला पोहोचला आहे की तो लावला असता कर्माला आपल्यासारखेच चांगले व पूर्ण करतो॥ ३९७॥ ज्याप्रमाणे लोखंडाला परिसाचा संसर्ग व्हावा, गंगेला ओढा मिळावा किंवा मेलेल्या माणसावर अमृताची वृष्टि व्हावी॥ ३९८॥ त्याप्रमाणेच, वीरश्रेष्ठा अर्जुना! अपूर्ण व निषिद्ध अशा कर्माला 'सत्' शब्द लावण्याचा उपयोग आहे. हे असो 'सत्' या नामाची अशी महतिच आहे॥ ३९९॥

**घेऊनि येथिंचे वर्म। जैं विचारिसी हें नाम्। तैं केवळ हेंचि ब्रह्म। जाणसी तूं॥ ४००॥**
**पाहें पां ॐ तत् सत् ऐसें। हें बोलणें तेथ नेतसे। जेथूनि का हें प्रकाशे। दृश्यजात॥ ४०१॥**
**तें तंव निर्विशिष्ट। परब्रह्म चोखट। तयाचें हें आंतुवट। व्यंजक नाम॥ ४०२॥**
**परी आश्रयो आकाशा। आकाशचि का जैसा। या नामा नामी आश्रयो तैसा। अभेदु असे॥ ४०३॥**

**अर्थ**—या नामाचे हे रहस्य जाणून तू नामाचा विचार करशील तेव्हा तुला असे दिसून येईल की ॐतत्-सत् हेच ब्रह्म आहे॥ ४००॥ हे पाहा अर्जुना! जेथून हे दृश्यजगत् प्रगट होते तेथेच ॐ-तत्-सत् हे नाम जीवाला

पोहचविते ॥ ४०१ ॥ ती वस्तु म्हणजे सर्व विशेषरहित असे शुद्ध परब्रह्म होय. त्याचा प्रत्यय आणून देणारे असे हे नाम अंतरंगभूत साधन आहे ॥ ४०२ ॥ ज्याप्रमाणे आकाशाला आकाशच आश्रय आहे, त्याप्रमाणे भगवंताच्या नामाला भगवंताचाच आश्रय असल्यामुळे भगवान व भगवंताचे नाव यांचा अभेदच आहे ॥ ४०३ ॥

**गूढार्थदीपिका**—म्हणूनच भगवान जसा अनध्यस्तविवर्तरूप आहे तसे त्याचे नावहि अनध्यस्तविवर्तरूप आहे, असेच सर्व संत मानतात.

**उदयिला आकाशीं। रवीचि रवीतें प्रकाशी। नामव्यक्ती तैसी। ब्रह्मा करी ॥ ४०४ ॥**

**अर्थ**—आकाशात सूर्य उगवला असता तो आपल्यालाच प्रकाशरूप करतो, त्याप्रमाणे ॐ-तत्-सत् हे व्यक्तनाम ब्रह्माला प्रकाशित करते ॥ ४०४ ॥

**यज्ञे तपसि दाने च स्थितिः सदिति चोच्यते। कर्म चैव तदर्थीयं सदित्येवाभिधीयते ॥ २७ ॥**

**अर्थ**—यज्ञ, दान व तप यांच्या अनुष्ठानात राहण्याच्या स्थितीला 'सत्' असे म्हणतात व त्यांच्याकरिता होणाऱ्या कर्मालाहि 'सत्' असे म्हणतात ॥ २७ ॥

**म्हणौनि त्र्यक्षर हें नाम। नव्हे जाण केवळ ब्रह्म। ययालागीं कर्म। जें जें कीजे ॥ ४०५ ॥**
**तें याग अथवा दानें। तपादिकें गहनें। तियें निफजतु कां न्यूनें। होऊनि ठातु ॥ ४०६ ॥**
**परी परिसाचां वरकलीं। नाहीं चोखाकिडाची बोली। तैसीं ब्रह्मीं अर्पितां केलीं। ब्रह्मचि होती ॥ ४०७ ॥**
**उणिया पुरियाची परी। नुरेचि तेथ अवधारीं। निवडूं न येती सागरीं। जैसिया नदी ॥ ४०८ ॥**
**एवं पार्था तुजप्रती। ब्रह्मनामाची हे शक्ती। सांगितली उपपत्ती। डोळसा गा ॥ ४०९ ॥**
**आणि येकेकाही अक्षरा। वेगळवेगळा वीरा। विनियोगु नागरा। बोलिलों रीती ॥ ४१० ॥**
**आतां एवं ऐसें सुमहिम। म्हणौनि हें ब्रह्मनाम। जाणितलें कीं सुवर्म। राया तुवां ॥ ४११ ॥**
**तरी येथूनि याचि श्रद्धा। उपलविली हो सर्वदा। जयाचें जालें बंधा। उरों नेदी ॥ ४१२ ॥**
**जिये कर्मीं हा प्रयोगु। अनुष्ठिजे सद्विनियोगु। तेथ अनुष्ठिला सांगु। वेदुचि तो ॥ ४१३ ॥**

**अर्थ**—म्हणून ॐ-तत्-सत् हे नुसते तीन अक्षरी नाम नसून ते केवळ परब्रह्मच होय, असे समज. याच्या निष्पत्तिकरिता जी जी थोर यज्ञ-याग, तप दाने इत्यादि कर्मे केली जातात ती सांग होवोत किंवा व्यंग होवोत ॥ ४०५-४०६ ॥ तरी ज्याप्रमाणे परिसाच्या कसोटीच्या स्पर्शाने झालेल्या सोन्यात, हे हीणकट आहे, हे चांगले आहे, अशी भाषा राहत नाही, त्याप्रमाणे परब्रह्माचे ठिकाणी अर्पण केलेली कर्मे सच्चिदानंद ब्रह्मस्वरूपच होतात ॥ ४०७ ॥ ज्याप्रमाणे समुद्रास मिळालेल्या नद्या पुनः ओळखता येत नाहीत, त्याप्रमाणे परब्रह्माला कर्मे अर्पण केली असता ती उणीपुरी राहत नाहीत, हे पक्के समज ॥ ४०८ ॥ याप्रमाणे, ज्ञानवान अर्जुना! तुला या ब्रह्मनामाच्या शक्तीची ही उपपत्ति सांगितली ॥ ४०९ ॥ आणि, हे वीरा अर्जुना! या ब्रह्मनामातील एक एक अक्षराचा वेगवेगळा विनियोगहि सुंदर रीतीने सांगितला ॥ ४१० ॥ अशा प्रकारे, वर सांगितल्याप्रमाणे त्याची उत्तम कीर्ति आहे, म्हणून ते परब्रह्माचे नाम झाले आहे, त्याचे हे नीट वर्म, हे राजा, जाणलेस ना! ॥ ४११ ॥ आजपासून ही नामाची श्रद्धा सदासर्वदा अशीच वाढलेली राहिली तर ती प्राप्त झालेल्या कर्मबंधनाला उरू देणार नाही ॥ ४१२ ॥ ज्या कर्मामध्ये 'ॐ-तत्-सत्' या ब्रह्मनामाचा उच्चार होऊन त्याचा योग्य विनियोग केला जाईल तेथे संपूर्ण वेदाचेच अनुष्ठान झाले ॥ ४१३ ॥

**अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत्। असदित्युच्यते पार्थ न च तत्प्रेत्य नो इह ॥ २८ ॥**

**ॐतत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे श्रद्धात्रयविभागयोगो नाम सप्तदशोऽध्यायः ॥ १७ ॥**

**अर्थ**—हे अर्जुना! अश्रद्धेने केलेल्या हवनाला, दिलेल्या दानाला, केलेल्या तपाला व केलेल्या स्तुति-नमस्कारादि कर्माला असत् म्हणतात. (हे सर्व करण्यात अत्यंत कष्ट होत असले) तरी त्याचे इहलोकी किंवा परलोकीहि फळ मिळत नाही॥ २८॥

**ना सांडूनि हे सोये। मोडूनि श्रद्धेची बाहे। दुराग्रहाची त्राये। वाढऊनियां॥ ४१४॥**
**मग अश्वमेध कोडी कीजे। रत्नें भरोनि पृथ्वी दीजे। एकांगुष्ठींही तपिजे। तपसाहस्त्रीं॥ ४१५॥**
**जळाशयाचेनि नांवें। समुद्र कीजती नवे। परी किंबहुना आघवें। वृथाचि तें॥ ४१६॥**
**खडकावरी वर्षलें। जैसें भस्मीं हवन केलें। कां खेंव दिधलें। साउलिये॥ ४१७॥**
**नातरी जैसें चडकणां। गगन हाणितलें अर्जुना। तैसा समारंभु सुणा। गेलाचि तो॥ ४१८॥**
**घाणा गाळिले गुंडे। तेथ तेल ना पेंडी जोडे। तैसें दरिद्र तेवढें। ठेलेंचि आंगीं॥ ४१९॥**
**गांठीं बांधली खापरी। येथें अथवा पैल्तीरीं। न सरोनि जैसी मारी। उपवासीं गा॥ ४२०॥**

**अर्थ**—कर्म करण्याची ही हातोटी सोडून देऊन व कर्माला लागणारा श्रद्धेचा हात मोडून टाकून अश्रद्धेने नुसत्या दुराग्रहाच्या बळावर कोट्यावधि अश्वमेध यज्ञ केले, रत्नांनी भरलेल्या पृथ्वीचे दान केले किंवा एका अंगुष्ठावर उभे राहण्यासारखी हजारो तपे केली अथवा फार काय सांगायचे! जलाशय निर्माण करण्याच्या नावाखाली समुद्रासारखे नवे समुद्र निर्माण केले तरी ते सर्व व्यर्थच होय॥ ४१४-४१६॥ ज्याप्रमाणे पाषाणावर झालेला पाण्याचा वर्षाव किंवा राखेत केलेले हवन, अथवा सावलीला दिलेले आलिंगन किंवा अर्जुना! आकाशाला मारलेली थापड व्यर्थ होय, त्याप्रमाणे अश्रद्धेने केलेले सर्व कार्यारंभ व्यर्थ होत॥ ४१७-४१८॥ ज्याप्रमाणे घाण्यात घालण्याकरिता टाकलेल्या दगडापासून तेल किंवा पेंड काहीच प्राप्त होत नाही, परंतु स्वतःचे दारिद्र्य तेवढे कायमच राहते॥ ४१९॥ कनवटीस खोचलेली खापरखुटी अलीकडील किंवा पलीकडील तीरावरील गावात कोठेहि चालत नसल्यामुळे जशी उपाशी मारते॥ ४२०॥

**तैसें कर्मजातें तेणें। नाहीं ऐहिकीचें भोगणें। तेथ परत्र ते कवणें। अपेक्षावे॥ ४२१॥**
**म्हणौनि ब्रह्मनामश्रद्धा। सांडूनि कीजे जो धांदा। हें असो सिणू नुसधा। दृष्टादृष्टीं तो॥ ४२२॥**
**ऐसें कलुषकरिकेसरी। त्रितापतिमिरतमारी। श्रीवीरवरनरहरी। बोलिलें तेणें॥ ४२३॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे अश्रद्धेने केलेल्या कर्मजाताने जेथे ऐहिक भोगच मिळत नाही, तेथे त्यांच्या योगाने परलोकातील भोग मिळतील, अशी आशा कशी करावी?॥ ४२१॥ म्हणून ॐ-तत्-सत् या ब्रह्मनामाचा प्रयोग व श्रद्धा यांना सोडून केलेले कोणतेहि कर्म, इहपरलोकी नुसता शीणच होय॥ ४२२॥ पापरूपी हत्तीला मारणारा सिंह, त्रिविध दुःखरूप अंधाराचा नाश करणारा सूर्य, लक्ष्मीचा पति, पराक्रमी, नरहरी असा हा भगवान श्रीहरी असे बोलता झाला॥ ४२३॥

**तेथ निजानंदा बहुवसा-। माजीं अर्जुन तो सहसा। हरपला चंद्रु जैसा। चांदिणेनि॥ ४२४॥**
**अहो संग्रामु हा वाणिया। मापें नाराचांचिया आणिया। सूनि मांस घे मवणिया। जीवितेंसी॥ ४२५॥**
**ऐसिया समयीं कर्कशें। भोगीजत स्वानंदराज्य कैसें। आजि भाग्योदयो हा नसे। आणिके ठायी॥ ४२६॥**
**संजयो म्हणे कौरवराया। गुणा रिझों ये रिपूचिया। आणि गुरुही हा आमुचिया। सुखाचा येथ॥ ४२७॥**
**हा न पुसता हे गोठी। तरी देवो कां सोडिते गांठी। तरी कैसेनि आम्हां भेटी। परमार्थेसी॥ ४२८॥**
**होतों अज्ञानाच्या आंधारां। वोसंतीत जन्मवाहरा। तें आत्मप्रकाशमंदिरा-। आंत आणिलें॥ ४२९॥**
**एवढा आम्हां तुम्हां थोरु। केला येणें हा उपकारु। म्हणोनि हा व्याससहोदरु। गुरुत्वें होय॥ ४३०॥**
**तेवींचि संजयो म्हणे चित्तीं। अतिशयो या नृपती। खुपेल म्हणौनि किती। बोलत असों॥ ४३१॥**

**ऐसी हे बोली सांडिली। मग येरीचि गोठी आदरिली। जे पार्थे कां पुसिली। श्रीकृष्णातें॥ ४३२॥**
**याचें जैसें कां करणें। तैसें मीही करीन बोलणें। ऐकिजो ज्ञानदेवो म्हणे। निवृत्तीचा॥ ४३३॥**

**इति श्रीज्ञानदेवविरचिता भावार्थदीपिकायां सप्तदशोऽध्यायः॥ १७॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे चंद्रापेक्षा पुष्कळपटीने असलेल्या (सूर्याच्या) प्रकाशात चंद्र हारपला जातो, त्याप्रमाणे अपार अशा आत्मानंदात अर्जुन तात्काळ निमग्न झाला॥ ४२४॥ अहो! कौरवपांडवाचा युद्धप्रसंग म्हणजे एक वाणीच होय. बाणांची अग्ररूपे मागे घालून तो प्राणासह मांसाचे माप घेत आहे॥ ४२५॥ अशा कठोर प्रसंगी तो अर्जुन स्वानंदाचे साम्राज्य कसे भोगित आहे, पाहा! अर्जुनावाचून दुसऱ्याचे ठिकाणी असा भाग्योदय झालेला दिसणार नाही॥ ४२६॥ संजय म्हणतो, हे कौरवांच्या राजा धृतराष्ट्रा! शत्रूच्या गुणाने आनंद होतो व तो आमच्या सुखप्राप्तीला कारण असल्यामुळे गुरुस्थानीहि आहे॥ ४२७॥ अर्जुनाने ही गोष्ट विचारलीच नसती तर देवांनी तरी प्रक्रियारूप गाठोडीची गाठ कशाला सोडली असती व मग आमच्यासारख्याला परमार्थाचा लाभ कसा झाला असता?॥ ४२८॥ जो मी आता विस्मृतिरूप आंधारात जन्मदुःख भोगित होतो, त्या मला आत्मस्मृति करून देऊन आत्मप्रकाशरूप मंदिरात आणले॥ ४२९॥ एवढा मोठा उपकार या अर्जुनाने आपल्यावर केला असल्यामुळे तो भगवान व्यासांचा बंधु व आपला गुरु झाला आहे॥ ४३०॥ तसेच संजय आपल्या चित्तात म्हणतो, अर्जुनाची केलेली स्तुति राजाच्या मनाला झोंबेल, म्हणून आता किती बोलायचे!॥ ४३१॥ असा विचार करून त्याने बोलणे आटोपते घेतले व मग अर्जुनाने भगवान श्रीकृष्णाला जी गोष्ट विचारली, हो त्या दुसऱ्याच गोष्टीविषयी बोलणे सुरू केले॥ ४३२॥ श्रीनिवृत्तिनाथ महाराजांचे श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात, ऐका! त्यांचे जसे करणे झाले आहे, तदनुरूपच मीहि निरूपणाचे बोलणे करीन॥ ४३३॥

**श्रीसद्गुरुमाऊलीच्या कृपाप्रसादाने श्रीज्ञानेश्वरीच्या सतराव्या अध्यायाचा अनुवाद गूढार्थदीपिकेसह समाप्त झाला, तो श्रीगुरुमाउलीच्या चरणी समर्पण असो.**



## समारोप

मागे सोळाव्या अध्यायाच्या शेवटी भगवंतांनी असा निर्णय केला की कर्तव्याकर्तव्याच्या निश्चितीकरिता एक शास्त्रच प्रमाण मानले पाहिजे. तेव्हा अर्जुनाला अशी शंका आली की, हे कर्म कर्तव्य होय किंवा कर्तव्य नव्हे, असे नुसत्या श्रद्धेने ठरविता येणार नाही काय? म्हणून अर्जुनाने प्रश्न केला की, हे भगवंता! शास्त्र न पाहता जे केवळ श्रद्धेने यजन करतात त्यांची ती निष्ठा सात्विक, राजस की तामस?

भगवान म्हणतात, अर्जुना! शास्त्राभ्यास किंवा शास्त्रावलोकन न करणाऱ्या लोकांची पूर्वकर्मानुसार प्राप्त होणारी स्वाभाविक श्रद्धाहि सात्विक, राजस, तामस अशी तीन प्रकारची असते. हा पुरुष श्रद्धामयच आहे. सात्विक पुरुषाची श्रुतिस्मृतिपुराणात सांगितलेल्या शिव व विष्णु यांच्या पूजनाचे ठिकाणी श्रद्धा असते. राजस श्रद्धेचे पुरुष यक्ष व राक्षस यांचे पूजन करतात व तामस श्रद्धेचे पुरुष भूतप्रेतादिकांचे पूजन करतात.

या तीन श्रद्धेपैकी रजोगुणी, तमोगुणी या दोन श्रद्धा अध:पतनाला कारणीभूत असल्यामुळे नि:शेष टाकून देऊन सात्विक श्रद्धाच जतन करावी. तसेच ज्यायोगे चित्तात सत्वगुण दृढ ठसेल, अशी संगति धरावी व सत्वगुण ज्यात अधिक आहे, असा आहार घ्यावा. खाल्लेल्या अन्नाप्रमाणेच मनुष्याचे मन बनते. सर्व मनुष्यांना प्रिय असलेला आहार सात्विक, राजस, तामस असा तीन प्रकारचा आहे. त्याचप्रमाणे यज्ञ, तप व दान हेहि तीन प्रकारचे आहेत.

भगवान म्हणतात, अर्जुना! प्रथम आहाराचे भेद सांगतो, ऐक.

**आहार**—सात्विक पुरुषाला प्रिय असलेला आहार, आयुष्य, चित्तातील स्थैर्य, शक्ति, आरोग्य, सुख व अभिरुचि इत्यादि सात्विक गुण वाढविणारा, स्वभावत:च रसभरित, आंगचाच स्निग्ध, शरीरात बराच वेळ टिकणारा व इंद्रियांना समाधान देणारा, असा असतो. राजस पुरुषाला प्रिय असलेला आहार, अति कडू, अति आंबट, अति तिखट, अति खारट, अति उष्ण, अति रुक्ष व शरीराचा दाह करणारा म्हणून दु:ख, शोक व रोग यांना उत्पन्न करणारा असतो. तामस पुरुषाला प्रिय असलेला आहार, निरस, दुर्गंधीयुक्त, शिळा, उष्टा व अपवित्र असा असतो.

**यज्ञ**—फळाची यत्किंचितहि इच्छा न करता शास्त्रविधीला धरून केला जाणारा सात्विक यज्ञ होय. फळाची इच्छा धरून लोकात प्रतिष्ठा मिरविण्याकरिता केला जाणारा यज्ञ राजस यज्ञ होय. शास्त्रविधि, यथोक्त अन्नदान, वैदिक मंत्र, शास्त्रोक्त दक्षिणा व श्रद्धा याविरहित केल्या जाणाऱ्या यज्ञाला तामस यज्ञ म्हणतात.

**तप**—अर्जुना! आता तपाचे स्वरूप ऐक.

तप हे शारीरिक, वाचिक व मानसिक असे तीन प्रकारचे आहे. देव, ब्राह्मण, गुरु व ज्ञानी यांचे पूजन करणे, शरीरशुद्धि, सरळपणाने वागणे, ब्रह्मचर्य व कोण्याहि प्राण्याची हिंसा न करणे ही कर्मे शरीराने होत असल्यामुळे याला शारीरिक तप म्हणतात.

खिन्नता उत्पन्न न करणारे, सत्य प्रिय व हितकारक असे बोलणे व आपल्याला पठण करण्यास योग्य म्हणून स्वीकारलेली स्तोत्रे व ग्रंथ यांचा अभ्यास करणे, याला वाचिक तप म्हणतात.

रागद्वेषरहित मन होणे, मनात सर्व लोकांच्या हिताची इच्छा व निष्कपट बुद्धि असणे याला मानसिक तप म्हणतात. हेच तप अत्यंत श्रद्धेने व फळाची इच्छा न धरता केले असता, ते सात्विक तप होते व फळाची इच्छा धरून प्रतिष्ठा मिरविण्याकरिता केले असता राजस तप होते; तसेच अविकारी अंत:करणाने आपल्या देहाला अत्यंत पीडा देऊन दुसऱ्याचा नाश करण्याकरिता केलेले तप तामस म्हटले जाते.

**दान**—पुण्यक्षेत्रात, पुण्यकाली, उपकार फेडण्यास असमर्थ व वेदपारंगत अशा ब्राह्मणाला दिले जाणारे दान सात्विक दान होय.

प्रत्युपकाराच्या आणि फळ मिळण्याच्या बुद्धीने व कष्टी अंत:करणाने केलेले दान राजस दान होय.

संध्यासमयी किंवा रात्री, अधर्माने मिळविलेल्या धनाचे, पापी लोकांना दान करणे याला तामस दान म्हणतात.

भगवान म्हणतात अर्जुना! आम्ही श्रद्धेपासून दानापर्यंत सत्व, रज, तम या तीन गुणांनी व्याप्त ह्या ज्या क्रिया सांगितल्या त्या, सात्विक कर्माचे स्वरूप स्पष्ट करण्याकरिता सांगितल्या. तू सत्वगुणाचा आश्रय करून सात्विक कर्मेच कर व राजस-तामस कर्माचा त्याग कर.

केलेल्या सात्विक कर्माने मोक्षसिद्धि कशी होते याचे वर्म मी तुला आता सांगतो, ऐक.

परब्रह्माचा ॐ, तत्, सत् असा तीन प्रकाराने नामनिर्देश केला आहे. या त्रिविध नामनिर्देशद्वाराच ब्राह्मण, वेद व यज्ञ निर्माण केले गेले, म्हणून मोक्षाची इच्छा करणाऱ्या वेदवादी ब्राह्मणांच्या यज्ञ, दान, तप इत्यादि सर्व क्रिया प्रथम ॐकाराचा उच्चार करून नेहमी होत असतात. केवळ तत्वाच्य ब्रह्माकडे लक्ष देऊन ते नाना प्रकारचे यज्ञ-दान-तपादि कर्मे करतात व तसेच अस्तित्व सद्वृत्तत्व या अर्थी प्रशस्त कर्मांचे ठिकाणी सत् शब्द लावला जातो. अशा प्रकारे ॐ, तत्, सत् या तीन नामांचा विनियोग करून यज्ञ, दान, तप यांचा अनुष्ठानात राहणाऱ्या स्थितीला सत् असे म्हणतात. जे अश्रद्धेने हवन केले जाते, दान दिले जाते ते असत् कर्म होय. इहलोकी किंवा मरणानंतर त्याचे काही फळ होत नाही.

**॥ श्रीमद्सद्गुरु श्रीज्ञानेश्वर महाराजार्पणमस्तु ॥**

